॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय अकरावा

**अवतरणिका**—मागील दहाव्या अध्यायांत, भगवंतांनी आपल्या विभूति सांगितल्या; पण त्या ऐकून, अर्जुनाचें समाधान न होतां, सर्व नामरूपांत पूर्ण सच्चिदानंद, एक अद्वैत परब्रह्मच कसें भरलें आहे, हें प्रत्यक्ष डोळ्यांनीच अनुभवितां आले, तर फार बरें होईल, अशी त्याची उत्कंठा वाढून, अर्जुनाने भगवंताला आपली उत्कंठा निवेदन केली व विश्वरूपाचें दर्शनाविषयीं भगवंतापाशीं आळ घेतली, भगवंतांनी त्याला दिव्य दृष्टि देऊन विश्वरूपदर्शनाची ती आळ पुरविली, हेंच या अध्यायांत सांगितलें आहे.

**आतां यावरी एकादशीं। कथा आहे दोन्ही रसीं। येथ पार्था विश्वरूपेसीं। होईल भेटी॥ १ ॥**

**अर्थ**—यानंतर आतां जेथें अर्जुनाला विश्वरूपाचें दर्शन होणार आहे, त्या अकराव्या अध्यायांतील कथाभागांत दोन रस मुख्यत: व्यक्त झालेले आहेत. ॥ १ ॥

**जेथ शांताचिया घरा। अद्भुत आला आहे पाहुणेरा। आणि येरांही रसां पांतिकरां। जाहला मानु॥ २ ॥**

**अर्थ**—याप्रमाणे या अध्यायांत शांतरसाचे घरीं, अद्भुत रस हा पाहुणचाराला आला आहे असें दिसेल आणि इतरहि रसांना त्यांच्या पंक्तीस पाहुणचार घेण्याचा मान मिळणार आहे ॥ २ ॥

**गूढार्थदीपिका**—श्रृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत असे नव रस आहेत. रति, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, तिटकारा, आश्चर्य व निर्वेद (वैराग्य) हे मनोविकार क्रमाने नवरसांचे स्थायिभाव आहेत. हे मनोविकार मनुष्याचे ठिकाणी सूक्ष्मरूपाने नेहमींच असतात, म्हणून यांना स्थायिभाव म्हणतात.

विभाव, अनुभाव, व्यभिचारीभाव यांच्या योगाने स्थायिभाव उत्कट वाढून, पुरुष 'तदेकचित्त' झाला असतां, रस प्रगट होतो.

विभाव हा आलंबन विभाव व उद्दीपन विभाव असा दोन प्रकारचा आहे. ज्या विषयाला धरून रस उत्पन्न होतो त्याला 'आलंबन विभाव' म्हणतात व ज्यांच्या योगाने स्थायिभाव उद्दीपित होतात म्हणजे वाढतात, त्याला 'उद्दीपन विभाव' म्हणतात.

रसोत्पत्तिनंतर शरीराचे ठिकाणी अनुभविले जाणारे जे भाव, त्यांना अनुभाव म्हणतात. स्थायिभावाच्या उद्दीपनाला सहायभूत होणारे आणखी व्यभिचारी भावहि असतात.

'भगवद्भक्ति चंद्रिकामृतरसोल्हास' या ग्रंथांत ग्रंथकाराने व सर्व संतांनी भगवद्भक्ति हा दहावा रस मानला आहे. तो या अध्यायांत विशेषत: व्यक्त झालेला नाही; कारण या रसाचा, प्रेम हा स्थायिभाव आहे व विश्वरूपाचें दर्शनाने अर्जुनाला, त्याविषयी प्रेम उत्पन्न झालें नाही, हें अर्जुनानेच, पुढें "बुद्धीतें सांडूनि ज्ञान। भेणें वळघलें रान। अहंकारें मन। देशधडी जाहालें" (ओ० ६६४) या ओवीने सांगितलें आहे.

**शांताचिया घरा। अद्भुत आला आहे पाहुणेरा**—निर्वेद म्हणजे विषयवैराग्य, हा शांतरसाचा स्थायिभाव होय हे वर सांगितलेंच आहे. या शांतरसाचें आलंबन व्यापक ब्रह्मस्वरूप असतें. भगवंतांनी आपल्या व्यापक विश्वरूपाचें दर्शन करून देऊन अर्जुनाचे मनांत प्रथम शांतरस उत्पन्न केला आणि नंतर तें अत्यंत आश्चर्यकारक विश्वरूप पाहून त्याचे ठिकाणी अद्भुतरसहि उत्पन्न झाला, हेच "शांताचिया घरां। अद्भुत आला आहे पाहुणेरा" या चरणांनी माऊलींनी सुचविलें आहे.

**येरांहि रसां पांतिकरा। जाहाला मान**—इतरहि जे हास्य, करुण, रौद्र, भयानक इत्यादि रस आहेत, तेहि अर्जुनाचे ठिकाणीं उत्पन्न होतांना दिसतील असा अर्थ.

**अहो वधुवरांचिये मिळणीं। जैशीं वराडियांही लुगडीं लेणीं। तैसे देशियेच्या सुखासनी। मिरविले रस॥ ३॥**

**अर्थ**—अहो! ज्याप्रमाणे मुलामुलीच्या लग्नांत आलेले पाहुणे वस्त्रालंकारांनी सुशोभित होऊन मिरवितात. त्याप्रमाणे या मराठी भाषेच्या पालखींत बसून हे सर्व रस मिरवितील॥३॥

**परि शांताद्भुत बरवे। जे डोळियांचां अंजुळीं घ्यावे। जैसे हरिहर प्रेमभावें। आले खेंवा॥ ४॥**

**अर्थ**—पण ज्याप्रमाणे हरिहरांनी प्रेमाने आलिंगन द्यावें, त्याप्रमाणें शांत व अद्भुत हे दोन रस मात्र डोळ्यांच्या आंजोळीने म्हणजे स्पष्टपणे घेता येतील॥ ४॥

**गूढार्थदीपिका—हरिहर प्रेमभावें। आले खेंवा**—हरि हे संपूर्ण ऐश्वर्यसंपन्न असून वैकुंठवासी आहेत, तर हर हे कडकडित वैराग्यसंपन्न असून श्मशानवासी आहेत. या दोघांच्या मिळणीची येथे शांतरस व अद्भुतरस यांच्या मिळणीला जी उपमा दिली आहे, ती अत्यंत उचित आहे; कारण हराच्या आलंबनाने त्यांचे ज्ञान, वैराग्य इत्यादि गुण ऐकून शांतरस उत्पन्न होतो व हरीच्या आलंबनाने त्यांचे अद्भुत पराक्रमादि गुण ऐकून अद्भुतरस उत्पन्न होतो.

**ना तरी अंवसेचां दिवशीं। भेटलीं बिंबें दोनी जैशीं। तेवीं एकवळा रसीं। केला एथ॥ ५॥**

**अर्थ**—किंवा अमावस्येच्या दिवशीं, ज्याप्रमाणें सूर्यबिंब व चंद्रबिंब हीं दोन्ही बिंबें मिळून जातात, त्याप्रमाणें या अध्यायांत दोन रस एकत्र मिळालेले आहेत.॥ ५॥

**गूढार्थदीपिका**—सूर्याचा प्रकाश अद्भुत असल्यामुळे व चंद्राचा प्रकाश शांत असल्यामुळे सूर्यबिंबाची व चंद्रबिंबाची दिलेली ही उपमा अत्यंत उचित आहे.

**मीनले गंगेयमुनचे ओघ। तैसें रसां जाहलें प्रयाग। म्हणोनि सुस्नात होत जग। आवघें एथ॥ ६ ॥**
**माजि गीता सरस्वती गुप्त। आणि दोनी रस ते ओघ मूर्त। यालागी त्रिवेणी हे उचित। फावली बापा॥ ७ ॥**
**एथ श्रवणाचेनि द्वारें। तीर्थीं रिघतां सोपारें। ज्ञानदेव म्हणे दातारें। माझेनि केलें॥ ८ ॥**
**तीरें संस्कृताची गहनें। तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें। रचिलीं धर्मनिधानें। श्रीनिवृत्तिदेवें॥ ९ ॥**
**म्हणौनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें। प्रयागमाधव विश्वरूप पाहावें। येतुलेनि संसारासि द्यावें। तिळोदक॥ १०॥**

**अर्थ**—किंवा ज्याप्रमाणे गंगायमुना यांचे प्रवाह प्रयागाचे ठिकाणी एकत्र झाले, त्याप्रमाणे हा अध्याय शांत व अद्भुत या रसांचें प्रयागस्थळ झालें आहे; म्हणून सर्व जग प्रयागक्षेत्राप्रमाणे येथे स्नान करून पवित्र होईल॥ ६॥ ज्याप्रमाणे प्रयागाचे ठिकाणी गंगा यमुना यांच्या संगमांत गुप्तपणें सरस्वति नदीचा संगम होऊन, प्रयाग हें त्रिवेणी संगमाचें स्थान झालें आहे, त्याप्रमाणे या अध्यायांतहि शांत व अद्भुत या दोन रसांचे प्रगट प्रवाह असून त्यामध्ये भगवंताची गीतारूप रसाळवाणीरूपी सरस्वति नदीचा गुप्त प्रवाह असल्यामुळे, बापहो! हा अध्याय म्हणजे योग्य असा त्रिवेणीसंगमच झाला आहे॥ ७॥ श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, स्वामी निवृत्तिनाथांनी मला निमित्त करून या त्रिवेणीक्षेत्रांत जाण्याकरितां श्रवणाचा सोपा मार्ग करून दिला॥ ८॥ संपूर्ण धर्माची ठेव अशा श्रीनिवृत्तिनाथांनी या संगमाच्या तीरावरील मूळच्या संस्कृत भाषेचीं दुर्गम अरण्यें तोडून मराठी शब्दरूपी पायऱ्या बांधल्या॥ ९॥ म्हणून कोणीहि येथे सद्भाव धरून स्नान करावें व या प्रयागांतील माधव जें विश्वरूप त्याचें दर्शन घ्यावें. एवढ्यानेच त्यांना संसाराचा निरास करतां येईल॥ १०॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताचे त्रिगुणरहित निर्गुणस्वरूप त्रिगुणरहित राहूनच अनंत नामरूपाने नटलेलें विश्वरूप होतें. अशा विश्वरूपाचा अनुभव आला असतां, ज्या नामरूपाच्या देखाव्याला आपण संसार म्हणतो, त्या संसाराचा ठावठिकाणच उरत नाही, असा अर्थ.

**हें असो ऐसे सावयव। येथ सासिन्नलें आथी रसभाव। तेथ श्रवणसुखाची राणीव। जोडली जगा॥ ११॥**

**अर्थ**—असे हें सावयव रूपकाचें निरूपण पुरे. या अध्यायांत रसभाव भरास आलेले आहेत आणि येथे सर्व

जगाला श्रवणाच्या आनंदाचें राज्यच प्राप्त होईल (श्रवणापासून परम सुख प्राप्त होईल असा अर्थ) ॥११॥

**गूढार्थदीपिका—हें असो ऐसें सावयव**-साहित्यशास्त्रांत रूपक हें सावयव व निरवयव असे दोन प्रकारचे सांगितलें आहे. रूपकांची परस्पर सापेक्षता असणाऱ्या रूपकांच्या समूहाला सावयवरूपक म्हणतात व तशी सापेक्षता नसलेल्या रूपकाला निरवयव रूपक म्हणतात. येथील रूपकें परस्पर सापेक्ष असल्यामुळे हीं रूपकें सावयव आहेत असे माउलीचे म्हणणे आहे.

**जेथ शांताद्भुत रोकडे। आणि येरां रसां पडप जोडे। हें अल्पचि परि उघडें। कैवल्य जेथ॥ १२॥**

**अर्थ**—जेथे केवळ शांतरस व अद्भुतरस हे स्पष्ट आहेत आणि बाकींच्या रसांनाहि शोभा म्हणजे मान प्राप्त झाला आहे. हे थोडे असले तरी उघड मोक्ष प्राप्त करून देणारे आहेत॥ १२॥

**तो हा अकरावा अध्यायो। जो देवाचा आपणपें विसंवता ठावो। परि अर्जुन सदैवांचा रावो। जे एथही पातला॥ १३॥**

**अर्थ**—तो हा अकरावा अध्याय म्हणजे स्वत: भगवान श्रीकृष्णाच्या विश्रांतीच्या ठिकाणाचें निरूपण करणारा होय. पण अर्जुन मात्र सर्व भाग्यवानांमध्ये थोर भाग्यवान आहे, कारण तो येथेहि प्राप्त झाला॥ १३॥

**गूढार्थदीपिका—जो देवाचा आपणपें विसंवता ठावो**-भगवंताचा सगुण साकार चतुर्भुजादि मूर्त्याविष्कार या विश्वरूपापासूनच होतो व तेथेच पुन: अंतर्धान पावतो असा अर्थ.

**एथ अर्जुनचि काय म्हणों पातला। आजि आवडतयाही सुकाळु जाहला। जे गीतार्थु हा आला। मऱ्हाठिये॥ १४॥**
**याचिलागीं माझें। विनविलें तें आइकिजे। तरि अवधान दीजे। सज्जनीं तुम्हीं॥ १५॥**
**तेवींचि तुम्हां संतांचिये सभे। ऐसी सलगी कीर करूं न लभे। परि मानावें जी तुम्ही लोभें। अपत्या मज॥ १६॥**
**अहो पुंसा आपणचि पढविजे। मग पढे तरी माथा तुकिजे। कां करविलेनि चोजें न रिझे। बाळका माय॥ १७॥**
**तेवीं मी जें जें बोलें। तें प्रभु तुमचेंचि शिकविलें। म्हणोनि अवधारिजो आपुलें। आपण देवा॥ १८॥**

**अर्थ**—एकट्या अर्जुनालाच हा लाभ प्राप्त झाला असे कां म्हणावें? गीतार्थ हा आतां मराठी भाषेंत आला असल्यामुळे, वाटेल त्याला सहज प्राप्त होण्याजोगा झाला आहे॥ १४॥ म्हणूनच तुम्ही संतजनांनी एकाग्र चित्त द्यावें व माझी विनंति ऐकावी॥ १५॥ त्याचप्रमाणे तुमच्यासारख्या संतसमाजांमध्ये मी असा धीटपणा करणें खरोखर बरें नाही, पण तुम्ही आईबापांनी माझ्यासारख्या लेंकराच्या विनंतीला पुत्रलोभाने मान द्यावा॥ १६॥ अहो! राघूला आपणच शिकवावें व शिकून तो राघू बोलूं लागला म्हणजे आपणच आनंदाने मान डोलवावी किंवा लेंकराकडून एखादी कौतुकाची गोष्ट करवून, ती पाहून आई आपणच आनंदित होत नाही काय?॥ १७॥ त्याप्रमाणे मी जें जें बोलतों तें तें, महाराज! तुम्हीं शिकविलेलेंच बोलतों, म्हणून देवा! तुमचे शिकविलेलेंच तुम्ही ऐका॥ १८॥

**गूढार्थदीपिका**—प्राप्त झालेलें ज्ञान, श्रीगुरुकृपेचेंच फळ आहे अशी कृतज्ञताबुद्धि सत्पुरुष अखंड वागवितात.

**हें सारस्वताचें गोड। तुम्हींचि लाविलें जी झाड। तरी आतां अवधानामृतें वाड। सिंपोनि कीजो॥ १९॥**
**मग हें रसभावफुलीं फुलेल। नानार्थफळभारें फळा येईल। तुमचेनि धर्में होईल। सुकाळ जगा॥ २०॥**
**या बोला संत रिझले। म्हणती तोषलों गा भलें केलें। आतां सांगे जें बोलिलें। अर्जुनें तेथ॥ २१॥**

**अर्थ**—हें ललितवाङ्मयाचे मधुर झाड तुम्हींच लाविलें, तेव्हा आतां त्यावर अवधानरूपी अमृताचें सिंचन करून त्याचें पोषण करावें॥ १९॥ मग हें झाड, नानारसभावरूपी फुलाने फुलून जाईल आणि अनेक अर्थरूपी फळभाराने तें फलद्रूप होईल. तुमच्या या परोपकाररूपी धर्माने सर्व जगाला सुखाचा लाभ होईल॥ २०॥ श्रीज्ञानेश्वर माउलीच्या या बोलण्याने संतांना फार समाधान झालें व ते म्हणाले, बाबा! फार चांगले बोललास! आम्हांला संतोष झाला आतां पुढे अर्जुन काय म्हणाला तें सांगा॥ २१॥

**गूढार्थदीपिका**—संत स्वत: निरहंकारी व अत्यंत नम्र असतात; म्हणूनच त्यांना निरहंकाराने व नम्रतेने विनंति करणाऱ्यांचें प्रेम उत्पन्न होतें.

**तंव निवृत्तिदास म्हणे। जी कृष्णार्जुनांचें बोलणें। मी प्राकृत काय सांगों जाणें। परि सांगवा तुम्ही॥ २२॥**
**अहो रानींचिया पालेखाइरा। नेवाणें करविजे लंकेश्वरा। एकल्ला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा। न जिणेचि काई॥ २३॥**
**म्हणोनि समर्थ जें जें करी। तें न हो न ये चराचरीं। तुम्ही संत तयापरी। बोल्वा मातें॥ २४॥**
**आतां बोलिजतसे आइका। हा गीताभाव निका। जो श्रीवैकुंठनायका। मुखौनि निघाल्ल॥ २५॥**
**बाप बाप ग्रंथ गीता। जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथी॥ २६॥**

**अर्थ**—तेव्हा निवृत्तिनाथांचे दास श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, अहो महाराज! श्रीकृष्णार्जुनाचे पुढें काय बोलणें झालें, हें मज अज्ञानी लेंकराला काय सांगतां येईल? परंतु तुम्हीच माझ्याकडून बोलवा॥ २२॥ अहो! जंगलांतील झाडांचा पाला खाऊन राहणाऱ्या वानरांकडून लंकेश्वर जो रावण त्याचा श्रीरामांनी पराभव करविला. एकटा अर्जुन, पण त्याने कौरवांचे अकरा अक्षौहिणी सैन्य जिंकलें नाही काय?॥ २३॥ म्हणून समर्थ जे करूं म्हणतील जे जगांत घडून येणार नाही असे होत नाही. त्याप्रमाणे आपण संतजनांनीहि माझ्याकडून बोलवावें॥ २४॥ श्रीवैकुंठीचा स्वामी जो भगवान श्रीकृष्ण, त्याच्या मुखांतून जो उत्तम गीतोपदेश निघाला तो मी आतां सांगतों, ऐका॥ २५॥ धन्य धन्य हा गीता ग्रंथ! कारण संपूर्ण वेदांनी ज्याचें वर्णन केलें, तोच भगवान श्रीकृष्ण साक्षात् हा ग्रंथ सांगत आहे॥ २६॥

**गूढार्थदीपिका—बाप बाप ग्रंथ गीता**-या वचनाने गीतेचें वेदतुल्य सर्वोच्च प्रामाण्य दाखविलें आहे.

**जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथीं**-या चरणांनी वेद निर्माणकर्ता व वेदांनी प्रतिपादिलेला जो भगवान, तोच भगवान श्रीकृष्ण असून, त्यांनीच गीता सांगितली आहे, हे गीतेच्या सर्वोच्च प्रामाण्याचें कारण दिलें आहे. तसेच वेदाने ज्या देवतेचें किंवा ज्या परमेश्वराचें प्रतिपादन केलें, तोच श्रीकृष्ण होय असे म्हणून, माउलींनी भगवान श्रीकृष्णाचें पूर्णब्रह्मत्व दाखविलें असून, गीता ही त्यांनीच सांगितली असल्यामुळे गीतेचें व वेदांचें तुल्य प्रामाण्य आहे असें सुचविलें आहे.

**तेथिंचे गौरव कैसें वानावें। जें श्रीशंभूचिये मती नागवे। तें आतां नमस्कारिजे जीवेंभावें। हेंचि भलें॥ २७॥**
**मग आइका तो किरीटी। घाल्लूनि विश्वरूपीं दिठी। पहिल्लि कैसी गोठी। करिता जाहल्ला॥ २८॥**
**हें सर्वही सर्वेश्वरु। ऐसा प्रतीतिगत जो पतिकरु। तो बाहेरी होआवा गोचरु। ल्लेचनासी॥ २९॥**
**हे जीवाआंतुल्लि चाड। परि देवासि सांगतां सांकड। कां जें विश्वरूप गूढ। कैसेनि पुसावें॥ ३०॥**
**म्हणे मागां कवणीं कहीं। जे पढियंतेनें पुसिलें नाहीं। सहसा कैसें काई। सांगा म्हणों॥ ३१॥**
**मी जरी सल्गीचा चांगु। तरी काय आइसीहुनि अंतरंगु। परि तेही हा प्रसंगु। बिहाल्लि पुसों॥ ३२॥**
**माझी आवडे तैसी सेवा जाहल्ली। तरि काय होईल गरुडाचिया येतुल्ली। परि तोही हे बोल्ली। करीचिना॥ ३३॥**
**मी काय सनकादिकांहूनि जवळां। परि तयांही नागवेचि हा चाळा। मी आवडेन काय प्रेमळां। गोकुळींचिया ऐसा॥ ३४॥**
**तयांतेंही लेंकुरपणें झकविलें। एकाचे गर्भवासही साहिले। परि विश्वरूप हें राहविलें। न दावीच कवणा॥ ३५॥**

अर्थ—ज्या गीताग्रंथाची थोरवी, साक्षात् शंकरालाहि कळली नाही, त्याची ती थोरवी मी कशी वर्णन करणार? तेव्हा मनोभावाने तिला नमस्कार करावा, हेंच उत्तम॥ २७॥ मग विश्वरूपदर्शनाचे ठिकाणीं लक्ष ठेऊन, त्या अर्जुनाने भगवंताशीं बोलण्याला कशी सुरुवात केली, ते ऐका॥ २८॥ हें सर्व चराचर जग, भगवानच नटला आहे असा बुद्धींत अनुभवाचा जो अविष्कार झाला, तो बाहेर डोळ्याला प्रत्यक्ष दिसावा॥ २९॥ अशी त्याच्या अंत:करणांत इच्छा उत्पन्न झाली; पण ही इच्छा देवाला सांगणे त्याला जरा कठीण वाटलें कारण जें विश्वरूप, भगवान अत्यंत गुप्त ठेवतात, कोणाला दाखवित नाहीत, तें दाखवा म्हणून आपण कसें म्हणावें?॥ ३०॥ अर्जुन मनांत म्हणतो, पूर्वी कधीं कोणी अत्यंत आवडत्या भक्तांनीहि जें विचारलें नाही, तें मला सांगा, असें एकदम कसें म्हणूं॥ ३१॥ मी जरी अत्यंत प्रेमांतील असलो, तरी आई लक्ष्मीपेक्षा जवळचा कसा होईन? पण तीहि विश्वरूपदर्शनाची गोष्ट काढण्यास भ्याली॥ ३२॥ मी वाटेल तशी भगवंताची सेवा केली असली, तरी ती गरुडाच्या सेवेची बरोबरी करील काय? पण त्यानेहि हीं गोष्ट काढली नाही॥ ३३॥ मी काय सनकादिकांपेक्षाहि जवळचा निकटवर्ती आहे? पण त्यांनाहि

ही इच्छा धरतां आली नाही. प्रेमळ गोकुळवासी जनांसारखा मी भगवंताला आवडतो काय?॥ ३४॥ पण त्यांनाहि बाळपणाने, आपलें सामर्थ्य झांकून टाकून फसविले. आपल्या अंबरीष भक्ताचे गर्भवास आपण सोसले, पण आपलें विश्वरूप गुप्तच ठेवलें, कोणासच दाखिविलें नाही.॥ ३५॥

**गूढार्थदीपिका**—पूर्वी केवढे थोर थोर प्रेमळ भक्त होऊन गेले, पण त्यापैकीं एकाचीहि आपण बरोबरी करूं शकत नाही किंवा एकाशींहि आपली तुलना होऊं शकत नाही असें वाटणें, हेंच प्रेमाचें लक्षण आहे. मला भगवंताचें प्रेम आहे असे वाटणें, हा अहंकार होतो व त्यामुळे सगुण साक्षात्कार होत नाही. "साधितां माझी भक्ति कां ज्ञान। ज्यासी चढे ज्ञानाभिमान। तो म्यां आपुलेनि हातें जाण। दिधला आंदण महादोषा॥ १४३॥" (ए० भा० अ० २०) भक्ताला नेहमीं माझे ठिकाणीं भगवत्प्रेम नाही, असेंच वाटत असतें.

**हा ठायवरी गुज। याचिये अंतरींचें हें निज। केविं उराउरी मज। पुसों ये पां॥ ३६॥**
**आणि न पुसेंचि जरी म्हणें। तरि विश्वरूप देखिलियाविणें। सुख नोहेचि परि जिणें। तेंही विपायें॥ ३७॥**
**म्हणोनि आतां पुसों अळुमाळसें। मग करूं देवा ठाके तैसें। येणें प्रवर्तला साध्वसें। पार्थु बोलों॥ ३८॥**
**परि तेंचि ऐसेनि भावें। जें एका दों उत्तरांसवें। दावी विश्वरूप आघवें। झाडा देउनी॥ ३९॥**
**अहो वांसरूं देखिलियाचिसाठीं। धेनु खडबडोनि मोहें उठी। मग स्तनामुखाचिये भेटी। काय पान्हा न ये॥ ४०॥**
**पाहा पां तया पांडवाचेनि नांवें। जो कृष्ण रानींही प्रतिपाळूं धांवे। तयांतें अर्जुनें जंव पुसावें। तंव साहील काई॥ ४१॥**
**तो सहजेंचि स्नेहाचें अवतरण। आणि येरु स्नेहा घातलें आहे माजवण। ऐसियें मिळणी वेगळेपण। उरे हेंचि बहु॥ ४२॥**

**अर्थ**—इतकें हें अत्यंत गुप्त ठेवलेलें व भगवंतांनी अंत:करणांत माझें मूलरूप होय असे ज्याला मानलें, तें हें विश्वरूप एकदम मला कसें विचारतां येईल?॥ ३६॥ आणि जाऊं द्या, पुसूंच नये! असें म्हणून सोडून द्यावें, तर विश्वरूप पाहिल्यावांचून मनाची तळमळ जाऊन सुख होणार नाही. एवढेंच नाही, तर तळमळीमुळे वांचणेंहि कठीण आहे॥ ३७॥ म्हणून सहजगत्या थोडेसें विचारून पाहावें; मग देव वाटेल ते करोत, असा विचार करून भीत भीत अर्जुनाने बोलायला सुरुवात केली॥ ३८॥ पण तेंच विचारणें अशा प्रेमभावाने केलें, की अर्जुनाचे मुखांतून एक दोन शब्द निघतात न निघतात, तोंच भगवंतांनी आपलें झाडून संपूर्ण विश्वरूप दाखविलें॥ ३९॥ अहो! वांसरूं पाहिल्याबरोबर गाय, प्रेमाने एकदम खडबडून उठते मग वांसराचे तोंड तिच्या स्तनाला लागल्यानंतर तिला पान्हा धरवेल काय?॥ ४०॥ त्याचप्रमाणे हे पहा, जो भगवान श्रीकृष्ण त्या पांडवांचें नांव ऐकल्याबरोबर त्यांचा प्रतिपाळ करण्याकरितां रानांतहि धांवून जातो, त्याला अर्जुनाने तोंड भरून विचारलें असतां तो स्वस्थ राहील काय?॥ ४१॥ आधींच भगवान श्रीकृष्ण प्रेमाचीच मूर्ति होय. त्यांत अर्जुन हा, त्या स्नेहाला माजविणारा मादक पदार्थ मिळाला, अशा मिळणींत श्रीकृष्ण व अर्जुन यांचे वेगळेपण राहिलें, हेंच फार झाले॥ ४२॥

**गूढार्थदीपिका—सहजेंचि स्नेहाचें अवतरण**—सगुण श्रीकृष्ण परमात्मा, हा "आनंद पदीं जया म्हणती हरि" आनंदांशाने आनंदाची किंवा प्रेमाची मूर्ति आहे असें जें नाथांनी म्हटलें आहे, तसेंच आपलें स्वानुभवी मत, माऊलींनी "स्नेहाचें अवतरण" या शब्दांनी व्यक्त केलें आहे.

**ऐसियें मिळणी वेगळेपण। उरे हेंचि बहु**—भक्त व देव यांचे प्रेमाने ऐक्य झाल्यावरहि, केवळ सारखा प्रेमाचा प्रवाह चालूं राहावा. म्हणूनच देव, भक्त असे दोनपण वागविले जातें.

**म्हणोनि अर्जुनाचिया बोलासरिसा। देव विश्वरूप होईल आपैसा। तोचि पहिला प्रसंगु ऐसा। ऐकिजो तरी॥ ४३॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुन बोलल्याबरोबर, देव जसें आहेत तसेंच विश्वरूप होतील, तरी आरंभीचा तोच प्रसंग ऐका॥ ४३॥

**गूढार्थदीपिका**—भगवान श्रीकृष्ण, सहज-म्हणजे आपलें श्रीकृष्णस्वरूप न सोडतांच-विश्वरूप होतील या म्हणण्याने श्रीमाउलींनी, श्रीकृष्णाचें रूप हें मूळांत विश्वरूपच असून ते भक्ताच्या प्रेमाने भक्ताला मर्यादित एकदेशीय भासते, असें जें पुढें म्हटलें आहे, तेंच येथें सुचविलें आहे.

*अर्जुन उवाच*

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसञ्ज्ञितम्। यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम॥ १॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला—माझ्यावर कृपा करून मला जो आपण अत्यंत गुह्य अशा आत्मविषयक वचनांचा उपदेश केला त्या उपदेशाने हा माझा संसारमोह संपूर्ण नाहीसा झाला॥ १॥

**मग पार्थु देवातें म्हणे। जी तुम्ही मजकारणें। वाच्य केलें न बोलणें। कृपानिधे॥ ४४॥**
**जैं महाभूतें ब्रह्मीं आटती। जीवमहदादींचे ठाय फिटती। तैं जें देव होऊनि ठाकती। तें विसवणें शेषींचें॥ ४५॥**

**अर्थ**—मग अर्जुन देवाला म्हणतात, देवा! तुम्ही अत्यंत कृपासागर आहांत, म्हणूनच जें बोललें जात नाही, तें आपण माझ्यावर कृपा करून शब्दाने सांगितलें॥ ४४॥ जेव्हा हीं संपूर्ण महाभूतें परब्रह्मांत लय पावतात व जीवरूप पराप्रकृति व महदादिरूप अपराप्रकृति यांचे नांवहि राहत नाही, तेव्हा तुम्ही, देवा! जे होऊन राहतां, तें तुमचें शेवटचें विश्रांतिस्थान होय॥ ४५॥

**गूढार्थदीपिका—जें महाभूते ब्रह्मीं आटती। जीवमहदादिचे ठाय फिटती**-स्थूल पंचमहाभूतें, महदादि सूक्ष्म पदार्थ व जीवदशा असे हें जडविनाशी जगत् परब्रह्माचे ठिकाणीं अध्यस्तविवर्तरूप-म्हणजे अज्ञानी जीवाने भ्रांतीने कल्पिले आहे असें वेदान्तांत म्हटलें आहे; म्हणून पूर्ण सच्चिदानंद परब्रह्माशीं त्याचा कांही एक संबंध राहत नाही, हें ''यत्र जगद्ध्यास: तत्कृतेन दोषेण गुणेन वा अणुमात्रेणापि स न संबध्यते'' (ब्र० सू० १-१ उपोद्घात) या आचार्यवचनानुसार सिद्ध होते.

या वचनपंक्तीचा भावार्थ असा की, जगत् व परब्रह्म यांचा कार्यकारणभाव सांगण्यकरितां जो वेदान्ताने विवर्तवाद मानला आहे, त्या विवर्तनवादानुसार पाहतां, कारणाच्या स्वरूपलक्षणांत यत्किंचित् बदल न होतां, कारण हें जसेच्या तसेच, कार्यरूप अवस्थांतराला येतें, असे मानले असल्यामुळे व जगांत परब्रह्म, आपल्या सच्चिदानंदधर्माने प्रत्ययाला येत नसल्यामुळे, या जडविनाशी जगताचे, शुद्ध सच्चिदानंदपरब्रह्म, हें साक्षात्कारण नव्हे; असें निश्चित ठरवून, परब्रह्म व जगत् यांच्यामध्ये जीवाने कल्पिलेली व परब्रह्माच्या आधाराने राहणारी त्रिगुणात्मक माया, वेदान्ताने मानली आहे.

ही त्रिगुणात्मक मायाच, जडविनाशी जगताचे उपादानकारण होय; म्हणून या जडविनाशी त्रिगुणात्मक मायेपासून महाभूतादि संपूर्ण सृष्टि उत्पन्न होते व तिच्या ठिकाणीच, प्रलयांत ती लीन होऊन, महाभूतादिक निरनिराळ्या पदार्थांचें अस्तित्व व वस्तुत्व नाहीसे होतें असा वेदान्ताचा सिद्धान्त आहें.

अशी ही सृष्टीची उत्पत्तिलयादि घडामोड, तिचें कारण जी माया तिच्यासह, परब्रह्मावरच अध्यस्तविवर्तरूप आहे व परब्रह्म हें, त्या सर्वांचे (सृष्टीचें व मायेचे) विवर्तोपादानकारण मानले आहे; म्हणून येथील ''ब्रह्मीं'' या शब्दाने जगताचें विवर्तोपादानकारण असलेलें त्रिगुणात्मक मायोपहित परब्रह्म घ्यावें लागतें.

आतां मायोपहित परब्रह्माचें माउलींनी मानलेलें स्वरूप काय आहे हें पाहिलें पाहिजे.

अद्वैत, निरवयव, अशा सच्चिदानंद परब्रह्माच्या अनुभवाने ज्या त्रिगुणात्मक मायेचा व तिच्या कार्याचा, ''अविद्याकाळी सतुकें। अविद्या नाही'' (अमृ० प्र० ६-३१) या माउलींच्या वचनाप्रमाणे, ती भासत होती तेव्हहि नव्हती, आता नाही व पुढेहि राहणें शक्य नाही, असा त्रैकालिक अत्यंत निवृत्तिरूप अनुभव येतो, तिच्यापासून जगद्रूप कार्य होणे दुरापास्त आहे असे ''केउते मेलिया माया। होऊं पाहिजे'' (अमृ० प्र० ८-९) या ओवीने माउलींनी सांगितलें आहे.

म्हणून आम्ही मागें सांगितल्याप्रमाणे, सच्चिदानंद परब्रह्म, आपल्या स्वाभाविक नामरूपात्मक सच्चिदानंद शक्तीने स्फुरण पावतें; पण या सत्यवस्तुस्थितीचें जीवाला ज्ञान नसल्यामुळे, त्याला ती त्रिगुणात्मक माया व तिचें नामरूपात्मक कार्य जगद्रूपाने भासते. असें मानलें असतां, सच्चिदानंदरूप नामरूपाने आविष्कृत झालेलें परब्रह्मच, जीवाच्या भ्रांतिकल्पित मायेला व सृष्टिकार्याला आधार असते, असें म्हणावें लागतें.

भगवंताच्या याच स्वरूपाला, पुढें विश्वरूप हें नांव दिलें गेलें आहे. आणि त्रिगुणात्मक मायोपहित परब्रह्म म्हणजे त्रिगुणात्मक मायेला आधार असणारें व सच्चिदानंदरूप नामरूपाने आविष्कार पावलेलें परब्रह्मच होय.

**तैं जे होऊनि ठाकती। तें विसवणें शेषींचें**—आणि हें स्वरूप वर सांगितल्याप्रमाणें अध्यस्तविवर्त अशा माया व मायाजन्य सृष्टीच्या गुणदोषाने यत्किंचितहि लिप्त न होतां, शुद्ध सच्चिदानंदस्वरूपच राहतें. रामकृष्णादिस्वरूपे, प्रगट होत असून, त्यांतच पुन: सामाविलीं जातात, असें माउलीचें म्हणणें वाहे. यावरून सर्व सृष्टि परमेश्वरावर भासणाऱ्या मायेंत लीन होते आणि रामकृष्णादिरूपें मायेला आधार असणाऱ्या, पण मायेचा स्पर्श नसलेल्या सगुणस्वरूपांत अंतर्भूत होऊन राहतात. या माउलीच्या म्हणण्याचा भावार्थ असा की भगवंताचें सर्वनामरूपात्मक विश्वरूप व श्रीकृष्णादिस्वरूपें त्रिगुणात्मक मायारहितच आहेत.

**होतें हृदयाचिये परीवरीं। रोंविलें कृपणाचिये परी। शब्दब्रह्मासिही चोरी। जयाची केली॥ ४६ ॥**

**अर्थ**—कृपण मनुष्याप्रमाणे जें हृदयमंदीरांत लपवून ठेवलें होतें आणि शब्दब्रह्मापासून म्हणजे वेदापासून जें चोरून ठेवलें होतें—म्हणजे वेद देखील या स्वरूपाला जाणूं शकला नाही॥ ४६ ॥

**गूढार्थदीपिका**—या स्वरूपाचा अनुभव नुसत्या ज्ञान्याला येत नाही. हा अनुभव भक्तांनाच येतो.

**तें तुम्हीं आजि आपुलें। मजपुढां हियें फोडिलें। जया अध्यात्मा वोवाळिलें। ऐश्वर्य हरें॥ ४७ ॥**

**अर्थ**—तें तुम्ही आज माझ्यापुढें आपलें हृदय उघडें केलें, या अध्यात्मस्वरूपावरून शंकराने कैलासाचें राज्य ओवाळून टाकलें व श्मशानांत वास केला॥ ४७ ॥

**गूढार्थदीपिका**—शुद्ध आत्मस्वरूपाला धरून जेवढें असतें, त्याला अध्यात्म म्हणतात, भगवंताचे निर्गुणस्वरूप स्वाभाविक असल्यामुळें जसें तें अध्यात्म म्हटलें जातें, तसेंच विश्वरूपहि स्वाभाविक असल्यामुळे, येथे त्यालाहि अध्यात्म म्हटलें आहे.

**ते वस्तु मज स्वामी। एकिहेळां दिधली तुम्हीं। हें बोलों तरि आम्ही। तुज पावोनि कैंचे॥ ४८ ॥**
**परि साचचि महामोहाचिये पुरीं। बुडालेया देखोनि सीसवरी। तुवां आपणपें घालोनी श्रीहरी। मग काढिलें मातें॥ ४९ ॥**
**एक तूंवांचूनि कांहीं। विश्वीं दुजियाची भाष नाहीं। कीं आमुचें कर्म पाहीं। जें आम्ही आथी म्हणों॥ ५० ॥**

**अर्थ**—ती अध्यात्मवस्तु, प्रभो! मला एकदम तुम्ही दिली असें म्हणावें, तर आम्ही तुझ्यापासून निराळे कोठे आहों?॥ ४८ ॥ पण खरोखरच मी या संसाररूपी महामोहाच्या पुरांत डोक्यापर्यंत बुडलों आहे, हे पाहून देवा! आपण स्वत: त्यांत उडी टाकून मला बाहेर काढलें॥ ४९ ॥ अद्वैतदृष्टीने पाहतां, तिन्ही काळीं एका तुझ्यावांचून या संपूर्ण विश्वांत दुसऱ्या वस्तुची गोष्ट देखील नाही; पण 'आम्ही आहों' असें म्हणतों, हें आमचें दुर्दैव पहा कसे आहे?॥ ५० ॥

**गूढार्थदीपिका**—सर्वनामरूपाने एक भगवानच नटला आहे, हाहि अद्वैतप्रत्ययच होय.

**मी जगीं एक अर्जुनु। ऐसा देहीं वाहे अभिमानु। आणि कौरवांतें इया स्वजनु। आपुला म्हणें॥ ५१ ॥**
**याहीवरी यांतें मी मारीन। म्हणें तेणें पापें कें रिगेन। ऐसें देखत होतों दु:स्वप्न। तो चेवविला प्रभु॥ ५२ ॥**
**देवा गंधर्वनगरींची वस्ती। सोडुनि निघालें लक्ष्मीपती। होतों उदकाचिया आर्ती। रोहिणी पीत॥ ५३ ॥**
**जी किरडूं तरी कापडाचें। परी ल्हरी येत होतिया साचें। ऐसें वायां मरतया जीवाचें। श्रेय तुवां घेतलें॥ ५४ ॥**
**आपुलें प्रतिबिंब नेणतां। सिंह कुहां घालील देखोनि आतां। जैसा धरिजे तेवीं अनंता। राखिलें मातें॥ ५५ ॥**
**एऱ्हवीं माझा तरी येतुलेवरी। एथ निश्चय होता अवधारीं। जें आतांचि सातांहि सागरीं। एकत्र मिळिजे॥ ५६ ॥**
**हें जगचि आघवें बुडावें। वरि आकाशहि तुटोनि पडावें। परि झुंजणें न घडावें। गोत्रेजेंशीं मज॥ ५७ ॥**
**ऐसिया अहंकाराचिये वाढी। मियां आग्रहजळीं दिधली होती बुडी। चांगचि तूं जवळा येऱ्हवीं काढी। कवणु मातें॥ ५८ ॥**
**नाथिलें आपणपें एक मानिलें। आणि नव्हतया नाम गोत्र ठेविलें। थोर पिसें होतें लागलें। परि राखिलें तुम्हीं॥ ५९ ॥**
**मागां जळत काढिलें जोहरीं। तैं तें देहासीच भय अवधारीं। आतां हे जोहरवाहर दुसरी। चैतन्यासकट॥ ६० ॥**

**अर्थ**—या जगांत मी एक कोणी अर्जुन आहे, असा या देहाच्या ठिकाणीं मी अभिमान वागवित होतों व हे कौरव माझे सोयरे आहेत असे म्हणत होतों॥ ५१ ॥ यावरहि आणखी मी यांना मारीन, तर त्या पापामुळे माझी काय गति होईल असें खोटेंच स्वप्न पाहत होतों; पण भगवंता! तूं मला जागें केलेंस॥ ५२ ॥ हे देवा! खरी वस्ती सोडून आकाशांतील गंधर्वनगराकडे जायला निघालों. पाणी पिण्याच्या इच्छेने मृगजळच पीत होतों॥ ५३ ॥ खरोखर कापडाचा केलेला साप, पण तो सत्य मानल्यामुळे त्याच्या विषाची बाधा होऊन लहरी येऊं लागल्या होत्या आणि आता मी मरणार अशी व्यर्थ कल्पना करणाऱ्या जीवाला वांचविण्याचें श्रेय तुम्ही घेतलें॥ ५४॥ आपलेंच प्रतिबिंब आहे असे न जाणतां (हा दुसरा सिंह आहे असे जाणून त्याच्याशीं लढण्याकरितां आतां) हा सिंह उडी टाकतो असे पाहून त्याला मागे जसें धरून ठेवावें, त्याप्रमाणे देवा! तुम्ही माझें रक्षण केले॥ ५५ ॥ नाही तर, पहा देवा! माझा असा पक्का निश्चय होता की आतांच सातही समुद्र मिळून सर्व जग बुडो की आकाश तुटून पडो, पण कांही झालें तरी आपल्याच स्वजनाशीं लढूं नये॥ ५६-५७॥ अशा प्रबल अहंकाराने मी आग्रहरूपी जळांत बुडी मारून बसलों होतों, पण इतकें फार चांगले झालें की तूं जवळच होतास, नाही तर कोणी मला त्यांतून काढिलें असते?॥ ५८ ॥ मी म्हणून कोणी निराळा नसतांना, मी एक कोणी आहे अशी कल्पना केली आणि माझ्याहून कोणी निराळा नसतांना निराळे मानून त्याला गोत्रज हे नांव ठेवलें. असा मला विलक्षण भ्रम झाला होता, पण तूं माझें रक्षण केलेंस॥ ५९ ॥ पूर्वी जळत असलेल्या लाक्षागृहांतून आम्हांला वांचविलेस, मात्र त्यावेळी देहालाच भीति होती, पण ही दुसरी लाक्षागृहाची भीति चैतन्यासहित देहाला प्राप्त झाली॥ ६० ॥

**गूढार्थदीपिका**—लौकिक अग्नि देहाचा नाश करतो; पण अविवेकरूपी अग्नि चैतन्यासहित देहांच्या नाशाची भीति उत्पन्न करतो, असा अर्थ.

**दुराग्रहें हिरण्याक्षें। माझी बुद्धि वसुंधरा सूदली काखे। मग मोहार्णवगवाक्षें। रिघोनि ठेला॥ ६१ ॥**
**तेथ तुझेनि गोसावीपणें। एकवेळ बुद्धीचिया ठाया येणें। हें दुसरें वराह होणें। पडिलें तुज॥ ६२ ॥**
**ऐसें अपार तुझें केलें। एकी वाचा काय मी बोलें। परि पांचही पालव मोकलिले। मजप्रती॥ ६३ ॥**
**तें कांही न वचेचि वायां। भलें यश फावलें देवराया। जे साद्यंत माया। निरसिली माझी॥ ६४ ॥**
**आजी आनंदसरोवरींचीं कमळें। तैसे जे हे तुझे डोळे। आपुलिया प्रसादाचीं राऊळें। जयालागीं करिती॥ ६५ ॥**
**हां हो तयाही आणि मोहाची भेटी। हे कायसी पाबळी गोठी। केउती मृगजळाची वृष्टी। वडवानळेंसी॥ ६६ ॥**
**आणि मी तंव दातारा। ये कृपेचिये रिघोनि गाभारां। घेत आहें चारा। ब्रह्मरसाचा॥ ६७ ॥**
**तेणें माझा जी मोह जाये। एथ विस्मो कांहीं आहे। तरी उद्धरलो की तुझे पाये। शिवतले आहाती॥ ६८ ॥**

**अर्थ**—मी युद्ध करणार नाही, या दुराग्रहरूपी हिरण्याक्षाने माझी बुद्धिरूपी पृथ्वी आपल्या काखेंत घालून अविवेकरूपीं समुद्राच्या भगदाडांतून तो पाताळांत जाऊन राहिला होता-(म्हणजे कांही झालें तरी मी युद्ध करणारच नाही अशा अट्टाहासामुळे माझी बुद्धि विचारहीन होऊन अविवेकाने कौरव हे माझे स्वजन आहेत या मोहांत सापडली होती)॥ ६१ ॥ तेथे तुझ्यासारखा समर्थ स्वामी मिळाल्यामुळे, माझी बुद्धि एकदांची विवेकरूपी आपल्या मूळ ठिकाणावर आली. माझ्या बुद्धीचा उद्धार करण्याकरितां तुला दुसऱ्यांदा हे असें वराह व्हावें लागले॥ ६२ ॥ देवा! तुझे असे अपार उपकार मी या एका वाचेने काय सांगणार? पण एवढें मात्र खरें की तूं माझ्या ठिकाणीं आपले पंचप्राण अर्पण केलें आहेस॥ ६३ ॥ देवा! तूं माझ्याकरितां श्रम केलेस, ते कांही वायां गेले नाहीत; कारण तूं माझा संपूर्ण अज्ञानभ्रम नाहीसा केलास असें थोर यश तुला प्राप्त झालें॥ ६४॥ परमानंदरूपी सरोवरांतील जणूं काय कमळेंच, असे हे तुझे डोळे, ज्याच्यावर कृपेचें मंदिर करतील॥ ६५ ॥ अशा त्याच्याशी मोहाची किंवा अविवेकाची गांठ पडणे, ही अगदींच दुर्घट गोष्ट तेथे कशी असणार? (जो) वडवानळ (समुद्राचे) पाण्याने विझत नाही, त्याला मृगजळाच्या वृष्टीने काय होईल॥ ६६ ॥ आणि प्रभो! कृपासागरा! मी तर तुमच्या कृपेच्या गाभाऱ्यांतच बसून ब्रह्मानंदाचा आस्वाद घेंत आहे॥ ६७ ॥ त्यामुळे माझें मोहरूपी अज्ञान नाहीसें झालें त्यात काय आश्चर्य आहे? पण आपल्या कृपेने माझा उद्धार झाला हें मी आपल्या पायावर हात ठेवून सांगतों॥ ६८ ॥

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया। त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम्॥ २॥**

**अर्थ**—हे कमलपत्राप्रमाणे डोळे असणाऱ्या भगवंता! तुझ्यापासून या भूतसृष्टीचे उत्पत्तिलय कसें होतात, हें मी सविस्तर ऐकिलें, त्याचप्रमाणे तुझें अविनाशी सामर्थ्यहि ऐकिलें॥ २॥

**पैं कमळायतडोळसा। सूर्यकोटितेजसा। मियां तुजपासोनि महेशा। परिसिलें आजि॥ ६९॥**
**इयें भूतें जयापरी होती। अथवा लया हन जैसेनि जाती। ते मजपुढां प्रकृती। विवंचिली देवें॥ ७०॥**
**आणि प्रकृती कीर उगाणा दिधला। वरि पुरुषाचाही ठावो दाविला। जयाचा महिमा पांघरोनि जाहला। धडौता वेदु॥ ७१॥**
**जी शब्दराशी वाढे जिये। कां धर्माऐशिया रत्नातें विये। ते एथिंचे प्रभेचे पाये। वोळगे म्हणोनि॥ ७२॥**
**ऐसें अगाध माहात्म्य। जें सकळमार्गैकगम्य। जैं स्वात्मानुभवरम्य। तें इयापरी दाविलें॥ ७३॥**
**जैसा केरु फिटलिया आभाळीं। दिठी रिगे सूर्यमंडळीं। कां हातें सारूनि बाबुळी। जळ देखिजे॥ ७४॥**
**नातरी उकलूनियां सापाचे वेढे। जैसें चंदना खेंव देणें घडे। अथवा विवसी पळे मग चढे। निधान हातां॥ ७५॥**
**तैसी प्रकृति हे आड होती। ते देवेंचि सारिली परौती। मग परतत्त्व माझिये मती। शेजार केले॥ ७६॥**
**म्हणोनि इये विषयींचा मज देवा। भरंवसा कीर जाहला जीवा। परि आणिक एक हेवा। उपनला असे॥ ७७॥**
**तो भिडां जरी म्हणों राहों। तरी आना कवणा पुसों जावों। काय तूजवांचोनि ठावो। जाणत आहों आम्ही॥ ७८॥**
**जळचरु जळाचा आभारु धरी। बाळक स्तनपानीं उपरोधु करी। तरी तया जिणयासी श्रीहरी। आन उपायो असे॥ ७९॥**
**म्हणोनि भीडसांकडी न धरावे। जीवी आवडे तेंही तुजपुढां बोलावें। तंव राहें म्हणितलें देवें। चाड सांगे॥ ८०॥**

**अर्थ**—हे कमळाला आश्रय होणारे ज्याचे डोळे आहेत अशा व कोटी सूर्यांचे तेजाप्रमाणे ज्याची अंगकांति अशा सर्वेश्वरा! मी तुझ्यापासून आज ऐकिलें॥ ६९॥ ही सर्व भूतसृष्टि ज्या प्रकृतिपासून उत्पन्न होते व जी मध्ये पुनः लय पावते, त्या प्रकृतीचें संपूर्ण विवेचन आपण माझ्यासमोर केलें॥ ७०॥ आणि प्रकृतीचें झाडून विवेचन केलें तसेंच ज्याचे कीर्तिरूप वस्त्र पांघरून वेद सवस्त्र झाला, त्या परमात्म्याची स्वरूपस्थितिहि सांगितली॥ ७१॥ अहोजी महाराज! शब्दराशीरूप वेदाचा जो एवढा विस्तार झाला आहे व टिकून राहिला आहे किंवा धर्मासारख्या रत्नाला त्यांनी जो जन्म दिला, तो आपल्या सामर्थ्यरूप पायाचा आश्रय केला म्हणूनच होय॥ ७२॥ असें आपलें सर्व मार्गाच्या ऐक्यतेने कळणारे व स्वानुभवालाहि रमविणारें जें तुझे अगाध माहात्म्य मला तुम्हीं दाखविलें॥ ७३॥ ज्याप्रमाणे आकाशांत आलेले ढंग नाहीसे झाले असतां सूर्यमंडलाचें ठिकाणीं दृष्टि जाते किंवा हाताने शेवाळ बाजूला सारूनच पाणी पाहतां येतें॥ ७४॥ किंवा सर्पांचे वेढे दूर केलें असतांच चंदनाच्या झाडाला मिठी मारतां येते अथवा द्रव्यावर बसलेलें पिशाच्च पळालें की तें द्रव्य आपल्या हातीं येते॥ ७५॥ त्याप्रमाणें माझ्या व आत्मस्वरूपाच्या मध्ये जो अज्ञानप्रकृतीचा पडदा होता, तो आपण देवा! दूर सारला आणि माझ्या बुद्धीला परतत्वाचें शय्याघर केलें॥ ७६॥ म्हणून या आत्मस्वरूपाविषयीं आतां माझा दृढ विश्वास झाला आहे; पण आणखी एक उत्कट इच्छा माझ्या मनांत उत्पन्न झाली आहे॥ ७७॥ भिडेने तीं इच्छा आतां बोलून दाखवत नाही असें म्हणावें, तर दुसऱ्या कोणाला मी तिच्याविषयी विचारणार? तुझ्यावांचून आम्ही दुसरें ठिकाण जाणतो काय?॥ ७८॥ पाण्यांत राहणाऱ्या प्राण्यांनी पाण्यांत राहण्याचा संकोच केला किंवा लहान मुलाने आईच्या स्तनपानाविषयीं भीड धरली, तर त्याच्या जगण्याला दुसरा उपाय आहे काय?॥ ७९॥ म्हणून भीड किंवा संकोच धरूं नये व आपल्या मनाला वाटते तें खुशाल तुमच्यासमोर बोलावें, असें वाटतें. तेव्हा भगवान म्हणाले, अर्जुना! (पाल्हाळ) बोलूं नकोस. मनांतील इच्छा सांग॥ ८०॥

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर। द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम॥ ३॥**

**अर्थ**—हे परमेश्वरा भगवंता! याप्रमाणे हें जें मला तूं आपल्या स्वरूपाविषयीं सांगितलेंस, तें तुझें ईश्वरस्वरूप, पुरुषोत्तमा! मी डोळ्यांनी पाहुं इच्छितों॥ ३॥

**मग बोलिला तो किरीटी। म्हणे तुम्हीं केली जे गोठी। तिया प्रतीतीची दिठी। निवाली माझी॥ ८१॥**

**आतां जयाचेनि संकल्पें। हे लोकपरंपरा होय हारपे। जया ठायातें आपणपें। मी ऐसें म्हणसी॥ ८२ ॥**
**ते मुद्दल स्वरूप तुझें। जेथूनि इये द्विभुजें हन चतुर्भुजें। सुरकार्याचेनि व्याजें। घेवोंघेवों येसी॥ ८३ ॥**
**पैं जळशयनाचिया अवगणिया। कां मत्स्य कूर्म इया मिरवणिया। खेळु सरलिया तूं गुणिया। सांठविसी जेथ॥ ८४ ॥**

**अर्थ**—त्यावर तो अर्जुन बोलला; अर्जुन म्हणतो, देवा! तुम्ही आपल्या परमेश्वरस्वरूपाविषयीं जें निरूपण केलें, त्यायोगें आता माझ्या बौद्धिक अनुभवदृष्टीचें समाधान झालें॥ ८१ ॥ आतां ज्याच्या संकल्पाने ही सृष्टिपरंपरा होते व लय पावते व ज्या स्वरूपाला 'तें स्वतः मी आहे' असें म्हणतोस॥ ८२ ॥ जेथून तूं द्विभुज किंवा चतुर्भुज रूप धारण करून देवादिकांचे कार्य करण्याकरितां वारंवार जगांत प्रगट होतोस, तें तुझे मूळचें रूप॥ ८३ ॥ क्षीराब्धींतील जलावर शयन करणारें सोंग असो किंवा मत्स्य, कूर्म इत्यादीरूपाने मिरवणे असो, हे खेळ करणाऱ्या गारूड्या! हे तुझे खेळ संपले की ही तुझीं रूपें ज्याठिकाणी सांठविलीं जातात॥ ८४ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे 'खेळ' या शब्दाचा ''खोटा'' असा अर्थ नसून ''लीलेने विग्रह धरणें'' असा आहे.

या ओवींत भगवंताच्या क्षीराब्धिजळशायीरूप व मत्स्यादिरूपें घेण्याला खेळ म्हटलें आहे; म्हणून तीं रूपें मिथ्या आहेत असे समजतां येत नाही. कारण वेदान्तदृष्टीने एक अविद्येचे कार्यच मिथ्या व नाशिवंत आहे. ''नित्याविद्यानिवृत्तत्वात्'' भगवान नित्य अविद्यारहित आहे असे वेदान्तांत मानले असल्यामुळे भगवंताचें कोणतेंहि रूप अविद्याजन्य नसतें. अर्थात् 'भगवंताचीं हीं रूपें घेणें हा खेळ आहे' या म्हणण्याचा अर्थ असा आहे की, भगवंताचीं हीं सर्व रूपें व विश्वरूपहि पूर्ण सच्चिदानंद स्वरूप राहूनच, ती सहज लीलेने घेतलीं जातात. त्यांत विश्वरूप हें पहिलें लीलाविग्रहीरूप असून क्षीराब्धिजळशायी किंवा मत्स्यकूर्मादि हीं विश्वरूपाचीं लीलाविग्रही रूपें आहेत. अर्थात् जडविनाशी, कल्पित अशा अविद्येच्या अपेक्षेने विद्योपाधि ही संज्ञा असलेल्या ज्ञानप्रधान विद्यावृत्तीने हीं सर्व रूपें भगवान घेत असल्यामुळे व विद्यावृत्तीनेच त्यांचा अनुभव येत असल्यामुळे, तीं खोटी, विनाशी म्हणतां येत नाहीत.

भगवंताचीं रूपें विद्याउपाधिजन्य आहेत हे म्हणणेंहि जीवाच्या ठिकाणीं असलेल्या अविद्येच्या अपेक्षेनेच आहे. अविद्योपाधीचा त्रैकालिक नाश झाल्यावर, विद्योपाधि ही संज्ञा नाहीशी होते व परब्रह्माचीं विश्वरूप, मत्स्यकूर्मादिरूपें पूर्ण निरुपाधिक ब्रह्मस्वरूप आहेत असा अनुभव येतो.

**उपनिषदें जें गाती। योगिये हृदयीं रिगोनी पाहाती। जयातें सनकादिक आहाती। पोटाळुनियां॥ ८५ ॥**

**अर्थ**—उपनिषदें ज्याचें वर्णन करतात, योगीलोक अंतर्मुखदृष्टि करून जे पाहतात आणि सनकादिक ज्या स्वरूपाला नेहमी मिठी मारून आहेत॥ ८५ ॥

**गूढार्थदीपिका**—वर सांगितल्याप्रमाणे, भगवंताचें विश्वरूप निरुपाधिक लीलाविग्रही आहे, म्हणूनच या ओवींत ''उपनिषदें जें गाती। योगिये हृदयीं रिगोनि पाहती। जयातें सनकादिक आहाती। पोटाळुनिया'' असा त्याचा महिमा गायिला आहे. त्रिगुणात्मक मायाउपाधिजन्य साकार स्वरूपाचा हा महिमा असणे शक्यच नाही.

**ऐसें अगाध जें तुझें। विश्वरूप कानीं ऐकिजे। तें देखावया चित्त माझें। उतावीळ देवा॥ ८६ ॥**
**देवें फेडूनियां सांकड। लोभें पुसिली जरी चाड। तरि हेचि एकी वाड। आर्ती जी मज॥ ८७ ॥**
**तुझें विश्वरूपपण आघवें। माझिये दिठीसि गोचर होआवें। ऐशी थोर आस जीवें। बांधोनि आहें॥ ८८ ॥**

**अर्थ**—असें अतर्क्य जें तुझें विश्वरूप नुसतें कानांनीं ऐकतो, तें डोळ्यांनी पाहण्याकरितां मी फार उतावीळ झालों आहे॥ ८६ ॥ देवांनी माझ्या मनांतील संकोच नाहीसा करून, काय इच्छा आहे ती सांग, असे मोठ्या प्रेमाने विचारलें. म्हणून सांगतों कीं माझ्या मनांत हीच एक भारी इच्छा आहे.॥ ८७ ॥ तुझें संपूर्ण विश्वरूप माझ्या दृष्टीस दिसावें अशी तीव्र इच्छा मी मनांत धरून आहे॥ ८८ ॥

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो। योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम्॥ ४॥**

**अर्थ**—पण देवा! तें तुझें विश्वरूप मी पाहणें शक्य आहे असे जर तुला वाटत असेल, तर हे योगेश्वरा कृष्णा! तें तूं आपलें अविनाशी स्वरूप मला दाखव॥ ४॥

**परि आणीक एक एथ शार्ङ्गी। तुज विश्वरूपातें देखावयालागीं। योग्यता माझां आंगीं। असे कीं नाहीं॥ ८९॥**
**हें आपलें आपण मी नेणें। तें कां नेणसी जरी देव म्हणे। तरी सरोगु काय जाणे। निदान रोगाचें॥ ९०॥**
**आणि जी आर्तीचेनि पडिभरें। आर्तु आपुलीं ठाकी पैं विसरे। तान्हेला म्हणे न पुरे। समुद्र मज॥ ९१॥**
**ऐशा सचाडपणाचिये भुली। न सांभाळवे समस्या आपुली। यालागीं योग्यता जेवीं माउली। बालकाची जाणे॥ ९२॥**
**तयापरी श्रीजनार्दना। विचारिजो माझी संभावना। मग विश्वरूपदर्शना। उपक्रम कीजे॥ ९३॥**
**तरि ऐसी ते कृपा करा। एऱ्हवीं नव्हे हें म्हणा अवधारा। वायां पंचमालापें बधिरा। सुख केउतें देणें॥ ९४॥**
**एऱ्हवीं एकल्या बापियाचिया तृषे। मेघ जगापुरतें काय न वर्षे। परि जहालीही वृष्टि उपखे। जऱ्हीं खडकीं होय॥ ९५॥**
**चकोरा चंद्रामृत फावलें। येरां आण वाहूनि काय वारिलें। परि डोळ्यावीण पाहलें। वायां जाय॥ ९६॥**
**म्हणोनि विश्वरूप तूं सहसा। दाविसी हा कीर भरंवसा। कां जे कडाडां आणि गहिंसां-। मार्जी नीच नवा तूं कीं॥ ९७॥**
**तुझे औदार्य जाणों स्वतंत्र। देतां न म्हणसी पात्रापात्र। पैं कैवल्या ऐसें पवित्र। कीं वैरियांही दिधलें॥ ९८॥**
**मोक्षु दुराराध्यु कीर होय। परि तोही आराधी तुझे पाय। म्हणोनि धाडिसी तेथ जाय। पाइकु जैसा॥ ९९॥**

**अर्थ**—पण देवा! येथे आणखी एक गोष्ट आहे, तुझ्या विश्वरूपाला पाहण्याकरितां लागणारी योग्यता माझ्या आंगी आहे किंवा नाहीं हे मी आपलें आपणच जाणूं शकत नाही. तुझी योग्यता आहे किंवा नाहीं, हें तूं कां जाणूं शकत नाहींस असे जर, देवा! तुम्ही म्हणाल, तर रोगी आपल्या रोगाचें निदान जाणतो काय?॥ ८९-९०॥ आणि ज्याप्रमाणे अत्यंत तहानलेला पुरुष जसा मला समुद्रहि पुरेसा होत नाही असें म्हणतो, त्याप्रमाणे महाराज! इच्छा करणाऱ्या पुरुषाची इच्छा अत्यंत वाढली असतां त्याला आपल्या योग्यतेचा विसर पडतो॥ ९१॥ अशाप्रमाणे अत्यंत इच्छेच्या वेगामुळेच भूल पडून, माझ्याने आपली योग्यता सांभाळली जात नाही; म्हणून आई जशी आपल्या मुलाला काय व किती पचेल, हें जाणते॥ ९२॥ त्याप्रमाणें, जनार्दना! माझ्या योग्यतेचा विचार करा व मग विश्वरूप दाखविण्याला प्रारंभ करा॥ ९३॥ म्हणून योग्यता असेल, तर विश्वरूप दाखविण्याची कृपा करा, नाहीतर विश्वरूप पाहण्याची तुझी योग्यता नाही, असे म्हणा. बहिऱ्याला व्यर्थ कोमल स्वराचें काय सुख द्यायचें? (त्याप्रमाणे माझी योग्यता नसतांना आपण विश्वरूप दाखविलें तरी मला काय त्याचें सुख होणार?)॥ ९४॥ नाही तरी एका भाग्यवान चातकाकरितां वर्षाव करतांना मेघ सर्व पृथ्वीवर पाऊस पाडीत नाहीत काय? पण पृथ्वीवर वर्षाव झाला तरी खडकावर झालेला वर्षाव व्यर्थच जातो॥ ९५॥ पूर्ण चंद्राच्या प्रकाशांत चकोरांना अमृतकण मिळतात आणि बाकीच्यांना चंद्राने आपल्या प्रकाशांतील अमृतकण वेचायला शपथ वाहून मनाई केली आहे काय? पण चकोराची अमृतकण पाहण्याची दृष्टि इतरांना नसल्यामुळे, नुसता चंद्राचा प्रकाश पाहण्याने तो लाभ होत नाही॥ ९६॥ म्हणून म्हटल्याबरोबर तूं एकदम विश्वरूप दाखविशील हा मला पक्का विश्वास आहे; कारण उतावळीने व अविचाराने देणाऱ्यामध्ये तुझें देणें नेहमीच अपूर्व असतें॥ ९७॥ तुझें औदार्य निरपेक्ष आहे. हें मी जाणतों; पण देतांना तूं पात्रापात्रतेचा विचार करीत नाहीस. मोक्षासारखी शुद्ध अशी स्थिति तूं आपल्या शत्रूलाहि दिलीस॥ ९८॥ खरोखरच मोक्षाची आराधना करणें (मोक्ष प्राप्त करून घेणे) अत्यंत कठीण आहे; पण तोहि तुझ्या पायाची आराधना करतो म्हणजे तो तुझ्या पायाच्या आश्रयानेच मिळतो-म्हणून तूं जेथें त्याला पाठवितोस, तेथें तो सेवकाप्रमाणे जातो॥ ९९॥

**गूढार्थदीपिका**—त्रिविधदु:खात्यंतनिवृत्तिपूर्वक परमानंदप्राप्तिरूप मोक्ष, सगुण भगवंताच्या भक्तिवांचून प्राप्त होणें अशक्य आहे असा भाव.

**तुवां सनकादिकांचेनि मानें। सायुज्यीं सौरसु दिधला पूतने। जे विषाचेनि स्तनपानें। मारूं आली॥ १००॥**
**हां गा राजसूययागाचिया सभासदीं। देखतां त्रिभुवनाची मांदी। कैसा शतधा दुर्वादीं। निस्तेजिलासी॥ १०१॥**
**ऐशिया अपराधिया शिशुपाळा। आपणपयां ठावो दिधला गोपाळा। आणि उत्तानचरणाचिया बाळा। काय ध्रुवपदीं चाड॥ १०२॥**
**तो वना आला याचिलागीं। जे बैसावें पितयाचां उत्संगीं। कीं तो चंद्रसूर्यादिकांपरिस जगीं। श्लाघ्यु केला॥ १०३॥**
**ऐसा वनवासियां सकळां। देता एकचि तूं धसाळा। पुत्रा आळवितां अजामिळा। आपणपें देसी॥ १०४॥**

**जेणें उरीं हाणितलासि पांपरा। तयाचा चरणु वाहासी दातारा। अझुनी वैरियांचियां कलेवरा। विसंबसीना॥ १०५॥**
**ऐसा अपकारियां तुझा उपकारु। तूं अपात्रींही परि उदारु। दान मागोनि दारवंटेकरु। जाहलासी बळीचा॥ १०६॥**
**तूंतें आराधी ना आयके। होती पुंसा बोलावीत कौतुकें। तिये वैकुंठीं तुवां गणिके। सुरवाडु केला॥ १०७॥**

**अर्थ**—विषाने स्तन भरून तूझा प्राण घेण्याकरितां आलेल्या पुतनेलाहि, भगवंता! त्वां सनकादिकांच्या प्रमाणे आपल्या सायुज्यमुक्तीचें सुख दिलें॥ १००॥ त्याचप्रमाणे दुसरा प्रसंग पहा! पांडवांच्या राजसूययज्ञामध्यें सर्व सभासदांच्या समोर, त्रैलोक्यांतील समुदाय जमला असतांना, त्या शिशुपालाकडून हजारों अपशब्दांनी तुमचा कसा पाणउतारा केला गेला॥ १०१ ॥ तसा घोर अपराध करणाऱ्या शिशुपालाला देखील गोपाळा! तुम्ही आपल्यांत मिळवून घेतले आणि उत्तानपादराजाच्या मुलाला-ध्रुवाला-काय ध्रुवपदाच्या प्राप्तीची इच्छा होती ?॥ १०२ ॥ पित्याच्या मांडीवर बसावे याच उद्देशाने तपश्चर्या करण्याकरितां तो अरण्यांत आला होता, पण तुम्ही त्याला चंद्रसूर्यापेक्षाहि श्रेष्ठ केला॥ १०३ ॥ अशा रीतीने तुझ्या करीतां वनवास करणाऱ्यांना तूंच एक विचार न करतां देणारा आहेस. अजामेळ पुत्राला प्रेमाने बोलावित असतां तुम्ही त्याला आपलीच प्राप्ति करून दिली॥ १०४॥ ज्याने तुमच्या वक्षस्थलावर लाथ मारली, त्याच्या चरणाचा ठसा, अझून तुम्ही वक्षस्थलावर धारण केला आहे. अझूनहि आपल्या (शंखासुर या) शत्रूच्या शरीराला (म्हणजे शंखाला) आपण दूर करीत नाही॥ १०५ ॥ असे तुम्ही अपकार करणाऱ्यावरहि उपकार करणारे आहांत. दानाला अयोग्य असणाऱ्यावरहि आपण उदार होऊन दान दिलें आहे, बळीने सर्व पृथ्वीचें दान केलें म्हणून आपण त्याचे द्वाररक्षक झालांत॥ १०६ ॥ नामस्मरणाने तुझी आराधना करीत नव्हती किंवा तुझें नांव ऐकतहि नव्हती. कौतुकाने राघुला रामकृष्ण म्हणून बोलण्यास शिकवित होती; पण त्या वेश्येला आपण वैकुंठसुख दिलें॥ १०७॥

**गूढार्थदीपिका ( महानंदा )**—गणिका पाळलेल्या राघूला 'राम कृष्ण हरि' हे शब्द केवळ बोलण्याला शिकवित होती, त्यांत आपण नामस्मरण करून भगवंताची आराधना करावी किंवा राघूच्या मुखांतून आपण भगवंताचे नाव ऐकावे असा कांही एक उद्देश तिने धरला नव्हता; तरीपण कोणत्याहि निमित्ताने भगवंताचें नाव मुखीं आलें असतां मनुष्य उद्धरला जातो, अशा नामाच्या माहात्म्यबळामुळे व भगवंताच्या नामांतच रंगून तिची पापप्रवृत्ति बंद पडल्यामुळे, ती तत्काळ उद्धरली गेली.

**ऐसीं पाहूनि वायाणीं मिषें। आपणपें देवों लागसी वानिवसें। तो तूं कां अनारिसें। मजलागीं करिसी॥ १०८॥**
**हां गा दुभतयाचेनि पवाडें। जे जगाचें फेडी सांकडें। तिये कामधेनूचे पाडे। काय भुकेले ठाती॥ १०९॥**
**म्हणोनि मियां जे विनवलें कांहीं। तें देव न दाखविती हें कीर नाहीं। परि देखावयालागीं देईं। पात्रता मज॥ ११०॥**
**तुझें विश्वरूप आकळे। ऐसें जरी जाणसी माझे डोळे। तरि आर्तीचे डोहळे। पुरवीं देवा॥ १११॥**
**ऐसी ठायेंठावो विनंती। जंव करूं सरला सुभद्रापती। तंव तया षड्गुणचक्रवर्ती। साहवेचिना॥ ११२॥**
**तो कृपापीयूषसजळु। आणि येरु जवळां आला वर्षाकाळु। नाना श्रीकृष्णकोकिळु। अर्जुन वसंतु॥ ११३॥**
**नातरी चंद्रबिंब वाटोळें। देखोनि क्षीरसागर उचंबळे। तैसा दुणेंहीवरी प्रेमबळें। उल्लसितु जाहला॥ ११४॥**

**अर्थ**—असें कांही तरी फोल निमित्त पाहून जो तूं आपली कौतुकाने प्राप्ति करून देतोस, तो तूं इतका उदार, मी विश्वरूप दाखीव म्हटल्यानंतर भलतेंच कसें करशील ?॥ १०८॥ दुभत्याच्या प्रभावाने-म्हणजे इच्छिलें तें देण्यास समर्थ असल्यामुळे-जी कामधेनू सर्व जगाचें दु:ख नाहीसे करते, त्या कामधेनूचेंच वासरूं भुकेले राहील काय ?॥ १०९॥ म्हणून मी जें आपल्याला विनंति करून विश्वरूप दाखवा म्हणून म्हटले, तें आपण दाखविणार नाही असे मुळींच नाही; पण तें विश्वरूप पाहण्याची पात्रता मला द्या॥ ११०॥ माझ्या या दोन्ही डोळ्यांनी विश्वरूप पाहण्याजोगें आहे, असें जर आपणांला वाटत असेल, तर देवा! माझी विश्वरूपदर्शनाची इच्छा पूर्ण करा॥ १११॥ सुभद्रापती अर्जुन अशी यथायोग्य विनंति जेव्हां करूं लागला तेव्हा षड्गुणैश्वर्याचा सार्वभौम राजा-म्हणजे अमर्याद षड्गुणैश्वर्यसंपन्न-जो भगवान श्रीकृष्ण, त्याला धीर धरवला नाही॥ ११२॥ कारण भगवान श्रीकृष्ण, कृपारूपी

अमृताने वळून आलेला जलयुक्त मेघ होता आणि अर्जुन हा अत्यंत जवळ येऊन ठेपलेला पावसाळा होता किंवा श्रीकृष्ण कोकिळपक्षी होता व अर्जुन वसंतऋतु होता॥ ११३॥ किंवा वाटोळें पूर्ण चंद्रबिंब पाहून जसा क्षीरसागर उचंबळतो, त्याप्रमाणें अर्जुनावरील द्विगुणित झालेल्या प्रेमाने भगवान अत्यंत आनंदित झाले॥ ११४॥

*श्रीभगवानुवाच*

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः। नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च॥ ५॥**

**अर्थ**—भगवान श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! माझीं नाना प्रकारचीं व नाना प्रकारच्या दिव्य वर्णांनी व आकृतींनी युक्त असलेली शेकडों हजारों म्हणजे अनंत रूपें पहा॥ ५॥

**मग तिये प्रसन्नतेचेनि आटोपें। गाजोनि म्हणितलें सकृपें। पार्था देख देख अमुपें। स्वरूपें माझीं॥ ११५॥**

**अर्थ**—मग त्या प्रसन्नचित्ताच्या आवेशाने भगवान श्रीकृष्ण गर्जना करून व दयार्द्र होऊन म्हणाले, अर्जुना! माझीं असंख्य स्वरूपें पहा! पहा!॥ ११५॥

**गूढार्थदीपिका**—हें विश्वरूप म्हणजे विराट्स्वरूप होय असे कित्येक समजतात; पण संपूर्ण स्थूल ब्रह्मांडाला विराट्स्वरूप म्हणतात. आणि तें विश्वरूपाच्या एका अंशावर भासलेलें अर्जुनाने पाहिलें; म्हणून तें विश्वरूपापेक्षां मर्यादित आहे, हें सिद्ध आहे. पुरुषसूक्तांत "सहस्रशीर्षा पुरुषः" असे पहिल्या पुरुषाचें वर्णन करून "ततो विराडजायत" त्या पुरुषापासून विराट पुरुष उत्पन्न होतो असें सांगितलें आहे. अर्थात् येंथील विश्वरूपाचा प्रत्यय, म्हणजे पुरुषसूक्तांनी, ज्या सहस्रशीर्ष पुरुषापासून स्थूल ब्रह्मांडरूप विराटपुरुषाचा भास किंवा उत्पत्ति होते असें सांगितलें आहे, त्या सहस्रशीर्ष अशा पुरुषाचाच प्रत्यय होय, हें सिद्ध होतें.

**एकचि विश्वरूप देखावें। ऐसा मनोरथु केला पांडवें। कीं विश्वरूपमय आघवें। करूनि घातलें॥ ११६॥**
**बाप उदार देवो अपरिमितु। याचक स्वेच्छा सदोदितु। असे सहस्रवरी देतु। सर्वस्व आपुलें॥ ११७॥**
**अहो शेषाचेहि डोळे चोरिले। वेद जयालागीं झकविले। लक्ष्मीयेही राहाविले। जिव्हार जें॥ ११८॥**
**तें आतां प्रगटुनी अनेकधा। करीत विश्वरूपदर्शनाचा धांदा। बाप भाग्या अगाधा। पार्थाचिया॥ ११९॥**
**जो जागता स्वप्नावस्थे जाये। तो जेवीं स्वप्नीचें आघवें होये। तेवीं अनंत ब्रह्मकटाह आहे। आपणचि जाहला॥ १२०॥**

**अर्थ**—एकच विश्वरूप पहावें अशी अर्जुनाने इच्छा केली होती; पण भगवंतांनीं सर्व विश्वरूपमय करून टाकलें॥ ११६॥ धन्य आहे हा अमर्याद उदार परमात्मा! याचकाचीं इच्छा पूर्ण करण्यास हा सदा सिद्ध असतो आणि याचकाच्या मागण्याच्या सहस्रपट देतो किंवा आपलें सर्वस्वहि देतो॥ ११७॥ अहो, जें विश्वरूप अत्यंत गुह्य म्हणून शेषाच्या डोळ्यालाहि दिसूं दिलें नाही, वेदाला कळूं दिलें नाही व लक्ष्मीलाहि ज्यापासून दूर ठेविलें॥ ११८॥ असें विश्वरूप आतां त्या धन्य व थोर भाग्यवान अर्जुनासाठी अनेक प्रकारें प्रगट करून, भगवान विश्वरूपदर्शनाचा खटाटोप करीत आहेत॥ ११९॥ जो जागा असलेला पुरुष, पुढें स्वप्नांत जातो व तो मग स्वप्नांत जेवढें कांही दिसतें, तें सर्व आपणच होतो, त्याप्रमाणे श्रीकृष्ण भगवान, आपणच अनंतब्रह्मांडरूप झाले॥ १२०॥

**गूढार्थदीपिका**—येथे भगवंताच्या विश्वरूपाने प्रगट होण्यास जो स्वप्नाचा दृष्टान्त दिसला, तो एकच पुरुष अनेकरूप कसा होतो हें जीवाला स्वप्न दृष्टान्तावरूनच समजत असल्यामुळे, दिला आहे.

स्वप्न जसें भ्रमजन्य काल्पनिक खोटें असतें, तसें भगवंताचें हें विश्वरूप भ्रमजन्य काल्पनिक खोटे आहे, हें सांगण्याकरितां दिला नाही. भगवंताचें हे स्वरूप तसें 'अज्ञानजन्य, काल्पनिक, खोटें असते, तर स्वप्नांत जसा मनुष्य, एक मीच अनेकरूप झालों आहों हें जाणत नाही, तसें भगवंतांनीहि आपलें एकवस्तुत्व व अद्वैतत्व जाणलें नसतें आणि अर्जुनालाहि विश्वरूपदर्शनांत भगवंताचें एक अद्वैतवस्तुत्व अनुभवाला आलें नसतें व त्याला पाहण्याकरितां दिव्यदृष्टीची आवश्यकता लागली नसती.

**ते सहसा मुद्रा सोडिली। आणि स्थूळदृष्टीची जवनिका फेडिली। किंबहुना उघडिली। योगऋद्धी॥ १२१॥**

**अर्थ**—आपल्या मर्यादित श्रीकृष्णस्वरूपाचा आकार एकदम लुप्त केला आणि ज्या अज्ञानजन्य स्थूलदृष्टीने

भगवंताचें श्रीकृष्णस्वरूप व जगत् निरनिराळें पांचभौतिक स्थूल दिसत होते, त्या स्थूलदृष्टीचा पडदा दूर केला; किंबहुना भगवंताने आपलें परमैश्वर्य प्रगट केले॥१२१॥

**गूढार्थदीपिका—स्थूलदृष्टीची जवनिका फेडिली-स्थूल दृष्टि**-संपूर्ण नामरूपात्मकदृश्य, नाना, जडविनाशीं व पांचभौतिक वस्तुरूप आहे असें समजणें, याला स्थूलदृष्टि म्हणतात. ही स्थूलदृष्टि अज्ञानदशेंत सर्वांच्या ठिकाणी असते.

**जवनिका**—ही दृष्टि, विश्वरूपाच्या दर्शनाला प्रतिबंधक आहे हें ''जवनिका'' शब्दाने सुचविलें आहे.

**फेडिली**—भगवंताने आपल्या सामर्थ्यानें ती नाहीशी केली.

**परि हा हें देखेल की नाहीं। ऐसी सेचि न करी कांहीं। एकसरां म्हणतसे पाहीं। स्नेहातुर॥ १२२॥**
**अर्जुना तुवां एक दावा म्हणितलें। आणि तेंचि दावूं तरि काय दाविलें। आतां देखें आघवें भरिलें। माझ्याचि रूपीं॥ १२३॥**

**अर्थ**—पण हा अर्जुन हें पाहील किंवा नाही याची भगवंताला आठवण झाली नाहीं. प्रेमानें उतावीळ होऊन, अर्जुना! विश्वरूप पहा, असें एकसारखें भगवान म्हणूं लागलें॥ १२२॥ भगवान म्हणतात, अर्जुना! तूं एक विश्वरूप दाखवा असें म्हटलेंस; आणि मी एकच विश्वरूप दाखविलें, तर मी आपलें पूर्ण विश्वरूप दाखविलें असें होणार नाही म्हणून जेवढें कांही आहे, ते सर्व माझ्याच रूपाने भरलें आहे पहा!॥ १२३॥

**गूढार्थदीपिका—आतां देखें आघवें भरिलें। माझ्याचि रूपी**—भगवान श्रीकृष्णांनी, आपल्या श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणीच अनंत ब्रह्मांडें दाखिविलीं. अनंत ब्रह्मांडाला आधार असणारें श्रीकृष्णस्वरूप, भक्तांना प्रेमवृत्तिमुळे व इतरांना अज्ञानामुळे एकदेशीय दिसत असलें, तरी तें व्यापकच असतें. त्याची व्यापकता नाहीशी होत नाही. भगवंताच्या श्रीकृष्णस्वरूपाचा हा महिमा ज्ञानदृष्टीनेच कळतो. भगवंताची व्यापकता ज्ञानीभक्त विसरत नसतात.

**एकें कृशें एकें स्थूळें। एकें न्हस्वें एकें विशाळें। पृथुतरें सरळें। अप्रांतें एकें॥ १२४॥**
**एकें अनावरें प्रांजळें। सव्यापारें एकें निश्चळें। उदासीनें स्नेहाळें। तीव्रें एकें॥ १२५॥**
**एकें घूर्णितें सावधें। असलगें एकें अगाधें। एकें उदारें अतिबद्धें। क्रुद्धे एकें॥ १२६॥**
**एकें शांते सन्मदें। स्तब्धें एकें सानंदें। गर्जितें निःशब्दें। सौम्यें एकें॥ १२७॥**
**एकें साभिलाषें विरक्तें। उन्निद्रितें एकें निद्रितें। परितुष्टें एकें आर्तें। प्रसन्नें एकें॥ १२८॥**
**एकें अशस्त्रें सशस्त्रें। एकें रौद्रें अतिमित्रें। भयानकें एकें विचित्रें। लयस्थें एकें॥ १२९॥**
**एकें जननलीला विलासें। एकें पालनशीलें लालसें। एकें संहारकें सावेशें। साक्षिभूतें एकें॥ १३०॥**
**एवं नानाविधें परि बहुवसें। आणि दिव्यतेजप्रकाशें। तेवींचि एकएकाऐसें। वर्णेही नव्हे॥ १३१॥**
**एकें तातलें साडेपंधरें। तैसीं कपिलवर्णें अपारें। एकें सर्वांगी जैसें सिंदुरें। डवरलें नभ॥ १३२॥**
**एकें सावियाचि चुळुकीं। जैसें ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं। एकें अरुणोदयासारिखीं। कुंकुमवर्णें॥ १३३॥**
**एकें शुद्धस्फटिक सोज्वळें। एकें इंद्रनीळ सुनीळें। एकें अंजनावर्णें सकाळें। रक्तवर्णें एकें॥ १३४॥**
**एकें लसत्कांचनसम पिंवळीं। एकें नवजलदश्यामळीं। एकें चांपेगौरी केवळीं। हरितें एकें॥ १३५॥**
**एकें तप्ततांम्रतांबडीं। एकें श्वेतचंद्र चोखडीं। ऐसीं नानावर्णें रूपडीं। देखे माझीं॥ १३६॥**
**हे जैसें कां आनान वर्ण। तैसें आकृतींही अनारिसेपण। लाजा कंदर्प रिघाला शरण। तैसीं सुंदरें एकें॥ १३७॥**
**एकें अतिलावण्यसाकारें। एकें स्निग्धवपु मनोहरें। शृंगारश्रियेचीं भांडारें। उघडिली जैसीं॥ १३८॥**
**एकें पीनावयव मांसाळें। एकें शुष्कें अतिविक्राळें। एकें दीर्घकंठें विताळें। विकटें एकें॥ १३९॥**
**एवं नानाविधाकृती। इयां पाहतां पारु नाहीं सुभद्रापती। ययांचां एकेकीं अंगप्रांतीं। देख पां जग॥ १४०॥**

**अर्थ**—एक रोड तर एक स्थूळ, एक ठेंगणें तर एक उंच, एक जाड पसरलेलें तर एक सरळ, एक अमर्याद॥ १२४॥ एक न आवरण्याजोगें, तर एक सुलभ आहे. एक व्यापार करीत असलेलें, तर एक निश्चळ आहे. कांही उदासींन रूपें, तर कांही प्रेमळ रूपे आहेत व कांही तीव्र वाटत आहेत॥ १२५॥ कांही रूपें धुंदीत असलेली,

तर कांही सावध दिसत आहेत. कांही सूक्ष्म दिसतात, तर कांही रूपे फार मोठीं आहेत. कांही रूपें उदार, कांही कृपण व कांही क्रुद्ध आहेत ॥ १२६ ॥ कांही रूपें शांत दिसत आहेत, तर कांही मदयुक्त दिसत आहेत. कांही स्तब्ध, कांही आनंदयुक्त, कांही रूपें गर्जना करीत असलेलीं, तर कांहीच्या तोंडून एक शब्दहि निघतांना दिसत नाही व कांही अत्यंत सौम्य आहेत ॥ १२७ ॥ कांही रूपांचे ठिकाणी अभिलाष दिसून येतो, तर कांही निरिच्छ आहेत. कांही रूपें जागी, तर काही निजलेंलीं, कांही रूपें अत्यंत संतोषयुक्त, तर कांही रूपे सवासन आहेत व कांही प्रसन्न आहेत ॥ १२८ ॥ कांही रूपें शस्त्ररहित दिसतात, तर काही शस्त्रसहित दिसतात. कांही रूपें अति भयंकर आहेत, तर कांही रूपें अत्यंत मित्राप्रमाणे भासतात आणि कांही रूपे विक्राळं आहेत तर कांही विचित्र आहेत व कांही रूपे सर्व वृत्तींचा लय करून समाधिस्थ झालेली दिसत आहेत ॥ १२९ ॥ कांही रूपें प्रजोत्पत्तिरूप लीला करीत आहेत, पर कांही रूपांचे ठिकाणी प्रजा पालनाची इच्छा दिसून येते. कांहींच्या ठिकाणी सर्व सृष्टीचा संहार करण्याचा आवेश दिसून येतो, तर कांही रूपे केवळ साक्षीस्वरूप दिसत आहेत ॥ १३० ॥ अशा रीतीने नानाप्रकारचीं अनंत रूपें दिसतात, तरी ती असंख्य आहेत आणि त्या सर्वांचें तेजहि अपरिमित आहे. त्याचप्रमाणे त्या सर्व रूपांचें वर्णहि एकसारखे नाहीत ॥ १३१ ॥ तापलेल्या सोन्याप्रमाणे लालसर अशीं कांही रूपें अमर्याद आहेत व आकाशाला शेंदूर फासावा, त्याप्रमाणे कांहींचे सर्वांग शेंदरी रंगाचे आहे ॥ १३२ ॥ माणिकांनी जडविलेल्या ब्रह्मांडाप्रमाणे कित्येक स्वाभाविकपणें सुंदर व चमकणारीं आहेत. कांही रूपें अरुणोदयासारखीं कुंकुमवर्णाचीं आहेत ॥ १३३ ॥ कित्येक शुद्ध स्फटिकप्रमाणे पांढरीं आहेत. कित्येक नीलमण्यासारखीं नीलवर्ण आहेत. कित्येक काजळासारखी काळीकुट्ट आहेत, तर कित्येक लाल रंगाचीं आहेत ॥ १३४ ॥ कित्येक रूपें चमकणाऱ्या सोन्यासारखीं पिवळीं, कित्येक नवमेघाप्रमाणें श्यामवर्ण, कित्येक चांफ्याच्या फुलासारखीं गौरवर्ण आहेत व कित्येक केवळ हिरवीं आहेत ॥ १३५ ॥ कित्येक तापविलेल्या तांब्याप्रमाणे तांबडीं, तर कित्येक पांढऱ्या चंद्राप्रमाणे पांढरीं आहेत. अशा प्रकारें नाना प्रकारच्या वर्णांचीं माझीं रूपें पहा ॥ १३६ ॥ हे जसे नानाप्रकारचे वर्ण आहेत, तसेच आकृतीतही नाना प्रकार आहेत. कांही रूपें अशी सुंदर आहेत की मदनही लाजेने शरण जाईल ॥ १३७ ॥ शृंगारसंपत्तीची भांडारें उघडल्याप्रमाणे, कांही रूपें, अत्यंत सौंदर्य साकार व्हावें, अशीं होतीं, तर कांही मनोहर तुकतुकिंत शरीराचीं होतीं ॥ १३८ ॥ कित्येकांचें अवयव पुष्ट व मांसल आहेत, तर कित्येकांचे देह शुष्क-रोड व अति विक्राळ दिसतात. कित्येक देह, लांब मान व मोठे डोकीं असलेले आहेत, तर कित्येक वांकडे तिकडे आकाराचे आहेत ॥ १३९ ॥ या प्रकारें नानाप्रकारच्या आकृती पाहतां, अर्जुना! अंत सांपडणार नाही आणि या एकएकाच्या अवयवांवर एक एक जग दिसत आहे, पहा! ॥ १४० ॥

**गूढार्थदीपिका—ययांच्या एकेकीं अंगप्रांतीं। देख पां जग**—जीव अंत:करणवृत्तीनेच जगाचा अनुभव घेतो; म्हणूनच त्याच्या केवळ अंत:करणवृत्तिमुळे त्याला परमेश्वराच्या स्वरूप, गुण व आकृति इत्यादिकांचा साकार किंवा मर्यादित अनुभव येतो.

पण परमात्मा मूळांत अस्फुट, अद्वैत, निरवयव, निरंश व अमर्याद असून, त्याचे हे धर्म बदलणारे किंवा नाहीसे होणारे नसल्यामुळे, त्याच्या साकार सगुणपणांतहि हे धर्म राहतातच-म्हणजे साकार सगुण भगवंताचा आकार, गुण इत्यादि हे सर्व अस्फुट, अद्वैत, निरवयव व अमर्याद असतात. हेंच "ययांच्या एकेकीं अंगप्रांतीं। देख पां जग" या चरणांनी माऊलींनी सुचविलें आहे.

मागेहि चवथ्या अध्यायांत माऊलींनी "माझें अजत्वें जन्मणे। अक्रियताचि कर्म करणें। हें अविकार जो जाणें तो परम मुक्त" या ओवीने हेंच सांगितलें आहे.

**पश्यादित्यान्वसूरुद्रानश्विनौ मरुतस्तथा। बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥**
**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्। मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥**

**अर्थ**—अर्जुना! सर्व आदित्य पहा, सर्व वसु पहा, सर्व रुद्र पहा, अश्विनीकुमार पहा, मरुतांचा समूह पहा, त्याचप्रमाणे पूर्वी कधीं पाहिलीं नाहीस अशीं नानाप्रकारचीं आश्चर्यें पहा ॥ ६ ॥ अर्जुना! या माझ्या विश्वरूप मूर्तीच्या

ठिकाणीं संपूर्ण चराचरात्मक जगत् कसें आहे हें आज पाहून घें. एवढेंच नाही, तर जें कांही आणखी तुला पाहण्याची इच्छा असेल, तेंहि तूं येथेंच पाहूं शकतोस॥ ७॥

**जेथ उन्मीलन होत आहे दिठी। तेथ पसरती आदित्यांचिया सृष्टी। पुढती निमीलनीं मिठी। देत आहाती॥ १४१॥**
**वदनींचिया वाफेसवें। होत ज्वाळामय आघवें। जेथ पावकादिक पावे। समूह वसूंचें॥ १४२॥**
**आणि भ्रुलतांचे शेवट। कोपें मिळों पाहती एकवाट। तेथ रुद्रगणांचे संघाट। अवतरत देखें॥ १४३॥**
**पैं सौम्यतेचा वोलावा। मिती नेणिजे अश्विनौदेवां। श्रोत्रीं होती पांडवा। अनेक वायु॥ १४४॥**
**यापरी एकेकाचिये लीळे। जन्मती सुरसिद्धांचीं कुळें। ऐसीं अपारें आणि विशाळें। रूपें इयें पाहीं॥ १४५॥**
**जयांतें सांगावया वेद बोबडे। पहावया काळाचेंही आयुष्य थोकडे। धातयाही परि न सांपडे। ठाव ज्यां॥ १४६॥**
**जयांतें वेदत्रयी कधी नायके। तियें इयें प्रत्यक्ष देख अनेकें। भोगीं आश्चर्याचीं कवतिकें। महासिद्धी॥ १४७॥**
**इया मूर्तीचिया किरीटी। रोममूळीं देखें पां सृष्टी। सुरतरुतळवटीं। तृणांकुर जैसे॥ १४८॥**
**वातायनाचेनि प्रकाशें। उडत परमाणु दिसती जैसें। भ्रमत ब्रह्मकटाह तैसें। अवयवसंधीं॥ १४९॥**
**एथ एकैकाचिया प्रदेशीं। विश्व देख विस्तारेंशीं। आणि विश्वाही परौतें मानसीं। जरी देखावें वर्ते॥ १५०॥**

**अर्थ**—ज्या विश्वरूपाच्या ठिकाणी दृष्टि उघडल्या बरोबर सर्व बाराही आदित्यांची उत्पत्ति होते व लावल्या बरोबर त्यांचा लोप होतो॥ १४१॥ तोंडांतून निघणाऱ्या वाफेबरोबर सर्व ज्वालामयच होऊन जाते व त्यांतच अग्नि इत्यादि सर्व वसूंचा समूह दिसूं लागतो॥ १४२॥ आणि जेथे क्रोधाने भृकुटींचे शेवट एकत्र होऊं पाहत आहेत, तेथे रुद्रगणांचा समूह उत्पन्न होत आहे, पहा॥ १४३॥ माझ्या विश्वरूपाचे ठिकाणीं, जेथे सौम्यपणाचा थोडा थंडावा दिसेल, तेथे असंख्य अश्विनौ देव उत्पन्न झालेले दिसतील आणि कानाचे ठिकाणीं अनेक वायु उत्पन्न झालेले आहेत, पहा॥ १४४॥ याप्रमाणे एका एका माझ्या रूपाच्या या लीलेमध्यें अनेक देव, सिद्ध यांचीं कुळें जन्माला येतात. अशीं माझीं हीं अनंत व विशाल रूपें पहा॥ १४५॥ ज्या विश्वरूपाचें वर्णन करतां करतां वेदाची बोबडी वळली, ज्याला पाहण्याकरितां काळाचें आयुष्य अपुरें पडतें-म्हणजे जेथे काळाचाहि अंत होतो व ब्रह्मदेवालाही ज्याचा पत्ता लागत नाही॥ १४६॥ ज्या स्वरूपाची गोष्ट तिन्ही वेदांना देखील ऐकायला कधीं मिळत नाही, तीं माझीं रूपें तू आतां प्रत्यक्ष पहा व आश्चर्याचें कौतुक किंवा आनंद हीच कोणी महासिद्धि, तिचें सुख भोग॥ १४७॥ ज्याप्रमाणे कल्पतरुच्या बुडाशीं गवताचें अंकुर वाढावें, त्याप्रमाणे या विश्वमूर्तीच्या रोमारोमांचे ठिकाणी तुला सृष्टि दिसेल, पहा!॥ १४८॥ एखाद्या गवाक्षांतून आलेल्या सूर्याचे किरणांत परमाणु उडत असेलेले दिसतात, त्याप्रमाणे माझ्या विश्वरूपाच्या अवयवसंधींत अनेक ब्रह्मांडें फिरत असलेली दिसतील॥ १४९॥ येथे एका एका अवयव प्रदेशावर सर्व विस्तृत ब्रह्मांडरचना आहे, पहा! आणि ब्रह्मांडाचे पलीकडेहि पाहण्याची जर इच्छा असेल॥ १५०॥

**गूढार्थदीपिका—एथ एकैकाचिया प्रदेशीं। विश्व देख विस्तारेंसीं**—या वचनाने मागे सांगितल्याप्रमाणे विश्वरूपाचे ठिकाणी अर्जुनाला जगताचा मिथ्या भास दिसत होता हें दाखविलें आहे. आणि "विश्वाही परौतें मानसीं। देखावें वर्ते" या चरणाने अर्जुनाला सृष्टीच्या भासावांचून विश्वरूपाचा केवल सच्चिदानंदात्मकहि प्रत्यय येत होता, असें सुचविलें आहे; म्हणून विश्वरूपांत अर्जुनाला येत असलेला विश्वाचा प्रत्यय, हा सत्य नसून मृगजळाप्रमाणेंच मिथ्या होता असें म्हणावें लागतें; कारण सच्चिदानंदाचा प्रत्यय लोपल्याखेरीज, विश्वाचा सत्य प्रत्यय येणें शक्य नाहीं.

**तरी तियेही विषयींचें कांहीं। एथ सर्वथा सांकडें नाहीं। सुखें आवडे तें माझिया देहीं। देखसी तूं॥ १५१॥**

**अर्थ**—तर तेहि पाहणें कठीण नाही. तुला जें पाहावेसें वाटेल, तें खुशाल माझ्या देहाच्या ठिकाणी पाहूं शकतोस॥ १५१॥

**ऐसें विश्वमूर्ती तेणें। बोलिलें कारुण्यपूर्णें। तंव देखत आहे कीं नाहीं न म्हणे। निवांतचि येरु॥ १५२॥**
**एथ कां पां हा उगला। म्हणोनि श्रीकृष्णें जंव पाहिला। तंव आर्तीचें लेणें लेइला। तैसाचि आहे॥ १५३॥**

**अर्थ**—करुणासंपन्न अशा त्या विश्वमूर्तीने असे म्हटलें, तरी अर्जुन स्तब्धच होता. मी विश्वरूप पाहत आहे

किंवा पाहत नाही, असे तो कांही बोलला नाही॥ १५२॥ असा हा अर्जुन कांही बोलत नाही, उगाच कां आहे, असे म्हणून श्रीकृष्णाने त्याचेकडे जेव्हा पाहिलें तेव्हा तो पूर्वी जसा भगवंताच्या विश्वरूपाच्या दर्शनाची इच्छा करीत होता, तसाच तो दिसला॥ १५३॥

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा। दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्॥ ८॥**

**अर्थ**—(भगवान म्हणतात, अर्जुना!) तूं आपल्या चर्मचक्षुने माझ्या या विश्वरूपाला पाहूं शकत नाहीस. मी तुला दिव्य चक्षु देतो. त्या दिव्यचक्षुने मग मी परमेश्वर, सर्व सामर्थ्याने कसा नटलो आहे, पहा!॥ ८॥

**मग म्हणे उत्कंठे वोहट न पडे। अझुनी सुखाची सोय न सांपडे। परि दाविलें तें फुडें। नाकळेचि यया॥ १५४॥**
**हें बोलोनि देवो हांसिले। हांसोनि देखणिया म्हणितलें। आम्हीं विश्वरूप तरी दाविलें। परि न देखसीच तूं॥ १५५॥**
**यया बोला येरें विचक्षणें। म्हणितलें हां जी कवणासि तें उणें। तुम्ही बकाकरवीं चांदिणें। चरवूं पहामा॥ १५६॥**
**हां हो उटोनियां आरिसा। आंधळिया दावूं बैसा। बहिरीयापुढें हृषीकेशा। गाणीव करा॥ १५७॥**
**मकरंदकणाचा चारा। जाणतां घालूनि दर्दुरा। वायां धाडा शार्ङ्गधरा। कोपा कवणा॥ १५८॥**
**जें अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें। केवळ ज्ञानदृष्टीचिया विभागा फिटलें। तें तुम्हीं चर्मचक्षूंपुढें सूदलें। मी कैसेंनि देखे॥ १५९॥**

**अर्थ**—मग श्रीकृष्ण मनांत म्हणाले, की माझें विश्वरूप पाहण्याची उत्कंठा अजून कमी झालेली दिसत नाही आणि विश्वरूपाच्या दर्शनाने व्हावयाचें जें सुख तेंहि झालेलें दिसत नाही, कारण मी जे विश्वरूप दाखविलें, तें अजून त्याला आकलन झालें नाही॥ १५४॥ असें मनांत बोलून देव हसले व हसून विश्वरूप पाहण्याची इच्छा करणाऱ्या अर्जुनाला म्हणाले, (अर्जुना!) आम्हीं तुझ्या इच्छेप्रमाणे विश्वरूप दाखविलें असतां, तूं तर पाहतच नाहीस?॥ १५५॥ या भगवंताच्या बोलण्याला त्या बुद्धिमान अर्जुनाने असे उत्तर दिलें की, अहो देवा! हा उणेपणाचा दोष कोणाकडे आहे? तुम्ही बगळ्याकडून चंद्राच्या प्रकाशांतील अमृतकण चरवूं पाहतां काय?॥ १५६॥ अहो हृषीकेशा! तुम्ही आरसा स्वच्छ करून तो आंधळ्याला दाखवूं पाहतां किंवा बहिऱ्यापुढें गायन करतां!॥ १५७॥ फुलांतील मधाचा चारा जाणूनबुजून बेडकाला घालून वायां घालवितां! मग हे शारंगधरा! कोणावर रागावतां?॥ १५८॥ जें विश्वरूप इंद्रियाने दिसण्याजोगें नाही, केवळ ज्ञानदृष्टीच्या आटोक्यांतील आहे, असें शास्त्राचें म्हणणें आहे, तें विश्वरूप तुम्ही माझ्या ह्या चर्मचक्षुंपुढें मांडलें, मग मी कसा पाहणार?॥ १५९॥

**गूढार्थदीपिका—अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें**—या चरणांत माऊलींनी विश्वरूप हें अतींद्रिय असल्यामुळे ज्ञानदृष्टीने दिसण्याजोगें आहे, अज्ञानजन्य स्थूलदृष्टीने दिसण्याजोगें नाही, असें अर्जुनाचे मुखाने वदवून, विश्वरूपाच्या मायिकपणाविषयीच्या शंकेचा निरास केला आहे.

**चर्मचक्षु**—ज्या दृष्टीला सच्चिदानंदस्वरूपाचें मुळींच ज्ञान नसतें व जी दृष्टा दृश्य यांचा भेद पाहून दृश्याला जडविनाशी व अनेकवस्तुरूप मानते, त्या दृष्टीला 'चर्मचक्षु' म्हणतात.

**ज्ञानदृष्टि**—ज्या दृष्टीने शुद्ध सच्चिदानंदस्वरूपाचें ज्ञान होतें, त्या दृष्टीला ज्ञानदृष्टि किंवा अतींद्रियदृष्टि म्हणतात.

**परि हें तुमचें उणें न बोलावें। मीचि साहें तेंचि बरवें। एथ आथि म्हणितलें देवें। मानूं बापा॥ १६०॥**
**साच स्वरूप जरी आम्हीं दावावें। तरी आधीं देखावया सामर्थ्य कीं द्यावें। परि बोलत प्रेमभावें। धसाळ गेलों॥ १६१॥**
**काय जाहलें न वाहतां भुईं पेरिजे। तरी तो वेलु विलया जाइजे। तरी आतां माझें निजरूप देखिजे। ते दृष्टी देवों तुज॥ १६२॥**
**मग तिया दृष्टी पांडवा। आमुचा ऐश्वर्ययोगु आघवा। देखोनियां अनुभवा। माजिवडा करीं॥ १६३॥**

**अर्थ**—पण तुमचा दोष काढूं नये. तो मी आपल्याकडेच घेणें बरें. या अर्जुनाच्या बोलण्यावर भगवान म्हणतात, बा अर्जुना! तुझें म्हणणें मला मान्य आहे॥ १६०॥ खरेंच आहे, जर आम्ही तुला विश्वरूप दाखवावयाचें, तर अगोदर तें विश्वरूप पाहण्याचें तुला सामर्थ्य द्यायला पाहिजे; पण अर्जुना! प्रेमाच्या वेगांत विचार सुचला नाही॥ १६१॥ कांही झालें तरी मशागत न करतां जमिनींत पेरलेला वेल नाश पावतो, असो. आतां ज्या दृष्टीने माझें विश्वरूप तुला पाहतां येईल, ती दृष्टि देतों॥ १६२॥ मग त्या दृष्टीच्या साहाय्याने माझा संपूर्ण ऐश्वर्ययोग पाहून तो अनुभवांत दृढ कर॥ १६३॥

**गूढार्थदीपिका—ऐश्वर्ययोग आघवा। देखोनिया अनुभवा-माजिवडा करी—**मीच एक जो सच्चिदानंदस्वरूप, तोच संपूर्ण नामरूपाने नटलों असून, नामरूपाचें व माझें अत्यंत ऐक्य असल्यामुळें, नामरूपें देखील सच्चिदानंदस्वरूपच आहेत, अशा परमेश्वराच्या अनुभवाला परमेश्वराचा ऐश्वर्ययोग म्हणतात, हें मागें सांगितलेंच आहे.

सच्चिदानंद परब्रह्माची मूळशक्ति चैतन्यस्वरूपच आहे. ''संविदेव पराशक्तिः'' असे सूतसंहितेंत म्हटलें असून ''**परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबल क्रिया च**'' (श्वे० उ० ६-८) परब्रह्माची, ज्ञानरूप म्हणजे संपूर्ण जाणण्याची किंवा सर्वज्ञतारूप व बलक्रियारूप म्हणजे अमर्याद सामर्थ्यरूप, शक्ति नानाप्रकारची म्हणजे अनंतनामरूपाने व षड्गुणैश्वर्याने आविष्कार पावणारी स्वाभाविक आहे, असें श्वेताश्वतर उपनिषदांत म्हटलें आहे.

''चित्पद ते माया'' असे नाथहि म्हणतात. जीवाच्या ठिकाणीं असणाऱ्या अविद्येच्या अपेक्षेने या भगवंताच्या पराशक्तीलाच वेदान्तातून ''विद्या'' असें नांव देण्यांत आलें आहे.

भगवान सृष्टिउत्पत्तिकालीं, आपल्या चैतन्यात्मक विद्याशक्तीशीं व जीवाच्या ठिकाणी असलेल्या अविद्याशक्तीशीं क्रीडा करतो व वेदाने त्या दोन्ही प्रकारच्या क्रीडेचें वर्णन केलें आहे, असे भागवतांत ''क्वचिदजयाऽऽत्मना च चरतोऽनुचरेन्निगमः'' (भाग० स्कं० १०-८७-१४) या श्लोकाने सांगितलें आहे.

स्कंदपुराणांतील श्रीभागवतमाहात्म्यांत ''**लीलैवं द्विविधा तस्य वास्तवी व्यावहारिकी। वास्तवी तत्स्वसंवेद्या जीवानां व्यावहारिकी॥ आद्यांविना द्वितीया न द्वितीया नाद्यगा क्वचित्**'' (स्कं० पू० वै० खं० भागवतमाहात्म्य अ० १-२६-२७) भगवंताची दोन प्रकारची लीला सांगितली आहे. वास्तवी व व्यावहारिकी. वास्तवी-म्हणजे सत्य अविनाशी. पहिली लीला सच्चिदानंदनामरूपात्मक असते. भगवंताचे अवतार, भक्त, व्रजवासी जन, गायी, गोपादिक इत्यादि नामरूपादिक सच्चिदानंदस्वरूपाचा आविष्कार होणें, ही पहिली लीला होय.

तैत्तिरीयोपनिषदांत ''सोऽकामयत बहुस्यां प्रजायेयेति'' या श्रुतीवर भाष्य करतांना आचार्य म्हणतात, भगवंताचा प्रथम होणारा संकल्प, सत्यज्ञानलक्षणात्मक स्वात्मभूत असल्यामुळे विशुद्ध असतो-म्हणजे मी सच्चिदानंदात्मक नामरूपाने बहुरूप व्हावें, असाच भगवंताच्या प्रथम संकल्पाचा मूळ अर्थ असतो.

**व्यावहारिकी**-म्हणजे ब्रह्मज्ञान होत नाही तोपर्यंत भासणारी अशी जडविनाशी पांचभौतिक सृष्टिरूप ही दुसरी लीला होय.

'सत्यलीला' स्वयंवेद्य असून, ज्ञानी भक्ताच्या अनुभवाला येते व 'व्यावहारिक' लीला अज्ञानी जनांच्या अनुभवाला येते असें म्हटलें आहे. पहिली लीला अगोदर होते व दुसरी लीला नंतर होते. दुसरी लीला अगोदर कधी होत नाही.

**परमार्थस्त्वमेवैको नान्योऽस्ति जगतः पते। तवैष महिमा येन व्याप्तमेतच्चराचरम्॥ ३८॥**
**यदेतद् दृश्यते मूर्तमेतज्ज्ञानात्मनस्तव। भ्रांतिज्ञानेन पश्यंति जगद्रूपमयोगिनः॥ ३९॥**

(विष्णुपुराण-प्रथम अंश-अ० ४)

भगवंता! तूंच एक असून, तुझ्यावांचून दुसरी वस्तु नाही. तूं संपूर्ण नामरूपात्मक चराचराच्या आंतबाहेर व्यापून आहेस-म्हणजे तूंच संपूर्ण चराचरात्मक झाला आहेस. हें तुझें अगाध सामर्थ्य होय. जेवढें कांही नामरूपात्मक सगुण दिसतें, तें सर्व ज्ञानस्वरूप तूंच झाला आहेस. असे असतांना अविद्याभ्रांतिजन्य विपरीतज्ञानाने युक्त असलेले अज्ञानी लोक, तुझ्या त्या नामरूपात्मक आविष्काराला जडविनाशी जगद्रूप समजतात, असें विष्णुपुराणांत सांगितलें आहे.

या सर्वाचा निष्कर्ष असा आहे की, आम्ही मागें सांगितल्याप्रमाणे, निर्विकल्प परब्रह्म, आपल्या स्वाभाविक ज्ञानशक्तीने स्फुरण पावून, सर्वनामरूपात्मक षड्गुणैश्वर्यसंपन्न विश्वरूपाकार होतें आणि तेंच भगवंताचें विश्वरूप अविद्याभ्रांतियुक्त जनांना नाना, जड, विनाशी व पांचभौतिक पदार्थाकार दिसतें. हा भगवंताचा विश्वरूपाकार ऐश्वर्ययोग, ''सर्वं खल्विदं ब्रह्म'' ''पुरुष एवेदं विश्वम्'' या श्रुतींतील व त्यावरील आचार्यांच्या ''न विश्वं नाम पुरुषादन्यत् किंचिदस्ति'' या भाष्यपंक्तींतील वचनानुसार, संपूर्ण चिन्मयच असल्यामुळे, भगवान, अर्जुनाला तो ''अनुभवामाजिवडा करी'' अनुभवांत दृढ कर, असें म्हणत आहेत.

**ऐसें तेणें वेदांतवेद्यें। सकळलोकआद्ये। बोलिलें आराध्यें। जगाचेनि॥ १६४॥**

**अर्थ**—वेदान्तविचाराने कळणारा, सर्व सृष्टीच्या पूर्वी कारणरूपाने असणारा व सर्व जगाचें आराध्य दैवत असा जो परमात्मा, तो याप्रमाणे बोलला॥ १६४॥

**गूढार्थदीपिका-बोलिलें आराध्ये जगाचेनि**—परमात्मा भगवान श्रीकृष्ण अद्वैतरूप असून, त्याच्यावांचून दुसरी वस्तुच नसल्यामुळे, निरनिराळ्या धर्मांतील लोक, त्याचीच निरनिराळ्या उपास्यांच्या रूपाने कल्पना करून, उपासना करीत असले, तरी ती भगवान श्रीकृष्णाचीच होते, असे "बोलिलें आराध्यें जगाचेनि" या वचनाने माऊलींनी सांगितलें आहे. "रुचीनां वैचित्र्यात् ऋजुकुटिलनानापथजुषाम्। नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णवमिव" असे महिम्नस्तोत्रांतहि म्हटलें आहे.

पण उपासकांची भावना निरनिराळी असल्यामुळें, फळ मात्र निरनिराळें मिळतें, हें मागील नवव्या अध्यायांतील २३ व्या श्लोकांत सांगितलेंच आहे.

*संजय उवाच*

**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः। दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्॥ ९॥**

**अर्थ**—संजय म्हणतो, राजा! महायोगेश्वर भगवान श्रीकृष्णाने असे बोलून, अर्जुनाला आपलें श्रेष्ठ असें ईश्वरीस्वरूप दाखविलें॥ ९॥

**पैं कौरवकुळचक्रवर्ती। मज हाचि विस्मयो पुढतपुढती। जें श्रियेहूनि त्रिजगतीं। सदैव असे कवणी॥ १६५॥**
**ना तरी खुणेचें वानावयालगीं। श्रुतीवांचूनि दावा पां जगीं। ना सेवकपण तरी अंगीं। शेषाच्याचि आथि॥ १६६॥**
**हां हो जयाचेनि सोसें। शिणत आठही पाहार योगी जैसें। अनुसरलें गरुडाऐसें। कवण आहे॥ १६७॥**
**परि तें आघवेंचि एकीकडे ठेलें। सापें कृष्णसुखा एकंदरें जाहलें। जिये दिवसींहूनि जन्मलें। पांडव हे॥ १६८॥**
**परि पांचांही आंतु अर्जुना। श्रीकृष्ण सावियाचि जाहला अधीना। कामुक कां जैसा अंगना। आपैता कीजे॥ १६९॥**
**पढविलें पाखिरूं ऐसें न बोले। यापरी क्रीडामृगही तैसा न चले। कैसें दैव एथें सुरवाडलें। तें जाणों न ये॥ १७०॥**
**आजि परब्रह्म हें सगळें। भोगावया सदैव याचेचि डोळे। कैसें वाचेचे हन लळे। पाळीत असे॥ १७१॥**
**हा कोपे कीं निवांत साहे। हा रुसे तरी बुझावीत जाये। नवल पिसें लागलें आहे। पार्थाचें देवा॥ १७२॥**
**येऱ्हवीं विषय जिणोनि जन्मले। जे शुकादिक दादुले। ते विषयोचि वानितां जाहले। भाट ययाचे॥ १७३॥**
**हा योगियांचें समाधिधन। कीं होऊनि ठेलें पार्थाअधीन। यालगीं विस्मयो माझें मन। करीतसे राया॥ १७४॥**

**अर्थ**—संजय म्हणतो, हे कौरवांच्या कुळांत उत्पन्न झालेंच्या सार्वभौमराजा धृतराष्ट्रा! मला वारंवार याचेंच आश्चर्य वाटतें की, या त्रैलोक्यांत श्रीलक्ष्मीपेक्षा भाग्यवान दुसरी कोणती स्त्री आहे?॥ १६५॥ किंवा आत्मस्वरूपाची खुणेने ओळख पटवून देणारा वेदाशिवाय जगांत दुसरा कोण आहे? किंवा खरें सेवकपण भगवंताची अखंड शय्या होऊन राहणाऱ्या शेषाच्याच ठिकाणी आहे॥ १६६॥ ज्याचा ध्यास लागून योग्याप्रमाणे आठहि प्रहर अविश्रान्त सेवा करणारा गरुडासारखा दुसरा कोण आहे?॥ १६७॥ पण ते सर्व बाजूला राहिले आणि सांप्रत पांडव जन्मले त्या दिवसापासून यांचेच ठिकाणीं भगवान श्रीकृष्णाचे संपूर्ण सुख एकवटून राहिलें॥ १६८॥ पण जसा कामासक्त पुरुष स्त्रियेच्या सर्वस्वीं स्वाधीन होतो, तसा श्रीकृष्ण हा, त्या पांचांहि पाडवांमध्यें खरोखरच अर्जुनाच्या सर्वस्वीं स्वाधीन झाला॥ १६९॥ (भगवान श्रीकृष्ण, अर्जुनाच्या जसा स्वाधीन झाला) तसा शिकविलेला पक्षीही शिकविणाऱ्यांचें सर्वस्वी स्वाधीन होऊन बोलणार नाही किंवा करमणुकीकरितां पाळलेले हरिणहि असे स्वाधीन होऊन चालणार नाही. अर्जुनाचें थोर भाग्य कसें उदयाला आलें तें समजत नाही॥ १७०॥ श्रीकृष्णरूपाने प्रगट झालेलें संपूर्ण परब्रह्म सर्वदा भोगण्याकरितां याचेच डोळे होते. अर्जुनाच्या बोलण्याचे भगवान कसे लळे पाहतो, पहा!॥ १७१॥ अर्जुन रागावला तर भगवान मुकाट्याने तें सहन करतात, अर्जुन रुसला तर स्वतः भगवान त्याला समजवितात, असे कांही अर्जुनाचें विलक्षण वेड श्रीभगवंताला लागलें आहे॥ १७२॥ संपूर्ण विषयवासना जिंकून जन्माला आले, असे जे

समर्थ शुकादिक मुनी, ते देखील या भगवंताच्या विषयभोगादि लीलांचें वर्णन करणारे भाट झाले॥ १७३॥ (जो भगवान श्रीकृष्ण) खरोखर योगियांचा समाधिरूप ठेवा होय, पण तोच अर्जुनाच्या स्वाधीन होऊन राहिला; म्हणून, राजा धृतराष्ट्रा! माझ्या मनाला याचेंच वारंवार आश्चर्य वाटतें॥ १७४॥

**गूढार्थदीपिका**—योगी ज्या निर्गुण, निराकार स्वरूपाचे ठिकाणी अत्यंत कष्टाने चित्त स्थिर करून, समाधि साधतात, तेंच स्वरूप, भक्ताच्या परमप्रेमामुळे सगुण साकार होऊन, भक्ताच्याच सर्वस्वीं स्वाधीन होऊन राहते. असें परमप्रेमरूपभक्तीचें आश्चर्यकारक कौतुक आहे, असा भाव माऊलींनी सूचित केला आहे.

**तेवींचि संजय म्हणे कायसा। विस्मयो एथें कौरवेशा। श्रीकृष्णें स्वीकारिजे तया ऐसा। भाग्योदय होय॥ १७५॥**

**अर्थ**—पुन: संजय आपणच म्हणतो, हे कौरवांच्या स्वामी धृतराष्ट्रा! येथें आश्चर्य करण्याचें कारणच नाही. भगवान श्रीकृष्णांनी आपला म्हणून ज्याचा अंगीकार केला, त्याचा भाग्योदय असाच होत असतो॥ १७५॥

**गूढार्थदीपिका**—**"नायं सुखापो भगवान् देहिनां गोपिकासुत। ज्ञानिनां चात्मभूतानां यथाभक्तिमतामिह॥"**

(भाग० स्कं० १०-९-२१)

पूर्णब्रह्मप्राप्ति, भक्तांना जितकी सुलभ होते, तितकी निर्गुणआत्मस्वरूप झालेल्या ज्ञान्यांनाहि होत नाही. ज्ञान्यांना व योग्यांना, भगवंताला वृत्तीने धरून ठेंवावें लागतें, पण भगवान भक्तांच्या स्वाधीनच होऊन राहतो व स्वत: त्यांच्या पूर्णस्थितीचें संगोपन करतो; म्हणूनच त्यांना भाग्यवान म्हटलें जातें.

**म्हणोनि तो देवांचा रावो। म्हणे पार्थाते तुज दृष्टि देवों। जया विश्वरूपाचा ठावो। देखसी तूं॥ १७६॥**
**ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें। निघती ना जंव एकसरें। तंव अविद्येचें आंधारें। जावोंचि लागे॥ १७७॥**

**अर्थ**—म्हणून तो देवांचाहि देव भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला, ज्या दृष्टिने माझ्या विश्वरूपाचा ठाव घेशील, अशी दृष्टि तुला देतो॥ १७६॥ श्रीकृष्णाच्या मुखांतून अशी अक्षरें निघाल्याबरोबर एकदम अविद्यारूपी अंध:कार नाहीसा झाला॥ १७७॥

**गूढार्थदीपिका**—सर्वांच्या अंत:करणांत ज्या परमेश्वराचा अखंड वास आहे व ज्याच्या प्राप्तीचा प्रयत्न करावयाचा असतो, तोच परमात्मा अर्जुनाला बाहेर सद्‌गुरुरूपाने जर प्राप्त झाला, तर त्या सत्यसंकल्प परमेश्वराने दिव्यदृष्टि देतो असा संकल्प केल्याबरोबर अविद्या अंध:कार नाहीसा व्हावा, यांत आश्चर्य नाही. तोच अंतर्यामी परमात्मा आत्मज्ञानाच्या रूपाने प्रगट होतो व भक्ताच्या अंत:करणांतील अविद्या अंध:कार नाहीसा करतो. अविद्या अंध:कार नाहीसा होऊन ज्ञानदृष्टीने पाहिलें जाणारें विश्वरूपहि अर्थात्‌च खोटें असणें शक्य नाही.

**"त्वं सर्वभूतहृदयेषु कृतालयोऽपि त्वं मंत्रजाप्यविमुखेषु तनोषि मायाम्॥ त्वन्मंत्रसाधनेष्वपयाति माया। सेवानुरूपफलदोऽसि यथा महीप:॥"** (अहिल्यास्तव-अध्यात्मरामायण)

जे भगवंताला विन्मुख असतात, त्यांना भगवंताची शक्ति भ्रम उत्पन्न करते; म्हणून त्यांच्या दृष्टीने ती शक्ति, अविद्या या संज्ञेला पात्र होते व जे भगवंताच्या सदा सन्मुख असतात, भगवंताला आठवितात, त्यांना भगवंताची शक्ति, भगवंताचे शुद्धस्वरूप दाखविते; म्हणून तिला "विद्या" किंवा "शुद्धसत्वात्मक माया" हें नांव प्राप्त होतें.

येऱ्हवीं माया ही मूळांत चैतन्यस्वरूप असल्यामुळे, ती परमेश्वराप्रमाणे सच्चिदानंदस्वरूप आहे. तीच स्फुरण पावली असतां दृष्टिरूप किंवा वृत्तिरूप होते किंवा शक्तिस्फुरणाला किंवा शक्तीच्या व्यक्त होण्याला दृष्टि किंवा वृत्ति म्हणतात. म्हणून अर्जुनाला भगवंतांनी जी दिव्यदृष्टि देतो म्हणून म्हटलें, ती दिव्यदृष्टि म्हणजे ज्ञानदृष्टि होय.

ही ज्ञानदृष्टि व्यतिरेकाने येणारी व अन्वयाने येणारी अशी दोन प्रकारची असून, ही दोन्ही प्रकारची ज्ञानदृष्टि भगवंतांनी अर्जुनाला दिली होती, हें पुढें १९५ व्या ओवींत सांगितलें आहे.

वस्तूची शक्ति स्फुरली की वस्तु व वस्तूची शक्ति असे दोनपण येते; म्हणून दोनपण हे शक्तीचें कार्य आहे. हें दोनपण दिसलें, तरी दोन्ही मिळून एक वस्तुच असते. जीवाला तें दोनपण द्वैतरूप भासते म्हणजे त्या दोनपणाला जीव स्वतंत्र अस्तित्वाच्या व वस्तुत्वाच्या दोन वस्तु, अज्ञानाने समजतो व एक वस्तु दोनपणाने भासते, हे तो विसरतो;

म्हणून त्याची ती भ्रांति किंवा अविद्या समजली जाते. ज्ञानीपुरुष दोनपणा दिसत असला तरी दोन्ही मिळून एक वस्तु आहे असें समजतो. ''अद्वैतं परमार्थोऽयं द्वैतं तद्भेद उच्यते'' (मां० का०) या मांडुक्यकारिकेवर भाष्य करतांना द्वैत हें अद्वैताचेंच कार्य असल्यामुळे, द्वैत हें अद्वैताचे विरोधी नाही असें आचार्यांनी म्हटलें असून माझ्या सद्‌गुरु आईनीहि ''द्वैत निषेधें अद्वैत। हा वनवासियांचा सिद्धान्त। अद्वैत हानी न करीं द्वैत। हा सिद्धान्त निगमाचा॥ ७९॥'' (प्रीतिनर्तन पदन्यास-१) असेच म्हटलें आहे.

''**भेद तंव तंव दूण। अभेदासी**'' हें अमृतानुभवांतील माऊलीचे वचन याच सिद्धान्ताला पुष्टि देणारें आहे.

सारांश, ज्ञानदृष्टीने संपूर्ण नामरूपें हीं एका परब्रह्माच्या सच्चिदानंदशक्तीचा आविष्कार आहे असें कळून येतें अर्जुनाला भगवंतांनी हीच ज्ञानदृष्टि दिली होती.

भगवान श्रीकृष्णाचे ठिकाणीं, अर्जुन विश्वरूप पाहत होता, तरी तो विश्वरूपाला श्रीकृष्णाहून निराळे समजत नव्हता-म्हणजे विश्वरूपाचा अनेकपणा पाहत होता, तरी एक भगवान श्रीकृष्ण आपल्या शक्तीने बहुरूप झाला हे त्याला माहित होतें तें तो विसरला नव्हता; म्हणून विश्वरूपदर्शन ज्ञानदृष्टीने येणारा अनुभव होय-भ्रांतीचा प्रत्यय नव्हे-हें सिद्ध आहे.

**तीं अक्षरें नव्हती देखा। ब्रह्मसाम्राज्यदीपिका। अर्जुनालागीं चित्कळिका। उजळलिया कृष्णें॥ १७८॥**

**अर्थ**—श्री ज्ञानेश्वर माऊली म्हणतात, भगवंताचे मुखांतून ''मी तुला दिव्यदृष्टि देतो'' हीं जीं अक्षरें निघाली ती अक्षरे नव्हती, ती ब्रह्मस्वरूपाचे साम्राज्य दाखविणारी ज्योति होती. ती ज्ञानज्योति अर्जुनाकरितां भगवंतांनी उजळली होती॥ १७८॥

**गूढार्थदीपिका—ब्रह्मसाम्राज्यदीपिका**—भगवंतानी अर्जुनाला जी दिव्य दृष्टि दिली, ती ''चित्कळिका'' म्हणजे चैतन्याची ज्योति होती आणि ती ''ब्रह्मसाम्राज्यदीपिका'' म्हणजे परब्रह्माचा संपूर्ण नामरूपात्मक आविष्कार सच्चिदानंदस्वरूप आहे असा प्रत्यय आणून देणारी होती, हें श्री ज्ञानेश्वरमाउलींनीच येथें स्पष्ट केलें आहे.

**चित्कळिका उजळलिया श्रीकृष्णें**—निर्गुण व सगुणस्वरूपाचें ऐक्यच असल्यामुळे, भगवान श्रीकृष्णहि सर्व ब्रह्मांडाचें अधिष्ठान आहेत; म्हणून ते (श्रीकृष्ण) स्वत: अमर्याद ज्ञान-ऐश्वर्यादिगुणांनी युक्त असून सर्व जीवांचे अंतर्यामि असल्यामुळे, तेच सर्व जीवांच्या अंत:करणांत त्यांच्या कर्मानुसार ज्ञान अज्ञानशक्तींचा उद्बोध करणारे आहेत, असे भागवतांत ''अगजगदौकसामखिलशक्त्यबोधक ते'' (भा० द० ८४-१४) या पंक्तीने सांगितलें आहे.

माउलीनी, याच अर्थाने अर्जुनाच्या अंत:करणांत श्रीकृष्णांनी ''चित्कळिका उजळली'' असें म्हटलें आहे.

**मग दिव्यचक्षु प्रकाशु प्रगटला। तया ज्ञानदृष्टी फाटा फुटला। ययापरी दाविता जाहला। ऐश्वर्य आपुलें॥ १७९॥**

**अर्थ**—मग (भगवंतांनी म्हटल्याबरोबर) अज्ञानांध:कार नाहीसा होऊन चैतन्याचा प्रकाश झाल्यामुळे, त्याला (अर्जुनाला) सर्वत्र एक अस्फुट अद्वैत श्रीकृष्णवस्तुच आहे, अशी ज्ञानदृष्टि प्राप्त झाली. या प्रमाणे भगवंतांनी अर्जुनाला विश्वरूप ऐश्वर्य दाखविलें॥ १७९॥

**हे अवतार जे सकळ। ते जिये समुद्रींचें कां कल्लोळ। विश्व हे मृगजळ। जया रश्मीस्तव दिसे॥ १८०॥**

**अर्थ**—संपूर्ण अवतार हे त्या समुद्राचे तरंग असून जग त्याच्या वृत्तिरूप किरणामुळे दिसणारे मृगजळ आहे॥ १८०॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताचा सगुण साकार विग्रह व सगुण साकार जगत् या दोहोंमध्ये कसा फरक आहे, हें या ओवींतून माऊलींनी दाखविलें आहे.

सर्व केवलाद्वैतवादी आचार्य व श्रीज्ञानेश्वर महाराजादि संत यांनी सच्चिदानंदपरब्रह्माहून भिन्न भासणारे जीव, जगत्, परमात्मा, अवतार यांचें परब्रह्माशीं ऐक्य आहे हें सांगण्याकरितां, परब्रह्माचे ठिकाणी हे निवर्तरूप आहेत असे मानलें आहे.

अनुभवी गुरुच्या मुखाने वेदान्तसिद्धान्ताचें श्रवण न केलेले वेदान्ती, अध्यस्तविवर्त, हाच एक विवर्त आहे,

दुसरा विवर्त नाही असे म्हणतांना दिसतात. पण हें मत माऊलींना मान्य असते, तर त्यांनी, अवताराला समुद्राच्या कल्लोळाचा व जगाला मृगजळाचा असा भिन्न भिन्न दृष्टान्त देण्याचें कारणच नव्हतें. अवताराला व जीवाला दोन भिन्न दृष्टान्त देऊन माऊलींनी विवर्त हा एक प्रकारचा नसून, दोन प्रकारचा आहे, हें स्वमुखानेच स्पष्ट केलें आहे. या दोन विवर्ताविषयीचें विवेचन आम्ही नवव्या अध्यायांत ओवी ६५ वरील गूढार्थदीपिकेंत केलेंच आहे.

हें सूर्याचें कंपन आहे, असे न जाणणाऱ्या मृगांना, जसें तें कंपन, भ्रांतीने विपरीत असे जलरूप दिसतें, त्याप्रमाणे सच्चिदानंद परब्रह्मच नामरूपाने आविष्कृत झालें आहे, असें न जाणणाऱ्या जीवांना तो परब्रह्माचा नामरूपात्मक आविष्कारच जड-विनाशी जगद्रूप भासतो; म्हणून जगत् हें अध्यस्तविवर्त आहे, असें ''विश्व हें मृगजळ'' या चरणाने माऊलींनी सुचविलें आहे.

पण समुद्रावर उठणाऱ्या कल्लोळरूप विवर्तांत, समुद्रच भरला आहे व त्याचें समुद्राशीं पूर्ण ऐक्य आहे, असाच प्रत्यय येतो; म्हणून तो अध्यस्तविवर्त नव्हे. तो अनध्यस्तविवर्त होय. त्याप्रमाणे अवताररूप विवर्ताचे ठिकाणी देखील अधिष्ठानभूत परब्रह्माच्या सच्चिदानंदादि लक्षणांचा व त्याचे परब्रह्माशीं असलेल्या ऐक्याचा अनुभव येत असल्यामुळे, अवतार हे भ्रांतिजन्य अध्यस्तविवर्त आहेत-असेंच म्हटलें पाहिजे, असे माऊलींनी अवतार हे ''समुद्रीचे कल्लोळ'' या चरणाने सुचविलें आहे.

जगद्रूप अध्यस्तविवर्ताचे, आत्मज्ञानाने भिन्न वस्तुत्व व भिन्न धर्मत्व नाहीसें झाल्यावर, हा जगद्रूपविवर्त, अधिष्ठानरूप परब्रह्माशीं ऐक्य पावून पूर्ण सच्चिदानंदरूपानेच अनुभवाला येतो आणि अवताररूप विवर्त, जशाच्या तसाच पूर्णब्रह्मत्वाने अनुभवाला येतो, आत्मज्ञानाने देखील नाहीसें होण्याजोगें त्याच्या ठिकाणीं कांही नसतें.

केवलाद्वैतवादी आचार्य व श्रीज्ञानेश्वरादि संत यांना अवतारांचे पूर्णब्रह्मत्व मान्य आहे हें आम्ही मागे नवव्या अध्यायांत त्यांचीच वचनें उदाहृत करून दाखविलें आहे. पण त्यांनी अवतारांना अनध्यस्तविवर्त हे नांव दिलेले नाही. माझ्या सद्गुरुआईंनी आपल्या ग्रंथांतून अवतारांना 'अनध्यस्तविवर्त' हे नांव देऊन ती उणीव भरून काढली आहे.

**जिये अनादिभूमिके निटे। चराचर हें चित्र उमटे। आपणपें वैकुंठें। दाविलें तया॥ १८१॥**

**अर्थ**—सच्चिदानंदनामरूपाने नटलेल्या ज्या विश्वरूप अनादि भूमिकेवर हें चराचरविश्वाचें चित्र उमटतें, तें विश्वरूप आपणच आहों असे भगवंतांनी अर्जुनाला दाखविलें॥ १८१॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताच्या विश्वरूपावरच, जडविनाशी जगताचा भास होतो, असें जें आम्ही मागें १६३ ओवीवरील गूढार्थदीपिकेंत म्हटलें आहे तें या ओवीच्या आधारानेच म्हटलें आहे.

येथे विश्वरूप अनादि आहे हें ''अनादिभूमिके'' या शब्दाने माऊलींनी सांगितलें आहे.

**मागां बाळपणीं येणें श्रीपती। जैं एक वेळ खादली होती माती। तैं कोपोनियां हातीं। यशोदा धरिला॥ १८२॥**
**मग भेणें भेणें जैसें। मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें। चवदाही भुवनें सावकाशें। दाविलीं तिये॥ १८३॥**
**नातरी मधुवनीं ध्रुवासि केलें। जैसें कपोलशंखें शिवतलें। आणि वेदांचियेही मती ठेलें। तें लागला बोलों॥ १८४॥**

**अर्थ**—मागें एकदां जेव्हा भगवंतांनी बाळपणीं मातीं खाल्ली होती, तेव्हा यशोदेने रागावून त्यांना हातांत धरलें॥ १८२॥ तेव्हा मग भगवान श्रीकृष्णाने 'भ्यालों' असे दाखवून 'मी माती खाल्ली नाही' हे दाखविण्याकरितां तोंड उघडलें असतां, आपल्या तोंडात संपूर्ण चवदाहि भुवनाची सृष्टि यशोदेला दाखविली॥ १८३॥ किंवां मधुवनात तपश्चर्या करीत असलेल्या व भगवंताची स्तुति करूं इच्छिणाऱ्या ध्रुवाचे गालाला आपल्या हातांतील शंखाचा स्पर्श केल्याबरोबर जे वेदालाहि अगम्य, तें तो बोलूं लागला॥ १८४॥

**गूढार्थदीपिका**—सत्य संकल्प, सर्वसमर्थ भगवंताच्या मनांत जसें येतें तसें तात्काळ सृष्टींत घडून येते.

**तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरी केला धनंजया। आतां कवणेकडेही माया। ऐसी भाष नेणें तो॥ १८५॥**

**अर्थ**—संजय म्हणतो. राजा धृतराष्ट्रा! भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनावर तशीच कृपा केली. त्यामुळे माया व तिचा कार्यपसारा या शब्दांचे देखील त्याला ज्ञान होत नव्हते॥ १८५॥

**गूढार्थदीपिका**—येथे 'माया' हा शब्द त्रिगुणात्मक अविद्या व सत्य वाटणारें तिचें जडविनाशी असे अनेकवस्तुरूप जगत्कार्य, या अर्थाने आलेला आहे. आणि अर्जुनाला प्राप्त झालेल्या विश्वरूपदर्शनाने तिचा संपूर्ण नाश होऊन. नामरूपा सह सर्वत्र एका सच्चिदानंदाचाच त्याला अनुभव येत होता. अर्थात् विश्वरूप म्हणजे ज्ञानदृष्टीने दिसणारें मायारहित स्वरूप होय असे माउलीचें मत असल्याचें, या ओवीवरून स्पष्ट होतें.

**एकसरें ऐश्वर्यतेजें पाहलें। तया चमत्काराचें एकार्णव जाहलें। चित्त समाजीं बुडोनि ठेलें। विस्मयाचां॥ १८६॥**

**अर्थ**—एकसारखें जिकडे तिकडे ऐश्वर्यतेजच प्रकाशमान झालेलें दिसूं लागलें. तो आश्चर्याचा सर्वत्र समुद्रच पसरलेला आहे. असें पाहूं लागला आणि त्याचें चित्त त्या आश्चर्याच्या समुदायांत बुडून गेलें॥ १८६॥

**गूढार्थदीपिका—चित्त समाजीं बुडोनि ठेले। विस्मयाचिया**—हाच अर्जुनाचे ठिकाणी प्रगट झालेला अद्भुतरस होय. ज्ञानदृष्टिपूर्वी, अविद्याभ्रमामुळे सत्य मानलेल्या मर्यादित व अनेक वस्तुधर्मयुक्त अशा जगताच्या प्रत्ययाने, जगताला अधिष्ठानभूत असलेलें अमर्याद ऐश्वर्यसम्पन्न असें भगवंताचे स्वरूप झांकले गेले होतें. ज्ञानदृष्टीने तो अविद्याभ्रम नाहीसा झाल्याबरोबर, अनेक वस्तूची व धर्माची देश काल वस्तु ह्या तिन्ही मर्यादा नाहीशा होऊन, ते स्वरूप, भगवंताच्या सर्व अमर्याद ऐश्वर्यरूपानेच दिसूं लागलें. तें पाहून अर्जुनाचे चित्तांत अद्भुतरस प्रगट झाला.

**जैसा आब्रह्म पूर्णोदकीं। पव्हे मार्कंडेय एकाकी। तैसा विश्वरूपकौतुकीं। पार्थु लोळे॥ १८७॥**
**म्हणे केवढें गगन एथ होतें। तें कवणें नेलें पां केउतें। तीं चराचरें महाभूतें। काय जाहलीं॥ १८८॥**

**अर्थ**—ब्रह्मलोकापर्यंत संपूर्ण ब्रह्मांड जलमय झालें असतां, ज्याप्रमाणे एकटे मार्कण्डेय ऋषीच त्या जलांत पोहत असतात, त्याप्रमाणे विश्वरूपाच्या दर्शनाने झालेल्या विस्मयसमुद्रावर अर्जुनहि लोळूं लागला॥ १८७॥ अर्जुन म्हणतो. (मी विश्वरूप पाहण्यापूर्वी) येथें केवढें मोठें आकाश होतें, तें आतां कोणी कोठें नेलें समजत नाही आणि त्या आकाशांत दिसणारी ती भूतसृष्टिहि काय झाली कोणाला माहित?॥ १८८॥

**दिशांचे ठावही हारपले। अधोर्ध्व काय नेणों जाहलें। चेइलिया स्वप्न तैसें गेले। लोकाकार॥ १८९॥**
**नाना सूर्यतेजप्रतापें। सचंद्र तारागण जैसें लोपें। तैसीं गिळिलीं विश्वरूपें। प्रपंचरचना॥ १९०॥**

**अर्थ**—दिशांचा ठावठिकाण राहिला नाही. खाली-वर ह्या दिशाही काय झाल्या समजत नाही? ज्याप्रमाणे जागें झाल्याबरोबर संपूर्ण स्वप्न मावळतें, तसें संपूर्ण लोकालोकांचा प्रत्यय नाहीसा झाला॥ १८९॥ किंवा सूर्य उगवल्याबरोबर, त्याच्या प्रखर तेजाने, ज्याप्रमाणे चंद्रासह सर्व नक्षत्रे त्याच्यात लोपून जातात, त्याप्रमाणे विश्वरूपदर्शनाने सर्व प्रपंचभाव नाहीसा झाला॥ १९०॥

**गूढार्थदीपिका—तैसी गिळिलीं विश्वरूपें। प्रपंचरचना**—प्रपंचरचना म्हणजे जडविनाशी अशा नानावस्तूंचें स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व होय.

विश्वरूप म्हणजे अविनाशी, अस्फुट व निरवयव अशा एका अद्वैत परब्रह्मवस्तूचेंच नानारूपाने नटणें होय. प्रत्येक नामरूपाचें परब्रह्माहून स्वतंत्र व अस्तित्व वस्तुत्व मानून, ती सर्व नामरूपें एकत्र मिळून, ही एक सत्य पण जडविनाशी जगद्वस्तु आहे अशी अज्ञानदशेंत भ्रांतबुद्धि उत्पन्न झालेली असते. ज्ञानदशा प्राप्त झाल्यानंतर, जगताविषयीची ती सत्यत्वबुद्धी नाहीशी होते. त्या सत्यत्वबुद्धिबरोबरच वस्तुत्वबुद्धिहि नाहीशी होते; पण नामरूपाची प्रतीति मात्र नाहीशी होत नाही, असा विद्यारण्यांनी "निवृत्त एव यस्मात्ते तत्सत्यत्वमतिर्गता। ईदृङ्‌ निवृत्तिरेवात्र बोधजा नन्वभासनम्"॥ ४६॥ (पं० द० प्र० १३) या श्लोकांत ज्ञान्याचा अनुभव सांगितला आहे.

अर्जुनाला प्राप्त झालेल्या ज्ञानदृष्टिमुळें त्याचे ठिकाणी, पूर्वी असलेली जगताविषयीची सत्यत्वबुद्धि व वस्तुत्वबुद्धि सपशेल नाहीशी झाली; पण नामरूपाची प्रतीति नाहीशी झाली नाही. त्या संपूर्ण नामरूपाने एक परमात्माच नटला आहे, असें त्याला दिसूं लागलें.

नामरूपामुळेच सच्चिदानंद परब्रह्माहून स्वतंत्र अशा जडविनाशी जगद्वस्तूचा भ्रम झाला व ब्रह्मवस्तूचा विसर पडला; म्हणून वेदान्तांत नामरूपें हीं माया आहे असें अज्ञानाच्या दृष्टीने म्हटलें असलें, तरी ज्ञानाने अविद्याभ्रमाचा

निरास झाल्यावरही नामरूपाची प्रतीति येणें बंद पडत नाही. त्यामुळे नामरूपें ही परमेश्वराची स्वाभाविक शक्ति आहे, असें मानावें लागते.

या ओव्यांतून जें विश्वरूपदर्शनाचें वर्णन आलें आहे. त्यावरून आमच्याच मताला पुष्टि मिळते. पुन: पंचदशीच्या वरील श्लोकावर जी रामकृष्णटीका आहे, तीहि आमच्या मताला पुष्टि देणारी आहे.

टीकाकार म्हणतात, निरुपाधिकभ्रम व सोपाधिकभ्रम असा दोन प्रकारचा भ्रम आहे.

अधिष्ठानज्ञान झाल्याबरोबर, ज्या भ्रमांत भासलेल्या वस्तूची नामरूपासह निवृत्ति होते, त्याला निरुपाधिक भ्रम म्हणतात आणि अधिष्ठानाचे ज्ञान झाल्यावर, ज्या भ्रमांत भासलेल्या वस्तुविषयीची नुसती सत्यत्वबुद्धिच नाहीशी होते, नामरूप नाहीसे होत नाही, त्याला सोपाधिकभ्रम म्हणतात.

रज्जूचें ज्ञान झाल्यावर, नामरूपासह सर्पाची निवृत्ति होते. म्हणून रज्जुसर्प हा निरुपाधिकभ्रम आहे आणि अधिष्ठानरूप ब्रह्माचें ज्ञान होऊन, जगताविषयीची सत्यत्वबुद्धि नाहीशी होते, पण नामरूपाची प्रतीति नाहीशी होत नाही, म्हणून जगद्रूप सोपाधिकभ्रम होय.

या टीकेचा विचार केला असतां हें स्पष्ट होतें की, ज्याप्रमाणे दोरीवर भ्रमाने भासलेल्या सर्पाचीं नामरूपें त्याचीं (सर्पाची) असतात म्हणूनच अधिष्ठानज्ञानाने त्याची नामरूपासह निवृत्ति होते आणि जगद्वस्तूचे ठिकाणी भासणारीं नामरूपें तिची (जगद्वस्तूची) नसतात. उलट तीं, जगत् अधिष्ठानभूत असलेल्या परब्रह्माचीं असतात आणि ती परब्रह्माचे ठिकाणी विवर्तरूप असून, भिन्न इव स्फुरत असल्यामुळे उपाधिभूत होऊन, जगद्भ्रम उत्पन्न करतात. या भ्रमालाच अविद्या किंवा त्रिगुणात्मक माया म्हणतात, ही जीवाचे-ठिकाणी अनादि आहे. अशा रीतीने नामरूपानेच त्रिगुणात्मक मायेचा भ्रम होत असल्यामुळे, हीं नामरूपें परमेश्वराची त्रिगुणात्मक मायाशक्ति किंवा प्रकृति होय असे आचार्यांनी म्हटलें आहे. (ब्र. सू. २-१-१४)

**अन्यथाभानहेतुत्वादियं मायेति कीर्तिता॥ १८॥**
**आत्मतत्वतिरस्कारात्तम इत्युच्यते बुधैः। विद्यानाश्यत्वतोऽविद्या मोहस्तत्कारणत्वत:॥ १९॥**
**सद्वैलक्षण्यदृष्ट्येयमसदित्युदिता बुधैः। कार्यनिष्पत्तिहेतुत्वात्कारणं प्रोच्यते बुधैः॥ २०॥**
**कार्यवद्व्यक्तताभावादव्यक्तमिति गीयते।** (सूतसंहिता-शिवमाहात्म्यखंड अ. ८)

मुळांत परमेश्वराची शक्ति नामरूपात्मक असून अज्ञान्यांला ती भलतेंच भासविते, म्हणून त्या नामरूपाला माया हे नांव दिलें गेले. नामरूपें हीं परब्रह्माला झांकून टाकतात म्हणून त्यांना तम म्हणतात. ज्ञानविचाराने त्यांच्या पृथक् अस्तित्वाचा व वस्तुत्वाचा नि:शेष नाश होतो, म्हणून त्यांना अविद्या असे म्हणतात. नामरूपें हींच जडविनाशी व नानावस्तुरूप अशा जगताचा भ्रम होण्याला कारण असल्यामुळे त्यांना मोह म्हणतात. तीं सत् म्हणजे नित्य किंवा अखंड या लक्षणाहून विलक्षण असल्यामुळे त्यांना असत् किंवा अनिर्वचनीय म्हणतात. तीं कार्यनिष्पत्तीला निमित्त असल्यामुळे, त्यांना कारण म्हणतात आणि प्रथम ती परब्रह्माशीं अत्यंत एकरूप राहत असल्यामुळें व्यक्त नसतात, म्हणून त्यांना अव्यक्त असेहि म्हणतात.

नामरूपें हीं अविद्येचें विक्षेपरूप कार्य आहे असें कदाचित् कोणी म्हणतील; पण वेदान्तांत नामरूपाला विक्षेप म्हटलें नसून नामरूपें हीं सच्चिदानंद परब्रह्माहून निराळी एक जडविनाशी सत्य वस्तु आहे असें वाटणें, याला विक्षेप म्हटलें आहे.

असो भगवंतांनी दाखविलेल्या या विश्वरूपदर्शनांत दोन प्रकारचा प्रत्यय दिसतो. येथें "गिळिलीं विश्वरूपें प्रपंचरचना" या चरणाने सांगितलेल्या पहिल्या प्रत्ययांत, संपूर्ण नामरूपासह एका सच्चिदानंदाशिवाय, जगताचा सत्य किंवा मिथ्या, असा दुसरा कोणताच प्रत्यय दिसून येत नाही आणि हा विश्वरूपाचा प्रत्यय, परब्रह्मावरच विवर्तरूप भासत असल्यामुळे, त्याला परब्रह्माची सत्ता असते; म्हणून तो परब्रह्मरूप व सत्य आहे. "सर्वच नामरूपादि सदात्मनैव विकारजातम् सत्यम्" (छां. उ. ६-३-२ शं. भा.) असे आचार्य म्हणत असून, श्रीज्ञानेश्वर माऊलींनी

"म्हणून विश्वपण जावें। मग मातें घेयावें। तैसा नव्हे आघवें सकटचि मी" (ज्ञा. अ. १४-३८०) "भलतैसा फांके। परी एकपणा न मुके। नाना संकोचे तरी असके। हाचि आथि॥ २५७॥ सिंधूची शींव न मोडे। पाणीपणा सळू न पडे। जरी मोड्डुत गाडे। तरंगाचे॥ २६१" (अमृ. प्र. ७) इत्यादि ओव्यांतून हाच सिद्धान्त मांडला आहे. हा विश्वरूपाचा प्रत्यय भगवान भक्तालाच देतो.

अर्जुनाला आलेला विश्वरूपाचा दुसरा प्रत्यय पुढे ओवी २४२ नंतर सांगितला आहे.

**तेव्हां मनासी मनपण न स्फुरे। बुद्धि आपणपें न सांवरे। इंद्रियांचे रश्मी माघारे। हृदयवरी भरले॥ १९१॥**
**तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पडिलें। टकासी टक लागलें। जैसें मोहनास्त्र घातलें। विचारजातां॥ १९२॥**
**तैसा विस्मितु पाहे कोडें। तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें। तेंचि नानारूप चहूंकडे। मांडोनि ठेलें॥ १९३॥**

**अर्थ**—(अशी विश्वरूपाने सर्व प्रपंचरचना गिळलेली पाहून) अर्जुनाच्या मनाचें मनपण स्फुरत नव्हतें-म्हणजे मनाचा बाह्यविषयाविषयीं होणारा संकल्पविकल्पात्मक व्यापार बंद पडला. बुद्धि निश्चयाचा व्यापार करीनाशी झाली व इंद्रियांच्या प्रवृत्ति माघाऱ्या होऊन हृदयाच्या ठिकाणीं एकवटल्या॥ १९१॥ जणूंकाय मोहनास्त्र घालून संपूर्ण विचार बंद पडावे, त्याप्रमाणे ताटस्थ्यहि तटस्थ्य राहिलें-म्हणजे साक्षित्वहि आठवेनासें झालें-एकसारखे टक लावून विश्वरूपाकडे पाहणें हेंहि विसरला॥ १९२॥ असा आश्चर्यचकित होऊन कौतुकाने तो पाहूं लागला, तेव्हा त्याला असें दिसलें की आपल्यासमोर भगवान श्रीकृष्णाचीं जी चतुर्भुज मूर्ति होती, तीच सर्वत्र अनेक नामरूपात्मक झाली॥ १९३॥

**गूढार्थदीपिका**—मागील ओवी १८० व ही ओवी १९३ या दोहींचा विचार केला तर चतुर्भुज श्रीकृष्णस्वरूपाचें व विश्वरूपाचें पूर्ण ऐक्य असतें, हेंच दिसून येतें.

**जैसे वर्षाकाळींचे मेघौडें। कां महाप्रळयींचें तेज वाढे। तैसें आपणेनवीण कवणीकडे। नेदीचि उरों॥ १९४॥**
**प्रथम स्वरूप समाधान। पावोनि ठेला अर्जुन। सवेंचि उघडी लोचन। तंव विश्वरूप देखे॥ १९५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वर्षाऋतूंत जिकडे तिकडे मेघच दिसतात किंवा प्रलयांत वाढलेलें तेज जिकडे तिकडे दिसतें, त्याप्रमाणे भगवंतानी आपल्यावांचून कोठेंच कांही उरूं दिलें नाही-सर्वत्र नामरूपाने एक परमात्मा श्रीकृष्णच अनुभवाला येत होता, असा अर्थ॥ १९४॥ प्रथम अर्जुन आपल्या सच्चिदानंद आत्मस्वरूपाच्या प्राप्तीने पूर्ण समाधान पावला व मग लगेच डोळे उघडून पाहतो तों त्याला विश्वरूप दिसू लागलें॥ १९५॥

**गूढार्थदीपिका-प्रथम स्वरूपसमाधान। पावोनि ठेला अर्जुन**—या ओवींत अर्जुनाला विश्वरूप कसें दिसलें हें स्पष्ट केलें आहे. भगवंतांनी अर्जुनाला प्रथम, स्वरूपप्राप्ति करून दिली-म्हणजे 'मी-मी' म्हणून स्फुरणाऱ्या वृत्तीचा आधारभूत जो सच्चिदानंद आत्मा, तोच अर्जुनाचें मूळस्वरूप असल्यामुळे त्या स्वरूपाच्या ठिकाणी त्याची 'मी' म्हणून स्फुरणारी बुद्धिवृत्ति स्थिर केली. आत्मस्वरूपाचे ठिकाणी बुद्धि स्थिर झाल्यामुळे, त्याच्या बुद्धीला आत्मैक्यस्वरूपसमाधि प्राप्त झाली. यालाच व्यतिरेकाने येणारा आत्मानुभव म्हणतात. "सर्वदुःखविनिर्मुक्तैकचैतन्यात्मकोऽहमित्येष आत्मानुभवः" संपूर्ण त्रिविधदुखःखापासून मुक्त असलेला मी, केवळ चित्स्वरूप आहे, असा हा अनुभव आहे, असे आचार्यांनी म्हटलें आहे.

**सवेंचि उघडी लोचन। तंव विश्वरूप देखें**—असे झाल्यानंतर अर्जुनाने जेव्हा डोळे उघडून बाहेर पाहिलें, तेव्हा त्याला विश्वरूपाचा अनुभव आला-म्हणजे सर्व संसारवस्तूंचे अस्तित्व नाहीसे होऊन, त्या जागीं सर्वनामरूपाने एक परमात्माच नटला आहे, असा अनुभव आला. यालाच अन्वयरूप अनुभव म्हणतात. हाच अनुभव "सर्वं खल्विदं ब्रह्म" या श्रुतींत सांगितला असून आचार्यांनींहि आपल्या ग्रंथांतून "तरंगफेनभ्रमबुद्बुदादि सर्वं स्वरूपेण जलं यथातथा। चिदेवदेहाद्यहमंतमेतत्सर्वं चिदेवैकरसं विशुद्धम्॥ ३९१॥" (वि. चू.) "यथैव मृन्मयः कुंभस्तद्वद्देहोऽपि चिन्मयः" (अपरोक्षानुभूति) इत्यादि श्लोकांनी असेंच सांगितलें आहे.

पहिला अनुभव आल्याशिवाय दुसरा अनुभव येत नसतो हे "प्रथम" व "सवेंचि" या दोन शब्दांवरून स्पष्ट होते.

**इहींचि दोहीं डोळां। पाहावें विश्वरूपा सकळा। तो श्रीकृष्णें सोहळा। पुरविला ऐसा॥ १९६॥**

**अर्थ**—याच दोन्ही डोळ्यांनी मी संपूर्ण विश्वरूप पाहावें, अशी जी अर्जुनाची इच्छा होती, ती भगवान श्रीकृष्णांनी, पुढें सांगितल्याप्रमाणे पूर्ण केली॥ १९६॥

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम्। अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम्॥ १०॥**

**अर्थ**—त्या विश्वरूपाचे ठिकाणी अनेक तोंडें होतीं, अनेकप्रकारचे अद्भुत दर्शन होत होतें, अनेक प्रकारचे दिव्य अलंकार होते व जें विश्वरूप अनेक प्रकारच्या दिव्य आयुधांनी उद्युक्त दिसत होतें॥ १०॥

**मग तेथ सैंघ देखे वदनें। जैसीं रमानायकाचीं राजभुवनें। नाना प्रगटलीं निधानें। लावण्यश्रियेचीं॥ १९७॥**
**कीं आनंदाचीं वनें सासिन्नलीं। जैसी सौंदर्या राणीव जोडली। तैसीं मनोहरें देखिलीं। हरीचीं वक्त्रें तेणें॥ १९८॥**
**तयांहीमाजीं एकैकें। सावियाचि भयानकें। काळरात्रीचीं कटकें। उठावलीं जैसीं॥ १९९॥**
**कीं यें मृत्यूसीचि मुखे जाहलीं। हो कां जे भयाचीं दुर्गें पन्नासिलीं। कीं महाकुंडें उघडलीं। प्रळयानळाचीं॥ २००॥**
**तैसी अद्भुतें भयासुरें। तेथ वदनें देखिलीं वीरें। आणिकें असाधारणें साळंकारें। सौम्यें बहुतें॥ २०१॥**
**पैं ज्ञानदृष्टीचेनि अवलोकें। परि वदनांचा शेवटु न टके। मग लोचन ते कवतिकें। लागला पाहों॥ २०२॥**

**अर्थ**—वैकुंठासारखे किंवा सौंदर्यलक्ष्मीचे ठेवेच पसरल्याप्रमाणे भगवंताचीं तोंडें जिकडे तिकडे दिसत होतीं॥ १९७॥ किंवा आनंदाची वनेंच भरास आलीं अथवा संपूर्ण सौंदर्याचें राज्य दिसावें-म्हणजे नि:सीम सौंदर्यवान-अशी तीं, भगवान विश्वरूपाचीं अत्यंत मनोहर मुखें अर्जुनाने पाहिलीं॥ १९८॥ तेथेंच पुन: कांही मुखें काळरात्रीच्या सैन्याने उठाव केल्याप्रमाणे खरोखर अत्यंत भयानक अशीं होतीं॥ १९९॥ किंवा मृत्यूलाच मुखें प्राप्त झालीं किंवा भयंकर भीतीचे किल्लेच पसरलेले आहेत किंवा प्रलयकालच्या अग्नीची कुंडें उघडीं केलीं जावीं॥ २००॥ त्याप्रमाणे भगवंताची अत्यंत भ्यासुर मुखें अर्जुनाने पाहिलीं तेथेंच आणखीं कांही अप्रतिम अलंकारांनी अलंकृत केलेलीं व सौम्य अशीं पुष्कळशीं तोंडें पाहिलीं॥ २०१॥ परंतु (अर्जुन) ज्ञानदृष्टीने पाहत होता, तरी त्या मुखांचा शेवट किंवा अंत त्याला लागत नव्हता; मग भगवंताचे डोळे कोणीकडे आहेत, हें तो कौतुकाने पाहूं लागला॥ २०२॥

**गूढार्थदीपिका**—अर्जुन ज्ञानदृष्टीने पाहत होता, तरी तोंडाचा अंत त्याला लागला नाही, या माऊलींच्या वचनावरून विश्वरूप हा अमर्याद अशा सच्चिदानंद परब्रह्माचाच, नामरूपात्मक आविष्कार असल्यामुळे, परब्रह्माप्रमाणेच त्याचा व त्याच्या एका एका अवयवाचा देखील शेवट दिसत नव्हता, हे साहजिक आहे.

**तंव नानावर्णें कमळवनें। की विकासिलीं तैसें अर्जुनें। डोळे देखिले पालिंगनें। आदित्यांचीं॥ २०३॥**
**तेथेंचि कृष्णमेघाचिया दाटी-। माजीं कल्पांत विजूचिया स्फुटी। तैसिया वन्हि पिंगळा दिठी। भ्रूभंगातळी॥ २०४॥**
**हें एकैक आश्चर्य पाहतां। तिये एकेचि रूपीं पांडुसुता। दर्शनाची अनेकता। प्रतिफळली॥ २०५॥**
**मग म्हणे चरण ते कवणेकडे। केउते मुकुट कें दोर्दंडें। ऐसी वाढविताहे कोडें। चाड देखावयाची॥ २०६॥**
**तेथ भाग्यनिधि पार्था। कां विफलत्व होईल मनोरथा। काय पिनाकपाणीचिया भाता। वायकांडीं आहाती॥ २०७॥**
**ना तरी चतुराननाचिये वाचे। काय आहाती लटिकिया अक्षरांचे सांचे। म्हणोनि साद्यंतपण अपरांचें। देखिलें तेणें॥ २०८॥**
**जयाची सोय वेदा नाकळे। तयाचे सकळावयव एकेचि वेळे। अर्जुनाचे दोन्ही डोळे। भोगिते जाहले॥ २०९॥**
**चरणौनी मुकुटवरी। देखत विश्वरूपाची थोरी। जे नाना रत्न अलंकारीं। मिरवत असे॥ २१०॥**
**परब्रह्म आपुलेनि आंगें। ल्यावया आपणचि जाहला अनेगें। तियें लेणीं मी सांगें। काइसयासारिखीं॥ २११॥**

**अर्थ**—तेव्हा अनेक रंगाच्या कमळाचीं वनें प्रफुल्लित झालेलीं दिसावीं व सूर्यांच्या रांगा लागाव्या, त्याप्रमाणे अर्जुनाने देवांच्या डोळ्यांच्या रांगा पाहिल्या॥ २०३॥ तेथेच, ज्याप्रमाणे प्रलयकालीं पाण्याने भरलेल्या काळ्या मेघांच्या गर्दीत विजा चमकाव्या, त्याप्रमाणे भुंवयाखालीं भगवंताची अग्निसारखी पिंगटदृष्टि अर्जुन पाहूं लागला॥ २०४॥ असें एक एक आश्चर्य पाहतां पाहतां, एका विश्वरूपाचे ठिकाणीच अर्जुनाला अनेक प्रकारचे दर्शन

होऊं लागलें ॥ २०५ ॥ मग अर्जुन म्हणतो, देवाचे चरण कोठे आहेत? देवाचा मुकुट कोठे आहे व बाहूकोठे आहेत? अशाप्रमाणे भगवंताचे निरनिराळे अवयव पाहण्याची, अर्जुन इच्छा वाढवूं लागला ॥ २०६ ॥ संपूर्ण भाग्याचा सांठा अशा अर्जुनाचे मनोरथ कसें व्यर्थ जातील? पिनाक धनुष्य धारण करणाऱ्या शंकराच्या भात्यांत निष्फळ होणारे बाण राहतील काय? ॥ २०७ ॥ किंवा ब्रह्मदेवाच्या वाणींत अर्थहीन अक्षरांचे सांचे राहूं शकतात काय? म्हणूनच त्या भाग्यवान अर्जुनाने अपार अशा विश्वरूपालाहि संपूर्ण पाहिले ॥ २०८ ॥ ज्या विश्वरूपाची स्थिति वेदालाहि अगम्य आहे, त्या विश्वरूपाचे सर्व अवयव अर्जुन दोन्ही डोळ्यांनी एकदमच पाहूं लागला ॥ २०९ ॥ नाना प्रकारच्या रत्नालंकारांनी सुशोभित झालेलें विश्वरूपाचें वैभव, अर्जुन पायापासून मस्तकापर्यंत पाहूं लागला ॥ २१० ॥ परमात्मा आपल्या अनेक आंगावर घालण्याकरितां आपणच अनेक अलंकाररूप झाला होता. ते अलंकार कशासारखे होते ते मी सांगतों ॥ २११ ॥

**जिये प्रभेचिये झळाळा। उजाळू चंद्रादित्यमंडळा। जे महातेजाचा जिव्हाळा। जेणें विश्व प्रगटे ॥ २१२ ॥**
**तो दिव्यतेज शृंगारु। कोणाचिये मतीसी होय गोचरु। देव आपणपेंचि लेइलें ऐसें वीरु। देखत असे ॥ २१३ ॥**
**आपण आंग आपण अलंकार। आपण हात आपण हातियर। आपण जीव आपण शरीर। देखे चराचर कोंदलें देवें ॥ २१४ ॥**
**मग तेथेंचि ज्ञानाचां डोळां। पहात करपल्लवां जंव सरळा। तंव तोडित कल्पांतींचिया ज्वाळा। तैसीं शस्त्रें झळकत देखे ॥ २१५ ॥**

**अर्थ**—ज्याच्या प्रभेच्या कांतीने चंद्रमंडळ व सूर्यमंडळ यांना तेज प्राप्त झाले आहे आणि जे महातेजाचाहि जिव्हाळा असून, ज्यामुळे हे विश्व म्हणजे हा नामरूपाचा पसारा प्रगट होतो ॥ २१२ ॥ त्या दिव्यतेजरूप शृंगाराचे कोणाच्या बुद्धीला आंकलन होऊं शकेल? देवाने आपणच अलंकाररूप होऊन, आपणच ते अलंकार घातले आहेत, असें वीर अर्जुन पाहत होता ॥ २१३ ॥ पुन: तेथेच अर्जुन ज्ञानदृष्टीने, सरळ अशा हाताकडे पाहत असतां, त्या हाताचे ठिकाणी कल्पांतीच्या अग्नीच्या ज्वाळा तोडणारी तेजस्वीं शस्त्रे झळकत असलेलीं तो पाहूं लागला ॥ २१४ ॥ भगवान आपणच आंग व आपणच अलंकार झाले. आपणच हात असून, आपणच हातांतील हत्यारहि झाले, आपणच जीव असून, आपणच शरीर झाले. अशी संपूर्ण चराचरसृष्टि देवानेच व्यापिली आहे, असे तो अर्जुन पाहूं लागला ॥ २१५ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे प्रकाश व अंध:कार परस्परविरोध-म्हणजे परस्परांचे नाशक-असल्यामुळे एकेठिकाणी राहूं शकत नाहीत, त्याप्रमाणे सच्चिदानंदधर्म व जडविनाशीधर्म परस्परविरोधी असल्यामुळे, ते एके ठिकाणीं राहूं शकत नाहीत; म्हणून सच्चिदानंद परब्रह्माचे ठिकाणीं अनध्यस्तविवर्तरूपाने किंवा पूर्णब्रह्मस्वरूपाने स्फुरणारें विश्वरूप, त्यांचे शरीर, अवयव, त्यावरील अलंकार, अवयवांचे ठिकाणीं असणारी आयुधें, हे सर्व परमात्मा आपणच नटला आहे, असें अर्जुन पाहू लागला, हेच या ओवींतून माऊलींनी प्रतिपादिलें आहे-म्हणजे विश्वरूपाचे ठिकाणी अर्जुनाला संपूर्ण सच्चिनंदाचाच प्रत्यय होता; कोठेहि जडविनाशी असा प्रत्यय नव्हता, असें माउलीचें म्हणणें आहे.

**जयांचिया किरणांचे निखरेपणें। नक्षत्रांचे होत फुटाणे। तेजें खिरडला वह्नि म्हणे। समुद्रीं रिघों ॥ २१६ ॥**
**मग काळकूटकल्लोळीं कवळिलें। नाना महाविजूंचे दांग उमटले। तैसे अपार कर देखिले। उद्यतायुधीं ॥ २१७ ॥**

**अर्थ**—ज्या शस्त्रांच्या तेजस्वी किरणांच्या प्रखरतेमुळे नक्षत्रांचे देखील फुटाणे फुटत होते आणि ज्या तेजाने संतप्त झालेला अग्निदेखील, दाह शमविण्याकरितां समुद्रांत शिरण्याची इच्छा करीत होता ॥ २१६ ॥ मग जणूं काय समुद्राच्या लाटांनी संपूर्ण काळकूट विषच भरून घ्यावे किंवा प्रलयसमयींच्या वीजांचे समुदाय प्रगट व्हावेत, त्याप्रमाणे नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले भगवंतांचे अनंत हात अर्जुन पाहूं लागला ॥ २१७ ॥

**दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् । सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥**

**अर्थ**—त्या विश्वरूप भगवंताने दिव्यमाळा व दिव्यवस्त्र धारण केलें आहे, दिव्यगंधाची उटी लावली आहे, त्याला सर्वत्र मुखें आहेत व तें सर्व आश्चर्यमय आहे, असें अर्जुनाने पाहिलें ॥ ११ ॥

**कीं भेणें तेथूनि काढिली दिठी। मग कंठमुगुट पाहातसे किरीटी। तंव सुरतरुंची सृष्टी। जयापासोनि का जाहली॥ २१८॥**
**जियें महासिद्धींचीं मूळपीठें। शिणली कमळा जेथ वावटे। तैसीं कुसुमें अति चोखटें। तुरंबिलीं देखिलीं॥ २१९॥**
**मुगुटावरी स्तबक। ठायीं ठायीं पूजाबंध अनेक। कंठीं रुळताति अलौकिक। माळादंड॥ २२०॥**
**स्वर्गे सूर्यतेज वेढिलें। जैसें पंधरेनें मेरूतें मढिलें। तैसें नितंबावरी गाढिलें। पीतांबरु झळके॥ २२१॥**
**श्रीमहादेवो कापुरें उटिला। कां कैलासु पारदें डवरिला। नाना क्षीरोदकें पांघरविला। क्षीरार्णवो जैसा॥ २२२॥**
**जैसी चंद्रमयाची घडी उपलविली। मग गगनाकरवीं बुंथी घेवविली। तैसी चंदन-पिंजरी देखिली। सर्वांगीं तेणें॥ २२३॥**
**जेणें स्वप्रकाशा कांती चढे। ब्रह्मानंदाचा निदाघु मोडे। जयाचेनि सौरभ्यें जीवित जोडे। वेधवतीये॥ २२४॥**

**अर्थ**—अर्जुनाने भीतीने आपली दृष्टि तेथून काढली व भगवंताच्या कंठाकडे व मुकुटाकडे अर्जुन पाहूं लागला, तेव्हा सर्व इंद्राच्या नंदनवनांतील पुष्पवृक्षांची ज्यापासून उत्पत्ति झाली असे म्हणतां येईल॥ २१८॥ ज्याच्यापासून महासिद्धि प्राप्त होतात व लक्ष्मीलाहि आपला शीण भागविण्याकरितां विश्रांति घेतां येईल, अशी सुंदर व सुगंधित फुलें, ज्याच्या कंठातील माळेंत व मुकुटाचे ठिकाणी खोवलेलीं दिसत होतीं॥ २१९॥ मुकुटावर फुलांचे गुच्छ खोवले आहेत, ठिकठिकाणी अनेक प्रकारच्या पूजा बांधल्या आहेत, गळ्यांत अनेक दिव्यफुलांचे हार रुळतांना दिसत आहेत॥ २२०॥ जणूं स्वर्गाने सूर्याचें तेज वेढल्याप्रमाणे किंवा सोन्याने मेरु पर्वताला मढविल्याप्रमाणे भगवंताच्या कमरेभोंवतीं घट्ट नेसलेला पिंवळा पीतांबर झळकत होता॥ २२१॥ धवलवर्ण महादेवाला कापराची उटी लावावी किंवा कैलास पर्वताला पाऱ्याचा लेप लावावा अथवा क्षीरसमुद्राला दुग्धरूपी उदकाचेच पांघरूण घालावें॥ २२२॥ किंवा ज्याप्रमाणे चंद्राची घडी उकलून त्याचें पाघरूण आकाशाकडून घेववावे, त्याप्रमाणे विश्वरूपाच्या सर्वांगावर शुभ्रचंदनाची उटी लावलेली पाहिली॥ २२३॥ ज्या दिव्य सुगंधयुक्त चंदनाच्या उटीने सच्चिदानंदरूप भगवंताच्या स्वप्रकाशरूप चिन्मय देहालाहि विशेष कांति प्राप्त होऊन शोभा येते व ब्रह्मानंदाचाच विग्रह अशा भगवंताचा ग्रीष्मऋतूंतील तापहि नाहीसा होतो व ज्याच्या दिव्य सुगंधामुळे चित्तवेधक गुणालाहि आयुष्य लाभतें॥ २२४॥

**गूढार्थदीपिका-स्वप्रकाशा**—चैतन्य हें स्वयंप्रकाश असल्यामुळे, स्वप्रकाश हा शब्द चैतन्याला लावला जातो आणि भगवान श्रीकृष्णाचा देह ''श्रीकृष्ण देहो चैतन्य घन'' (ए. भा. अ. २-३०) चिन्मय असें नाथांनी जें म्हटलें आहे त्याला अनुसरून ''स्वप्रकाश'' म्हणजे ''भगवंताच्या चिन्मय देहाला'' असा अर्थ होतो.

**ब्रह्मानंदाचा**—''आनंदपदीं जया म्हणती हरी'' (ए. हरि.) ''आनंदविग्रही श्रीकृष्ण'' (ए. भा. अ. २१-५२०) इत्यादि वचनांतून नाथांनी भगवान श्रीकृष्णाचा देह ब्रह्मानंदाचा विग्रह आहे असे जे म्हटलें आहे, त्याला अनुसरून ''ब्रह्मानंद'' म्हणजे ''ब्रह्मानंदाची मूर्ति'' असा त्याचा अर्थ होतो.

**जयाचे निर्लेप अनुलेपु करी। जें अनंगुही सर्वांगीं धरी। तया सुगंधाची थोरी। कवण वानी॥ २२५॥**
**ऐसी एकैक शृंगारशोभा। पाहतां अर्जुन जातसे क्षोभा। तेवींचि देवो बैसला कीं उभा। कां सेयांतु हें नेणवे॥ २२६॥**
**बाहेर दिठी उघडोनि पाहे। तव आघवें मूर्तिमय देखतु जाये। मग आतां न पाहे म्हणोनि उगा राहे। तरी आंतुही तैसेंचि॥ २२७॥**
**अनावरें मुखें समोर देखें। तयाभेणें पाठीमोरा जंव ठाके। तंव तयाहीकडे श्रीमुखें। करचरण तैसेचि॥ २२८॥**
**अहो पाहतां कीर प्रतिभासे। एथ नवलावो काइ असे। परि न पाहतांही दिसे। चोज आइका॥ २२९॥**
**कैसें अनुग्रहाचें करणें। पार्थाचें पाहणें आणि न पाहणें। तयाहीसकट नारायणें। व्यापूनि घातलें॥ २३०॥**

**अर्थ**—अलिप्त परमात्मा, ज्या चंदनाच्या उटीचा आपल्या आंगाला लेप करतो, स्वतः सर्वांगसुंदर असा मदनहिं आपल्या सर्वांगावर (ज्या उटीला) धारण करतो, त्या चंदनाच्या सुगंधाचे वर्णन कोण करूं शकेल॥ २२५॥ अशा रीतीने विश्वरूपाची एक एक सौंदर्य शोभा पाहत असतां, अर्जुन अगदी भांबावून गेला. तसेच देव बसले आहेत, उभे आहेत, की निजले आहेत हे त्याला कांहीच कळेना॥ २२६॥ अर्जुन दृष्टि उबडून बाहेर पाहूं लागला, तेव्हा त्याला सर्व मूर्तिमय दिसूं लागलें आणि आतां बाहेर दृष्टि उघडून पाहत नाही असे म्हणून तो डोळे मिटून स्तब्ध

राहिला, तर आंतहि त्याला तसेच सर्व मूर्तिमय दिसूं लागलें॥ २२७॥ दृष्टिसमोर विश्वरूपाची असंख्य विशाल मुखें पाहून, भीतीने अर्जुन विश्वरूपाकडे पाठ करून उभा राहिला असतां, तिकडेहि त्याला तशीच विश्वरूपाची असंख्य व विशाल मुखें व करचरणादिक दिसूं लागले॥ २२८॥ अहो! दृष्टीने पाहात असतांना अर्जुनाला विश्वरूप दिसावें यांत काय आश्चर्य आहे; पण तो पाहत नसतांना देखील त्याला विश्वरूप दिसत होते, हें नवल ऐका!॥ २२९॥ भगवंताच्या कृपेचें करणें कसें आहे, पहा! अर्जुनाचे पाहणें व न पाहणें या दोहोलाहि भगवंतांनी व्यापून घेतलें॥ २३०॥

**गूढार्थदीपिका**—जेवढें कांही पांचभौतिक जडविनाशी पदार्थ आहेत, ते सर्व देश, काल, वस्तु या तिन्ही मर्यादेने मर्यादित असल्यामुळे ते, ज्ञानाने, आहेत असे करतात, तेव्हाच ते असतात. जेव्हां त्यांचे ज्ञान होत नाही–म्हणजे ते आहेत असे कळत नाही–तेव्हा ते नसतात; पण परब्रह्म, अद्वैत, एक जिनसी व त्याच्याहून दुसऱ्या वस्तूचें अस्तित्वच मानतां येत नाही, इतकें व्यापक असल्यामुळे व त्याची ज्ञानदृष्टिहि तशीच नित्य अविनाशी असल्यामुळे, ज्याप्रमाणे त्या परब्रह्माचें अस्तित्व व नास्तित्व पाहण्यावर किंवा न पाहण्यावर अवलंबून नसतें; त्याप्रमाणेच श्री ज्ञानेश्वर माउलींनी येथील विश्वरूपाचें अस्तित्व व नास्तित्व अर्जुनाच्या पाहण्यावर किंवा न पाहण्यावर अवलंबून नव्हतें, असे विधान करून, परमेश्वराचें नामरूपरहित असणारें साकारस्वरूपदेखील, परमेश्वराच्या नामरूपरहित निराकार स्वरूपाप्रमाणेंच शुद्ध व नित्य असतें, असें दाखविलें आहे.

**म्हणोनि आश्चर्याच्या पुरी एकीं। पडिला ठायेंठाव थडी ठाकी। तंव चमत्काराचिया आणिकीं। महार्णवीं पडे॥ २३१॥**
**ऐसा अर्जुनु असाधारणें। आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें। कवळूनि घेतला तेणें। अनंतरूपें॥ २३२॥**
**तो विश्वतोमुख स्वभावें। आणि तेंचि दावावयालागीं पांडवें। प्रार्थिला आतां आघवें। होऊनि ठेला॥ २३३॥**
**आणि दीपें कां सूर्यें प्रगटे। अथवा निमुटलिया देखावेंचि खुंटे। तैसी दिठी नव्हे जे वैकुंठें। दिधली आहे॥ २३४॥**
**म्हणोनि किरीटीसि दोहीं परी। तें देखणें देखें अंधारीं। हे संजयो हस्तिनापुरीं। सांगतसे राया॥ २३५॥**
**म्हणे किंबहुना अवधारिलें। पार्थें विश्वरूप देखिलें। नाना आभरणीं भरलें। विश्वतोमुख॥ २३६॥**

**अर्थ**—म्हणून एका आश्चर्याच्या पुरांत पडलेला अर्जुन, त्या आश्चर्याच्या पुरांतून बाहेर पडून थडीला लागतो तोंच, तो तेथल्या तेथें दुसऱ्या चमत्काराच्या समुद्रांत पडत असे॥ २३१॥ याप्रमाणे अलौकिक अशीं अनंत रूपें धारण करणाऱ्या विश्वरूप परमेश्वराने आपल्या विश्वरूपाच्या दर्शनाची लीला दाखवून, अर्जुनाला संपूर्ण व्यापून टाकलें॥ २३२॥ भगवान श्रीकृष्ण स्वभावतःच सर्वव्यापी व सर्वतोमुख आहे आणि अर्जुनाने तो स्वभावतःच सर्वतोमुख व सर्वव्यापक कसा आहे, हेच पाहण्याची इच्छा करून, तसें विश्वरूप दाखविण्याची भगवंताला प्रार्थना केली व भगवान त्याच्यासमोर तात्काळ विश्वरूप होऊन राहिले॥ २३३॥ भगवंतांनी विश्वरूप पाहण्याकरितां अर्जुनाला जी दृष्टि दिली ती दिव्याच्या किंवा सूर्याच्या साहाय्याने पाहूं शकणारी किंवा "ती मिटली असतां पाहणेंच होणार नाही" अशी नव्हती॥ २३४॥ म्हणून अर्जुन, डोळे मिटून व डोळे उघडे ठेवून, अशा दोन्ही प्रकाराने आंधारीं म्हणजे दिव्याच्या किंवा सूर्याच्या प्रकाशावांचून विश्वरूप पाहात होता; असे हस्तिनापुरी धृतराष्ट्राला संजय सांगूं लागला॥ २३५॥ संजय म्हणतो, किंबहुना नाना अलंकाराने अलंकृत झालेलें व सर्वत्र मुखें असलेलें, असें विश्वरूप अर्जुनाने पाहिलें, हे आपण ऐकिलें ना!॥ २३६॥

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता। यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः॥ १२॥**
**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा। अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा॥ १३॥**
**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनञ्जयः। प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत॥ १४॥**

**अर्थ**—आकाशांत हजारों सूर्य एकदम प्रगट झाले असतां जो प्रकाश होईल, त्या प्रकाशाची माहात्म्या विश्वरूपाच्या तेजाला कांहीशी उपमा देतां येईल॥ १२॥ तेव्हा अर्जुनाने देवांचा देव जो विश्वरूप परमात्मा, त्यांच्या शरीरांत एका ठिकाणीं स्थित असलेलें व अनेक प्रकाराने भिन्न असलेलें संपूर्ण जगत् तेथेच पाहिलें॥ १३॥ त्यामुळे

अर्जुन अत्यंत आश्चर्यचकित झाला व त्याच्या शरीरावर सर्व आनंदाचे रोमांच उभे रहिले आणि मस्तक खालीं करून त्याने देवाला नमस्कार केला व हात जोडून म्हणाला॥ १४॥

**तिये अंगप्रभेचा देवा। नवलावो काइसया ऐसा सांगावा। कल्पांती एकुचि मेळावा। द्वादशादित्यांचा होय॥ २३७॥**
**तैसे ते दिव्यसूर्य सहस्त्रवरी। जरी उदयजती कां एकेचि अवसरीं। तऱ्ही तया तेजाची थोरी। उपमूं न ये॥ २३८॥**
**आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे। आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे। तेवींचि दशकुही मेळविजे। महातेजांचा॥ २३९॥**
**तऱ्ही तिये अंगप्रभेचेनि पाडें। हें तेज कांहीं होईल थोडें। आणि तयाऐसें कीर चोखडें। त्रिशुद्धी नोहे॥ २४०॥**
**ऐसें माहात्म या श्रीहरीचें सहज। फांकतसे सर्वांगींचे तेज। तें मुनिकृपा जी मज। दृश्य जाहलें॥ २४१॥**

**अर्थ**—महाराजा धृतराष्ट्रा! विश्वरूपाच्या आंगचें तेज कशासारखें होतें तें सांगू गेल्यास, कल्पान्तसमयीं बारा आदित्यांचा समुदाय एकत्र होतो॥ २३७॥ असे ते हजारों दिव्य सूर्य जरी एकाच वेळीं उदय पावलेत, तरी त्यांच्या त्या एकत्रित झालेल्या तेजांच्या थोरवीची देखील विश्वरूपाच्या तेजाला उपमा देतां येणार नाही॥ २३८॥ त्यांतच संपूर्ण विजांचा प्रकाश एकत्र करून आणि प्रलयांतील अग्नीची संपूर्ण सामग्री आणून तसेंच दहा महातेजहि मिळविले असतां॥ २३९॥ ते तेज विश्वरूपाच्या अंगप्रभेशीं कांही थोडीशी बरोबरी करूं शकेल; पण तें तंतोतंत विश्वरूपाच्या तेजासारखें कधीच होणार नाही॥ २४०॥ असें माहात्म्या विश्वरूप श्रीहरीच्या सर्वांगाचे ठिकाणी असणारें जें साहाजिक तेज होतें ते भगवान व्यासमुनींच्या कृपेने मीहि पाहूं शकलों॥ २४१॥

**गूढार्थदीपिका-तें मुनिकृपा जी मज दृश्य जाहलें**—भगवान श्रीकृष्णाच्या कृपेने अर्जुनाला विश्वरूपाचें दर्शन झालें व संजयाला श्रीगुरु व्यासांच्या कृपेने त्याच विश्वरूपाचें दर्शन झालें. यावरून श्रीगुरुच्या कृपेनेहि विश्वरूपाचें दर्शन होतें, असें स्पष्ट दिसतें.

**आणि तिये विश्वरूपीं एकीकडे। जग आघवें आपुलेनि पवाडें। जैसें महोदधीमाजीं बुडबुडे। सिनाने दिसती॥ २४२॥**

**अर्थ**—आणि महासमुद्राचे ठिकाणी, जसे निरनिराळें अनेक बुडबुडे दिसतात, तसे त्या विश्वरूपांत एका बाजूला संपूर्ण जग आपल्या विस्ताराने भासत होतें॥ २४२॥

**गूढार्थदीपिका**—येथून आपल्या विश्वरूपाचे ठिकाणींच जगाचे उत्पत्ति, स्थिति, लय कसे होतात, हें भगवंतांनी अर्जुनाला दाखवावयास सुरुवात केली आहे.

सर्व नामरूपाने एक भगवानच नटला आहे, असे ज्ञान नसलेल्या अज्ञानी जीवांना, सर्व नामरूपाचा पसारा, भ्रमाने जगद्रूप व सत्य भासत असतो; पण भगवंताच्या अद्वैतस्वरूपाचें ज्ञान झाल्यावर मात्र, तो संपूर्ण जगत्पसारा भ्रमजन्य भास आहे, असा अनुभव येतो. हेंच माऊलींनी पुढील "आकाशीं गंधर्वनगर" इत्यादि ओव्यांतून सांगितलें आहे.

मागे ओवी १९० यांतील गूढार्थदीपिकेंत विश्वरूपाचा जो दुसरा प्रत्यय म्हणून निर्देशिला आहे, तो हाच प्रत्यय होय.

**कां आकाशीं गंधर्वनगर। भूतळीं पिपीलिका बांधे घर। नाना मेरूवरी सपूर। परमाणु जैसे॥ २४३॥**
**विश्व आघवेंचि तयापरी। तया देवचक्रवर्तीचिया शरीरीं। अर्जुन तिये अवसरीं। देखता जाहला॥ २४४॥**
**तेथ एक विश्व एक आपण। ऐसें अळुमाळ होतें जें दुजेपण। तेंही आटोनि गेलें अंतःकरण। विरालें सहसा॥ २४५॥**

**अर्थ**—आकाशांत गंधर्वनगर दिसावें किंवा जमिनीवर मुंग्यांनी वारुळ उभारावें अथवा मेरु पर्वतावर सूक्ष्म परमाणु पसरले असावे॥ २४३॥ त्याप्रमाणे त्यावेळीं भगवंताच्या विश्वरूप शरीराचे ठिकाणी, अर्जुन संपूर्ण जगदाभास पाहतां झाला॥ २४४॥ तेथें जग ही एक वस्तु असून तिला पाहणारा तिच्याहून निराळा मीहि एक आहे, असें जें थोडेसें द्वैत सत्य वाटत होतें, तें नाहीसें होऊन अंतःकरण एकाएकीं विरून गेलें॥ २४५॥

**आंतुला महानंदा चेइरें जाहलें। बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें। आपाद पां गुंतलें। पुल्कांचले॥ २४६॥**
**वार्षिये प्रथमदशे। वोहळलया शैलाचें सर्वांग जैसें। विरूढें कोमलांकुरीं तैसें। रोमांच जाहाले॥ २४७॥**
**शिवतला चंद्रकरीं। सोमकांतु द्रावो धरी। तैसिया स्वेदकणिका शरीरीं। दाटलिया॥ २४८॥**

**माजीं सांपडलेनि अलिकुळें। जळावरी कमळकळिका जेवीं आंदोळे। तेवीं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें। बाहेरि कांपे॥ २४९॥**
**कर्पूरकेळीचीं गर्भपुटें। उकलतां कापुराचेनि कोंदाटें। पुलिका गळती तेवीं थेबुटें। नेत्रोनि पडती॥ २५०॥**
**ऐसा सात्त्विकांही आठां भावां। परस्परें वर्ततसे हेवा। तेथ ब्रह्मानंदाची जीवा। राणीव फावली॥ २५१॥**
**उदयलेनि सुधाकरें। जैसा भरलाचि समुद्र भरे। तैसा वेळोवेळां ऊर्मिभरें। उचंबळत असे॥ २५२॥**
**तैसाचि तया सुखानुभवापाठीं। केला द्वैताचा सांभाळु दिठी। मग उससौनि किरिटी। वास पाहिली॥ २५३॥**
**तेथ बैसला होता जिया सवा। तियाचिकडे मस्तक खालविला देवा। मग जोडूनि करसंपुट बरवा। बोलतु असे॥ २५४॥**

**अर्थ**—आंतील महानंद प्रगट झाला, बाहेर शरीराच्या अवयवांचें ठिकाणी जें बळ होतें, तें नाहीसें झालें व पायापासून मस्तकापर्यंत सर्व शरीरावर रोमांच उभे राहिले॥ २४६॥ वर्षाऋतूच्या आरंभीं, ज्याप्रमाणे पर्वताच्या आंगावरून पावसाचें पाणी वाहून गेल्यानंतर, गवताचे कोवळें अंकुर फुटतात, त्याप्रमाणे अर्जुनाच्या आंगावर रोमांच उभे राहिले॥ २४७॥ सोमकांतमण्याशीं चंद्राच्या किरणांचा स्पर्श झाला असतां, तो सोमकांतमणि जसा पाझरतो, तसें अर्जुनाच्या सर्व शरीरावर धर्मबिंदु दाटून आले॥ २४८॥ पाण्यावरील कमळाच्या कळींत सापडलेल्या भ्रमराच्या समुदायाने, ज्याप्रमाणे कमळाची कळी हालूं लागते, त्याप्रमाणे आंत उठणाऱ्या सुखाच्या उमाळ्यामुळे बाहेर अर्जुनाचें आंग कापूं लागलें॥ २४९॥ कापूर उत्पन्न करणाऱ्या कापूरकेळींत कापूर दाटला असतां ज्याप्रमाणे त्या कापुरकेळीची सोपटें उकललीं जाऊन, त्यांतून कापराचे कण गळूं लागतात, त्याप्रमाणे अर्जुनाच्या नेत्रांतून जलबिंदू पडूं लागले॥ २५०॥ पौर्णिमेला पूर्णचंद्राचा उदय झाला असतां, ज्याप्रमाणे भरलेल्या समुद्राला भरती येते, त्याप्रमाणे आंत वेळोवेळीं उठत असलेल्या आनंदाच्या उर्मीमुळें अर्जुन वारंवार उचंबळूं लागला॥ २५१॥ याप्रमाणे अर्जुनाचे ठिकाणी प्रगट झालेल्या अष्टसात्विकभावांत परस्पर स्पर्धा होऊं लागली असतां, अर्जुनाच्या जीवाला ब्रह्मानंदाचें राज्य प्राप्त झालें॥ २५२॥ तसेंच त्या ब्रह्मसुखानुभवा नंतर पुन: देहावर येऊन व द्वैतसृष्टीचा अंगीकार करून, अर्जुनाने एक उसासा टाकला व विश्वरूपाकडे दृष्टि केली॥ २५३॥ तेथे अर्जुन जिकडे बसला होता, तिकडेच अर्जुनाने आपलें मस्तक वांकवून देवाला नमस्कार केला व दोन्ही हात जोडून देवाशीं प्रेमाने बोलूं लागला॥ २५४॥

*अर्जुन उवाच*

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान्। ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान्॥ १५॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, देवा! मी तुमच्या या विश्वरूप शरीराचे ठिकाणी सर्व देव, स्थावरजंगम प्राण्यांचे निरनिराळे समुदाय, ब्रह्मदेव, विष्णु शंकर, सर्व ऋषि व दिव्य नागादिक पाहत आहे.॥ १५॥

**म्हणे जयजयाजी स्वामी। नवल कृपा केली तुम्हीं। जें हें विश्वरूप कीं आम्ही। प्राकृत देखों॥ २५५॥**
**परि साचचि भलें केलें गोसाविया। मज परितोषु जाहला साविया। जी देखिलासि जो इया। सृष्टिसी तूं आश्रयो॥ २५६॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, देवा! तुमचा जयजयकार असो. आपण माझ्यावर विलक्षण कृपा केली, त्यामुळे मी सामान्यपुरुष देखील तुमचे हें विश्वरूप पाहत आहे॥ २५५॥ हे स्वामी भगवंता! खरोखरच त्वां माझ्या इच्छेप्रमाणे केलेंस आणि मला त्यामुळे अत्यंत संतोष झाला. या संपूर्ण सृष्टीला तूंच आश्रय आहेस, हें मी आज पाहिलें॥ २५६॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताच्या विश्वरूपाचे ठिकाणीच सृष्टीचा भास आहे हें येथे स्पष्टच सांगितलें आहे.

**देवा मंदराचेनि अंगलगें। ठायीं ठायीं श्वापदांचीं दांगें। तैसीं इयें तुझ्या देहीं अनेगें। देखतसें भुवनें॥ २५७॥**
**अहो आकाशाचिये खोळे। दिसती ग्रहगणांचीं कुळें। कां महावृक्षीं अविसाळें। पक्षिजातीचीं॥ २५८॥**
**तयापरी श्रीहरी। तुझिया विश्वात्मकीं इये शरीरीं। स्वर्गु देखतसें अवधारीं। सुरगणेंसीं॥ २५९॥**
**प्रभु महाभूतांचें पंचक। येथ देखत आहें अनेक। आणि भूतग्राम एकेक। भूतसृष्टीचें॥ २६०॥**
**जी सत्यलोकु तुजमाजीं आहे। देखिला चतुरानन हा नोहे। आणि येरीकडे जंव पाहें। तंव कैलासही दिसे॥ २६१॥**
**श्रीमहादेव भवानियेंशीं। तुझ्या दिसतसे एके अंशीं। आणि तूतेंही गा हृषीकेशी। तुजमाजीं देखें॥ २६२॥**
**पैं कश्यपादि ऋषिकुळें। इयें तुझिंया स्वरूपीं सकळें। देखतसें पाताळें। पन्नगेशीं॥ २६३॥**

**किंबहुना त्रैलोक्यपती। तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती। इयें चतुर्दशभुवनें चित्राकृती। अंकुरलीं जाणों॥ २६४॥**

**अर्थ**—देवा! ज्याप्रमाणे मंदार पर्वताचे अंगावर श्वापदांचे कळप असावे, त्याप्रमाणे या तुझ्या विश्वरूपाचे ठिकाणीं अनेक भुवनें मी पाहत आहे. ॥ २५७ ॥ अहो देवा आकाशाच्या पोटांत ज्याप्रमाणे ग्रहांचे समुदाय दिसावे किंवा एखाद्या मोठ्या वृक्षाचे ठिकाणीं पक्षांचीं घरटीं असावींत॥ २५८ ॥ त्याप्रमाणे भगवंता! या तुझ्या विश्वरूप शरीराचे ठिकाणी सर्व देवसमुदायासह मी स्वर्गलोक पाहत आहे॥ २५९ ॥ प्रभो! येथे पंचमहाभूतांचे अनेक समुदाय मी पाहत असून, एक एक सृष्टीचे जारज अंडजादि प्राणीसमुदायहि पाहत आहे॥ २६० ॥ भगवंता! तुझ्या ठिकाणीच सत्यलोक आहे. पाहिलेला हा ब्रह्मदेव नव्हे काय! आणि दुसरीकडे जों मी पाहतो तों तुझ्याठिकाणी कैलासहि दिसूं लागला॥ २६१ ॥ पार्वतीसहवर्तमान भगवान शंकर तुझ्या एका अंशावर दिसत असून, भगवंता! तुझें चतुर्भुजरूपहि मी तुझ्या विश्वरूपाचे ठिकाणी पाहत आहे॥ २६२॥ त्याचप्रमाणे कश्यपादि संपूर्ण ऋषींचीं कुळें, या तुझ्या विश्वरूपाचे ठिकाणी मी पाहत असून, नागासहवर्तमान अनेक पाताळलोकहि तुझ्या ठिकाणी पाहत आहे॥ २६३ ॥ हे त्रैलोक्यनाथा! किंबहुना तुझ्या एक एक अवयवरूप भितीचे ठिकाणी चवदा लोकांच्या चित्रांची आकृति चितारलेली दिसत आहे. ॥ २६४ ॥

**आणि तेथिंचे जे जे लोक। ते चित्ररचना जी अनेक। ऐसें देखतसें अलौकिक। गांभीर्य तुझें॥ २६५ ॥**

**अर्थ**—आणि त्या चवदा लोकांतील संपूर्ण प्राणी म्हणजे अनेक चित्रांची रचनाच होय. अशी मी तुझी असामान्य थोरवी पाहत आहे. ॥ २६५ ॥

**अनेक बाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम्। नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप॥ १६ ॥**

**अर्थ**—सर्व ब्रह्मांडाचें नियमन करणाऱ्या विश्वरूपा जगन्नायका! तुझें हे अनेक बाहु, अनेक उदरें, अनेक मुखें अनेक डोळें असलेल्या तुला सर्वत्र अनंतरूपाने मी पाहत आहे. त्या तुझ्या विश्वरूपाला आदि, मध्य, तसेंच अन्त हे तिन्ही नाहीत हेहि मी पाहात आहे॥ १६ ॥

**त्या दिव्यचक्षूंचेनि पैसें। चहूंकडे जंव पाहत असें। तंव दोर्दंडीं जैसें। आकाश कोंभैलें॥ २६६ ॥**
**तैसे एकेक निरंतर। देवा देखत असें तुझे कर। करीत आघवेचि व्यापार। एकेचि काळीं॥ २६७॥**

**अर्थ**—हे देवा! तुवां दिलेल्या ज्ञानदृष्टीचा संपूर्ण विकास करून चोहोंबाजूला मी जों पाहूं लागलों, तों जणू काय आकाशाला कोंभ फुटावें असे तुझे दोन बाहु दिसत आहेत॥ २६६ ॥ त्याचप्रमाणें तुझा एक एक हात एकाचवेळीं अखंड सर्व व्यापार करीत आहे असें मी पाहात आहे॥ २६७॥

**गूढार्थदीपिका**—जीवाच्या मर्यादित स्वरूपामुळें व अल्पशक्ति मुळें, जीवाच्या ठिकाणीं कर्माचा किंवा व्यापाराचा आरंभादि क्रम दिसून पडतो आणि त्याच्या अल्पज्ञतेमुळें त्याचें ज्ञान भूत, भविष्य वर्तमान असे तिन्ही कालांनी विभागलें जातें. पण परमेश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् व सर्वव्यापक असल्यामुळे त्याचे ठिकाणी सर्व व्यापार व सर्व ज्ञानें एकदम एका वर्तमानकालींच असतात. परमेश्वराच्या शक्तिव्यापाराला व ज्ञानाला भूत, भविष्य, वर्तमान अशी कालाची मर्यादा नसते.

**मग महाशून्याचेनि पैसारें। उघडलीं ब्रह्मकटाहाचीं भांडारें। तैसी देखतसें अपारें। उदरें तुझीं॥ २६८ ॥**
**जी सहस्त्रशीर्षं याचें दाखले। कोडीवरी होताति एकिवेळें। कीं परब्रह्मचि वदनफळें। मोडोनि आलें॥ २६९ ॥**
**तैसीं वक्त्रें जी जेउतीं तेउतीं। तुझीं देखतसें विश्वमूर्ती। आणि तयाचिपरी नेत्रपंक्ति। अनेका सैंघ॥ २७० ॥**
**हें असो स्वर्ग पाताळ। कीं भूमी दिशा अंतराळ। हे विवक्षा ठेली सकळ। मूर्तिमय देखतसें॥ २७१ ॥**

**अर्थ**—परब्रह्म जेवढें अमर्याद आहे, तेवढेच त्याच्यावर भासणाऱ्या तुझ्या विश्वरूपाचीं उदरें, जणू काय अपार ब्रह्मांडाचीं भांडारें उघडल्याप्रमाणे दिसत आहेत॥ ३६८ ॥ अहो जी देवा! तुम्ही सहस्त्रशीर्ष आहांत, याची एकाच वेळीं कोट्यावधी प्रत्यंतरें येत आहेत किंवा जणुं काय परब्रह्मच मुखरूपी फळाने भरभराटून आले॥ ३६९ ॥ अशीं, हीं विश्वरूपा! तुझीं मुखें मी जिकडे तिकडे पाहांत आहे; त्याप्रमाणे डोळ्यांच्याही अनेक रांगा मी सर्वत्र पाहात

आहे ॥ २७० ॥ हें असूं दे. पण हा सर्व स्वर्ग, हे पाताळ किंवा ही भूमी, ह्या दिशा, हें आकाश, ही निरनिराळी भाषा वापरण्याची देखील सोय राहीली नाही. तुला संपूर्ण मूर्तिरूप मी पाहत आहे ॥ २७१ ॥

**गूढार्थदीपिका**—मूढ मृगांना, मृगजळ हें पाणीच वाटतें; म्हणून मनुष्य त्याला मृगजळ म्हणत असला, तरी त्याला तें जसें सूर्य प्रकाशाचें कंपन वाटतें. त्याप्रमाणे अज्ञानी जीवांना, भगवंताचें विश्वरूप अनेक प्रकारच्या वस्तूंनी भरलेलें जगत वाटत असलें, तरी ज्ञानीभक्ताला एक भगवानच सर्ववस्तुरूपाने दिसतो.

**तुजवीण एकादियाकडे। परमाणुहि एतुला कोडें। अवकाशु पाहतसें परि न सांपडे। ऐसें व्यापिलें तुवां॥ २७२॥**
**इयें नानापरी अपरिमितें। जेतुलीं सांठविलीं होतीं महाभूतें। तेतुलाही पवाडु तुवां अनंतें। कोंदला देखतसें॥ २७३॥**
**ऐसा कवणे ठायाहूनि तूं आलासी। एथ बैसलासि कीं उभा आहासी। आणि तूं कवणिये मायेचिये पोटीं होतासी। तुझें ठाण केवढें॥ २७४॥**
**तुझें रूप वय कैसें। तुज पैलीकडे काय असे। तूं काइसयावरी आहासि ऐसें। पाहिलें मियां॥ २७५॥**

**अर्थ**—तूं नाहीस अशी परमाणु इतकी सूक्ष्म तरी पोकळी कोठें आहे काय, हें मी कौतुकाने पाहत आहे, पण ती कोठें सांपडत नाही असे तुवां व्यापिलें आहे ॥ २७२ ॥ ही नाना प्रकारचीं जेवढी अपरिमित महाभूतें ब्रह्मांडांत सांठविली दिसत होती, तेवढाहि संपूर्ण विस्तार, अनंता! एका तुझ्यानेच भरलेला आहे असें मी पाहत आहे ॥ २७३ ॥ असा तूं विश्वव्यापक कोणत्या ठिकाणाहून आलास? येथे तूं बसला आहेस की उभा आहेस? तूं कोणत्या मातेच्या पोटी होतास? तुझें तें स्थान केवढें आहे?॥ २७४ ॥ तुझें रूप व वय कसें आहे? तुझ्या पलीकडे काय आहे? तू कशावर आहेस? हें मी संपूर्ण निरखून पाहिलें ॥ २७५ ॥

**तंव देखिलें जी आघवेंचि। तरि आतां तुझा ठावो तूंचि। तूं कवणाचा नव्हेसि ऐसाचि। अनादि आयता॥ २७६॥**

**अर्थ**—हें संपूर्ण मी पाहिलें, तेव्हा कळून आलें की तुझें स्थान तूंच आहेस-म्हणजे तुझ्याहून तुझे स्थान निराळे नाही. तूं कोणाचाहि नव्हेस-म्हणजे तूं कोणापासून उत्पन्न झाला नाहीस-असा तूं अनादि व सिद्ध आहेस ॥ २७६ ॥

**गूढार्थदीपिका-तुझा ठाव तूंचि**—"स भगव: कस्मिन्प्रतिष्ठित इति। स्वे महिम्नि" (छां. उ. ७-२४-१) या श्रुतीचाच हे चरण अनुवाद आहे.

**तूं कवणाचा नव्हेसि ऐसाचि। अनादि आयता**—विश्वरूपाचे ठिकाणी विश्वरूपाहून दुसऱ्या पदार्थाचा अनुभवच नाही, म्हणून दुसऱ्या कोणापासून त्याची उत्पत्ति मानतां येत नाही. अर्थात् "अनादि आयता" म्हणजे विश्वरूप हें उत्पत्तिरहित स्वत:सिद्ध वस्तुस्वरूप आहे असा अर्थ.

**तूं उभा ना बैठा। दिघडु ना खुजटा। तुज तळीं वरी वैकुंठा। तूंचि आहासी॥ २७७॥**
**तूं रूपें आपणयांचि ऐसा। देवा तुझी तूंचि वयसा। पाठी पोट परेशा। तुझें तूं गा॥ २७८॥**
**किंबहुना आतां। तुझें तूंचि आघवें अनंता। हें पुढत पुढती पाहतां। देखिलें मियां॥ २७९॥**

**अर्थ**—तूं उभा नाहीस किंवा बसला नाहीस. तूं उंच नाहीस, ठेंगणा नाहीस. भगवंता! तुझ्या खाली-वर सर्वत्र एक तूंच भरला आहेस ॥ २७७ ॥ देवा! तूं रूपाने आपल्यासारखाच आहेस-म्हणजे तूं जसा अपरिमित तसें तुझें रूपहि अपरिमित आहे. तूंच तुझें वय आहेस-म्हणजे तुला जशी मर्यादा नाही तशी तुझ्या विश्वरूपालाहि मर्यादा नाही व तुझें पाठ पोट तूंच आहेस म्हणजे तुझें पाठ पोट इत्यादि अवयवयुक्त शरीर तूंच आहेस ॥ २७८ ॥ किंबहुना आतां तुझें सर्व तूंच आहेस म्हणजे तूं जसा सच्चिदानंदस्वरूप तसें तुझें अवयवयुक्त शरीर सच्चिदानंदस्वरूप आहे असेच मी वारंवार पाहिलें आहे ॥ २७९ ॥

**परि या तुझिया रूपाआंतु। जी उणीव एक असें देखतु। जे आदि मध्य अंतु। तिन्हीं नाहीं॥ २८०॥**

**अर्थ**—पण या विश्वरूपांत एकच मला उणीव दिसत आहे, ती म्हणजे तुझ्या विश्वरूपाचे ठिकाणी आदि, मध्य, अन्त हे तिन्ही नाहीत ॥ २८० ॥

**गूढार्थदीपिका-"अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्यय:"** (गीता अ. १३-३१)

"ए एवाधस्तात्स उपरिष्टात्स पश्चात्स पुरस्तात्स दक्षिणत: स उत्तरत: स एवेदं इति" (छां. उ. ७-२५-१)

"स भूमि विश्वतो वृत्वा" (श्वे उ. ३-१४) इत्यादि श्रुतींतून भगवंताच्या नामरूपरहित निराकार-स्वरूपाचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत, तीच संपूर्ण लक्षणें, त्याच्या सगुणसाकार स्वरूपाचींहि असतात, हेंच माउलींनी वरील ओव्यांतून सांगितलें आहे.

**एऱ्हवीं गिंवसिलें आघवां ठायीं। परि सोय न लहेचि कहीं। म्हणोनि त्रिशुद्धी हे नाहीं। तिन्ही एथ॥ २८१॥**
**एवं आदिमध्यांतरहिता। विश्वेश्वरा अपरिमिता। तूं देखिलासि जी तत्त्वतां। विश्वरूपा॥ २८२॥**
**तुज महामूर्तीचियां आंगीं। उमटलिया पृथक् मूर्ती अनेगी। लेइलासि वानेंपरींची आंगी। ऐसा आवडतु आहासी॥ २८३॥**
**नाना पृथक् मूर्ती तिया द्रुमवेली। तुझां स्वरूपमहाचळीं। दिव्यालंकार फुलीं फळीं। सासिन्नलिया॥ २८४॥**
**हो कां जे महोदधी तूं देवा। जाहलासि तरंगीं मूर्ती हेलावा। कीं तूं वृक्षु एक बरवा। मूर्तिफळीं फळलासि॥ २८५॥**
**जी भूतीं भूतळ मांडिलें। जैसें नक्षत्रीं गगन गुढारले। तैसें मूर्तिमय भरलें। देखतसें तुझें रूप॥ २८६॥**

**अर्थ**—तुला आदि, मध्य, अन्त कोठे आहेत, हे सर्व ठिकाणी मी निरखून पाहिलें, परंतु त्यांचा कोठे थांग लागत नाही; म्हणून हे तिन्ही तुझ्या ठिकाणीं नाहीत हे त्रिवार सत्य आहे॥ २८१॥ हे आदिमध्यान्तरहिता! हे सर्व ब्रह्माण्डाच्या नियंत्या! हे अमर्यादरूपा! हे विश्वरूपा! याप्रमाणे तूं खरोखर आहेस, हें मी पाहिलें॥ २८२॥ तुझ्या विश्वरूप महामूर्तीच्या आंगावर ज्या अनेक निरनिराळ्या मूर्ती प्रगट झाल्या आहेत त्या पाहतां, तूं नाना प्रकारची आंगडीं घातली आहेस, असा वाटतोस॥ २८३॥ किंवा नाना प्रकारच्या निरनिराळ्या मूर्ती ह्याच कोणी निरनिराळे वृक्ष व वेली असून, त्या तुझ्या विश्वरूपी महापर्वताचे ठिकाणी दिव्य अलंकाररूपी फळा-फुलांनी भरास आल्या आहेत॥ २८४॥ किंवा देवा! असेहि वाटते की तूं महासमुद्र असून, मूर्ती ह्या तुझेच तरंगरूप हेलकावे आहेत किंवा तूं एक सुंदर वृक्ष असून मूर्तीरूप फळांनी फलद्रूप झाला आहेस॥ २८५॥ अहो जी देवा! जशी पृथ्वी भूतांनी व्यापिली आहे किंवा आकाश नक्षत्रांनी भरलें आहे, त्याप्रमाणे तुझें विश्वरूप मूर्तीने भरलेलें मी पाहत आहे॥ २८६॥

**जी एकेकीचां अंगप्रांतीं। होय जाय हें त्रिजगती। एवढियाही तुझां आंगीं मूर्ती। कीं रोमां जालिया॥ २८७॥**
**ऐसा पवाडु मांडूनि विश्वाचा। तूं कवण पां एथ कोणाचा। हें पाहिलें तंव आमुचा। सारथी तोचि तूं॥ २८८॥**

**अर्थ**—देवा! काय सांगूं! तुझ्या आंगावर दिसणाऱ्या एका एका मूर्तीच्या एका एका अवयवावर हें त्रैलोक्य, उत्पन्न व नष्ट होत असून, एवढ्याहि मूर्ती तुझ्या आंगाचे ठिकाणी रोमाप्रमाणे दिसत आहेत॥ २८७॥ असा हा विश्वरूपाचा विस्तार मांडून राहिलेला तूं कोण व कोणाचा हे मी पाहिलें, तेव्हा आमचा जो सारथी श्रीकृष्ण, तोच तूं आहेस, असें दिसून आलें॥ २८८॥

**गूढार्थदीपिका**—आपल्या सारथि श्रीकृष्णाच्या एकदेशीयस्वरूपाचे ठिकाणीच अर्जुनाला विश्वरूपाचें दर्शन होत होतें, असें माउलीचें म्हणणें आहे. अर्थात् श्रीकृष्णस्वरूप व विश्वरूप असा या दोन्ही स्वरूपांचा प्रत्यय अर्जुनाला विश्वरूपदर्शनांत येत होता असें स्पष्ट दिसतें. यावरून भगवंताच्या एकदेशीय श्रीकृष्णस्वरूपाचा व विश्वरूपाचा केव्हाच विरोध नसतो व बीजवृक्षाप्रमाणे एकदेशीय श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणी संपूर्ण विश्वरूप व विश्वरूपांत श्रीकृष्णस्वरूप समाविष्ट असते, असेंच सिद्ध होतें.

**तरि मज पाहतां मुकुंदा। तूं ऐसाचि व्यापकु सर्वदा। भक्तानुग्रहें तया मुग्धा। रूपातें धरिसी॥ २८९॥**

**अर्थ**—भगवंता! मला असें वाटतें की तूं असाच सदासर्वदा व्यापक आहेस, पण भक्तांवर प्रेमवृद्धिरूप अनुग्रह करण्याकरितां तू सुंदर गोजिरवाणें एकदेशीय श्रीकृष्णस्वरूप धारण करतोस॥ २८९॥

**गूढार्थदीपिका**—समुद्राचे कांठी उभे राहून समुद्राकडे पाहिले असतां, जसा तो विस्तीर्ण समुद्र मनुष्याच्या मर्यादित दृष्टीने मर्यादित पाहिला जातो, तरीपण, समुद्र विस्तीर्ण आहे, हें तो विसरत नसतो, त्याप्रमाणे भगवान सदा सर्वदा व्यापक असतो तरी भक्ताच्या प्रेमवृत्तीच्या मर्यादेमुळे, तो भक्ताकडून एकदेशीय घेतला जातो, तरीपण भक्त भगवंताची व्यापकता विसरत नसतो. "प्रेम गली अति साकली तामे दो न समाय" प्रेमाची गल्ली अत्यंत अरुंद

असल्यामुळे भगवंताचें सगुणसाकारस्वरूपच, प्रेमाचा विषय होऊं शकतें, व्यापकस्वरूप होऊं शकत नाही; हेंच माउलींनी या ओवींत सांगितलें आहे.

**कैसें चहूं भुजांचें सांवळें। पाहतां वोल्हावती मन डोळे। खेंव देऊं जाइजे तरि आकळे। दोहींचि बाहीं॥ २९०॥**

**अर्थ**—तुझें तें चतुर्भुजरूप कसें सुंदर व गोजिरवाणें आहे की जें पाहतांक्षणीं मनाची व डोळ्यांची तृप्ति होते आणि प्रेमाने आलिंगन देऊं म्हटल्यास आम्हांला आपल्या दोन हातांनी ते कवटाळतां येतें॥ २९०॥

**ऐसी मूर्ति कोडिसवाणी कृपा-। करूनि होसी विश्वरूपा। कीं आमुचियाचि दिठी सलेपा। जे सामान्यत्वें देखती॥ २९१॥**

**अर्थ**—हे विश्वरूपा भगवंता! याप्रकारें आम्हां भक्तांवर कृपा करून, अशी ही गोजिरवाणी सगुण सांवळी मूर्ति धारण करतोस, पण आमची दृष्टिच अविद्येने दूषित असल्यामुळें आम्ही त्या तुझ्या सगुणस्वरूपाला सामान्य मनुष्याप्रमाणेच पांचभौतिक लेखतो॥ २९१॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताच्या सगुण श्रीकृष्णस्वरूपाला सामान्यत्वाने-म्हणजे इतर अज्ञानी जीवाच्या शरीराप्रमाणे-पांचभौतिक जडविनाशी समजणाऱ्यांची दृष्टि अविद्यादोषाने दूषितच असते असें माउलीचें स्पष्ट म्हणणें आहे.

**तरी आतां दिठीचा विटाळु गेला। तुवां सहजें दिव्यचक्षू केला। म्हणोनि यथारूपें देखवला। महिमा तुझा॥ २९२॥**

**अर्थ**—परंतु देवा! तुम्ही सहज माझ्यावर कृपा करून जी ज्ञानदृष्टि दिली, त्या ज्ञानदृष्टिने माझ्या पूर्वदृष्टींतील अविद्येचा दोष नाहीसा झाल्यामुळे तुझ्या सगुणसाकारस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊन, त्या सगुणस्वरूपाचा खरा महिमा आतां मला कळून आला॥ २९२॥

**गूढार्थदीपिका**—समर्थांनीहि "सगुण इच्छावें। आणि निर्गुण प्रतिपादावें। परि ते निर्गुणचि स्वभावें। सगुण होतें" (र. च. स. १५-१६) "परमेश्वराचे अनंत गुण। मनुष्यें काय सांगावीं खुण। परि ते अध्यात्मग्रंथश्रवण। होतां उमजे"॥ ४०॥ (दास. द. १८-४) या ओव्यांतून हाच आशय व्यक्त केला आहे.

**परि मकरतुंडामागिलेकडे। होतासि तोचि तूं एवढें। रूप जाहलासि हें फुडें। वोळखिलें मियां॥ २९३॥**

**अर्थ**—आणि मगराच्या तोंडाच्या आकाराप्रमाणे असलेल्या जुंवाच्या मागच्या बाजूला जे तुम्ही बसलां होता, त्याच तुम्ही एवढें विश्वरूप धारण केलें, हें मी पक्कें ओळखलें॥ २९३॥

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम्।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्॥ १७॥**

**अर्थ**—किरीट धारण केलेला, हातांत गदा व सुदर्शनचक्र असलेला, अत्यंत दैदीप्यमान, सर्वत्र ज्याचें तेज फांकलेले आहे असा अत्यंत तेजोराशी, दृष्टीने सर्वत्र पाहिला न जाणारा व अत्यंत प्रदीप्त झालेल्या अग्नीच्या व सूर्याच्या तेजाप्रमाणे तेजस्वी असलेला, प्रत्यक्षहि प्रमाणाने कळूं न शकणारा, अशा तुला मी पाहत आहे॥ १७॥

**नोहे तोचि हा शिरीं। मुकुट लेइलासि श्रीहरी। परि आतांचें तेज आणि थोरी। नवल कीं बहु हें॥ २९४॥**
**तेंचि हें वरिलियेचि हातीं। चक्र परिजितया आयती। सांवरितासि विश्वमूर्ती। ते न मोडे खूण॥ २९५॥**
**येरीकडे तेचि हे नोहे गदा। आणि तळिलिया दोनी भुजा निरायुधा। वागोरे सांवरावया गोविंदा। संसरिलिया॥ २९६॥**
**आणि तेणेंचि वेगें सहसा। माझिया मनोरथासरिसा। जाहलासि विश्वरूपा विश्वेशा। म्हणोनि जाणें॥ २९७॥**
**परि कायसें बा हें चोज। विस्मयों करावयाहि पवाडु नाहीं मज। चित्त होऊनि जातसे निर्बुज। आश्चर्यें येणें॥ २९८॥**
**हें एथ आथी कां येथ नाहीं। ऐसें विवरों नये कांहीं। नवल अंगप्रभेची नवाई। कैसी कोंदली सैंघ॥ २९९॥**
**एथ अग्नीचीही दिठी करपत। सूर्य खद्योतु तैसा हारपत। ऐसें तीव्रपण अद्भुत। तेजाचें यया॥ ३००॥**
**हो कां जे महातेजाचिया महार्णवीं। बुडोनि गेली सृष्टि आघवी। कीं युगांतविजूंच्या पालवीं। झांकलें गगन॥ ३०१॥**
**नातरी संहार तेजाचिया ज्वाळा। तोडोनि माचु बांधला अंतराळा। आतां दिव्य ज्ञानाचिया डोळां। पाहवेना॥ ३०२॥**
**उजाळु अधिकाधिक बहुवसु। धडाडीत आहे अतिदाहसु। पडत दिव्यचक्षूंसही त्रासु। न्याहाळितां॥ ३०३॥**
**हो कां जे महाप्रळयींचा भडाडु। होता काळाग्निरुद्राचां ठायीं गूढु। तो तृतीयनयनाचा मढु। फुटला जैसा॥ ३०४॥**

**तैसें पसरलेनि प्रकाशें। सैंघ पांचवनिया ज्वाळांचे वळसे। पडतां ब्रह्मकटाह कोळिसे। होत आहाती॥ ३०५॥**
**ऐसा अदभुत् तेजोराशी। जन्मा नवल म्यां देखिलासि। नाहीं व्याप्ती आणि कांतीसी। पारु जी तुझिया॥ ३०६॥**

**अर्थ**—श्रीहरी भगवंता! तुझ्या चतुर्भुजमूर्तीच्या मस्तकावर जो मुकुट घातला जात असे, तोच हा आतां घातलेला मकुट नव्हे काय? पण आतां त्या मुकुटाचें तेज आणि थोरवी कांही अपूर्व आहे, हें नवल आहे॥ २९४॥ (हे विश्वरूपा भगवंता!) शत्रूच्या वधार्थ फिरविण्याकरितां जें चक्र तुझ्या वरच्या हातांत सज्ज असतें, तेंच तूं सांवरून धरीत आहेस, ती खूण नाहीशी झाली नाही॥ २९५॥ हे गोविंदा! दुसरीकडे जी गदा आहे ती, तीच नव्हे काय? आणि शस्त्ररहित असलेल्या खालच्या दोन्ही भुजा घोड्याचा लगाम धरण्याकरितां पुढें सरसाविल्या आहेत॥ २९६॥ आणि माझ्या इच्छेबरोबर हे विश्वेशा! आपण "तेणेचि" म्हणजे त्याच सगुण श्रीकृष्णरूपाने एकदम विश्वरूप झालांत, हे मला कळून आलें॥ २९७॥ पण कसें हें आश्चर्य पहा की या विश्वरूपाच्या दर्शनाने माझें चित्त दिङ्मूढ होऊन गेलें आहे आणि मला आश्चर्य करण्यापुरतीहि योग्यता राहिली नाही॥ २९८॥ हें विश्वरूप येथे आहे किंवा नाही, याचा माझें मन कांही विचार करूं शकत नाही, तुझ्या अंग्रप्रभेचें विलक्षण अपूर्वत्व असून, ती कशी सर्वत्र भरली आहे, पहा॥ २९९॥ या प्रभेपुढें अग्नीची दृष्टि देखील होरपळून जाईल, सूर्याचें तेज देखील काजव्याच्या तेजाप्रमाणे या प्रभेंत लोपून जाईल, असे या तुझ्या अद्‌भुत तेजाचें तीव्रपण आहे॥ ३००॥ असें वाटतें जणुं काय या तुझ्या महातेजाच्या समुद्रांत सर्व सृष्टि बुडून गेली आहे किंवा कल्पान्तसमयींच्या विजांच्या वस्त्रांनी सर्व आकाश झांकून टाकलें आहे॥ ३०१॥ किंवा सर्व सृष्टीचा प्रलयकालीं संहार करणाऱ्या ज्वाळा तोडून जणुं काय आकाशांत माळाच बांधला; म्हणूनच आतां ह्या माझ्या दिव्यदृष्टीनेहि तें तेज पाहवत नाही॥ ३०२॥ तें तेज अधिकाधिक फार वाढून अत्यंत दाहक होत आहे व तें पाहतांना माझ्या दिव्यचक्षूलाहि त्रास होत आहे॥ ३०३॥ असें वाटते की महाप्रलयांतील महातेजाचा भडका, काळाग्निरुद्राच्या ठिकाणी जो गुप्त होता, तो तृतीय नेत्ररूप तेजाचा सांठाच जणुं काय बाहेर पडला॥ ३०४॥ तशा त्या सर्वत्र पसरलेल्या तेजाने संपूर्ण पांचही अग्नीच्या (गार्हपत्य, आहवनीय, दाक्षिणाग्नि, सभ्य आणि आवसथ्य असे पांच अग्नि) ज्वाळांचे वेढे पडल्यामुळे सर्व ब्रह्मांडाचे कोळसे होत आहेत॥ ३०५॥ याप्रमाणे जणुं काय अद्भुत तेजाची राशीच असा अत्यंत आश्चर्यकारक, मी तुला जन्मापासून आजच पाहत आहे. या तुझ्या व्याप्तीला व कान्तीला मर्यादाच नाही॥ ३०६॥

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम्। त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे॥ १८॥**
**अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम्। पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम्॥ १९॥**
**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः। दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्॥ २०॥**

**अर्थ**—देवा! सर्व जाणण्यायोग्य वस्तुमध्ये श्रेष्ठ, प्रकृतीच्याहि पलीकडे असलेलें जें अविनाशी परब्रह्म, तें तूं आहेस. संपूर्ण विश्व सांठविण्याचें श्रेष्ठ ठिकाण तूंच आहेस. तूं कधीहि नाश पावणारा नसून, या शाश्वत, सनातन वैदिक धर्माचा संरक्षण करणारा तूंच आहेस आणि ज्याला सनातन पुराणपुरुष म्हणतात, तोहि तूंच आहेस, हे मला कळून आलें॥ १८॥ तूं आदि, मध्य, अन्त रहित असून, अगाध सामर्थ्यवान आहेस. तुला अनंत बाहु आहेत. चंद्र व सूर्य हे तुझे नेत्र आहेत. पेटलेल्या अग्निप्रमाणे तुझें मुख आहे. आपल्या तेजाने या संपूर्ण विश्वाला तूं संतप्त करीत आहेस, असें मी पाहत आहे॥ १९॥ हे महात्म्या! स्वर्ग, पृथ्वी यांच्यामधील संपूर्ण अंतराळ प्रदेश व संपूर्ण दिशा त्वां एकट्यानेच व्यापिल्या आहेत. हें तुझें अत्यंत अद्‌भुत उग्र विश्वरूप पाहून तिन्ही लोक अत्यंत भयभीत व व्याकुळ झाले आहेत.॥ २०॥

**देवा तूं अक्षर। औटाविये मात्रेसि पर। श्रुती जयाचें घर। गिंवसीत आहाती॥ ३०७॥**

**अर्थ**—देवा! वेद ज्या तुझ्या ठिकाणाचा शोध करीत आहे, तो तूं अविनाशी असून ओंकाराच्या साडेतीन मात्रेच्या पलीकडे आहेस-म्हणजे ॐकारालाहि तूं अगम्य आहेस॥ ३०७॥

**गूढार्थदीपिका**—निर्गुण स्वरूपाप्रमाणे परमेश्वराचे सगुणस्वरूपहि शब्दाला अगम्य आहे असा अर्थ.

**जें आकाराचें आयतन। जे विश्वनिक्षेपैक-निधान। तें अव्यय तूं गहन। अविनाश जी॥ ३०८॥**
**तूं धर्मांचा वोलावा। अनादिसिद्ध तूं नित्य नवा। जाणें मी सदतिसावा। पुरुष विशेष तूं॥ ३०९॥**

**अर्थ**—तूं सर्व आकारांचा आश्रय आहेस म्हणजे सर्व नामरूपें तुझ्यावरच भासतात. संपूर्ण विश्व सांठविण्याचें एकमेव, नाश न पावणारे असे अविनाशी व अपार असें स्थान तूंच आहेस॥ ३०८॥ तूं धर्माचे जीवन असून, तूं अनादि, स्वत:सिद्ध व नित्य नूतन आहेस. प्रकृतिजन्य छत्तीस तत्वांच्या पलीकडे सदतिसावा विशेष पुरुष म्हणून जो सांगितला आहे, तो तूं आहेस, हें मी आतां जाणलें॥ ३०९॥

**गूढार्थदीपिका**—सांख्यशास्त्राच्या मतें पुरुष सोडून, कार्यप्रपंच म्हणून जी चोवीस तत्वें सांगितलीं आहेत, त्यांच्या थोडा विस्तार करून, माउलींनी छत्तीस तत्वें मानली आहेत. हीं छत्तीस तत्वें पुढें तेराव्या अध्यायांत क्षेत्राचें वर्णन करतांना सांगितलीं आहेत. आणि सांख्यांत जसा चोवीस तत्वाव्यतिरिक्त पंचविसावा पुरुष मानला आहे, तसा येथे छत्तीस तत्वाव्यतिरिक्त सदतिसावा पुरुष म्हणून, विश्वरूपाला मानलें आहे. या प्रतिपादनानें भगवंताचीं सगुण व निर्गुण हीं दोन्हीं रूपें छत्तीस तत्वांच्या पलीकडे असल्यामुळे तीं त्रिगुणात्मक मायारहित किंवा अविद्यारहित आहेत, असें सुचविलें आहे.

**तू आदिमध्यांतरहितु। स्वसामर्थ्यें तूं अनंतु। विश्वबाहु अपरिमितु। विश्वचरण तूं॥ ३१०॥**
**पैं चंद्र चंडांशु डोळां। दावितासि कोपप्रसाद लीळा। एकां रुससी तमाचां डोळां। एकां पाळितोसि कृपादृष्टी॥ ३११॥**
**जी एवंविधा तूंते। मी देखतसें हें निरुतें। पेटले प्रळयाग्नीचें उजितें। तैसें वक्त्र हें तुझें॥ ३१२॥**
**वणिवेनि पेटले पर्वत। कवळूनि ज्वाळांचे उभड उठत। तैसी चाटीत दाढा दांत। जीभ लोळे॥ ३१३॥**
**इये वदनींचिया उबा। आणि जी सर्वांगकांतीचिया प्रभा। विश्व तातलें अति क्षोभा। जात आहे॥ ३१४॥**
**कां जे द्योर्लोक आणि पाताळ। पृथिवी हन अंतराळ। अथवा दशदिशा समाकुळ। दिशाचक्र॥ ३१५॥**
**हें आघवेंचि तुवां एकें। भरलें देखत आहे कौतुकें। परि गगनाहीसकट भयानकें। आप्लविजे जेवीं॥ ३१६॥**

**अर्थ**—तुला आदि, मध्य, अंत नाहीत. स्वत:च्या सामर्थ्याच्या दृष्टीने तूं अनंत आहेस-म्हणजे तुझें सामर्थ्य अपरिमित आहे. सर्वत्र अपरिमित असे तुझे बाहु व चरण आहेत॥ ३१०॥ तूं आपल्या सूर्य व चंद्र या डोळ्यांनी कोप व अनुग्रह अशी लीला दाखवितोस. सूर्यरूपी क्रुद्ध (तीक्ष्ण) डोळ्याने कोणावर रुसून नाश करतोस, तर चंद्ररूपी डोळ्याने कोणावर कृपा करून त्याचें संरक्षण करतोस॥ ३११॥ भगवंता! याप्रमाणेच खरोखर मी तुला पाहत आहे. जणुं काय प्रलयांतील पेटलेल्या अग्नीचा लखलखाटच, असें हें तुझें मुख दिसत आहे॥ ३१२॥ जंगलांत लागलेल्या अग्नीने पर्वत पेटून जशा सर्व ज्वाला मिळून त्यांचा एकच भडका उठावा, त्याप्रमाणे दांत व दाढा चाटीत जीभ तोंडात सारखी फिरत आहे॥ ३१३॥ या तुझ्या मुखांतील ज्वाळांच्या उष्णतेने आणि तुझ्या सर्वांगाच्या अदभुत तेजाने संपूर्ण विश्व होरपळून गेलें असून अत्यंत व्याकूळ होत आहे॥ ३१४॥ कारण स्वर्ग, पाताळ, पृथ्वी आणि अंतराळ अथवा दशदिशासहित संपूर्ण दिङ्मंडळ, आकाशासहित हें संपूर्ण विश्व बुडवून टाकावे, त्याप्रमाणे तूं आपल्या एका भयंकर मुखांत सहज भरलें आहेस असे मी आश्चर्यचकित होऊन पाहत आहे.॥ ३१५-३१६॥

**नातरी अद्भुतरसाचां कल्लोळीं। जाहली चवदाही भुवनांसि कडियाळी। तैसें आश्चर्येचि मग मी आकळीं। काय एक॥ ३१७॥**
**नावरे व्याप्ती हे असाधारण। न साहवें रूपाचें उग्रपण। सुख दूरी गेलें परी प्राण। विपायें धरी जग॥ ३१८॥**
**देवा ऐसे देखोनियां तूंतें। नेणों कैसें आलें भयाचें भरितें। आतां दु:खकल्लोळीं झळंबतें। तीन्हीं भुवनें॥ ३१९॥**
**एऱ्हवीं तुज महात्मयाचें देखणें। तरि भयदु:खासि कां मेळवणें। परि हें सुख नव्हेचि जेणें गुणें। तें जाणवत आहे मज॥ ३२०॥**
**जंव तुझें रूप नोहे दिठें। तंव जगासि संसारिक गोमटें। आतां देखिलासि तरी विषयविटें। उपनला त्रासु॥ ३२१॥**
**तेवींचि तुज देखिलियासाठीं। काइ सहसा तुज देवों येईल मिठी। आणि नेदीं तरी संकटीं। राहों केवीं॥ ३२२॥**
**म्हणोनि मागां सरों तंव संसारु। आडवीत येतसे अनिवारु। आणि पुढां तूं तंव अनावरु। न येसि घेवों॥ ३२३॥**

**अर्थ**—किंवा अदभुतरसाच्या कल्लोळांनी चवदाहि भुवनाला जसा वेढा दिला तसेच मीहि एक काय तें

आश्चर्यच अनुभवित आहे (एका आश्चर्याशिवाय मला कांही दिसत नाही असा अर्थ) ॥ ३१७ ॥ तुझा हा असामान्य व्यापकपणा आकलन होत नाही व तुझ्या रूपाचें उग्रपणहि सहन करवत नाही. सुख होणे तर दूरच राहिलें; पण जगाला प्राण धारण करणें देखील कठीण झालें आहे ॥ ३१८ ॥ देवा! तुझ्या अशा विश्वस्वरूपाला पाहून अशी भयंकर भीति कां वाटत आहे हें सांगवत नाही; पण हें संपूर्ण त्रिभुवन या दु:खाच्या लाटामध्ये गटांगळ्या खात आहे ॥ ३१९ ॥ खरोखर पाहतां, तुज माहात्म्याच्या दर्शनाने भीतिरूप दु:खांची प्राप्ति कां व्हावी? पण ज्या गुणामुळे या विश्वरूपदर्शनाचें सुख होत नाही, तो गुण मलाहि कळून येत आहे ॥ ३२० ॥ जोपर्यंत तुझें हें विश्वरूप दृष्टीस पडत नाही, तोपर्यंत जीवांना संसारसुखच गोड वाटतें आणि आतां तुझ्या विश्वरूपदर्शनाने विषयसुखाचा वीट येऊन विषयांचा कंटाळा उत्पन्न झाला आहे ॥ ३२१ ॥ त्याचप्रमाणे तुझ्या भयंकर रूपाला पाहिल्यानंतर एकदम तुला प्रेमाने मिठी मारतां येईल काय? आणि प्रेमाने मिठी मारतां येणार नाही, तर त्यावांचून विरहशोकसंकटात तरी कसें राहायचें!॥ ३२२ ॥ म्हणून तुजपासून मागें सरावें, तर हा अनिवार संसार मागें फिरूं देत नाही आणि समोर तुझे अनिवार स्वरूप आकलन करतां येत नाही ॥ ३२३ ॥

**गूढार्थदीपिका**—एकदेशीय सगुणाच्या प्रेमभक्तिवांचून त्रिगुणमायारहित व्यापक स्वरूपाच्या प्राप्तीचा प्रयत्न केवळ दु:खदायीच होतो हें येथे दाखविलें आहे. कारण वैराग्याने विषयाचा कंटाळा येतो आणि व्यापक स्वरूपावर प्रेम करतां येत नाही, अशा रीतीने साधक दु:खच भोगत राहतो.

**ऐसा माझारिलीं सांकडां। बापुड्या त्रैलेक्याचा होतसे हुरडा। ऐसा हा ध्वनि जी फुडा। चोजवला मज ॥ ३२४ ॥**
**जैसा आरंबळला आगीं। समुद्रा ये निवावयालागीं। तंव कल्लोळपाणियाचिया तरंगीं। आगळा बिहे ॥ ३२५ ॥**
**तैसें या जगासि जाहलें। तूंतें देखोनि तळमळित ठेलें। यामाजीं पैल भले। ज्ञानसुरांचे मेळावे ॥ ३२६ ॥**

**अर्थ**—याप्रमाणे संसारांचें भय आणि विश्वरूपाचें भय या दोन संकटाच्या कात्रींत सांपडलेल्या बिचाऱ्या त्रैलोक्याचा होरपळा होत आहे, असा आशय मला स्पष्ट कळला आहे ॥ ३२४ ॥ ज्याप्रमाणे अग्नीने होरपळलेला मनुष्य, शरीराचा दाह नाहीसा करण्याकरितां, समुद्रावर जातो आणि त्या समुद्रावर उठणाऱ्या भयंकर लाटांना पाहून, तो अत्यंत भितो ॥ ३२५ ॥ त्याप्रमाणे या संपूर्ण त्रैलोक्याला झालें असून, तुला पाहून, तें अत्यंत तळमळत आहे. यामध्यें पलीकडे मोठमोठे ज्ञानियांचे मेळावेहि आहेत ॥ ३२६ ॥

**अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जल्यो गृणन्ति।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥**

**अर्थ**—हे सुरांचे समुदाय तुझ्यांत प्रविष्ट होत आहेत, कित्येक भयभीत होऊन व हात जोडून तुझी प्रार्थना करीत आहेत, आणि महर्षि, सिद्ध यांचे समुदाय 'तुझें कल्याण असो' असें म्हणून नानाप्रकारच्या स्तुतींनी तुझें स्वतन करीत आहेत ॥ २१ ॥

**हे तुझेनि आंगिकें तेजें। जाळूनि सर्व कर्मांचीं बीजें। मिळत तुजआंतु निजें। सद्भावेंसीं ॥ ३२७ ॥**

**अर्थ**—हे देवांचे समुदाय, तुझ्या आंगच्या तेजानें आपल्या सर्व कर्माची बीजें जाळून आपल्या सद्भावाने तुझ्यांत मिळत आहेत ॥ ३२७ ॥

**गूढार्थदीपिका—तुझेनि आंगिकें तेजें। जाळूनि सर्व कर्मांचीं बीजें**—चैतन्य प्रकाशरूप परमेश्वराचे ठिकाणी, त्यावांचून कर्म म्हणून दुसरी वस्तुच नाही, या ज्ञानाने किंवा कर्मरूपानेहि परमेश्वरच भासतो, या ज्ञानाने भगवदाज्ञा समजून भगवत्प्रीत्यर्थ निष्काम कर्मयोगानुष्ठान करून आपलें कर्मकर्तृत्व नि:शेष नाहीसे करतात.

**आणिक एक साविया भयभीरु। सर्वस्वें धरूनि तुझी मोहरु। तुज प्रार्थितातित करु। जोडोनियां ॥ ३२८ ॥**
**देवा अविद्यार्णवीं पडिलों। जी विषयवागुरें आतुडलों। स्वर्गसंसाराचां सांकडलों। दोन्हीं भागीं ॥ ३२९ ॥**
**ऐसें आमुचें सोडवणें। तुजवांचोनि कीजेल कवणें। तुज शरण गा सर्वप्राणें। म्हणत देवा ॥ ३३० ॥**
**आणि महर्षी अथवा सिद्ध। कां विद्याधरसमूह विविध। हे बोलत तुज स्वस्तिवाद। करिती स्तवन ॥ ३३१ ॥**

**अर्थ**—आणि कित्येक खरोखरच भयभीत होऊन व सर्वस्वीं तुझ्याकडे दृष्टि देऊन, हात जोडून तुझी प्रार्थना करीत आहेत की॥ ३२८॥ देवा! आम्हीं तुला निःशेष विसरलों आहों व विषयासक्तिरूप जाळ्यांत सांपडलों आहों. त्यामुळें स्वर्गसुख व संसारसुख या दोहोंच्या कात्रींत अडकून पडलों आहो॥ ३२९॥ अशा आमची, येथून सुटका आतां तुझ्यावांचून कोण करणार? देवा! आम्ही तुलाच पंचप्राण समर्पण करून शरण आलों आहों, असे म्हणत आहेत॥ ३३०॥ आणि महर्षि अथवा सिद्ध, तसेच नानाविध विद्याधरांचे समुदाय ''तुझें कल्याण असो'' असे म्हणून तुझें स्तवन करीत आहेत॥ ३३१॥

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च।**
**गन्धर्वयक्षासुरसिद्धसङ्घा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे॥ २२॥**

**अर्थ**—रुद्र, आदित्य, वसु, साध्य, विश्वदेव, अश्विनीकुमार, मरुद्‌गण, पितर, गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध, यांचे समुदाय हे सर्व अत्यंत आश्चर्यचकित होऊन तुला पाहात आहेत॥ २२॥

**हे रुद्रादित्यांचे मेळावे। वसु हन साध्य आघवे। अश्विनौदेव विश्वेदेव विभवें। वायुही हे जी॥ ३३२॥**
**अवधारा अग्नि हन गंधर्व। पैल यक्षरक्षोगण सर्व। जी महेंद्रमुख्य देव। कां सिद्धादिक॥ ३३३॥**
**हे आघवेची आपुलांलिया लोकीं। सोत्कंठित अवलोकीं। हे महामूर्ती दैविकी। पाहात आहाती॥ ३३४॥**
**मग पाहात पाहात प्रतिक्षणीं। विस्मित होऊनि अंतःकरणीं। करित निजमुकुटीं वोवाळणी। प्रभुजी तुज॥ ३३५॥**
**ते जयजय घोष कलरवें। स्वर्ग गाजविताती आघवे। ठेवित ललाटावरी बरवे। करसंपुट॥ ३३६॥**
**तिये विनयद्रुमाचिये आरवीं। सुरवाडली सात्त्विकांची माधवी। म्हणोनि करसंपुटपल्लवीं। तूं होतासि फळ॥ ३३७॥**

**अर्थ**—अकरा रुद्रांचा समूह, बारा सूर्याचा समूह, आठ वसु, सर्व साध्य, अश्विनीकुमार, वैभवाने युक्त असे विश्वदेव, तसेच वायु॥ ३३२॥ पहा! पितर, गंधर्व, पलीकडें असलेले यक्षराक्षसगण, इंद्रादिदेव आणि सिद्धादिक॥ ३३३॥ हे सर्वच आपआपल्या लोकांमध्ये अत्यंत उत्कंठित होऊन तुझ्या या दैवी महामूर्तीकडे पाहत आहेत, हे पहा॥ ३३४॥ मग पाहत पाहत क्षणोक्षणीं अंतःकरणांत आश्चर्यचकित होऊन, आपल्या शिरावर असलेल्या मुकुटांची तुझ्यावरून ओवाळणी करीत आहेत॥ ३३५॥ ते, मंजुळ शब्दांनी तुझा जयघोष करून, संपूर्ण स्वर्ग दुमदुमून टाकीत आहेत आणि मुंदर जोडलेले हात ते मस्तकावर ठेवित आहेत॥ ३३६॥ त्या अत्यंत नम्रतारूप वृक्षाच्या अरण्यांत. सात्विक गुणांच्या वसंतऋतूचें ऐश्वर्य प्रगट झालें; म्हणून त्यांच्या जोडलेल्या हस्तरूपी पदरांत फळरूपाने तूं प्राप्त होतोस॥ ३३७॥

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम्।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम्॥ २३॥**

**अर्थ**—हे आजानुबाहो कृष्णा! ज्याला असंख्य मुखें व नेत्र आहेत, तसेंच असंख्य बाहु, मांड्या व पाय आहेत, ज्याला असंख्य उदरें आहेत व जें असंख्य दाढांनी विक्राळ झालें आहे, असें तें तुझें भयंकर रूप पाहून संपूर्ण त्रैलोक्यांतील प्राणी व मी देखील अत्यंत भयभीत झालों आहे॥ २३॥

**जी लोचना भाग्य उदेलें। जीवा सुखाचें सुयाणें पाहलें। जे अगाध तुझें देखिलें। विश्वरूप इहीं॥ ३३८॥**
**हें लोकव्यापक रूपडें। पाहतां देवांही वचकु पडे। याचें सन्मुखपण जोडे। भलतयाकडुनी॥ ३३९॥**
**ऐसें एकचि परि विचित्रें। आणि भयानकें तेवींचि बहु वक्त्रें। बहुलोचन हे सशस्त्रें। अनंतभुजा॥ ३४०॥**
**अनंत ऊरु बाहु चरण। बहु उदर आणि नानावर्ण। कैसें प्रतिवदनीं मातलेपण। आवेशाचें॥ ३४१॥**
**हो कां जे महाकल्पाचां अंतीं। तवकलेनि यमें जेउतेतेउतीं। प्रळयाग्नीचीं उजितीं। आंबुखिलीं जैसीं॥ ३४२॥**
**नातरी संहारत्रिपुरारीचीं यंत्रें। कीं प्रळयभैरवांचीं क्षेत्रें। नाना युगांतशक्तीचीं पात्रें। भूतखिचा वोढविलीं॥ ३४३॥**
**तैसीं जियेतियेकडे। तुझीं वक्त्रें जी प्रचंडें। न समाती दरीमाजीं सिंहाडें। तैसे दांत दिसती रागीट॥ ३४४॥**
**जैसें काळरात्रीचेनि अंधारें। उल्हासत निघती संहारखेचरें। तैसिया वदनीं प्रळयरुधिरें। काटलिया दाढा॥ ३४५॥**
**हें असो काळें अवंतिलें रण। कां सर्वसंहारें मातलें मरण। तैसें अति भिंगुळवाणेंपण। वदनीं तुझिये॥ ३४६॥**

**हे बापडी लोकसृष्टी। मोटकीये चि पाहिली दिठी। आणि दु:खकालिंदीचिया तटीं। झाड होऊनि ठेली॥ ३४७॥**
**तुज महामृत्यूचिया सागरीं। आतां हे त्रैलोक्यजीविताची तरी। शोकदुर्वातलहरी। आंदोळत असे॥ ३४८॥**
**एथ कोपोनि जरी वैकुंठें। ऐसें हन म्हणिपैल अवचटें। जें तुज लोकांचे काइ वाटे। तूं ध्यानसुख हें भोगी॥ ३४९॥**
**तरी जी लोकांचें कीर साधारण। वायां आड सूतसे वोडण। केवीं सहसा म्हणों प्राण। माझेचि कांपती॥ ३५०॥**
**ज्या मज संहाररूद्र वासिपे। ज्या मजभेणें मृत्यु लपे। तो मी अहाळबाहळीं कांपें। ऐसें तुवां केलें॥ ३५१॥**
**परि नवल बापा हे महामारी। इया नाम विश्वरूप जरी। हें भ्यासुरपणें हारी। भयासि आणी॥ ३५२॥**

**अर्थ**—अहो जी भगवंता! मन व डोळे यांनी जें तुझें अगाध विश्वरूप पाहिलें, तें डोळ्यांचे भाग्य उदयाला आलें व मनाने सुखाचा सुकाळ पाहिला॥ ३३८॥ हें तिन्ही लोकांना व्यापून असणारें तुझें विश्वरूप पाहतांना देवांनाहिं धाक उत्पन्न होतो आणि कोणालाहि तें सन्मुखच वाटतें॥ ३३९॥ याप्रमाणे हें तुझें विश्वरूप एकच पण विचित्र आणि भयानक अशा असंख्य मुखांनी, असंख्य नेत्रानी व शस्त्रयुक्त अनंत भुजांनी युक्त आहे॥ ३४०॥ या विश्वरूपाचे ठिकाणी असंख्य उर, बाहू व चरण असून बहु उदरें आणि नाना वर्ण आहेत आणि प्रत्येक मुखाचे ठिकाणी खाण्याच्या आवेशाचा माज कसा दिसून येतो, पहा!॥ ३४१॥ जणुं काय महाकल्पाच्या शेवटीं क्रुद्ध झालेल्या यमाने जिंकडे तिकडे प्रलयकालच्या अग्नीच्या होळ्याच पसरल्या आहेत॥ ३४२॥ किंवा ती सृष्टि संहार करणाऱ्या शंकराचीं शस्त्रास्त्रेंच. की प्रलयकालच्या भैरवाचीं शरीरेंच किंवा युगाचा अंत करणाऱ्या शक्तीचीं सोंगे भूतांचा नाश करण्याकरितां प्राप्त झाली॥ ३४३॥ त्याप्रमाणे जिकडे तिकडे तुझीं असलेलीं भयंकर मुखें मावत नाहीत आणि तसेंच त्यांतील दांत दरीतील क्रुद्ध सिंहाप्रमाणे रागीट दिसतात॥ ३४४॥ ज्याप्रमाणे प्रलयकाळाच्या गदड अंधाराचा आश्रय करून प्राण्यांचा नाश करणारी पिशाच्चें अत्यंत उल्हासाने वावरतात, त्याप्रमाणे तुमच्या मुखांतील दाढा, जणुं काय प्रलयकालीं संहार पावणाऱ्या प्राण्यांच्या रक्ताने माखलेल्या आहेत॥ ३४५॥ हे असो, काळानेच युद्धाला आमंत्रण दिल्याप्रमाणे किंवा सर्व प्राण्यांचा संहार करून मरणाने माजावें, त्याप्रमाणे तुझ्या या मुखांचा देखावा अत्यंत भयंकर दिसत आहे॥ ३४६॥ ही बिचारी सृष्टि, तूं सहज दृष्टीने पाहिलीस आणि ती दु:खरूपी यमुनानदीच्या तीरावरील कालियासर्पाच्या विषाने करपलेल्या वृक्षाप्रमाणे होऊन राहिली आहे॥ ३४७॥ तुझ्या या महामृत्यूच्या सागरांत, त्रैलोक्याच्या आयुष्याची नौका, दु:खरूपी वादळांतील लाटांनी हेलकावे खात आहे॥ ३४८॥ या माझ्या म्हणण्याचा राग येऊन, भगवंता! आपण, जर कदाचित असे म्हणाल की, तुला या लोकांचे काय उगीच वाईट वाटत आहे! तूं माझ्या विश्वरूप ध्यानाचें सुख भोग॥ ३४९॥ पण खरोखर देवा! भीतीने माझ्या जीवाचा थरकाप झाला आहे, असे मी एकदम कसें म्हणूं? म्हणूनच मी, व्यर्थ लोकांच्या दु:खांचे सामान्य निमित्त पुढें करीत आहे॥ ३५०॥ ज्या मला सृष्टीचा संहार करणारा रुद्र भितो, ज्या मला भिऊन मृत्युदेखील तोंड लपवितो. त्या मलाहि अत्यंत थरकांप सुटावा, असा विश्वरूप तूं झाला आहेस॥ ३५१॥ पण याला विश्वरूप हें जरी नांव आहे, तरी भगवंता! ही विलक्षण महामारी आहे. हें विश्वरूप, आपल्या भयंकर विक्राळ स्वरूपामुळे साक्षात् भयालाही हार खायला लावणारें आहे॥ ३५२॥

**नभ:स्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम्।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विन्दामि शमं च विष्णो॥ २४॥**

**अर्थ**—हे भगवंता! ज्यांनी आकाशाला स्पर्श केला आहे, ज्यांत प्रज्वलित अशीं अनेक वर्णयुक्त पसरलेलीं तोंडें आहेत, ज्यांत प्रज्वलित व विशाल नेत्र आहेत, अशा रूपाने युक्त असलेल्या तुला पाहून माझें अंत:करण अत्यंत दु:खित झाल्यामुळे त्याला धैर्य व सुख प्राप्त होत नाही॥ २४॥

**ठेलीं महाकाळेंसी हटेंतटें। तैसीं कितीएकें मुखें रागिटें। इहीं वाढोनियां धाकुटें। आकाश केलें॥ ३५३॥**
**गगनाचेनि वाडपणें नाकळे। त्रिभुवनींचियाही वारिया न वेंटाळे। ययाचेनि वाफा आगी जळे। कैसें धडाडीत असे॥ ३५४॥**
**तेवींचि एकासरिखें एक नोहे। एथ वर्णावर्णाचा भेदु आहे। हो कां जे प्रळयीं सावावो लाहे। वह्नी ययाचा॥ ३५५॥**

जयाचिये आंगींची दीप्ती येवढी। जे त्रैलोक्य कीजे राखोंडी। कीं तयाही तोंडें आणि तोंडीं। दांत दाढा॥ ३५६॥
कैसा वारया धनुर्वात चढला। समुद्र कीं महापूरीं पडिला। विषाग्नि मारा प्रवर्तला। वडवानळासी॥ ३५७॥
हळाहळ अग्नि पियालें। नवल मरण मारा प्रवर्तलें। तैसें संहारतेजा या जाहलें। वदन देखा॥ ३५८॥
परि कोणें मानें विशाळ। जैसें तुटिलिया अंतराळ। आकाशासि कव्हळ। पडोनि ठेलें॥ ३५९॥
नातरी काखें सूनि वसुंधरी। जैं हिरण्याक्षु रिगाला विवरीं। तैं उघडलें हाटकेश्वरीं। जेवीं पाताळकुहर॥ ३६०॥
तैसा वक्त्रांचा विकास। माजीं जिव्हांचा आगळाचि आवेशु। विश्व न पुरे म्हणोनि घांसु। न भरीचि कोडें॥ ३६१॥
आणि पाताळव्याळांचियां फूत्कारीं। गरळज्वाळा लागती अंबरीं। तैसी पसरलिये वदनदरी-। माजीं हे जिव्हा॥ ३६२॥
काढूनि प्रळयविजूंचीं जुंबाडें। जैसे पन्नासिले गगनाचे हुडे। तैसे आवाळुवांवरीं आंकडे। धगधगीत दाढांचे॥ ३६३॥
आणि ललाटपटाचिये खोळे। कैसे भयातें भेडविताती डोळे। हो कां जे महामृत्यूचे उमाळे। कडवसां राहिले॥ ३६४॥
ऐसें दाऊनि भयाचें भोज। एथ काय निपजवूं पाहतोसि काज। तें नेणें परी मज। मरणभय आलें॥ ३६५॥
देवा विश्वरूप पहावयाचे डोहळे। केले तियें पावलों प्रतिफळें। बापा देखिलासि आतां डोळे। निवावे तैसे निवाले॥ ३६६॥
अहो देहो पार्थिव कीर जाये। ययाची काकुळती कवणा आहे। परि आतां चैतन्य माझें विपायें। वाचें की न वांचे॥ ३६७॥
एऱ्हवीं भयास्तव आंग कांपे। नावेक आगळें तरि मन तापे। अथवा बुद्धीही वासिपे। अभिमानु विसरिजे॥ ३६८॥
परि येतुलियाही वेगळा। जो केवळ आनंदैककळा। तया अंतरात्मयाही निश्चळा। आली शियारी॥ ३६९॥
बाप साक्षात्काराचा वेधु। कैसा देशधडी केला बोधु। हा गुरुशिष्यसंबंधु। विपायें नांदे॥ ३७०॥
देवा तुझ्या ये दर्शनीं। जें वैकल्य उपजलें आहे अंत:करणीं। तें सांवरावयालागीं गंवसणी। धैर्याची करितसें॥ ३७१॥
तंव माझेनि नामें धैर्य हारपलें। कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन जाहलें। हें असो परि मज भलें आतुडविलें। उपदेशाइया॥ ३७२॥
जीव विसंवावयाचिया चाडा। सैंघ धांवाधांवी करितसे बापुडा। परि सोय ही कवणेकडा। न लभे एथ॥ ३७३॥
ऐसें विश्वरूपाचिया महामारी। जीवित्व गेलें आहे चराचरीं। जी न बोलें तरि काय करीं। कैसेनि राहें॥ ३७४॥

**अर्थ**—तुझीं कित्येक क्रुद्ध मुखें, जणुंकाय महाकाळाशीं पैज मारून आहेत, तशी रागीट आहेत, त्यांनी आपल्या विस्तृतपणाने आकाशालाहि लहान केलें आहे॥ ३५३॥ हीं अफाट वाढलेलीं मुखें एवढ्या विस्तीर्ण आकाशांतहि सामावत नाहीत. त्रिभुवनांत वाहणारा वारादेखील त्यांना वेटाळूं शकत नाही. त्यांच्या वाफेने अग्निदेखील जळूं शकेल, अशी प्रज्वलित आहेत॥ ३५४॥ त्याचप्रमाणे सर्व मुखें एकसारखीं नसून त्यांचे वर्णही भिन्न भिन्न आहेत, जणुं काय प्रलयकालीं अग्नीला यांचेंच साहाय्य मिळतें॥ ३५५॥ ज्यांच्या आंगचें तेज एवढें भयंकर आहे की, जें त्रैलोक्याची राखरांगोळी करील. त्यांतहि आणखी तोंडें असून, त्या तोंडात भयंकर दांत दाढा आहेत॥ ३५६॥ जणुं काय वाऱ्याला धनुर्वात झाला किंवा समुद्र महापुरांत पडला अथवा विषरूपी अग्नि, समुद्रांत असणाऱ्या वडवाग्नीला मिळून, मारण्याला प्रवृत्त झाला॥ ३५७॥ किंवा अग्नीने हलाहल विष प्राशन केलें किंवा स्वत: मरणच मारायला प्रवृत्त झालें. त्याप्रमाणे या सृष्टिचा संहार करणाऱ्या या अंगच्या तेजाला, तुझीं मुखें आणखी सहायभूत झालीं आहेत॥ ३५८॥ पण हीं तुझीं मुखें कशाप्रमाणे अशी विशाल पसरलेलीं आहेत, असें म्हणशील, तर ज्याप्रमाणे अंतराळ तुटून आकाशांत जणुं काय भगदाड पडलें आहे॥ ३५९॥ किंवा जेंव्हा हिरण्याक्ष राक्षस, पृथ्वी खाकेंत मारून पाताळांत जाण्याकरितां समुद्राच्या विवराने शिरला, तेव्हा, ज्याप्रमाणे पाताळांतील हाटकेश्वराने पाताळाचें विवर खुलें केलें॥ ३६०॥ त्याप्रमाणे तुझ्या मुखांचा विस्तार असून, त्यांत जिभांचा विलक्षण आवेश आहे. संपूर्ण विश्व एका घांसापुरतेंहि नाही. म्हणून तें तुं कौतुकाने तोंडात भरलें नाहीस॥ ३६१॥ आणि पाताळांतील विषारी सर्पाच्या फुत्काराने विषाच्या उठणाऱ्या ज्वाळा आकाशांत लागाव्या, त्याप्रमाणें पसरलेल्या तुझ्या प्रत्येक मुखरूपी दरीमध्ये ह्या एक एक जिव्हा आहेत॥ ३६२॥ प्रलयकालच्या बीजांचे गठ्ठे घेऊन आकाशाचे बुरुज शृंगारावेत, त्याप्रमाणे तोंडाच्या जबड्याच्या दोन्ही भागाला दाढांची आंकडे धगधगित आहेत॥ ३६३॥ कपाळभागांच्या खळगीत असणारे व भयालाहि भय उत्पन्न करणारे तुझे डोळे, महामृत्युचे उठावच आंधारांत लपून राहिलेले आहेत, अशा

प्रमाणे वाटतात॥ ३६४॥ ऐसी केवळ भीतीची मूर्ति धारण करून काय कार्यसिद्धि करू पाहतोस, हें मला कळत नाही; पण मला मात्र मरणाचें भय उत्पन्न झालें आहे ॥ ३६५ ॥ तेव्हा मला विश्वरूप पाहण्याची अत्यंत उत्कंठा लागली होती व त्याचें फळ मला मिळालें. बा भगवंता! तुझें विश्वरूप पाहून माझ्या डोळ्याचें जसें समाधान व्हायला पाहिजे तसें झालें ॥ ३६६ ॥ अहो देवा! हा पांचभौतिक देह जाईल याचा मला खेद वाटत नाही; परंतु माझें चैतन्यहि कदाचित् वांचेल की नाही, असें मला वाटतें॥ ३६७॥ खरोखरच भयाने माझें आंग कांपत आहे. मनहि घटकाभर शरीराहून सूक्ष्म असलें, तरी तेंहि व्याकुळ होत आहे किंवा बुद्धिहि भयभीत झाली असून, ती अभिमानाला विसरली आहे॥ ३६८ ॥ पण देह, मन, बुद्धि यांच्याहून निराळा, केवळ आनंदस्वरूप व निश्चळ असा जो अंतरात्मा, त्यालाहि तुझें हें विश्वरूप पाहून शिसारी आली आहे॥ ३६९ ॥ तुमच्या विश्वरूपाच्या साक्षात्काराच्या छंदाने कसा आत्मबोधहि देशोधडीस लागला आणि आतां हा गुरुशिष्यसंबंधदेखील क्वचितच टिकेल॥ ३७० ॥ देवा! या तुझ्या विश्वरूपदर्शनाने माझ्या मनांत जी कांही व्याकुळता उत्पन्न झाली, ती सांवरण्याकरितां मी धैर्याची खोळ करण्याचा प्रयत्न करीत आहे॥ ३७१ ॥ तेव्हा माझ्या 'अर्जुन' या नावाने धैर्य नाहीसें झालें; कारण विश्वरूपाचें दर्शन धैर्याच्या मर्यादेपेक्षाहि श्रेष्ठ झालें (म्हणजे मी अर्जुन धैर्यवान् खरा, पण विश्वरूपाच्या दर्शनाने जी भीति वाटली, ती भीति माझ्या धैर्य धरण्याच्या मर्यादापेक्षा फार भयकंर होती; म्हणून माझें धैर्य नाहीसें झालें, असा अर्थ) हे असो. पण तुम्ही मला या उपदेशाने-म्हणजे विश्वरूपदर्शनाने-बरें संकटांत टाकलें॥ ३७२ ॥ बापडा माझा जीव निर्धास्त होऊन विश्रांति मिळावी म्हणून सर्वत्र धांवाधांवी करीत आहे; पण या विश्वरूपांत तशी सोय कोठेहि प्राप्त होत नाही॥ ३७३ ॥ याप्रमाणे या विश्वरूपाच्या महामारींत सर्व स्थावरजंगम जीवांचें जीवित्व नाहीसें झालें आहे. देवा! हें बोलूं नये, पण काय करूं बोलण्यावांचून राहवत नाही. ॥ ३७४ ॥

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि।**
**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास॥ २५॥**

**अर्थ**—भयंकर दाढांनी प्रलयकालच्या अग्निसारखीं विक्राळ झालेलीं तुझीं मुखें पाहून मला दिशांचा देखील विसर पडला व समाधान कसें वाटत नाहीं. हे जगन्निवासा देवाधिदेवा! मजवर प्रसन्न हो॥ २५॥

**पैं अखंड डोळ्यांपुढें। फुटलें जैसें महाभयाचें भांडें। तैशीं तुझीं मुखें वितंडें। पसरलीं देखें॥ ३७५॥**
**असो दांतदाढांची दाटी। न झांकवे मा दोहों वोठीं। सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी। लागलिया जैशा॥ ३७६॥**
**जैसें तक्षका विष भरलें। हो कां जे काळरात्रीं भूत संचरलें। कीं अग्नेयास्त्र परजिलें। वज्राग्नि जैसें॥ ३७७॥**
**तैशी तुझीं वक्त्रें प्रचंडें। वरी आवेश हा बाहेरी वोसंडे। आले मरणरसाचे लोंढें। आम्हांवरी॥ ३७८॥**
**संहारसमयींचा चंडानिळु। आणि महाकल्पांत प्रळयानळु। या दोहीं जैं होय मेळु। तैं काय एक न जळे॥ ३७९॥**
**तैसीं संहारकें तुझीं मुखें। देखोनि धीरु कां आम्हां पारुखे। आतां भुललों मी दिशा न देखें। आपणपें नेणें॥ ३८०॥**
**मोटकें विश्वरूप डोळां देखिलें। आणि सुखाचें अवर्षण पडिलें। आतां जापाणीं जापाणीं आपुलें। अस्ताव्यस्त हें॥ ३८१॥**
**ऐसें करिसी म्हणोनि जरि जाणें। तरि हे गोष्टि सांगावी कां मी म्हणें। आतां एकवेळ वांचवी जी प्राणें। या स्वरूपप्रळयापासोनि॥ ३८२॥**
**जरि तूं गोसावी आमुचा अनंता। तरि सुई वोडण माझिया जीविता। सांटवीं पसारा हा मागुता। महामारीचा॥ ३८३॥**
**आइकें सकळ देवांचिया परदेवते। तुवां चैतन्यें गा विश्व वसतें। तें विसरलासी हें उपरते। संहारूं आदरिलें॥ ३८४॥**
**म्हणोनि वेगीं प्रसन्न होईं देवराया। संहरीं संहरीं आपुली माया। काढीं मातें महाभया-। पासोनियां॥ ३८५॥**
**हा ठायवरी पुढतपुढती। तूंतें म्हणिजे बहुधा काकुळती। ऐसा मी विश्वमूर्ती। भेडका जाहलों॥ ३८६॥**
**जैं अमरावतीये आला धाडा। तै म्यां एकलेनि केला उवेडा। जो मी काळाचियाही तोंडा। वासिपू न धरीं॥ ३८७॥**
**परि तया आंतुल नव्हे हें देवा। एथ मृत्यूसही करूनि चढावा। तुवां आमुचाचि घोटु भरावा। या सकळ विश्वेंसीं॥ ३८८॥**
**कैसा नव्हता प्रळयाचा वेळु। गोखा तूंचि मिनलासि काळु। बापुडा हा त्रिभुवनगोळु। अल्पायु जाहला॥ ३८९॥**
**अहा भाग्या विपरीता। विघ्न उठिलें शांति करितां। कटकटा विश्व गेलें आतां। तूं लागलासि ग्रासूं॥ ३९०॥**

**हें नव्हें मां रोकडें। सैंघ पसरूनियां तोंडे। कवळितासि चहूंकडे। सैन्यें इयें॥ ३९१॥**

**अर्थ**—महाभय साठविलेलें भांडे फुटल्याप्रमणे तुझीं विक्राळ मुखें मी अखंड डोळ्यासमोर पसरलेलीं पाहत आहे॥ ३७५॥ हें असो संपूर्ण प्रलयकालच्या शस्त्रांचे दाट कुंपण लागावें, त्याप्रमाणे तुझ्या मुखांतील दांतदाढांची असलेली दाटी दोन्ही ओठांनी झांकली जात नाही॥ ३७६॥ जणुं काय विषारी तक्षकाचे ठिकाणीं विष भरलें, प्रलयकालच्या रात्रीं भुतांचा संचार झाला किंवा प्रलयाग्नीने पुनः आग्नेयास्त्र हातांत घेतलें॥ ३७७॥ त्याप्रमाणे तुझीं हीं प्रचंड व भयंकर मुखें असून त्यांतहि पुनः त्यांचा आवेश बाहेर प्रगट होत आहे. असें वाटतें की त्यातून आम्हांवर मरणरूपी रसाचे लोंढे आले आहेत॥ ३७८॥ देवा! प्रलयकाळचा भयंकर वायु व महाकल्पाच्या वेळचा प्रलयाग्नि, हे दोन्ही मिळाले असतां काय जळणार नाही?॥ ३७९॥ त्याप्रमाणेच तुझीं सर्व ब्रह्मांडाचा संहार करणारीं मुखें पाहून, धैर्य आम्हांला स्पर्श करील काय? आतां मी भ्रमिष्ट व दिङ्मूढ झालों व मला माझेंहि भान राहिलें नाही॥ ३८०॥ तुझे विश्वरूप डोळ्याने पाहिलें मात्र, तोंच सुखाचा दुष्काळ पडला; म्हणून आपले हे अवाढव्य पसरलेलें विश्वरूप आतां आवरा, आवरा॥ ३८१॥ (हें आपले भयंकर विश्वरूप दाखवून आम्हांला) अशाप्रकारें अत्यंत भयभीत करशील असें जर मला माहित असतें, तर विश्वरूप दाखवा, असें मी कशाला म्हटले असतें? तरी आतां, देवा! एकवेळ प्राणदान देऊन, या माझ्या जीवाच्या होऊं पाहणाऱ्या स्वरूपप्रलयापासून-म्हणजे माझीं संपूर्ण स्थूळ सूक्ष्मतत्वें अव्यक्तांत मिळूं पाहत आहेत त्यापासून-प्राणाने मला वांचवा-म्हणजे माझे प्राण जिवंत ठेवा॥ ३८२॥ भगवंता! जर तूं आमचा स्वामी म्हणवितोस, तर माझ्या, जीवितावर आडपडदा घालून माझे संरक्षण कर व हा महामारीचा पसारा पुनः फिरून आपले ठिकाणीं सांठवून घे॥ ३८३॥ हे सर्व देवांच्याहि परम देवा! माझें म्हणणें ऐक. तूंच चैतन्यस्वरूपाने सर्व विश्वांत वास करतोस, हें तूं विसरलास आणि उलट सर्व विश्वाचा संहार करावयास उठलास॥ ३८४॥ म्हणून देवा! त्वरित प्रसन्न होऊन या आपल्या मायेचा, येथून उपसंहार कर व या महाभयपासून मला सोडव॥ ३८५॥ अशाप्रकारें वारंवार तुला अत्यंत ककुळती येऊन म्हणावें, इतका मी, विश्वरूपा भगवंता! अत्यंत भित्रा झालों आहे॥ ३८६॥ जेव्हा इंद्राच्या अमरावती राजधानीवर राक्षसांची धाड पडली, तेव्हा ज्या मी एकट्यानेच त्यांचा पराभव केला, कारण मी मृत्यूच्या तोंडाचेंहि भय बाळगित नाही॥ ३८७॥ पण देवा! हें तुझें विश्वरूप त्यापैकीं दिसत नाही. येथे मृत्युवरही ताण करून सर्व ब्रह्मांडासह आमचा घास घ्यावा, असे तूं केलें आहेस॥ ३८८॥ खरोखर हा सृष्टीच्या प्रलयाचा काल नसतांना मध्येंच कसा तूं काळ होऊन प्राप्त झालास? पहा! बिचारे हें संपूर्ण ब्रह्मांड अल्पायुषी झालें आहे॥ ३८९॥ आहारे माझ्या दुर्दैवा! विश्वरूपदर्शनाने सुख प्राप्ति व्हावी म्हणून प्रयत्न करीत असतां, हें विघ्न उत्पन्न झालें. हाय, हाय! तूं ग्रासू लागल्यामुळे आतां हें सर्व विश्व नाहीसें होणार!॥ ३९०॥ जिकडे तिकडे मुखें पसरून या दोन्ही सैन्याला चहूंकडून आपल्या तोंडांत टाकीत आहेस, हें स्पष्ट दिसत नाही काय?॥ ३९१॥

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः॥ २६॥**

**अर्थ**—दुर्योधनादिक धृतराष्ट्राचे पुत्र, भीष्माचार्य, द्रोणाचार्य, सूतपुत्र कर्ण हे आपल्याकडील मोठमोठ्या राजांच्या समुदायासह व आमच्याकडील मुख्य मुख्य योद्ध्यासह तुझ्या ठिकाणी प्राप्त होत आहेत॥ २६॥

**नोहेति हे कौरवकुळींचे वीर। आंधळिया धृतराष्ट्राचे कुमर। हे गेले गेले सहपरिवार। तुझियां वदनी॥ ३९२॥**
**आणि जे जे यांचेनि सावायें। आले देशोदेशींचे राये। तयांचें सांगावया जावों न लाहे। ऐसे सरकटितु आहासी॥ ३९३॥**
**मदमुखाचिया संघटा। घेत आहासि घटघटां। आरणीं हन थाटा। देतोसि मिठी॥ ३९४॥**
**जंत्रावरिचील मार। पदातींचे मोगर। मुखाआंत भार। हारपताति मा॥ ३९५॥**
**कृतांताचिया जावळी। जें एकचि विश्वातें गिळी। तियें कोटीवरील सगळीं। गिळीतासि शस्त्रें॥ ३९६॥**
**चतुरंगा परिवारा। संजोडियां रहंवरां। दांत न लाविसी मा परमेश्वरा। कैसा तुष्टलासि बरवा॥ ३९७॥**
**हां गा भीष्माऐसा कवणु। सत्यशौर्यनिपुणु। तोही आणि ब्राह्मण द्रोणु। ग्रासिलासि कटकटा॥ ३९८॥**

**अहा सहस्त्रकराचा कुमरु। एथ गेला गेला कर्णवीरु। आणि आमुचिया आघवयांचा केरु। फेडिला देखें॥ ३९९॥**
**कटकटा धातया। कैसें जाहले अनुग्रहा यया। मियां प्रार्थूनि जगा बापुडिया। आणिलें मरण॥ ४००॥**
**मागां थोडिया बहुवा उपपत्ती। येणें सांगितलिया विभूती। तैसा नसेचि मा पुढती। बैसलों पुसों॥ ४०१॥**
**म्हणोनि भोग्य तें त्रिशुद्धी न चुके। आणि बुद्धिही होणारासारिखी ठाके। माझां कपाळीं पिटावें लोकें। तें लोटेल काह्या॥ ४०२॥**
**पूर्वीं अमृतही हातां आलें। परि देव नसतीचि उगले। मग काळकूट उठविलें। शेवटीं जैसें॥ ४०३॥**
**परि तें एकबगीं थोडें। केलिया प्रतिकारामाजिवडें। आणि तियें अवसरींचें तें सांकडें। निस्तरविलें शंभू॥ ४०४॥**
**आतां हा जळता वारा कें वेंटाळे। कोणा हे विषा भरलें गगन गिळे। महाकाळेंसि कें खेळें। आंगवत असे॥ ४०५॥**
**ऐसा अर्जुन दुःखें शिणतु। शोचित असे जिवाआंतु। परि न देखे तो प्रस्तुतु। अभिप्राय देवाचा॥ ४०६॥**
**जे मी मारिता हे कौरव मरते। ऐसेनि वेंटाळिला होता मोहें बहुतें। तो फेडावयालागीं अनंतें। हें दाखविलें निज॥ ४०७॥**
**अरे कोण्ही कोणातें न मारी। एथ मीचि हो सर्व संहारीं। हें विश्वरूपव्याजें हरी। प्रकटित असे॥ ४०८॥**

**अर्थ**—हे कौरवकुळांतील वीर आणि आंधळ्या धृतराष्ट्राचे पुत्र नव्हते काय? हे सर्व आपल्या परिवारासह तुझ्या मुखांत शिरलेत॥ ३९२॥ आणि युद्धांत यांचें साहाय्य करण्याकरितां इतर देशींचे जे जे राजे आले आहेत, त्यांची मृत्युवार्ताहि सांगायला कोणी उरणार नाही. अशा रीतीने सरसकट सर्वांना गिळित आहेस॥ ३९३॥ मदोन्मत्त हत्तींच्या समुदायांना तोंडांत घटघट ओतीत आहेस व त्याचप्रमाणे युद्धांत थाटलेल्या संपूर्ण सैन्यरचनेला मिठी मारत आहेस॥ ३९४॥ तोफादिक यंत्रांचा मारा करणारे व पायदळांचे मुख्य यांच्या झुंडीच्या झुंडी तुझ्या मुखात गडप होत आहेत ना?॥ ३९५॥ एकच शस्त्र संपूर्ण विश्वाचा संहार करतें व म्हणून मृत्यूचें भावंड होय, अशी कोट्यावधि शस्त्रें तूं गिळित आहेस॥ ३९६॥ हत्ती, घोडे, रथ, पायदळ अशा चतुरंग सेनेचा संपूर्ण परिवार व घोडे जोडलेले रथ यांना, भगवंता! कसा प्रसन्न झाला आहेस पहा की, यांना तूं दांत न लागूं देतां गिळून टाकीत आहेस॥ ३९७॥ देवा! भीष्माचार्यासारखा सत्यवचनी व शौर्यात अत्यंत निपुण असा कोण आहे? पण अरेरे! त्याला व द्रोणाचार्यासारख्या ब्राह्मणालाहि ग्रासून टाकलेंस॥ ३९८॥ हाय! हाय! सूर्यपुत्र जो महायोद्धा कर्ण, तोहि तुझ्या मुखांत गेला आणि आमच्या सर्वांचा केरकचरा नाहीसा केलास, असें मी पाहत आहे॥ ३९९॥ अरेरे ब्रह्मदेवा! विश्वरूप दर्शनाचा अनुग्रह कसा फळला पहा! मी विश्वरूपदर्शनाकरितां भगवंताची प्रार्थना करून बिचाऱ्या जगावर मरणाचा प्रसंग आणला॥ ४००॥ पूर्वी थोड्याबहुत युक्तींने भगवंताने आपल्या विभूती सांगितल्या, त्या ऐकून तसाच मी राहिलों नाही आणि पुन: पुढे विश्वरूपदर्शनाविषयीं विचारूं लागलों॥ ४०१॥ म्हणून प्रारब्धभोग चुकत नाही म्हणतात, तें त्रिवार सत्य आहे आणि प्रारब्धानुसार जें होणार असेल त्याप्रमाणेच बुद्धि होते. लोकांनी माझ्या नांवाने रडावें, असें माझ्या कपाळीं होतें, तें चुकेल कसें?॥ ४०२॥ पूर्वी समुद्रमंथन करतां करितां अमृत हातीं लागलें; पण त्यांतच संतोष मानून देव मंथन सोडून उगे राहिले नाहीत, शेवटी हालाहल विष समुद्रांतून निघाले॥ ४०३॥ क्षीराब्धीने केलेल्या चौदा रत्नांच्या आविष्कारामध्यें काळकूटाचा आविष्कार एका परीने थोडा होता आणि त्यावेळचें संकट भगवान शंकरांनी निवारण केलें॥ ४०४॥ आतांचा हा पेटलेला वारा कसा आवरला जाणार? हे संपूर्ण विषाने भरलेलें आकाश कोण गिळणार? या महामृत्यूशीं खेळण्याचें सामर्थ्य कोण आंगीं वागवितो?॥ ४०५॥ याप्रमाणे अर्जुन, दु:खाने अत्यंत व्याकुळ होऊन, अंत:करणांत शोक करूं लागला; पण भगवंताच्या विश्वरूपदर्शनाचा प्रस्तुत हेतु काय आहे, हें तो जाणत नव्हता॥ ४०६॥ मी मारणार व कौरव माझ्याकडून मारले जाणारे, अशा थोर अविवेकाने तो ग्रासला गेला होता. तो अविवेक नाहीसा करण्याकरितां भगवंतांनी आपले हें विश्वरूप दाखविलें॥ ४०७॥ अरे! कोणी कोणाचा नाश करित नाही. एक मीच सर्वांचा नाश करणारा आहे, हेंच भगवंतांनी विश्वरूपाच्या मिषाने स्पष्ट दाखविलें॥ ४०८॥

**गूढार्थदीपिका**—जगांतील प्राण्यांच्या उत्पत्तिस्थितिसंहाराचा व्यापार, जीवांच्या कर्मानुसार एक परमेश्वरच करीत असतो; उत्पत्तिस्थितिलयाशीं संबंधित असलेले पदार्थ केवळ निमित्तमात्र असतात, असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे.

**परि वायांचि व्याकुळता। तें न चोजवेचि पांडुसुता। मग अहा कंपु नव्हता। वाढवित असे॥ ४०९॥**

**अर्थ**—पण अर्जुन हें न जाणतां दु:खाने व्याकुळ होऊन नसताच थरकांप वाढवित होता॥ ४०९॥

**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि।**
**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु सन्दृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः॥ २७॥**

**अर्थ**—विक्राळ दाढांनी भयंकर दिसत असलेल्या तुझ्या मुखांत ते मोठ्या त्वरेने शिरत आहेत. त्यांतील कांही, चूर्ण झालेल्या मस्तकांनी दातांच्या फटींत अडकून राहिलेले दिसतात.॥ २७॥

**तेथ म्हणे पाहा हो एके वेळे। सासिकवचेंसि दोन्ही दळें। वदनीं गेलीं आभाळें। गगनीं कां जैसीं॥ ४१०॥**
**कां महाकल्पाचां शेवटीं। जैं कृतांतु कोपला होय सृष्टी। तैं एकविसांही स्वर्गा मिठी। पाताळासकट दे॥ ४११॥**
**नातरी उदासीनें दैवें। संचकाचीं वैभवें। जेथींची तेथ स्वभावें। विल्या जाती॥ ४१२॥**
**तैसीं ससिन्नलीं सैन्यें एकवटें। इयें मुखीं जाहलीं प्रविष्टें। परि एकही तोंडौनि न सुटे। कैसें कर्म देखा॥ ४१३॥**
**अशोकाचे अंगवसे। चघळिले कन्हेनि जैसें। लोक वक्त्रामाजीं तैसें। वायां गेले॥ ४१४॥**
**परि सिसाळें मुकुटेंसीं। पडिलीं दाढांचे सांडसीं। पीठ होत कैसीं। दिसत आहाती॥ ४१५॥**
**तियें रत्ने दातांचिये सवडी। कूट लागलें जिभेच्या बुडीं॥ कांहीं कांही आगरडीं। दंष्ट्रांचीं माखलीं॥ ४१६॥**
**हो कां जे विश्वरूपें काळें। ग्रासिलीं लोकांचीं शरीरें बळें। परि जीवदेहींचीं सिसाळें। अवश्य कीं राखिलीं॥ ४१७॥**
**तैसीं शरीरामाजीं चोखडीं। इये उत्तमांगें होती फुडीं। म्हणोनि महाकाळाचियांहि तोंडीं। परि उरली शेखीं॥ ४१८॥**
**मग म्हणे हें काई। जन्मलयां आन मोहरचि नाहीं। जग आपैसेचि वदनडोहीं। संचरताहे मा॥ ४१९॥**
**यया आपेआप आघविया सृष्टी। लागलिया आहाति वदनाचिया वाटीं। आणि हा जेथिंचिया तेथ मिठी। देतसे उगला॥ ४२०॥**
**ब्रह्मादिक समस्त। उंचा मुखामाजीं धांवत। येर सामान्य हे भरत। ऐलीच वदनीं॥ ४२१॥**
**आणीकही भूतजात। जें उपजलेचि ठायीं ग्रासित। परि याचिया मुखा निभ्रांत। न सुटेचि कांहीं॥ ४२२॥**

**अर्थ**—त्या वेळेला अर्जुन पुन: म्हणाला, अहो देवा! पहा! आकाशांत जसे मेघ नाहीसे होतात, त्याप्रमाणे आंगावरील चिलखतें व हातांतील तलवारीसह दोन्ही कडील सैन्यें, एकाच वेळीं तोंडांत गेली आहेत॥ ४१०॥ किंवा महाकल्पाच्या शेवटीं संपूर्ण सृष्टीचा नाश करण्याकरितां जेव्हा कृतान्त सर्व सृष्टीवर क्रुद्ध होतो, तेव्हा तो पाताळासकट एकवींस स्वर्गांना ग्रासून टाकतो॥ ४११॥ अथवा दैव प्रतिकूल झालें असतां, धनसंचय करणाऱ्याची संपत्ति, जशी जागच्या जागीं नाहीशी होते॥ ४१२॥ त्याप्रमाणे युद्धाला सज्ज झालेलीं हीं दोन्ही सैन्यें, तुझ्या मुखांत एकत्र शिरलीं आहेत. त्यापैकीं, तुझ्या मुखांतून एकहि सुटत नाही. कसें त्यांचें कर्म आहे, पहा!॥ ४१३॥ ऊंटाने अशोकवृक्षाचे डाखळे जसे चघळावें, त्याप्रमाणे सर्व लोक तुझ्या तोंडांत व्यर्थ गेले आहेत॥ ४१४॥ राजांची मुकुटासहित शिरें दाढांच्या सांडशीत सांपडून त्यांचें कसे पीठ होतांना दिसत आहे.॥ ४१५॥ मुकुटांतील रत्नें दातांच्या संधींत असून, मस्तकांचें चूर्ण जिभेच्या बुडाशीं लागलें आहे व कांहीं कांही दाढांचीं टोकेंही माखलीं आहेत॥ ४१६॥ हो! एक गोष्ट मात्र दिसते की, या विश्वरूपी काळाने लोकांचीं शरीरें व बळें ग्रासून टाकली; पण त्या जीवांच्या शरीरांचीं मस्तकें मात्र, न गिळतां तशींच ठेवलीं॥ ४१७॥ हीं सुंदर मस्तकें म्हणजे शरीरांतील खरोखर उत्तम अंगें असल्यामुळे, ती महाकाळाच्याही तोंडांत शेवटीं उरली आहेत॥ ४१८॥ पुढे अर्जुन म्हणतो, अरें! हें काय आश्चर्य! जन्माला आलेल्या प्राण्यांला दुसरी गतिच दिसत नाही. सर्व जगत् आपण होऊन विश्वरूपाच्या मुखरूपी डोहांत शिरत आहे ना!॥ ४१९॥ ह्या संपूर्ण सृष्टी सहजगत्या विश्वरूपाच्या मुखांत जाण्याच्या मार्गास लागल्या आहेत आणि हा विश्वरूप भगवान जागच्या जागींच स्वस्थ त्यांना गिळीत आहे॥ ४२०॥ हे सर्व ब्रह्मादिकदेव वर असलेल्या मुखामध्यें वेगाने शिरत असून, बाकीचे सर्व सामान्य लोक हे अलीकडील मुखांतच भरले जात आहेत॥ ४२१॥ आणि कित्येक प्राणिजात उत्पन्न झाल्याबरोबर ग्रासले जात आहेत; पण याच्या मुखांतून निश्चित् कांही एक सुटत नाही॥ ४२२॥

**गूढार्थदीपिका**—येथे प्राण्यांच्या तीन गती दाखविल्या आहेत. ब्रह्मादिक देवांना उंचलोक म्हणजे

सत्यलोकप्राप्ति होते. सामान्य म्हणजे भगवत्प्रीत्यर्थ निष्कामचित्ताने विहित कर्माचें अनुष्ठान न करतां स्वर्गादि लोकांच्या प्राप्तिकरितां कर्म करणारे जे पुरुष असतात, त्यांना चंद्रलोकप्राप्ति होऊन, ते तेथें सुख भोगून परत संसारांत येतात व अत्यंत पातकी लोक, सुखभोगाकरितां कोणत्याहि लोकांत न जातां ''जायस्व म्रियस्व'' (छं. उ. ५-१०-७) या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे जन्मानंतर मरण व मरणानंतर जन्म असे केवळ दु:खच भोगत असतात.

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभि विज्वलन्ति॥ २८॥**
**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः।**
**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः॥ २९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे नद्यांचे अनेक प्रवाह समुद्राला सन्मुख करून वाहतात, त्याप्रमाणे मनुष्यलोकांतील वीर, हे आपला नाश करून घेण्याकरितां सर्व बाजूंनी पेटलेल्या तुझ्या मुखामध्यें प्रवेश करीत आहेत॥ २८॥ ज्याप्रमाणे पतंग, नाश करून घेण्याकरितां अत्यंत वेगाने प्रदीप्त अग्नीत शिरतात, त्याचप्रमाणे हे संपूर्ण लोक, अत्यंत वेगाने नाश करून घेण्याकरितां तुझ्या मुखांत शिरत आहेत॥ २९॥

**जैसे महानदीचे वोघ। वहिले ठाकिती समुद्राचे आंग। तैसें आघवांचिकडूनि जग। प्रवेशत मुखी॥ ४२३॥**
**आयुष्यपंथें प्राणिगणीं। करोनि अहोरात्रांची सोवाणीं। वेगें वक्त्र मिळणीं। साधिजत आहाती॥ ४२४॥**
**जळतया गिरीच्या गवखा-।माजीं घापती पतंगाचिया झाका।तैसे समग्र लोक देखा।इये वदनीं पडती॥ ४२५॥**
**परि जेतुलें येथ प्रवेशलें। तें तातलिया लोहें पाणीचि पां गिळिलें। वहिवाटींहि पुसिलें। नामरूप तयांचें॥ ४२६॥**

**अर्थ**—जसे महानदीचे प्रवाह मोठ्या वेगाने समुद्रांत येऊन मिळतात, तशी सर्व बाजूनी ही सृष्टि तुझ्या मुखांत प्रविष्ट होत आहे॥ ४२३॥ सर्व प्राणिसमुदाय, आपल्या आयुष्यरूपी मार्गाने दिवस आणि रात्र यांच्या पायऱ्या करून अत्यंत त्वरेने तुझ्या मुखांत पडण्याचे साधित आहेत॥ ४२४॥ पेटलेल्या पर्वताच्या दरीत ज्याप्रमाणे पतंगाच्या झुंडीच्या झुंडी जाऊन पडतात, त्याप्रमाणे हे सर्व लोक तुझ्या मुखांत पडत आहेत॥ ४२५॥ पण तुझ्या मुखांत जेवढे कांही गेले, तेवढे सर्व तापलेल्या लोखंडावर टाकलेल्या पाण्याप्रमाणे गिळले गेले त्यांचे वहिवाटीपुरतें देखील नामरूप राहिलें नाही॥ ४२६॥

**लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो॥ ३०॥**

**अर्थ**—हे विष्णो! आपल्या पेटलेल्या मुखांनी, सर्व लोकांना, सर्व बाजूंनी तूं गिळित आहेस आणि जिभांनी त्यांची रुचि घेत आहेस. संपूर्ण जगाला आपल्या तेजाने तूं व्यापिलें असून तुझें तें अत्यंत उग्र तेज संपूर्ण जगाला संतप्त करीत आहे॥ ३०॥

**आणि येतुलियाही आरोगण। करितां भुके नाहीं उणेपण। कैसें दीपन असाधारण। उदयलें यया॥ ४२७॥**
**जैसा रोगिया ज्वराहूनि उठिला।कां भणगा दुष्काळु पाहला।तैसा जिभांचा लळलळाटु देखिला।आवाळुवें चाटितां॥ ४२८॥**
**तैसें आहाराचेन नावें कांहीं। तोंडापासूनि उरलेंचि नाहीं। कैसी समसमित नवाई। भुकेलेपणाची॥ ४२९॥**
**काय सागराचा घोंटु भरावा। कीं पर्वताचा घांसु करावा। ब्रह्मकटाहो घालावा। आघवाचि दाढे॥ ४३०॥**
**दिशा सगळियाचि गिळावियां। चांदणिया चाटूनि घ्यावियां। ऐसें वर्तत आहे साविया। लोलुप्य बा तुझें॥ ४३१॥**
**जैसा भोगीं कामु वाढे। कां इंधनें आगीसि हकाक चढे। तैसीं खातखातांचि तोंडें। खाखातें ठेलीं॥ ४३२॥**
**कैसें एकचि केवढें पसरलें। त्रिभुवन जिव्हाग्रीं आहे टेंकलें। जैसें कां कवींठ घातलें। वडवानळीं॥ ४३३॥**
**ऐसीं अपारें वदनें। आतां येतुलीं कैंचीं त्रिभुवनें। कां आहारु न मिळतां येणें मानें। वाढविलीं असह्या॥ ४३४॥**
**अगा हा लोकु बापुडा। जाहला वदनज्वाळां वरपडा। जैसीं वणवेयाचिया वेढां। सांपडती मृगें॥ ४३५॥**
**आतां तैसें या विश्वा जाहालें। देवा नव्हे हें कर्म आलें। की जगजळचरां पांगिलें। जाळे काळेंत॥ ४३६॥**

**आतां इये अंगप्रभेचिये वागुरे। कोणीकडूनि निगिजैल चराचरें। वक्त्रें नव्हतीं जोहरें। वोडवलीं जगा॥ ४३७॥**
**आगी आपुलेनि दाहकपणें। कैसेनि पोळिजे तें नेणें। परि जया लागे तया प्राणें। सुटिका नाहीं॥ ४३८॥**
**नातरी माझेनि तिखटपणें। कैसें निवटे हें शस्त्र कायि जाणें। कां आपुलियां मारा नेणें। विष जैसें॥ ४३९॥**
**तैसी तुज काहीं। आपुलिया उग्रपणाची सेचि नाहीं। परि ऐलीकडिले मुखीं खाई। हों सरली जगाची॥ ४४०॥**
**अगा आत्मा तूं एकु। सकळ विश्वव्यापकु। तरि कां आम्हां अंतकु। वोडवलासी॥ ४४१॥**
**तरि मियां सांडिली जीवित्वाची चाड। आणि तुवांही न धरावी भीड। मनीं आहे तें उघड। बोल पां सुखें॥ ४४२॥**
**किती वाढविसी या उग्ररूपा। अंगींचें भगवंतपण आठवीं बापा। नाहीं तरि कृपा। मजपुरती पाहीं॥ ४४३॥**

**अर्थ**—आणि इतकेंहि भक्षण करून याची भूक यत्किंचितहि शांत झाली नाही. कसा याचा जठराग्नि अत्यंत प्रदीप्त झाला आहे!॥ ४२७॥ ज्याप्रमाणे ज्वरांतून उठलेला रोगी किंवा दुष्काळांत सांपडलेला भिकारी खायखाय करतो, त्याप्रमाणे ओठ चाटतांना जिभांची अत्यंत वळवळ दिसत अहे॥ ४२८॥ तसेच तुझ्या खाण्याचा नव्हे असा कोणताच पदार्थ तुझ्या तोंडापासून सुटला नाही. अत्यंत खरमरीत भुकेचे नवल कसें आहे!॥ ४२९॥ संपूर्ण समुद्राचा घोट घ्यावा की सगळ्या पर्वताचा एकच घांस करावा अथवा हें सर्व ब्रह्मांड असेच्या असेंच दाढेखालीं घालावें॥ ४३०॥ सगळ्या दिशा गिळून टाकाव्या कीं चांदण्या चाटून घ्याव्या, अशा प्रकारचा खरोखर तुझा हांवरेपणा दिसत आहे॥ ४३१॥ ज्याप्रमाणे भोगाने भोगवासना वाढत जाते किंवा लांकडें घातल्याने अग्नि भडकतो, त्याप्रमाणे ही सर्व तुझीं मुखें खातांखातांच खाखावलेलीं आहेत॥ ४३२॥ तुझें एकच मुख कसें विस्तीर्ण पसरलें आहे, पहा! ज्याप्रमाणे वडवाग्निमध्यें कवठ घालावें, त्याप्रमाणे हें संपूर्ण त्रिभुवन तुझ्या नुसत्या जिभेच्या टोंकाला लागलें आहे॥ ४३३॥ अशीं हीं असंख्य मुखें आहेत. आतां तितकीं त्रिभुवनें कोठलीं आणणार? पुरेसा आहार मिळत नसतांना ज्यांचा ताप असह्य होतो, अशीं मुखें कां असंख्य वाढविलींस?॥ ४३४॥ देवा! ज्याप्रमाणे वणव्याचा वेढा पडून, त्यांत जनावरें सांपडतात, त्याप्रमाणे तुझ्या मुखांतील पेटलेल्या ज्वालांना हें बिचारें ब्रह्मांड बळी पडलें आहे॥ ४३५॥ आतां तसेंच या विश्वाला झालें. हें विश्वरूप म्हणजे देव नव्हे, हें लोकांचें दुर्दैव आहे किंवा जगरूपी जलचरांना पकडण्याकरितां काळाने आपलें जाळेंच पसरलें आहे॥ ४३६॥ आतां या अंगकांतिरूप पाशांतून, हें चराचर प्राणी कोणीकडून बाहेर पडतील? हीं तुझीं मुखें नसून, हीं जगाला लाक्षागृहें झालीं आहे॥ ४३७॥ अग्नीला आपल्या दाहकशक्तीने दुसऱ्याला मी कसें जाळतों, हें समजत नाही; पण ज्याला अग्नि लागतो, तो मात्र जिवंत राहत नाही॥ ४३८॥ किंवा माझ्या तीक्ष्णपणाने पदार्थ कसा कापला जातो, हें शस्त्राला माहित नसतें. किंवा माझ्याने मनुष्य कसा मरतो, हे विषाला ज्याप्रमाणे कळत नाही॥ ४३९॥ त्याप्रमाणे तुझें हें विश्वरूप कसें अत्यंत उग्र व भयंकर आहे याची तुला जाणीव नाही; पण अलीकडील मुखरूपी खाईंत संपूर्ण जगच नाहीसें झालें॥ ४४०॥ अहो देवा! तूं सर्व ब्रह्मांडाचा एक अंतरात्मा असून सर्व जगतांत भरला आहेस, मग आम्हांला कां असा प्राण घेणारा मृत्यु झालास?॥ ४४१॥ तरी मी जिवंत राहण्याची आशा सोडली आहे. आणखी तूंहि कांहीं संकोच करूं नकोस. तुझ्या मनांत जें कांही असेल तें स्पष्ट खुशाल सांग॥ ४४२॥ आतां या आपल्या रूपाचा भयंकरपणा किती वाढवितोस? तुझ्या स्वत:चे आंगीं असलेल्या भगवंतपणाचें स्मरण ठेव. नाही तर माझ्यापुरती तरी कृपा कर॥ ४४३॥

**गूढार्थदीपिका—अंगींचें भगवंतपण आठवीं बापा**—यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य असे हे लोकांना एक सुखच देणारे, सहा श्रेष्ठ गुण भगवंताचें ठिकाणीं नित्य असतात; म्हणून त्याला भगवान म्हणतात. यांत संहार करण्याचा गुण नाही याची भगवंताला आठवण करून देण्याकरितां अर्जुनाने येथें ''आंगीचें भगवंतपण आठवी बापा'' असें म्हटलें आहे.

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्॥ ३१॥**

**अर्थ**—हे देवाधिदेवा! तुला नमस्कार असो. माझ्यावर कृपा कर! असें उग्र रूप धारण करणारा तूं कोण

आहेस, हें मला सांग. आपण जगाच्या पूर्वी असणारे-म्हणजे जगाचें आदिकारण-आहां, त्या तुम्हांला मी जाणण्याची इच्छा करतों; कारण तूं एवढें भयंकर विश्वरूप धारण करून काय करणार आहेस हें मला समजत नाही॥ ३१॥

**तरि एक वेळ वेदवेद्या। त्रिभुवनाचिया आद्या। विनवणी विश्ववंद्या। आइकें माझी॥ ४४४॥**
**ऐसें बोलोनि वीरें। चरण नमस्कारिले शिरें। मग म्हणे तरी सर्वेश्वरें। अवधारिजो॥ ४४५॥**
**मियां होआवया समाधान। पुसिलें विश्वरूपध्यान। आणि एकें काळें त्रिभुवन। गिळितुचि उठिलासी॥ ४४६॥**
**तरि तूं कोण कां येतुलीं। इयें भ्यासुरें मुखें कां मेळविलीं। अवधियाचि करीं परजिलीं। शस्त्रें काह्या॥ ४४७॥**
**जी जंव तंव रागीटपणें। वाढोनि गगना आणितोसि उणें। कां डोळे करूनि भिंगुळवाणे। भेडसावीत आहासी॥ ४४८॥**
**एथ कृतांतेंसीं देवा। कासया किजतसे हेवा। आपुला तुवां सांगावा। अभिप्राय मज॥ ४४९॥**
**या बोला म्हणे अनंतु। मी कोण हें आहासी पुसतु। आणि कायिसयालागीं असें वाढतु। उग्रतेसीं॥ ४५०॥**

**अर्थ**—वेदानेच जाणला जाणाऱ्या, त्रैलोक्याच्या मूळ कारणा व त्रैलोक्याला पूज्य अशा भगवंता! एक वेळ माझी प्रार्थना ऐक॥ ४४४॥ असें बोलून, त्या श्रेष्ठ अर्जुनाने भगवंताच्या पायांवर मस्तक ठेवलें व म्हणाला, हे सर्वेश्वरा! ऐंक॥ ४४५॥ माझें समाधान व्हावें म्हणून मी तुला विश्वरूप दाखविण्याची प्रार्थना केली आणि तूं तात्काळ संपूर्ण ब्रह्मांड गिळितच प्रगट झालास॥ ४४६॥ तरी तूं कोण आहेस? अशीं एवढीं मुखें कशाकरिता घेतलीस? व संपूर्ण हातामध्यें परजलेली शस्त्रे कशाला धारण केलीस?॥ ४४७॥ आणि देवा! जेव्हा तेव्हा क्रुद्धपणाने वाढून आकाशाला कां मागें टाकतोस आणि अत्यंत लाल डोळे वटारून आम्हांला कां भीति दाखवितोस?॥ ४४८॥ देवा! या ठिकाणी महामृत्यूशीं तूं कशाला स्पर्धा करीत आहेस? असें करण्यांत तुझ्या मनांतील हेतु काय आहे, तो मला सांग॥ ४४९॥ हें अर्जुनाचें म्हणणें ऐकून, भगवान म्हणतांत, मी कोण आहे व आपलें एवढें उग्र स्वरूप कां वाढवित आहे, हेच तूं विचारित आहेस॥ ४५०॥

*श्रीभगवानुवाच*

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः॥ ३२॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, मी सर्व सृष्टीचा संहार करणारा काळ असून, अत्यंत वाढून लोकांचा संहार करण्याकरितां यावेळीं प्रवृत्त झालों आहे. तुम्हांला सोडून शत्रूच्या सैन्यांत जे थोर थोर योद्धे दिसत आहेत, ते सर्व नाहीसे होणार आहेत.॥ ३२॥

**तरि मी काळु गा हें फुडें। लोक संहारावयालागीं वाढे। सैंघ पसरिलीं आहाती तोंडें। आतां ग्रासीन हें आघवे॥ ४५१॥**
**तेथ अर्जुन म्हणे कटकटां। उबगिलों मागिल्या संकटा। म्हणोनि आळविला तंव वोखटा। उवाइला हा॥ ४५२॥**
**तेवींचि कठीण बोलें आसतुटी। अर्जुन होईल हिंपुटी। म्हणोनि सवेंचि म्हणे किरीटी। परि आन एक असे॥ ४५३॥**
**तरि आतांचि ये संहारवाहरे। तुम्ही पांडव असा बाहिरे। तेथ जातजातां धनुर्धरें। सांवरिले प्राण॥ ४५४॥**
**होता मरणमहामारीं गेला। तो मागुता सावधु जाहला। मग लागला बोला। चित्त देऊं॥ ४५५॥**
**ऐसें म्हणिजत आहे देवें। अर्जुना तुम्ही माझें हें जाणावें। येर जाण मी आघवें। सरलों ग्रासूं॥ ४५६॥**
**वज्रानळीं प्रचंडीं। जैसी घापे लोणियाची उंडी। तैसें जग हें माझिया तोंडी। तुवां देखिलें जें॥ ४५७॥**
**तरि तयामाझारीं कांहीं। भरंवसेनि उणें नाहीं। इयें वायांचि सैन्यें पाहीं। वल्गिजत आहाती॥ ४५८॥**
**हे जे मिळोनियां मेळे। कुंथती वीरवृत्तीचेनि बळें। यमावरी गजदळें। वाखाणिजताती॥ ४५९॥**
**म्हणती सृष्टीवरी सृष्टी करूं। आण वाहूनि मृत्यूतें मारूं। जगाचा भरूं। घोंटु यया॥ ४६०॥**
**पृथ्वी सगळीचि गिळूं। आकाश वरिचियांवरि जाळूं। काय बाणवरी खिळूं। वारयातें॥ ४६१॥**
**ऐशा चतुरंगाचिया संपदा। करित महाकाळेंसीं स्पर्धा। वांटिवेचिया मदा। वळंघले जें॥ ४६२॥**
**बोल हतियेराहूनि तिखट। दिसती अग्निपरिस दासट। मारकपणें काळकूट। महुर म्हणत॥ ४६३॥**

**तरि हे गंधर्वनगरींचें उमाळे। जाण पोकळीचे पेंडवळे। अगा चित्रींचे पुतळे। वीर हे देखें॥ ४६४॥**
**हा गा मृगजळाचा पूर आला। दळ नव्हे कापडाचा साप केला। इया शृंगारूनियां खाला। मांडिलिया पैं॥ ४६५॥**
**येर चेष्टवितें जें बळ। तें मागांचि मियां ग्रासिलें सकळ। आतां कोल्हेरिचे वेताळ। तैसे निर्जीव हे आहाती॥ ४६६॥**
**हालविती दोरी तुटली। तरि तियें खांबावरील बाहुलीं। भलतेणें लोटिलीं। उलथोनि पडती॥ ४६७॥**

**अर्थ**—तर अर्जुना! मी (खरोखर काळ) आहे, हें स्पष्ट जाण. सर्व लोकांचा संहार करण्याकरितां मी वाढत आहे. हीं जिकडे तिकडे सर्वत्र माझीं उग्र मुखे पसरलीं असून, या सर्व विश्वाला आतां मी गिळून टाकीन॥ ४५१॥ तेव्हा अर्जुन म्हणतो, अरेरे! अगोदर विश्वरूपाच्या मुखांत होत असलेल्या सर्व लोकांच्या संहाराच्या संकटाला पाहून मी त्रस्त झालों होतों; म्हणून भगवंताची प्रार्थना केली, तों तो अधिकच निष्ठुरपणाने प्रगट झाला॥ ४५२॥ तसेच जीवाची आशा नाहीशी करणाऱ्या निष्ठुर बोलण्याने अर्जुन अत्यंत कष्टी होईल, म्हणून भगवान लगेच म्हणाले, अर्जुना! पण त्यांत दुसरें एक आहे॥ ४५३॥ तुम्ही पांडव मात्र आतां होणाऱ्या या संहाररूपी बाधेच्या बाहेर आहांत. हें ऐकतांच अर्जुनाने जात असलेले प्राण सांवरले॥ ४५४॥ अर्जुन मरणाच्या महामारींत सांपडला होता; पण भगवंताच्या आश्वासनाने पुन: देहावर आला आणि मग भगवंताच्या बोलण्याकडे चित्त देऊं लागला॥ ४५५॥ देव असें म्हणू लागले की, अर्जुना! तुम्ही माझे आहांत, हें लक्षांत असू दे. बाकीच्या सर्वांना ग्रासण्याकरितां मी प्रवृत्त झालों आहे॥ ४५६॥ प्रलयकालच्या प्रचंड अग्निमध्ये, ज्याप्रमाणे लोण्याचा गोळा घालावा, त्याप्रमाणे हें संपूर्ण जग, माझ्या तोंडांत जात आहे, हें जें तू पाहिलेंस॥ ४५७॥ त्यांत तर यत्किंचितहि अन्यथा होणार नाही. दोन्हीकडील सैन्यें व्यर्थच आपल्या पराक्रमाची फुशारकी मारत आहेत॥ ४५८॥ असे हे सैन्याचे मिळालेले समुदाय, पराक्रमाचें बळ आणून कुंथूं लागले आहेत आणि यमापेक्षाहि आमचें गजदळ श्रेष्ठ आहे अशी त्यांची प्रशंसा करतात॥ ४५९॥ हे म्हणतात की, या सृष्टीवर दुसरी सृष्टि निर्माण करूं. पैज बांधून मृत्यूला मारूं आणि या सर्व जगाचा घोंट भरूं॥ ४६०॥ सर्व पृथ्वी गिळूं. वरच्या वरच आकाश जाळूं. वाऱ्याला देखील बाणाने जखडून टाकूं॥ ४६१॥ पराक्रमाच्या मदाने मत्त होऊन अशा या चतुरंग सैन्यसंपत्तीच्या बळावर ते कृतान्ताशीं स्पर्धा करीत आहेत॥ ४६२॥ यांचे हे सर्व शब्द शस्त्रांपेक्षां तीक्ष्ण आणि अग्निपेक्षा दाहक दिसतात आणि प्राण घेण्यांत त्यांच्यापेक्षा काळकूटहि मधुरच म्हणावें लागेल॥ ४६३॥ परंतु अर्जुना! हे सर्व योद्धे गंधर्वनगरीचे देखावे किंवा पोकळीचे भेंडोळे अथवा चित्रांतील पुतळे आहेत, पहा!॥ ४६४॥ अरे! हीं सर्व सैन्यें म्हणजे मृगजळाचा पूर होय, हीं सैन्यें नसून कापडाचा साप आहे किंवा कातड्यांत भुसा भरून तयार केलेल्या व शृंगारलेल्या ह्या बाहुल्या मांडल्या आहेत॥ ४६५॥ बाकी हालचाल करविणारें जें बळ मी पहिलेच गिळून टाकलें आहे. आतां हे सर्व सैन्य कुंभाराने केलेल्या मातीच्या वेताळाप्रमाणे निर्जीव आहे॥ ४६६॥ बाहुलीला नाचविणारी दोरी तुटली तर, खांबावरील बाहुल्या वाटेल त्याने लोटल्या की उलथून खालीं पडतात॥ ४६७॥

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम्।**
**मयैवैते निहता: पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्॥ ३३॥**

**अर्थ**—म्हणून तूं उठ. (शस्त्र घे.) यश संपादन कर. शत्रूंना जिंकून या संपन्न राज्याचा उपभोग घे. यांना मी पूर्वीच मारलें आहे. अर्जुना! तूं आतां निमित्तमात्र हो॥ ३३॥

**तैसा सैन्याचा यया बगा। मोडतां वेळु नलगे पैं गा। म्हणोनि उठीं उठीं वेगां। शाहाणा होईं॥ ४६८॥**
**तुवां गोग्रहणाचेनि अवसरें। घातलें मोहनास्त्र एकसरें। मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें। आसडूनि नागविलें॥ ४६९॥**
**आतां हें त्याहूनि निपटारें जाहालें। निवटीं आयितें रण पडिलें। घेईं यश रिपु जिंतिले। एकलेनि अर्जुनें॥ ४७०॥**
**आणि कोरडें यशचि नोहे। समग्र राज्यही आलें आहे। तूं निमित्तमात्रचि होये। सव्यसाची॥ ४७१॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे सैन्याची ही रचना मोडण्याला, अर्जुना! वेळ लागणार नाही; म्हणून एकदम उठ, शहाणा हो॥ ४६८॥ गोग्रहणाचे वेळीं तूं संपूर्ण शत्रूसैन्यावर मोहनास्त्र घातलेंस व मग विराटराजाच्या अति भित्र्या उत्तराने

सैन्याचीं वस्त्रें हिसकावून त्यांना नग्न केलें॥ ४६९ ॥ आतां हें सैन्य त्याच्याहूनहि निकृष्ट दर्जाचें झालें आहे. आधींच मरून पडलेलें सैन्य नाहीसें कर व एकट्या अर्जुनाने शत्रूला जिंकलें असें यश घे॥ ४७० ॥ नुसतें यशच नाही तर, संपूर्ण राज्यहि तुला प्राप्त झालें आहे. अर्जुना! यांच्या नाशाला तूं नुसता निमित्तमात्रच होणार आहेस॥ ४७१ ॥

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान्।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठायुध्यस्व जेतासि रणे सपत्नान्॥ ३४॥**

**अर्थ**—द्रोणाचार्य, भीष्माचार्य, जयद्रथ, कर्ण तसेच इतर मोठमोठें योद्धें यांना मी मारलेलेंच आहे. तू आतां त्यांना मार, दु:ख करूं नकोस, युद्ध कर आणि तूं रणांत शत्रूंना जिंकशील॥ ३४॥

**द्रोणाचा पाडु न करीं। भीष्माचें भय न धरीं। कैसेनि कर्णावरी। परजूं हें न म्हण॥ ४७२॥**
**कोण उपायो जयद्रथा कीजे। हें न चिंतू चित्त तुझें। आणीकही आथि जे जे। नावाणिगे वीर॥ ४७३॥**
**तेही एक एक आघवे। चित्रींचे सिंहाडें मानावें। जैसें वोलेनि हातें घ्यावें। पुसोनियां॥ ४७४॥**
**यावरी पांडवा। काइसा युद्धाचा मेळावा। हा आभासु गा आघवा। येर ग्रासिलें मियां॥ ४७५॥**
**जेव्हां तुवां देखिले। हे माझिया वदनीं पडिले। तेव्हांचि यांचें आयुष्य सरलें। आतां रितीं सोपें॥ ४७६॥**
**म्हणोनि वहिला उठीं। मियां मारिले तूं निवटीं। न रिगे शोकसंकटीं। नाथिलिया॥ ४७७॥**
**आपणचि आडखिळा कीजे। तो कौतुकें तैसा विंधोनि पाडिजे। तैसें देखें गा तुझें। निमित्त आहे॥ ४७८॥**
**बापा विरुद्ध जें जाहलें। तें उपजतांचि वाघें नेलें। आतां राज्येंशीं संचलें। यश तूं भोगीं॥ ४७९॥**
**सावियाचि उतत होते दायाद। आणि बळिये जगीं दुर्मद। ते वधिलें विशद। सायासु न लागतां॥ ४८०॥**
**ऐसिया इया गोष्टी। विश्वाच्या वाक्पटीं। लिहूनि घालीं किरीटी। विजयी होई॥ ४८१॥**

**अर्थ**—द्रोणाच्या बरोबरीचा मी नाही असे मनांत आणूं नकोस. भीष्माची भीति बाळगूं नकोस. कर्णावर शस्त्र कसें चालवूं असें म्हणूं नकोस॥ ४७२ ॥ जयद्रथाला मारण्याकरितां कोणता उपाय करावा, याचें चिंतन मनांत करूं नकोस. आणखी जे जे नांवाजलेले पराक्रमी वीर आहेत॥ ४७३ ॥ ते सर्व ओल्या हातांनी पुसून घेण्यासारखे भिंतीवर काढलेल्या सिंहाचीं चित्रे आहेत असें मान॥ ४७४॥ अशा स्थितींत अर्जुना! हे काय युद्धाकरितां जमलेलें सैन्य आहे? हा सर्व भास असून, बाकीचे हें सर्व मी गिळून टाकले आहेत॥ ४७५ ॥ जेव्हा तूं हे सर्व माझ्या तोंडांत पडले असें पाहिलेस, तेव्हाच त्यांचें आयुष्य संपलें. हीं आतां रिकामी सोपटीं आहेत॥ ४७६ ॥ म्हणून लवकर उठ. मी मारलेल्यांना तूं नाहीसें कर आणि व्यर्थ शोकसंकटांत पडूं नकोस॥ ४७७ ॥ आपणच एखादें निशाण उभें करावें आणि कौतुकाने त्याला बाण मारून पाडावें, त्याप्रमाणे यांच्या नाशाला तुझें नुसतें निमित्त आहे, पहा!॥ ४७८ ॥ बा अर्जुना! जे तुझे वैरी जन्मास आले, ते जन्मल्याबरोबरच वाघाने नेले (असे समज) आतां राज्यासह मिळविलेल्या यशाचा तूं उपभोग घे॥ ४७९ ॥ खरोखरच, हे तुझे भाऊबंद अत्यंत उन्मत्त, मदांध व जगामध्यें जे बलवान् झाले आहेत, ते तूं कांही श्रम न पडतां सहज मारलेस॥ ४८० ॥ अशा प्रकारच्या गोष्टी जगामध्यें सर्व लोकांच्या मुखरूपी पटावर, अर्जुना! तूं लिहून ठेव-म्हणजे सर्व लोकांच्या तोंडीं होऊ दे व विजयी हो॥ ४८१ ॥

*सञ्जय उवाच*

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमान: किरीटी।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीत: प्रणम्य॥ ३५॥**

**अर्थ**—संजय म्हणतो, भगवंताचें हें वचन ऐकून, हात जोडून, कांपत कांपत नमस्कार करून व भीत भीत अत्यंत नम्र होऊन पुन: सद्गद अंतकरणाने अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला॥ ३५॥

**ऐसी आघवीचि हे कथा। तया अपूर्णमनोरथा। संजयो सांगे कुरुनाथा। ज्ञानदेवो म्हणे॥ ४८२॥**
**मग सत्यलोकौनि गंगाजळ। सुटलिया वाजत खळाळ। तैशी वाचा विशाळ। बोलतां तया॥ ४८३॥**
**नातरी महामेघांचे उमाळे। घडघडीत एके वेळे। कां घुमघुमिला मंदराचळें। क्षीराब्धी जैसा॥ ४८४॥**

**तैसें गंभीरें महानादें। हें वाक्य विश्वकंदें। बोल्लिलें अगाधें। अनंतरूपें॥ ४८५॥**
**तें अर्जुनें मोटकें ऐकिलें। आणि सुख कीं भय दुणावलें। हें नेणों परि कांपिन्नलें। सर्वांग तयाचें॥ ४८६॥**
**सखोलपणें वळल्री मोट। आणि तैसैचि जोडले करसंपुट। वेळोवळां ल्लाट। चरणीं ठेवी॥ ४८७॥**
**तेवींचि कांहीं बोलों जाये। तंव गळा बुजालाचि ठाये। हें सुख कीं भय होये। हें विचारा तुम्ही॥ ४८८॥**
**परि तेव्हां देवाचेनि बोलें। अर्जुना हें ऐसें जाहलें। मियां पदांवरी देखिलें। श्लोकाचिया॥ ४८९॥**
**मग तैसाचि भेणभेण। पुढती जोहारूनि चरण। मग म्हणे जी आपण। ऐसें बोलिलेति॥ ४९०॥**

**अर्थ**—श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हें संपूर्ण वर्तमान ज्याचे मनोरथ पूर्ण झाले नाहीत, अशा कुरुराज धृतराष्ट्राला संजय सांगूं लागला॥ ४८२॥ मग ज्याप्रमाणे सत्यलोकापासून उगम पावलेल्या गंगाजळाचा खळाळ वाजतो, तशी अर्जुनाशीं बोलतांना भगवंताची वाणी गंभीर होती॥ ४८३॥ किंवा आकाशांत महामेघाचे उमाळे उठले असतां एकदम घडघड असा आवाज होतो किंवा क्षीरसमुद्राच्या मंथनाचे वेळीं मंदराचलाच्या मंथनाचा आवाज घुमूं लागला॥ ४८४॥ त्याप्रमाणे विश्वरूप धारण करणाऱ्या व विश्वांचें कारण असणाऱ्या अगाध भगवंताने गंभीर व थोर नाद करणाऱ्या वाणीने हें वाक्य उच्चारिलें॥ ४८५॥ तें वाक्य अर्जुनाने केवळ ऐकलें मात्र आणि त्याच्या मनांत सुख झालें की भीति दुप्पट वाढली. हें आम्ही जाणत नाही; पण त्याचें सर्वांग मात्र कांपू लागलें॥ ४८६॥ त्याचा शब्द खोल जाऊन मुरकुंडी वळली व तशा स्थितींतच त्याने हात जोडले व वारंवार चरणावर मस्तक ठेऊं लागला॥ ४८७॥ त्याचप्रमाणे कांही बोलण्याचा प्रयत्न करूं लागता त्याचा कंठ भरून येई. हें सुखाचें लक्षण आहे की भीतीचें लक्षण होय याचा तुम्हीच विचार करा॥ ४८८॥ पण तेव्हा देवाच्या बोलण्याने अर्जुनाची अशी स्थिति झाली ती श्लोकांतील पदावरून मी जाणली आहे॥ ४८९॥ मग तसाच भीत भीत पुनः भगवंताच्या चरणांना नमस्कार करून अर्जुन म्हणतो, अहो जी भगवंता! आपण असे बोललांत॥ ४९०॥

*अर्जुन उवाच*

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः॥ ३६॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, हे ऋषीकेशा! सर्व जगत्, तुझी कीर्ति श्रवण करून व गाऊन, आनंदित होतें व तुझें प्रेम करतें, ते योग्यच आहे. तसेंच राक्षस हे तुझ्या भीतीने दशदिशेला पळतात हे त्यांना योग्यच आहे आणि सिद्धांचे समुदाय तुला नमस्कार करतात, हेहि त्यांना उचितच आहे॥ ३६॥

**ना तरी अर्जुना मी काळु। आणि ग्रासिजे तो माझा खेळु। हा बोलु तुझा कीर अढळु। मानूं आम्ही॥ ४९१॥**
**परि तुवां जी काळें। आजि स्थितीचिये वेळे। ग्रासिजे हें न मिळें। विचारासी॥ ४९२॥**
**कैसेनि आंगीचें तारुण्य काढावे। कैचें नव्हेते वार्धक्य आणावें। म्हणोनि करूं म्हणसी तें नव्हे। बहुतकरुनी॥ ४९३॥**
**हां जी चौपाहारी न भरतां। कोणेही वेळे श्रीअनंता। काय माध्यान्हीं सविता। मावळतु आहे॥ ४९४॥**
**पैं तुज अखंडिता काळा। तिन्ही आहाती जी वेळा। तया तिन्ही परी सबळा। आपुलालियां समयीं॥ ४९५॥**
**जे वेळीं हो ल्गे उत्पत्ती। ते वेळीं स्थिति प्रळयो हारपती। आणि स्थितिकाळीं न मिरविती। उत्पत्ति प्रळयो॥ ४९६॥**
**पाठीं प्रळयाचिये वेळे। उत्पत्ति स्थिति मावळे। हें कायसेनही न ढळे। अनादि ऐसें॥ ४९७॥**
**म्हणोनि आजि तरी भरें भोगें। स्थिती वर्जिजत आहे जगें। एथ ग्रसिसी तूं हें नल्गे। माझां जीवीं॥ ४९८॥**
**तंव संकेतें देव बोले। अगा या दोन्हीं सैन्यांसींचि मरण पुरलें। तें प्रत्यक्ष तुज दाविलें। येर यथाकाळें जाण॥ ४९९॥**

**अर्थ**—नाही तरी अर्जुना! मी काळ आहे आणि सर्व सृष्टीचा संहार करणें हा माझा खेळ आहे, असें जे भगवंता! तूं बोललास, तें निश्चयाने आम्ही खरें मानतो॥ ४९१॥ पण देवा! तूं काळ असलास तरी आज जगताचें पालन करण्याचा समय असतांना, काळरूपी त्वां सर्व जगताचा संहार करावा, हें विचार करून पाहतां विसंगत दिसतें॥ ४९२॥ तारुण्यपणांत आंगचें तारुण्य काढून, नसलेलें वार्धक्य कसें आणतां येईल? म्हणून तूं जो संहार

करूं म्हणतोस, तो बहुतकरून होऊं नये ॥ ४९३ ॥ अहो जी देवा! दिवसाचे चार प्रहर न संपतांच, कोणतेहि वेळीं माध्यान्हकाळींच सूर्य कधीं मावळतो काय? ॥ ४९४ ॥ तूं जरी अखंड काळस्वरूप असलास, तरी तुला तीन वेळा आहेत. त्या तिन्ही आपआपल्या काळीं बलवान असतात ॥ ४९५ ॥ जेव्हा विश्वाची उत्पत्ति होऊं लागते, तेव्हा स्थिति व प्रलय राहत नाहीत आणि स्थितीकाळीं उत्पत्ति प्रलय दिसत नाहीत ॥ ४९६ ॥ नंतर प्रलयाचे वेळीं उत्पत्ति स्थिति नसतात. हा प्रवाह अनादि असून, तो कधींहि बदलत नाही ॥ ४९७ ॥ म्हणून आज हें सर्व भोगाने संपन्न असलेलें जग स्थिति अवस्थेंत आहे. अशा स्थितींत या जगाला तूं ग्रासतोस हें म्हणणे माझ्या मनाला पटत नाही ॥ ४९८ ॥ तेव्हा भगवान म्हणाले बा अर्जुना! संकेतदृष्टीने पाहतां या दोन्ही सैन्याचा माझा पालनकाल संपला आहे हें तुला मी प्रत्यक्षच दाखविलें. बाकी प्रत्यक्ष संहार कालानुसारच होणार, हें जाण ॥ ४९९ ॥

**गूढार्थदीपिका—संकेंतें**—म्हणजे ईश्वराच्या सर्वज्ञतारूप ज्ञानदृष्टीने. या दृष्टीने पाहतां भूत भविष्य व वर्तमान असा काळाचा त्रिविध भेद प्रत्ययाला येत नाही व सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, लय हे तिन्ही एकदमच दिसतात.

**हा संकेतु जंव अनंता। वेळु लागला बोलतां। तंव अर्जुनें लोकु मागुता। देखिला यथास्थिति ॥ ५०० ॥**

**अर्थ**—हा संकेत सांगता असतांना जो थोडा वेळ लागला, तितक्या वेळांत, पूर्वी लोक जशा स्थितींत होते तशा स्थितींतच, अर्जुनाने सर्व लोक पाहिले ॥ ५०० ॥

**मग म्हणतसे देवा। तूं सूत्री विश्वलाघवा। जग आला मा आघवा। पूर्वस्थिति पुढती ॥ ५०१ ॥**
**परि पडिलिया दुःखसागरीं। तूं काढिसी कां जयापरी। ते कीर्ति तुझी हरी। आठवित असें ॥ ५०२ ॥**
**कीर्ति आठवितां वेळोवेळां। भोगीतसे महासुखाचा सोहळा। तेथ हर्षामृतकल्लोळा। वरि लोळत आहों ॥ ५०३ ॥**

**अर्थ**—तेव्हा मग अर्जुन म्हणूं लागला, देवा! विश्वरूपी मायाखेळाचा तूं सूत्रधार आहेस. पुनः हें जग पूर्वस्थितींत आले ना! ॥ ५०१ ॥ परंतु दुःखसागरांत पडलेल्या आपल्या भक्तांना तूं बाहेर काढतोस, अशी जी तुझी कीर्ति आहे, त्या कीर्तीची माझ्या अंतःकरणांत आठवण होत आहे ॥ ५०२ ॥ ती कीर्ति पुनः पुनः आठवितांना मी चित्तांत अत्यंत सुखाचा सोहळाहि भोगत आहे आणि तेथे त्या सुखांतील हर्षरूपी अमृताच्या लाटांवर मी लोळत आहे ॥ ५०३ ॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताची भक्तवत्सलता वारंवर आठवून. भक्तांना अत्यंत प्रेम व सुख प्राप्त होतें.

**देवा जियालेपणें जग। धरी तुझां ठायीं अनुराग। आणि दुष्टां तयां भंग। अधिकाधिक ॥ ५०४ ॥**
**पैं त्रिभुवनींचिया राक्षसां। महाभय तूं हृषीकेशा। म्हणोनि पळताती दिशां। पैलीकडे ॥ ५०५ ॥**
**येर सुरनर सिद्ध किन्नर। किंबहुना चराचर। ते तुज देखोनि हर्षनिर्भर। नमस्कारित असती ॥ ५०६ ॥**

**अर्थ**—देवा! तूं जीवदान दिल्यामुळें हे जग तुझ्या ठिकाणी प्रेम करीत आहे आणि दुष्टांचा अधिकाधिक मनोभंग होत आहे ॥ ५०४ ॥ कारण त्रैलोक्याच्या सर्व राक्षसांना, भगवंता! तूं महाभयरूप वाटतोस; म्हणून ते दाही दिशेच्या पलीकडे पळून जात आहेत ॥ ५०५ ॥ बाकीचे देव, मनुष्य, सिद्ध, किन्नर, किंबहुना सर्व प्राणी तुला पाहून अत्यंत आनंदित होत्साते, तुला नमस्कार करीत आहेत ॥ ५०६ ॥

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे।**
**अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥**

**अर्थ**—ब्रह्मदेवाचा उत्पन्नकर्ता म्हणून श्रेष्ठ अशा महात्म्या हे राक्षस तुला कां बरें नमस्कार करीत नाहीत! हे अनंता! देवदेवा, जगन्निवासा! सत् व असत् किंवा कार्य-कारण जगताचें पलीकडे असणारें जें आहे तें अक्षरस्वरूप तूंच आहेस ॥ ३७ ॥

**एथ गा कवणा कारणा। राक्षस हे नारायणा। न लगतीचि चरणा। पळते जाहले ॥ ५०७ ॥**
**आणि हें तूतें काइ पुसावें। येतुलाले आम्हांसिही जाणवे। तरी सूर्योदयीं राहावें। कैसेनि तमें ॥ ५०८ ॥**
**तूं स्वप्रकाशाचा आगरु। आणि जाहाला आहासि गोचरु। म्हणोनियां निशाचरां केरु। फिटला सहजें ॥ ५०९ ॥**

**हें येतुले दिवस आम्हां। कांहीं नेणवेंचि श्रीरामा। आतां देखतसों महिमा। गंभीर तुझा॥ ५१०॥**
**जेथूनि नाना सृष्टीचिया वोळी। पसरती भूतग्रामाचिया वेली। तया महद्ब्रह्मातें व्याली। दैविकी इच्छा॥ ५११॥**
**देवो निःसीमतत्त्व सदोदितु। देवो निःसीमगुण अनंतु। देवो निःसीमसाम्य सततु। नरेंद्र देवांचा॥ ५१२॥**
**जी तु त्रिजगतिये वोलावा। अक्षर तूं सदाशिवा। तूंचि संतासंत देवा। तयाही अतीत तें तूं॥ ५१३॥**

**अर्थ**—हे नारायणा! येथे हे राक्षस कोणत्या कारणाने तुझ्या चरणाला नमस्कार न करतांच पळून जात आहेत?॥ ५०७॥ आणि हे तुला कशाला विचारायला पाहिजे? एवढें आम्हांलाहि कळतें की, सूर्योदय झाल्यावर आंधाराने कसे राहावयाचें॥ ५०८॥ देवा! तूंच स्वयंप्रकाशाचें अमर्याद कोठार आहेस आणि तोच तूं आम्हाला प्रत्यक्ष दृष्टीस पडला आहेस; म्हणून संपूर्ण राक्षसरूपी केर सहजच नाहीसा झाला॥ ५०९॥ इतके दिवस, हे भगवंता! आम्ही हे कांहीच जाणत नव्हतों. आतां तुझा अगाध महिमा आम्हांला कळून आला आहे. ॥ ५१०॥ जेथून अनंत सृष्टीच्या रांगा व चतुर्विध प्राण्यांच्या वेली पसरतात त्या अव्यक्त मायेला तुज देवाच्या इच्छेने जन्म दिला॥ ५११॥ सदासर्वदा असणारी अमर्याद सत्ता देवा! तूच आहेस. अनंत व अमर्याद गुणस्वरूप तूच आहेंस. नित्य व अमर्यांद अशी समब्रह्मस्थिति तूंच आहेस. तूं देवांचाहि देव आहेस॥ ५१२॥ तूं त्रैलोक्याचा जिव्हाळा असून, हे सदाशिवा! तूं अविनाशी आहेंस. कार्यकारणरूप जगत् तूंच झाला असून, त्यावेगळे जें आहे, तेंहि तूंच आहेस॥ ५१३॥

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप॥ ३८॥**

**अर्थ**—आदिदेव व पुराण पुरुष तूंच आहेस. तूंच या जगाला अंतिम आश्रय आहेस, जाणणारा तूंच असून जाणलें जाणारेंहि तूच आहेंस. अत्यंत श्रेष्ठ गति तूच असून, हें विश्वरूपा! तूच या जगाला व्यापिलें आहेस॥ ३८॥

**तु प्रकृति पुरुषांचियां आदी। जी महत्तत्त्वां तूंचि अवधी। स्वयें तूं अनादी। पुरातन॥ ५१४॥**
**तूं सकळ विश्वजीवन। जीवांसि तूंचि निधान। भूतभविष्याचें ज्ञान। तुझ्याचि हाती॥ ५१५॥**
**जी श्रुतीचिया लोचना। स्वरूपसुख तूंचि अभिन्ना। त्रिभुवनाचिया आयतना। आयतन तूं॥ ५१६॥**

**अर्थ**—देवा! तू या प्रकृतिपुरुषाचाही आदि म्हणजें कारण आहेस. जी भगवंता! महत्तत्त्वाचे शेवटही तूच आहेस. स्वतः तूं अनादि पुरातन आहेस॥ २१४॥ तूं सर्व विश्वाचें जीवन असून, सर्व जीवाचें अधिष्ठान तूच आहेस आणि भूत-भविष्यज्ञान तुझ्या स्वाधीन आहे॥ ५१५॥ तू वेदाचे डोळे आहेस. आत्मस्वरूपाशीं तूं अभिन्न आहेस आणि म्हणून आत्मस्वरूपाचें सुखहि तूच आहेस. तूच संपूर्ण त्रिभुवनाला आधार असणाऱ्या विश्वरूपालाहि आधार आहेस॥ ५१६॥

**गूढार्थदीपिका—त्रिभुवनाचिया आयतना। आयतन तूं**—आयतन म्हणजे आधार. या शब्दाचा "माया" असा अर्थ करून, माया ही त्रिभुवनाला आधार आहे, असे कोणी म्हणतात.

पण त्रिगुणात्मक माया व तिचें कार्य त्रिभुवन, हे दोन्ही भ्रमरूपच आहेत आणि भ्रमच भ्रमाला आधार होऊं शकत नाही. भ्रमाला आधार सत्य वस्तु असली पाहिजे, असे वेदान्तांत मानलें असल्यामुळे, येथे त्रिगुणात्मक माया ही त्रिभुवनाला आधार आहे असे म्हणतां येत नाही.

कोणी म्हणतील की, ज्ञानदृष्टीने पाहतां, दोरी ही वस्तु भ्रमजन्यच आहे, तरीपण तिच्यावर सर्पवस्तूचा भ्रम होतोच की नाही? या शंकेला उत्तर असे आहे की, दोरीवर सर्पाचा भ्रम होतो, असे अज्ञानी मूर्ख जरी म्हणत असले, तरी वेदान्तशास्त्राचें तसें म्हणणे नाही. चैतन्य हें सत्य असून, सर्व वस्तूंचे ठिकाणी व्यापक असल्यामुळे तें दोरींतहि आहे आणि दोरीला आधार असणाऱ्या त्या चैतन्यावरच सर्पाचा भ्रम होतो, दोरीवर होत नाही असे वेदान्त शास्त्रांतून सांगितलें आहे.

भगवंतांनी जेव्हा अर्जुनाला विश्वरूप दाखविलें, तेव्हा अर्जुनाला भगवंताच्या श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणी विश्वरूप (ओ. २९१-अ. ११) व विश्वरूपाचे ठिकाणी त्रिभुवन आहे (ओ. २४४-अ. ११) असे जे स्पष्ट दिसत

होते, त्याचाच उल्लेख करून, ''देवा! तूं विश्वरूपाने त्रिभुवनाला आधार असून, श्रीकृष्णस्वरूपाने विश्वरूपालाहि आधार आहेस'' अशी अर्जुनाने भगवान श्रीकृष्णाची स्तुति केली आहे; म्हणून या ओवींतील ''त्रिभुवनाचिया आयतना'' या तिसऱ्या चरणांतील ''आयतन'' या शब्दाचा ''विश्वरूप'' व ''आयतन तूं'' या चवथ्या चरणांतील ''आयतन'' या शब्दाचा ''श्रीकृष्णस्वरूप'' असा अर्थ केला पाहिजे.

**म्हणोनि जी परम। तूंतें म्हणिजे महाधाम। कल्पांतीं महद्ब्रह्म। तुजमाजीं रिगे॥ ५१७॥**
**किंबहुना तुवां देवें। विश्व विस्तारिलें आहे आघवें। तरि अनंतरूपा वानावें। कवणें तूंतें॥ ५१८॥**

**अर्थ**—म्हणून भगवंता! तुला सर्वश्रेष्ठ म्हणतात व सर्वांचें अंतिम वसतिस्थान तुलाच म्हणतात. कल्पाचे शेवटीं ही माया तुझ्या ठिकाणींच लीन होते॥ ५१७॥ किंबहुना तूंच संपूर्ण जगत्स्वरूपाने प्रगट झाला आहेस, तेव्हा हे विश्वरूपा! तुझें वर्णन करण्यास कोण समर्थ आहे?॥ ५१८॥

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते॥ ३९॥**
**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः॥ ४०॥**

**अर्थ**—वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, ब्रह्मदेव व ब्रह्मदेवाचा पिता तूच आहेस. तुला सहस्रशः प्रणाम असोत. पुनः वारंवार तुला नमस्कार करतो॥ ३९॥ पूर्वदिशेस तुला नमस्कार असो. पश्चिमदिशेस तुला नमस्कार असो, हे सर्वरूपा! अनंत सामर्थ्य असलेल्या व अनंत पराक्रम करणाऱ्या! संपूर्ण जगत् तू एका आत्म्यानेच व्यापतोस; म्हणून तू सर्वरूप आहेस. अशा तुला सर्वत्र सर्व ठिकाणीं नमस्कार असो॥ ४०॥

**जी काय एक तूं नव्हसी। कवणे ठायीं नससी। हें असो जैसा आहासी। तैसिया नमों॥ ५१९॥**
**वायु तूं श्रीअनंता। यम तूं नियमिता। प्राणिगणीं वसता। अग्नि तो तूं॥ ५२०॥**
**वरुण तूं सोम। स्त्रष्टा तूं ब्रह्म। पितामहाचा परम। आदि जनक तूं॥ ५२१॥**
**आणीकही जें जें कांहीं। रूप आथि अथवा नाहीं। तया नमो तुज तैसयाही। श्रीजगन्नाथा॥ ५२२॥**
**ऐसें सानुरागें चित्तें। स्तवन केलें पांडुसुतें। मग पुढती म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभो॥ ५२३॥**
**पाठीं तिये साद्यंतें। न्याहाळी श्रीमूर्तीतें। आणि पुढती म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभो॥ ५२४॥**
**पाहतां पाहतां प्रांतें। समाधान पावे चित्तें। आणि पुढती म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभो॥ ५२५॥**
**इये चराचरीं जीं भूतें। सर्वत्र देखे तयांतें। आणि पुढती म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभो॥ ५२६॥**
**ऐसी रूपें तियें अद्भुते। आश्चर्यें स्फुरती अनंतें। तंव तंव नमस्ते। नमस्तेचि म्हणे॥ ५२७॥**
**आणिक स्तुति ही नाठवे। आणि निवांतुही न बैसवे। नेणों कैसा प्रेमभावें। गाजोंचि लागे॥ ५२८॥**
**किंबहुना इयापरी। नमन केलें सहस्त्रवरी। कीं पुढती म्हणे श्रीहरी। तुज सन्मुखा नमो॥ ५२९॥**
**देवासि पाठी पोट आथि कीं नाहीं। येणें उपयोगु आम्हां काई। तरि तुज पाठिमोरेयाही। नमो स्वामी॥ ५३०॥**
**उभा माझिये पाठीसीं। म्हणोनि पाठिमोरें म्हणावें तुम्हांसी। सन्मुख विमुख जगेंसीं। न घडे तुज॥ ५३१॥**
**आतां वेगळालिया अवयवां। नेणें रूप करूं देवा। म्हणोनि नमो तुज सर्वा। सर्वात्मका॥ ५३२॥**
**जी अनंतबळसंभ्रमा। तुज नमो अमितविक्रमा। सकळकाळीं समा। सर्वदेशा॥ ५३३॥**
**आधविया अवकाशीं जैसें। अवकाशचि होऊनि आकाश असे। तूं सर्वपणें तैसें। पातलासि सर्व॥ ५३४॥**
**किंबहुना केवळ। सर्व हें तूंचि निखळ। परि क्षीरार्णवीं कल्लोळ। पयाचे जैसे॥ ५३५॥**
**म्हणोनियां देवा। तूं वेगळा नव्हसी सर्वां। हे आलें मज सद्भावा। आतां तूंचि सर्व॥ ५३६॥**

**अर्थ**—देवा! तूं काय एक नाहीस व कोण्या ठिकाणी नाहीस? हे असो. जसा तूं आहेस तशाच तुला नमस्कार असो॥ ५१९॥ अनंता! तूंच वायु असून, प्राण्यांना कर्माप्रमाणे शासन करणारा यम, तूंच आहेस. सर्व प्राणिमात्रांच्या

जठरांत राहणारा अग्नि तूंच आहेस ॥ ५२० ॥ वरुण, सोम, सृष्टी उत्पन्न करणारा ब्रह्मदेव व ब्रह्मदेवाचाहि उत्पन्नकर्ता असा परम कारण तूच आहेस ॥ ५२१ ॥ आणीकहि रूप आहे किंवा रूप नाही-जें जें कांही आहे, तें तूच आहेस. देवा! तशा तुला नमस्कार असो ॥ ५२२ ॥ अशारीतीने प्रेमयुक्त चित्ताने भगवंताला अर्जुनाने नमन केले आणि पुन: भगवंता! तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो! असें म्हणूं लागला ॥ ५२३ ॥ नंतर त्या संपूर्ण विश्वरूपाकडे पाहून पुन: भगवंता! तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो, असेंच म्हणू लागला ॥ ५२४ ॥ एका एका अवयवाकडे पाहत पाहत, मनांत परम संतोष मानून पुन:, भगवंता! तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो, असें म्हणूं लागला ॥ ५२५ ॥ हीं स्थावर-जंगम जीं भूतें आहेत, तीं सर्वत्र पाहूं लागला व पुन: पुन:, भगवंता! तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो, असेंच म्हणू लागला ॥ ५२६ ॥ भगवंताची अद्‌भुत आश्चर्यांने युक्त अशी असंख्य रूपें जों जों पाहूं लागला, तों तों तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो असेंच म्हणून लागला ॥ ५२७ ॥ आणखी काय स्तुति करावी हें त्याला आठवत नव्हतें आणि मौनहि धरून राहवेना. प्रेमभावाने तो कसा नमस्ते, नमस्ते असा घोष करूं लागला, हे मला समजत नाही ॥ ५२८ ॥ किंबहुना याप्रमाणे हजारों वेळा त्याने नमन केलें व पुन: हे श्रीहरी! माझ्या समोर असणाऱ्या तुला नमस्कार असो, असें म्हणू लागला ॥ ५२९ ॥ देवाला पाठ व पोट आहे किंवा नाही, या विचाराचा आम्हाला काय उपयोग? तरी पाठीमागें असणाऱ्या तुला भगवंता! नमस्कार असो! ॥ ५३० ॥ माझ्या पाठीशीं उभा आहेस, म्हणून तुला पाठमोरे म्हणायचें, एरव्हीं तूं जगाच्या सन्मुख किंवा विन्मुख होऊं शकत नाहीस ॥ ५३१ ॥ आतां तुझ्या वेगवेगळ्या अवयवांचें मी वर्णन करूं शकत नाही; म्हणून सर्वरूप व सर्वात्मक असलेल्या तुला नमस्कार असो ॥ ५३२ ॥ अगाध सामर्थ्यसंपन्न व अगाध पराक्रम असणाऱ्या, सर्वकाळीं सर्व देशांत एकरूप, एकसारखा असणाऱ्या तुला भगवंता! नमस्कार असो ॥ ५३३ ॥ ज्याप्रमाणे सर्व आकाशांत पोकळीच आकाशरूप होऊन आहे, त्याप्रमाणे सर्व नामरूपाने तू सर्व झाला आहेस ॥ ५३४ ॥ पण क्षीरसमुद्रावर जसे दूधाचे तरंग उठावे, त्याप्रमाणे हे सर्व तूच केवळ नटला आहेस ॥ ५३५ ॥ म्हणून देवा! या सर्व नामरूपाहून तूं वेगळा नाहीस आतां सर्व तूच आहेस, हें माझ्या पूर्ण प्रत्ययाला आलें ॥ ५३६ ॥

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥**
**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥**

**अर्थ—**देवा! तुझा अगाध महिमा न जाणतां, चुकून किंवा प्रेमाने, तुला आपल्या बरोबरीचा आपला मित्र समजून अनादराने, हे कृष्णा! हे यादवा! हे सख्या! असे जे मी तुला मागें बोललों ॥ ४१ ॥ तुजबरोबर, चालतांना किंवा फिरतांना, निजतांना, बसतांना, जेवतांना, तुझी थट्टा करून, मीच एकटा असतांना किंवा लोकांसमोर तुझा पुष्कळ अनादर केला, त्या संपूर्ण अपराधाची, प्रमाणाने न कळणाऱ्या तुज परमेश्वरापाशीं क्षमा मागतों ॥ ४२ ॥

**परि ऐसिया तूंतें स्वामी। कहींच नेणों जी आम्ही। म्हणोनि सोयरें संबंधधर्मीं। राहाटलों तुजसीं ॥ ५३७ ॥**
**अहा थोर वाउर जाहलें। अमृतें संमार्जन म्यां केलें। वारिकें घेऊनि दिधलें। कामधेनूतें ॥ ५३८ ॥**
**परिसाचा खडवाचि जोडला। कीं फोडोनि गांडोरा आम्ही घातला। कल्पतरू तोडोनि केला। कुंपु शेता ॥ ५३९ ॥**
**चिंतामणीची खाणी लागली। परी नोळखेचि म्हणौनि अव्हेरिली। तैसी तुझी जवळिक धाडिली। सांगातीपणें ॥ ५४० ॥**
**हे आजिचेंचि पाहें पां रोकडें। कवण झुंज हें केवढें। एथ परब्रह्म तूं उघडें। सारथी केलासी ॥ ५४१ ॥**
**ययां कौरवांचिया घरा। शिष्टाई धाडिलासि दातारा। ऐसा वणिजेसाठीं जगेश्वरा। विकलासि आम्हीं ॥ ५४२ ॥**
**तूं योगियांचें समाधिसुख। कैसा जाणेचिना मी मूर्ख। उपरोधु जी सन्मुख। तुजसीं करूं ॥ ५४३ ॥**
**तूं या विश्वाची अनादि आदी। बैससी जिये सभासदीं। तेथें सोयरीकीचिया संबंधी। रळीं बोलें ॥ ५४४ ॥**
**विपायें राउळा येवों। तरि तुझेनि अंगें मानु पावों। न मानसी तरी जावों। रुसोनि सलगी ॥ ५४५ ॥**

पायां लागोनि बुझावणी। तुझा ठायीं शार्ङ्गपाणीं। पाहिजे ऐशी करणी। बहु केली आम्हीं॥ ५४६॥
सजनपणाचिया वाटा। तुजपुढें बैसें उफराटा। हा पाडु काय वैकुंठा। परि चुकलों आम्ही॥ ५४७॥
देवेंसि कोल्काठी धरूं। आखाडां झोंबीलोंबी करूं। सारी खेळतां तस्करूं। निकरेंही भांडों॥ ५४८॥
चांग तें उराउरी मागों। सर्वज्ञासि कीं बुद्धी सांगों। तेवींचि म्हणों काय लागों। तुझें आम्ही॥ ५४९॥
ऐसा अपराधु हा आहे। जो त्रिभुवनीं न समाये। जी नेणतांचि कीं पाये। शिवतले तुझे॥ ५५०॥
देवो बोनयाच्या अवसरीं। लोभें कीर आठवण करी। परि माझा निसुग गर्व अवधारीं। जे फुगूनचि बैसें॥ ५५१॥
देवाचिया भोगायतनीं। खेळतां आशंकेना मनीं। जी रिगोनियां शयनीं। सरिसा पहुडें॥ ५५२॥
'कृष्णा' म्हणोनि हाकारिजे। यादवपणें तूंतें लेखिजे। आपली आण घालिजे। जातां तुज॥ ५५३॥
मज एकासनीं बैसणें। कां तुझा बोल न मानणें। हें वोळखीचेनि दाटपणें। बहुत घडलें॥ ५५४॥
म्हणोनि काय काय आतां। निवेदिजेल अनंता। मी राशि आहें समस्तां। अपराधांची॥ ५५५॥
यालागीं पुढां अथवा पाठीं। जियें राहाटलों बहुवें वोखटीं। तियें मायेचिया परी पोटीं। सामावीं प्रभो॥ ५५६॥
जी कोणी एके वेळें। सरिता घेऊनि येती खडुळें। तियें सामाविजेति सिंधुजळे। आन उपाय नाहीं॥ ५५७॥
तैसीं प्रीती कां प्रमादें। देवेंसीं मज विरुद्धे। बोलविलीं तियें मुकुंदें। उपसाहावीं जी॥ ५५८॥
आणि देवाचेनि क्षमत्वें क्षमा। आधारु जाली आहे या भूतग्रामा। म्हणोनि जीजी पुरुषोत्तमा। विनवूं तें थोडें॥ ५५९॥
तरि आतां अप्रमेया। मज शरणागता आपुलिया। क्षमा कीजो जी यया। अपराधांसी॥ ५६०॥

**अर्थ**—पण, महाराज! सर्व नामरूपाने तूंच नटला आहेस असे आम्ही पूर्वी कधीं जाणत नव्हतो, म्हणूनच तुझ्याशीं सोयरेपणाच्या नात्याने वागलों॥ ५३७॥ हाय हाय! माझें फार अनुचित वर्तन झालें. मी अमृताने सडासंमार्जन केलें. कामधेनूला देऊन तिच्याबद्दल मी शिंगरूं घेतलें॥ ५३८॥ प्रत्यक्ष परिसाचा खडक प्राप्त झाला असतांना, आम्ही तो फोडून घराच्या पायऱ्यांत घातला आणि कल्पतरूच्या डाहाळ्या तोडून शेताला कुंपण केलें॥ ५३९॥ चिंतामणीची खाण लागली असतां, ओळखता न आल्यामुळे तिची उपेक्षा केली जावी, त्याप्रमाणे तुमच्याशीं अति सलगीने वागून तुमची प्राप्ति व्यर्थ दवडिली॥ ५४०॥ प्रत्यक्ष आजचीच गोष्ट पाहा. हें युद्ध काय आहे आणि कितीसें आहे; पण तूं स्पष्ट परब्रह्म असूनहि तुला मी आपला सारथि केला॥ ५४१॥ आणि जगन्नाथा! या कौरवांच्या घरी तडजोड करण्याकरितां आम्ही तुला पाठविलें. याप्रमाणे आम्ही आपले क्षुल्लक व्यवहारदेखील तुझ्याकडून करविलें॥ ५४२॥ योगीलोक तुझ्याच ठिकाणीं समाधि लावून सुख भोगतात; पण मी मूर्ख, हें कसें म्हणून जाणत नव्हतो आणि तुझ्या तोंडावर तुझी थट्टा करीत असे॥ ५४३॥ तूं या विश्वाचें अनादिकारण असतांना, तूं ज्या सभासदांमध्यें बसत होतास, त्या सभासदांच्या समोर सोयरिकीच्याच नात्याने तुझ्याशी चेष्टा करीत होतों॥ ५४४॥ कदाचित् तुमच्या राजमंदिरात मी आलो तर, तुमच्याकडून सत्कार करून घेत असे. जर मानाने तसें वागविलें नाही तर अत्यंत सलगीमुळें मी तुमच्यावर रुसूनहि जात होतों॥ ५४५॥ हे शार्ङ्गपाणि भगवंता! खरोखर तुझ्या पाया पडून व क्षमेकरितां तुझी याचना करून, तुझें सांत्वन केलें पाहिजे, अशा प्रकारची वागणूक माझ्याकडून फार झाली॥ ५४६॥ सोयरेपणाच्या नात्याने तुझ्याकडे पाठ करून बसत असे, भगवंता! हे योग्य होतें काय? पण आम्ही चुकलों॥ ५४७॥ देवा! तुमच्या बरोबर दांडपट्टा खेळलों, आखाड्यांत तुमच्याशी झोंबाझोंबीं केली. सोंगट्या खेळतांना खोटे दान देत असूं आणि हातघाईवर येऊन, तुमच्याशीं भांडतहि असूं॥ ५४८॥ जी चांगली वस्तु असेल, ती बळजबरीने मागत असू. सर्वज्ञ अशा तुला शहाणपण सांगत असू त्याचप्रमाणे केव्हा 'आम्ही तुझे काय लागतो' असेहि म्हणत असूं॥ ५४९॥ असे हे त्रैलोक्यांत मावणार नाही इतके अपराध माझ्याकडून झाले आहेत; पण देवा! हे सर्व अज्ञानामुळे घडले आहेत, हे तुझ्या पायाला स्पर्श करून सांगतों॥ ५५०॥ देवा! तुम्ही जेवणाचे वेळीं माझी खरोखर प्रेमाने आठवण करीत असां, पण मी फुगूनच बसत असे. हा माझा निर्लज्ज गर्व पहा!॥ ५५१॥ देवाच्या अंत:पुरांत खेळतांना मनांत शंका देखील येत नसे. देवा! तुझ्या आंथरुणावर तुझ्याबरोबर निजत असे॥ ५५२॥ 'अरे कृष्णा!' म्हणून तुला हांक मारावी. तूं एक यादव आमचा

सोयरा आहेस, असें समजावें. तूं जायला लागलास की तुला मी आपली आण वाहून 'जाऊं नकोस' असें म्हणत असे॥ ५५३ ॥ तूं बसलेल्या आसनावर मी बसणें किंवा तुझें म्हणणेंहि न ऐकणें, हे अतिपरिचयामुळें पुष्कळ वेळां घडून आले आहे; म्हणून, अनंता! काय काय अपराध सांगूं? मी सर्व अपराधांची राशीच आहे॥ ५५४-५५५ ॥ म्हणून प्रत्यक्ष तुमच्यासमोर किंवा तुमच्या पश्चात्, जें कांही माझ्याकडून वाईट वागणें झालें, भगवंता! तें सर्व आईप्रमाणे पोटांत घाल॥ ५५६ ॥ देवा! कोणे एखादे वेळीं नद्या गढूळ पाण्याचे प्रवाह घेऊन समुद्राकडे येतात व दुसरा उपायच नसल्यामुळें समुद्र, त्या पाण्याला आपल्यांत सामावून घेतो॥ ५५७॥ त्याप्रमाणे प्रेमाने असो की प्रमादाने असो, बोलू नये असें, सलगीमुळे संवयीने जे शब्द बोलविले गेले असतील, ते सर्व भगवंताने पोटांत घालावें॥ ५५८॥ आणि देवाच्या क्षमागुणाच्या अंशामुळे पृथ्वी क्षमा संज्ञेला पात्र झाली, म्हणून ती सर्व भूतसृष्टीला आधार झाली आहे; म्हणून पुरुषोत्तमा! मी काय विनंति करूं!॥ ५५९ ॥ तरी आतां प्रमाणाच्या आटोक्यांत न येणाऱ्या भगवंता! मज आपल्या शरणागताला या सर्व अपराधांची क्षमा कर॥ ५६० ॥

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥ ४३ ॥**
**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम्।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम्॥ ४४॥**

**अर्थ**—हे अगाध सामर्थ्यवान् भगवंता! तूं या ब्रह्मांडांतील स्थावरजंगम प्राण्यांचा जनक असून, सर्वांना वंदनीय व सर्वांपेक्षा श्रेष्ठ म्हणून सर्वांचा गुरु आहेस. त्रैलोक्यांत तुझ्या सारखाच जर कोणी नाही, तर अधिक कोठून असणार!॥ ४३ ॥ म्हणून तुला शिरसाष्टांग प्रणाम करून, सर्वांचा ईश्वर व स्तुतीला पात्र अशा तुला, प्रसन्न होण्याकरितां प्रार्थना करतो. देवा! जसा पुत्राचा अपराध पितां, मित्राचा अपराध मित्र व पत्नीचा अपराध पती सहन करतो, तसा माझा अपराध तूं सहन करण्यास योग्य आहेस॥ ४४॥

**जी जाणितलें मियां साचें। महिमान आतां देवाचें। देवो होय चराचराचें। जन्मस्थान॥ ५६१ ॥**
**हरिहरादि समस्तां। देवा तूं परम देवता। वेदांतेंही पढविता। आदिगुरु तूं॥ ५६२ ॥**

**अर्थ**—अहो जी देवा! आतां मी यथार्थ महिमा जाणला आहे. तूं सर्व ब्रह्मांडाचे उत्पत्तिस्थान आहेस॥ ५६१ ॥ हरिहरादि सर्व देवांची तूं परम पूज्य देवता असून, वेदालाहि उपदेश करणारा आद्य व परम गुरु तूं आहेस॥ ५६२ ॥

**गूढार्थदीपिका—वेदातेंहि पढवितां। आद्य गुरु तूं**—वेदालाहि बोलायला लावणारा तूं आहेस. ''स पूर्वेषामपि गुरुः कालेनानयच्छेदात्'' असे योगसूत्र, परमेश्वराचे ठिकाणी कालमर्यादा नसल्यामुळें, तोच सर्व ब्रह्मदेव, ऋषी वगैरे यांचा ज्ञानदाता आहे. वेदादिशास्त्रें, जीवापासून उत्पन्न झालीं नसून परमेश्वरापासूनच जीवाला प्राप्त झालीं आहेत, असा अर्थ.

**गंभीर तूं श्रीरामा। नानाभूतैकसमा। सकळगुणीं अप्रतिमा। अद्वितीया॥ ५६३ ॥**
**तुजसी नाहीं सरिसें। हें प्रतिपादनचि कायसें। तुवां जालेनि आकाशें। सामाविलें जग॥ ५६४॥**
**तया तुझेनि पाडें दुजें। ऐसें बोल्तांचि लाजिजे। तेथ अधिकाचि कीजे। गोष्टी केवीं॥ ५६५ ॥**
**म्हणोनि त्रिभुवनीं तूं एकु। तुजसारिखा ना आणिकु। तुझा महिमा अलौकिकु। नेणिजे वानूं॥ ५६६ ॥**
**ऐसें अर्जुनें म्हणितलें। मग पुढती दंडवत घातलें। तेथें सात्त्विकाचें आलें। भरतें तया॥ ५६७॥**
**मग म्हणतसे प्रसीद प्रसीद। वाचा होतसें सद्गद। काढी जी अपराध-। समुद्रौनि मातें॥ ५६८॥**
**तुज विश्वसुहृदातें कहीं। सोयरेपणें न मनूंचि पाहीं। तुज विश्वेश्वराचिया ठायीं। आश्चर्य केलें॥ ५६९ ॥**
**तूं वर्णनीय परी लोभें। मातें वर्णिसी पां सभे। तरि मियां वल्गिजे क्षोभें। अधिकाधिक॥ ५७० ॥**
**आतां ऐसिया अपराधां। मर्यादा नाहीं मुकुंदा। म्हणोनि रक्ष रक्ष प्रमादा। पासोनियां॥ ५७१ ॥**
**जी हेंचि विनवावयालागीं। कैंची योग्यता माझिया आंगीं। परि अपत्य जैसें सल्गी। बापेंसि बोलें॥ ५७२ ॥**

**पुत्राचे अपराध। जरी जाहले अगाध। तरी पिता साहे निर्द्वंद्व। तैसें साहिजो जी॥ ५७३॥**
**सख्याचें उद्धत। सखा साहे निवांत। तैसें तुवां समस्त। साहिजो जी॥ ५७४॥**
**प्रियाचियां ठायीं सन्मान। प्रिय न पाहे सर्वथा जाण। तेवीं उच्छिष्ट काढिलें आपण। तें क्षमा कीजो॥ ५७५॥**
**नातरि प्राणाचें सोयरें भेटे। मग जीवें भूतलीं जियें संकटें। तियें निवेदितां न वाटे। संकोच कांहीं॥ ५७६॥**
**कां उखितें आंगे जीवें। आपणपें दिधलें जिया मनो भावें। तिये कांत मिनलिया न राहवें। हृदय जेवीं॥ ५७७॥**
**तयापरी जी मियां। हें विनविलें तुमतें गोसाविया। आणिक कांहीं एक म्हणावया। कारण असे॥ ५७८॥**

**अर्थ**—हे श्रीरामा तूं अति गंभीर असून, सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणी एकसारखा व्यापून आहेस. तुझ्या ठिकाणी सर्व ज्ञान ऐश्वर्यादि षड्गुण निरतिशय असून तुझ्यावांचून दुसरी वस्तुच नाही॥ ५६३॥ तुझ्या बरोबरीचे दुसरें कांही नाही, हें काय बोलायचें? आकाशरूप झालेल्या तुझ्या ठिकाणीच संपूर्ण त्रिभुवन सामावलें आहे॥ ५६४॥ तुझ्या बरोबरीचें दुसरें आहे, हे म्हणतांच जेथे लाज वाटतें, तेथें तुझ्यापेक्षा दुसरा श्रेष्ठ आहे हें कसे म्हणतां येईल?॥ ५६५॥ म्हणून या संपूर्ण त्रिभुवनांत तूंच एक असून, तुझ्यासारखा किंवा तुझ्यापेक्षा अधिक दुसरा कोणी नाही. तुझा अगाध महिमा वर्णन करतांना आमची मति कुंठित होते॥ ५६६॥ अर्जुन असें बोलला व भगवंताला पुन: त्याने साष्टांग नमस्कार घातला, तेव्हा त्याला अष्टसात्विकभाव दाटून आले॥ ५६७॥ मग अत्यंत गहिंवरून गद्गद वाणीने भगवंताला म्हणाला, भगवंता! कृपा कर, कृपा कर व मला या अपराधसमुद्रांतून बाहेर काढ॥ ५६८॥ तूं सर्व ब्रह्मांडाचा अहेतुक कल्याणकर्ता असूनहि, सोयरेपणामुळें आम्ही असें मानित नव्हतों तूं सर्व सृष्टीचा चालक, पण आम्हांला ते आश्चर्यकारक वाटत असे॥ ५६९॥ तूंच एक सर्वस्वी वर्णन करण्यास योग्य, परंतु सभेमध्यें प्रेमाने तूं माझें वर्णन करावें व मी तें पाहून गर्वाने फुगून अधिकच बडबड करीत असे॥ ५७०॥ भगवंता! आतां अशा माझ्या अपराधाला मर्यादाच नाही म्हणून या अपराधांपासून माझें रक्षण कर रक्षण कर॥ ५७१॥ माझे इतके असंख्य अपराध आहेत की अपराधांपासून माझें रक्षण कर अशी प्रार्थना करण्याचीहि माझ्या आंगी योग्यता रहिली नाही. पण मुलगा जसा बापाशीं सलगीने बोलतो तसे मी बोलत आहे॥ ५७२॥ पुत्राचे असंख्य अपराध झाले तरी, पिता जसा ते सर्व अपराध दुजाभाव सोडून देऊन सहन करतो, तसें माझें सर्व अपराध, देवा! सहन कर॥ ५७३॥ मित्राचा उद्दामपणा, जसा मित्र मनांत कांही न येऊं देतां सहन करतो, त्याप्रमाणे माझें सर्व अपराध तूं पोटांत घाल॥ ५७४॥ प्रिय, प्रियेच्या ठिकाणी मानाची मुळींच इच्छा करीत नाही, त्याप्रमाणे आपण राजसूय-यज्ञांत उच्छिष्ट पानें काढलीं, त्याची क्षमा करा॥ ५७५॥ किंवा अत्यंत जिवलग सोयऱ्याची भेट झाली असतां, मग आपण भोगलेले दु:खाचें प्रसंग, त्याला सांगतांना मनांत कांही संकोच वाटत नाही॥ ५७६॥ किंवा जिने आपलें एकंदर शरीर व प्राण, ज्याला मनोभावाने समर्पण केलें, त्या पतीची भेट झाल्यानंतर, आपल्या मनांतील गोष्ट सांगितल्यावाचून, ज्याप्रमाणे तिला राहवत नाही॥ ५७७॥ त्याप्रमाणे देवा! मी तुमच्या सलगीने प्रार्थना केली आहे. तसेंच प्रार्थना करण्याचें दुसरें आणखी एक कारण आहे॥ ५७८॥

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे।**
**तदेव मे दर्शय देवरूपं प्रसीद देवेश जगन्निवास॥ ४५॥**

**अर्थ**—भगवंता! पूर्वी कधीं न पाहिलेलें हें तुझें विश्वरूप पाहून मी आनंदित झालों व तसेंच माझें मन भयाने दु:खी झालें. आतां हे जगन्निवास! देवाधिदेवा! मजवर कृपा करून तें पूर्वीचें रूप मला दाखव॥ ४५॥

**तरि देवेंसीं सलगी केली। जे विश्वरूपाची आळी घेतली। ते मायबापें पुरविली। स्नेहाळाचेनि॥ ५७९॥**
**सुरतरूंचीं झाडें। आंगणीं लावावीं कोडें। देयावें कामधेनूचें पाडें। खेळावया॥ ५८०॥**
**मियां नक्षत्रीं डाव पाडावा। चंद्र चेंडुवालागीं देयावा। हा छंदु सिद्धी नेला आघवा। माउलिये तुवां॥ ५८१॥**
**जिया अमृतलेशालागीं सायास। तयाचा पाऊस केला चारी मास। पृथ्वी वाहून चासेचास। चिंतामणि पेरिले॥ ५८२॥**
**ऐसा कृतकृत्य केला स्वामी। बहुवे लळा पाळिला तुम्हीं। दाविलें जें हरब्रह्मीं। नायकिजे कानीं॥ ५८३॥**

**मा देखावयाची केउती गोठी। जयाची उपनिषदां नाहीं भेटी। ते जिव्हारींचीं गांठी। मजलागीं सोडिली॥ ५८४॥**
**जी कल्पादीलागोनी। आजिची घडी धरुनी। माझीं जेतुलीं होउनि। गेलीं जन्में॥ ५८५॥**
**तयां आघवियांचिआंतु। घरडोळी घेऊनि असें पाहतु। परि ही देखिली ऐकिली मातु। आतुडेचिना॥ ५८६॥**
**बुद्धीचें जाणणें। कहीं न वचेचि याचेनि आंगणें। हें सादही अंत:करणें। करवेचिना॥ ५८७॥**
**तेथ डोळ्यां देखी होआवी। ही गोष्टीचि कायसया करावी। किंबहुना ऐसें पूर्वीं। दृष्ट ना श्रुत॥ ५८८॥**
**तें हें विश्वरूप आपुलें। तुम्ही मज डोळां दाविलें। तरि माझें मन झालें। हृष्ट देवा॥ ५८९॥**
**परि आतां ऐसी चाड जीवीं। जे तुजसी गोठी करावी। जवळीक हे भोगावी। आलिंगावयासी॥ ५९०॥**
**ते इयेचि रूपीं करूं म्हणिजे। तरि कोणे एके मुखेंसीं चावळिजे। आणि कोणा खेंव देइजे। तुज लेख नाहीं॥ ५९१॥**
**म्हणोनि वारियासवें धांवणें। न ठके गगना खेंव देणें। जळकेली खेळणें। समुद्रीं केउतें॥ ५९२॥**
**यालागीं जी देवा। एथीचें भय उपजतसे जीवा। म्हणोनि येतुला ळळा पाळावा। जें पुरे हें आतां॥ ५९३॥**
**पैं चराचर विनोदें पाहिजे। मग तेणें सुखें घरीं राहिजे। तैसें चर्तुर्भुज रूप तुझें। तो विसांवा आम्हां॥ ५९४॥**

**अर्थ**—देवा! मी तुझ्याशीं सलगी करून तुझें विश्वरूप पहाण्याचा हट्ट धरला आणि प्रेमळभक्ताच्या मायबापाने तुवां, तो माझा हट्ट पुरविला॥ ५७९॥ ज्याप्रमाणे कौतुकाने आंगणांत कल्पतरूचीं झाडें लावातींत किंवा कामधेनुचें वासरू खेळावयाला आणून द्यावें॥ ५८०॥ नक्षत्ररूप फाश्यांनी डाव टाकावा व चेंडू खेळण्याकरिता चंद्र द्यावा इत्यादि हट्टासारखाच असलेला माझा विश्वरूप-दर्शनाचा हट्ट, आई! तूं पूर्णपणें सिद्धीस नेला॥ ५८१॥ ज्या अमृताचा एक थेंब मिळविण्याकरितां देखील अत्यंत प्रयास पडतात, त्याचा चार महिने सारखा पाऊस पाडावा किंवा संपूर्ण पृथ्वीची मशागत करून वाफ्यावाफ्यांत चिंतामणी पेरावेत॥ ५८२॥ त्याप्रमाणे भगवंता! मला अत्यंत कृतार्थ केलें. माझा तुम्ही पुष्कळ लाड पुरविला आणि जें विश्वरूप दाखविलें, तें शंकर, ब्रह्मदेव यांनी कानांनी देखील ऐकिलें नाही॥ ५८३॥ मग प्रत्यक्ष विश्वरूप पाहण्याची गोष्ट दूरच राहिली. ज्या विश्वरूपाची वेदालाहि भेट घेतां आली नाही, ती हृदयांतील विश्वरूपाची गांठ, आपण माझ्याकरिता सोडली॥ ५८४॥ देवा! कल्पांच्या आरंभापासून या क्षणापर्यंत माझे जेवढे जन्म होऊन गेले॥ ५८५॥ त्या प्रत्येक जन्मांतील घराघराचा शोध करून पाहतांहि हे विश्वरूप मी पाहिलें किंवा ऐकिलें असें म्हणणारा कोणी सांपडत नाही॥ ५८६॥ या विश्वरूपाच्या अंगणांत सुद्धां बुद्धीचा प्रवेश होत नाही. जेथें अंत:करणालाहि याची कल्पना करतां येत नाही॥ ५८७॥ तेथे डोळ्यांनी कोणी पाहिलें असेल ही गोष्टच कशी करायची! किंबहुना हे विश्वरूप पूर्वी कोणी पाहिलें नाहीं किंवा ऐकिलेहि नाही॥ ५८८॥ तें हें आपलें विश्वरूप आपण माझ्या डोळ्याला दाखविलें. त्यामुळे मला अत्यंत आनंद झाला॥ ५८९॥ पण अंत:करणांत आतां अशी इच्छा आहे की, तुझ्याशीं चार गोष्टी कराव्या व तुला आलिंगन देण्याकरिता तुझें सान्निध्य प्राप्त व्हावें॥ ५९०॥ ह्या सर्व गोष्टी, या विश्वरूपाशीं करूं म्हटल्यास, तुझ्या या विश्वरूपाला संख्याच नसल्यामुळे कोणत्या एका मुखाशीं बोलावें व कोणत्या रूपाला आलिंगन द्यावें?॥ ५९१॥ म्हणून वाऱ्या बरोबर धांवणें किंवा आकाशाला आलिंगन देणें शक्य नाही. समुद्रांत जलक्रीडा कशी करायची?॥ ५९२॥ याकरितां, हे देवा! माझ्या मनांत या विश्वरूपाचें भय वाटते; म्हणून हा माझा हट्ट पुरवा, आतां हें विश्वरूपाचें दर्शन पुरें॥ ५९३॥ ज्याप्रमाणे कौतुकाने सर्व पृथ्वीचा प्रवास केल्यावर प्रवासाची दगदग नाहीशी करण्याकरितां परत घरीं येऊन, सुखाने विश्रांति घ्यावी, त्याप्रमाणे तुझें हें चतुर्भुजरूप आमचा सर्व शीण नाहीसा करणारें आमचें विश्रांतिस्थान आहे॥ ५९४॥

**गूढार्थदीपिका—चतुर्भुज रूप तुझें। तो विसांवा आम्हां**—परब्रह्मप्राप्तिकरितां लागणारी शमादि साधनसंपत्ति, भक्तिवांचून नुसत्या अभ्यासाने आंगीं बाणवितांना अत्यंत क्लेश होतात.

शम म्हणजे मनाचा निग्रह साधणे, हा दम म्हणजे इंद्रियांचा निग्रह साधण्यावर अवलंबून आहे. तसेंच मुमुक्षुता हा वैराग्यावर अवलंबून असून, वैराग्य हें मुमुक्षतेवर अवलंबून आहे. देहाची आसक्ति नाहीशी झाल्याखेरीज,

तितीक्षा बाणणें कठीण असते व परब्रह्मप्राप्ति न होतां समाधान ठेवणें कठीण असते आणि समाधानाचे अभावीं इतर साधनांचा अभ्यास होत नाही.

अशी स्थिति असल्यामुळे शमादिसाधनसंपत्ति प्राप्त होण्याकरितां किती क्लेश होतात, हें एका खऱ्या मुमुक्षूलाच माहित. त्यांतहि ज्याप्रमाणे नदी, आपल्या बाहूने तरून जाणारा पुरुष, परतीराला पोहोंचल्यावर, एकदाचा तीरावर पोहोचलो असा जरी समाधानाचा निःश्वास टाकीत असला तरी, थंड वाऱ्याची झुळूक आल्यावरच त्याच्या सर्व श्रमांचा परिहार होतो, त्याप्रमाणे निर्गुण ब्रह्मप्राप्तिकरितां करावे लागणारे शमादि साधनसंपत्तीचे संपूर्ण श्रम त्रिविधदु:खनिवृत्तिरूप निर्गुण ब्रह्मप्राप्ति होऊनहि, अखंड आनंदाच्या प्राप्तीच्या अभावीं निःशेष नाहीसे होत नाहीत. ते, सगुण परमेश्वराच्या भक्तीने अखंड परमानंदाची प्राप्ति होऊन देहाचा विसर पडला म्हणजेच नाहीसे होतात, असाच भक्तांचा अनुभव आहे. हेंच अर्जुन स्वानुभवाने ''विसावा आम्हां'' असें म्हणून येथें सांगत आहे.

**आम्ही योगजात अभ्यासावें। तेणें याचि अनुभवा यावें। शास्त्रांतें आलोडावें। परि सिद्धांतु तो हाचि॥ ५९५॥**
**आम्हीं यजनें किजती सकळें। परि तियें फळावीं येणेंचि फळें। तीर्थे होतु सकळें। याचिलागीं॥ ५९६॥**
**आणिकही कांहीं जें जें। दान पुण्य आम्हीं कीजे। तया फळीं फळ हेंचि तुझें। चतुर्भुज रूप॥ ५९७॥**

**अर्थ**—आम्ही सर्व योगांचा अभ्यास करून शेवटीं याच चतुर्भुज मूर्तीच्या सुखाचा अनुभव घ्यावा. सर्व शास्त्रांचे अध्ययन करावें, पण शेवटीं एका तुझ्या चतुर्भुज मूर्तीच्या आश्रयानेच पूर्ण सुखाची प्राप्ति होते, हाच सर्व शास्त्रांचा सिद्धान्त आहे॥ ५९५॥ आम्ही नानाप्रकारच्या सर्व यज्ञांचें अनुष्ठान करावें, पण त्या सर्व यज्ञांच्या अनुष्ठानाचें फळ मात्र तुझ्या चतुर्भुज मूर्तीची प्राप्ति व्हावी, हेंच असावें. या चतुर्भुज मूर्तीच्या प्राप्तिकरितां सर्व तीर्थाटन असावें॥ ५९६॥ आणिकहि कांही जीं जीं दानादिक पुण्यें आम्ही करूं त्या सर्व पुण्याने तुझ्या चतुर्भुज मूर्तीची प्राप्ति व्हावी॥ ५९७॥

**गूढार्थदीपिका—तया फळीं फळ हेचि तुझें। चतुर्भुज रूप**—''सत तेंचि चिद। चिद तोचि आनंद। वस्तु नोहे त्रिविध। एक पद निजानंदें'' (एक. हरिपाठ) परब्रह्माचें सत्, चित्, आनंद हे धर्म एकमेकांना सोडून मुळीच नसतात; म्हणून ते पृथक् नसून सच्चिदानंद हें एकच पद आहे, असें श्रीनाथांनी म्हटलें आहे; पण बुद्धिवृत्तीने अनुभव घेणाऱ्या जीवाला, त्या सच्चिदानंदाचा सत्, चित्, आनंद असा त्रिविध अनुभव येतो, असे माउलींनी ''येऱ्हवीं सच्चिदानंद भेदें। चालिलीं तिन्हीं पदे''। (अमृ. प्र. ५) या चरणाने म्हटलें असून पंचपादिकाकारांनी ''आनंदोविषयानुभवी नित्यत्वं चेति सन्ति धर्मा ब्रह्मणो ह्यपृथक्त्वेऽपि पृथगिवावभासन्ते'' या वचनाने असेच सांगितलें आहे.

परब्रह्माच्या या सत्, चित्, आनंद या तीन अंशांचा अनुभव पाहिला असतां, सदंशाच्या अनुभवांत सदंश प्रधान असून चिदानंद सामान्य असतात. चिदंशाच्या अनुभवांत चिदंश प्रधान असून सदंश हा त्याच्याशी एकरूप होऊन असतो, पण आनंदांश सामान्य असतो. असा आशय विद्यारण्यांनी पंचदशीच्या योगानंद नामक बाराव्या प्रकरणांतील ७३-७४ या श्लोकांतून दाखविला आहे. आनंदाशाच्या अनुभवांत मात्र, सच्चिदानंदाच्या तीनपणाचा भेद जाऊन सच्चिदानंदघन असे एकच पद होतें असें माउलींनी ''परी तिन्ही उणी आनंदें। केली येणे'' (अमृ. प्र. ५) या चरणाने सांगितलें आहे.

हें सच्चिदानंदघन एक पदच अनध्यस्तविवर्त अशा सगुण श्रीकृष्णस्वरूपाने, भक्तांच्या अनुभवाला येतें असे, ''आनंदपदी जया म्हणती हरी'' या चरणाने श्रीनाथांनी सांगितलें आहे.

''भगवान् परमानंदस्वरूप: स्वयमेवहि'' सगुण परमात्मा साक्षात् परमानंदस्वरूप आहे, असें मधुसूदनसरस्वतिहि आपल्या 'भक्तिरसायनांत' म्हणतात.

श्रीज्ञानेश्वर माऊलीनीहि आपल्या ज्ञानेश्वर्यादि ग्रंथांतून व अभंगांतून ''येणें आनंदघनें'' ''चिदानंदाची मांदुसें'' इत्यादि पदांनी सगुण परमात्मा आनंदघन किंवा आनंदाची मूर्ति आहे असेच सांगितलें आहे.

भागवतांतहि "यन्मित्रं परमानंदम्" "केवलानुभवानन्दस्वरूप:" (भाग. १० स्कं. अ. ३) इत्यादि श्लोकांतून भगवंताचे श्रीकृष्णस्वरूप केवळ आनंदरूपच आहे असे सांगितलें आहे. म्हणूनच सगुण साकार भगवंताच्या प्रेमभक्तीनेच जीवाला पूर्ण सच्चिदानंदघन ब्रह्मस्थिति प्राप्त होते आणि हाच आपला स्वानुभव अर्जुनाने "तया फळीं फळ तुझें। चतुर्भुजरूप" या दोन चरणांत सांगितला आहे.

**ऐसी तेथिंची जीवा आवडी। म्हणोनि तेंचि देखावया ल्वडसवडी। वर्तत असे ते सांकडी। फेडीं वेगी॥ ५९८॥**

**अर्थ**—अशी तुझ्या चतुर्भुजमूर्तीच्या विषयीं माझ्या मनांत आवडी असल्यामुळें, तें तुझे रूप पाहण्याची मनाला अत्यंत तळमळ लागली आहे. ती तळमळ लवकर नाहीशी कर॥ ५९८॥

**अगा जीवींचे जाणतेया। सकळ विश्ववसवितेया। प्रसन्न होईं पूजितया। देवांचिया देवा॥ ५९९॥**

**अर्थ**—हे अंत:करणांतील जाणणाऱ्या, सर्व जगाला आधार असणाऱ्या व सर्व देवांना पूज्य असणाऱ्या देवाच्या देवा! माझ्यावर प्रसन्न हो॥ ५९९॥

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते॥ ४६॥**

**अर्थ**—किरीटयुक्त; गदा व चक्र हातांत घेतलेल्या तुला, पूर्वीच्या चतुर्भुजरूपानें पाहण्याची मला इच्छा आहे; म्हणून हे विश्वरूपा! हे सहस्रबाहो! तूं चतुर्भुजरूपाने प्रगट हो॥ ४६॥

**कैसें नीलोत्पलातें रांवित। आकाशाही रंगु लावित। तेजाची वोज दावित। इंद्रनीळा॥ ६००॥**
**जैसा परिमळ जाहला मरगजा। कां आनंदासीचि निघालिया भुजा। ज्याचें जानूवरी मकरध्वजा। जोडली बरव॥ ६०१॥**
**मस्तकीं मुकुटातें ठेविलें। कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें। शृंगारा लेणें लाधलें। आंगाचेनि जया॥ ६०२॥**
**इंद्रधनुष्याचिये आडणी। मार्जी मेघ गगनरंगणीं। तैसें आवरिलें शार्ङ्गपाणी। वैजयंतिया॥ ६०३॥**
**आतां कवणी ते उदार गदा। असुरां देत कैवल्य पदा। कैसें चक्र हन गोविंदा। सौम्यतेजें मिरवे॥ ६०४॥**
**किंबहुना स्वामी। तें देखावया उत्कंठित पां मी। म्हणोनि आतां तुम्हीं। तैसया होआवें॥ ६०५॥**
**हे विश्वरूपाचे सोहळे। भोगूनि निवाले जी डोळे। आतां होताति आधले। कृष्णमूर्तिलागीं॥ ६०६॥**
**तें साकार कृष्णरूपडें। वांचूनि पाहों नावडे। तें न देखतां थोडें। मानिताति हे॥ ६०७॥**
**आम्हां भोगमोक्षाचियां ठायीं। श्रीमूर्तीवांचूनि नाहीं। म्हणोनि तैसाचि साकारू होईं। हें उपसंहारी आतां॥ ६०८॥**

**अर्थ**—भगवंताच्या आंगच्या स्वयंभू नीलवर्णाने निळ्या कमळाला व आकाशाला कसा नील वर्ण दिला आहे पाहा! भगवंताच्या आंगचें तेज इंद्रनील मण्याचे ठिकाणी कशी झांक दाखवित आहे, पहा॥ ६००॥ ज्याच्या आंगचा सुगंध म्हणजे जणुं काय मरगजाला प्राप्त झालेला सुगंध होय. भगवंताचे बाहु म्हणजे ब्रह्मानंदालाच निघालेल्या भुजा होत. ज्याच्या गुडघ्याचे सौंदर्य मदनाला प्राप्त झालें आहे॥ ६०१॥ मस्तकावर मुकुट ठेवल्याने मस्तकाला शोभा आली नसून, भगवंताचें मस्तकच मुकुटाला शोभा आणीत आहे. शृंगारानें भगवंताचें आंग अलंकृत केले नसून, भगवंताच्या अंगानेच शृंगाराला अलंकृत केलें आहें॥ ६०२॥ आकाशांत उठलेला मेघ, जसा इंद्रधनुष्याने वेढलेला दिसतो, तसा वैजयंतीमाळेने भगवान वेढलेला दिसतो॥ ६०३॥ असुरांचा प्राण घेऊन त्यांना मोक्ष देणारी तुझ्या हातांतील कशी ती उदार गदा आहें आणि गोविंदा! तुझ्या हातांतील सुदर्शनचक्रहि, सौम्यतेजाने कसें युक्त दिसत आहे॥ ६०४॥ किंबहुना प्रभो तें असें तुझें रूप पाहण्याकरितां मला अत्यंत उत्कंठा लागली आहे, म्हणून तूं तसाच चतुर्भुज हो॥ ६०५॥ हा विश्वरूपाचा आनंद भोगून माझे डोळे तृप्त झाले. आतां ते, तुझें पूर्वीचें श्रीकृष्णस्वरूप पाहण्याकरितां आतुर झाले आहेत॥ ६०६॥ त्या साकार श्रीकृष्णस्वरूपावाचून माझ्या डोळ्याला दुसरें कांहीं पाहणें आवडत नाही. श्रीकृष्णस्वरूप न पाहतां हे विश्वरूप देखील माझ्या डोळ्यांना कमी प्रतीचे वाटतें॥ ६०७॥ आम्हां तुझ्या भक्ताना-भोग म्हणजे दृष्ट परमानंद व मोक्ष म्हणजे विदेहमुक्ति-या दोहोकरितां, तुझ्या सगुण साकार मूर्तिवांचून दुसरें काही लागत नाही; म्हणूनच आतां विश्वरूपाचा उपसंहार कर व सगुण श्रीकृष्णरूपाने प्रगट हो॥ ६०८॥

**गूढार्थदीपिका—आम्हां भोगमोक्षांचियां ठायीं। श्रीमूर्तिवांचूनि नाहीं**—भगवद्भक्ताला, एक भगवंताचेच प्रेम असल्यामुळें त्याची विषयभोगाची इच्छा नि:शेष नाहीशी झालेली असते. प्रारब्धाने प्राप्त होणारे सांसारिक भोग भोगण्याची देखील त्याला इच्छा नसते. आणि ते भोग भोगण्याकरितां श्रीकृष्णमूर्तीची आवश्यकताहि नाही. पण भोगाकरितां तुझी श्रीकृष्णमूर्ति पाहिजे आहे असे अर्जुनाने म्हटलें आहे; म्हणून येथे ''भोग'' या शब्दाचा ''सांसारिकभोग'' असा अर्थ न घेता, 'जीवन्मुक्त स्थितींतील दृष्ट परमानंद' असा अर्थ घेतला पाहिजे, असे माझ्या सद्गुरुआईंनी आपल्या निदिध्यासनप्रकाश नामक ग्रंथांतील समास आठमध्ये म्हटलें आहे.

दृष्ट परमानंद म्हणजे जिवंतपणीच अंत:करण ब्रह्मानंदाकार होणें होय. हीच भक्ताची जीवन्मुक्त-स्थिति असते आणि या ब्रह्मानंद स्थितींतून, भक्ताचें जेव्हा कधीही व्युत्थानच होत नाही, तेव्हा ती भक्ताची विदेहमुक्ति होते. ही विदेहमुक्ति भक्ताला प्रेमामुळे स्वेच्छेने होते आणि ज्ञान्याला ती प्राप्त होण्याकरितां प्रारब्ध संपेपर्यंत वाट पाहावी लागते.

कोणी असे म्हणतात की, विदेहमुक्ति ही देहपातावर अवलंबून आहे, पण हें म्हणणें बरोबर नाही. कारण ''तस्मान्मिथ्याप्रत्ययनिमित्तत्वात्सशरीरत्वस्य सिद्धं जीवतोऽपि विदुषोऽशरीरत्वम्'' (ब्र. सू. १-१-४) देह व देहाचा आत्म्याशीं संबंध हे दोन्ही अज्ञानभ्रांतिकल्पित असल्यामुळे, ज्ञानाने अज्ञानभ्रांति नाहीशीं झाल्याबरोबर देह व देहाचा संबंध यांचें अस्तित्वच नाही, असाच ज्ञानीपुरुषाला अनुभव येत असल्यामुळे, अज्ञानी पुरुषांना ज्ञानीपुरुषाचा देह व त्याचा, त्याच्याशीं संबंध दिसत असला तरी ज्ञानीपुरुष अशरीर म्हणजे विदेहच असतो, असे आचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्यांत म्हटलें आहे.

ज्ञानानंतर, भक्ति न करणाऱ्या ज्ञान्याचे ठिकाणीं मिथ्या देहाभास व जगदाभास असतो, हे मागें सांगितलेंच आहे; म्हणून तो असतो तोपर्यंत जीवन्मुक्ति, व प्रारब्ध संपून तो नाहीसा झाल्यावर विदेहमुक्ति, असा जरी ज्ञानमार्गात मुक्तीचा भेद मानला असला, तरी तो ज्ञान्याच्या देह असण्यावर किंवा देहपातावर अवलंबून नसून, त्याला देह व जगत् यांचा मिथ्या प्रत्यय येणें व तो न येणें यावरच अवलंबून असतो; म्हणून जिवंतपणींच देहाचा भास व जगदाभास नाहीसा झाल्यास, देह न पडतां देखील विदेहमुक्तीची स्थिति राहूं शकते, हें सिद्ध होतें. आणि

**नंदनंदनें या मधुसूदनें लावियलें गे पिसें । कीं जनि वनिं अवघा आपण दिसे॥**
**कंसमर्दनें मुरलीवादनें अघटित केलें कसें?। किं आभास काहिंच उरला नसें॥**

सगुण साकार भगवंताच्या प्रेमभक्तीने संपूर्ण देह व जगदभास नाहीसा होतो, असा एकनाथादि भक्तांनी आपला अनुभव सांगितला आहे.

हा भक्तांचा अनुभव स्वीकारूनच, अर्जुनाने आम्हां भक्तांना, तुझ्या सगुण श्रीकृष्णस्वरूपाच्या आश्रयानेच दृष्ट परमानंदरूप जीवन्मुक्ति व अखंड परमानंदरूप विदेहमुक्ति प्राप्त होते, असें म्हटले आहे.

*श्रीभगवानुवाच*

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात्।**
**तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्॥ ४७॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! मी प्रसन्न होऊन, अत्यंत तेजोमय, अमर्याद, आद्य म्हणजे सृष्टीच्या पूर्वी असणारें, पण पूर्वी तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणी न पाहिलेलें असें हे आपलें श्रेष्ठ स्वरूप, तुला आपल्या योगसामर्थ्याने दाखविलें॥ ४७॥

**या अर्जुनाचिया बोला। विश्वरूपा विस्मयो जाहाला। म्हणे ऐसा नाहीं देखिला। धसाळ कोणी॥ ६०९॥**
**कोण हे वस्तु पावला आहासी। तया लाभाचा तोषु न घेसी। मा भेणें काय नेणों बोलसी। हेकड ऐसा॥ ६१०॥**
**आम्हीं सावियाचि जैं प्रसन्न होणें। तैं आंगचिवरी म्हणे देणें। वांचोनि जीव असे वेंचणें। कवणासि गा॥ ६११॥**
**तें हें तुझिये चाडें। आजि जिवाचेंचि दळवाडें। कामऊनियां येवढें। रचिलें ध्यान॥ ६१२॥**
**ऐसी काय नेणों तुझिये आवडी। जाहली प्रसन्नता आमुची वेडी। म्हणोनि गौप्याची ही गुढी। उभविली जगीं॥ ६१३॥**

**तें हें अपरां अपार। स्वरूप माझें परात्पर। एथूनि ते अवतार। कृष्णादिक॥६१४॥**

**अर्थ**—अर्जुनाचें हें म्हणणे ऐकून, विश्वरूप भगवंताला आश्चर्य वाटलें आणि भगवान म्हणाले, अर्जुना! तुझ्यासारखा अविचारी, दुसरा कोणी मी पाहिला नाही॥६०९॥ अरे! केवढी ही थोर वस्तु तुला प्राप्त झाली, त्याच्या लाभाचा संतोष तुला होत नाही आणि त्या रूपाच्या दर्शनाने भयभीत होऊन, एखाद्या दुराग्रही माणसाप्रमाणे, हें काय बोलत आहेस, कळत नाहीं॥६१०॥ खरोखर, आम्ही जेव्हा प्रसन्न होतो, तेव्हा सर्व आपल्या शरीरासह त्यांच्या स्वाधीन होतो. प्रसन्नतेवांचून असा जीवभाव, आम्ही कोणाकरितांच वेंचत नसतो॥६११॥ पण आमच्या ठिकाणीं असलेलें सर्व सामर्थ्य वेंचून जें हें आम्ही विश्वरूपाचें ध्यान प्रगट केलें, तें तुझी इच्छा पूर्ण करण्याकरितांच केलें॥६१२॥ तुझें अत्यंत प्रेम लागून आमची प्रसन्नता कशी वेडी झाली हे समजत नाही; म्हणून सर्वांपासून गुप्त अशा विश्वरूपाचीहि जगांत ध्वजा उभारिली॥६१३॥ तें हें माझें विश्वरूप, सर्व आकाशादिक अमर्याद वस्तुपेक्षाहि अमर्याद असून मायेच्याहि पलीकडे आहे व येथूनच हे कृष्णादिक अवतार होतात॥६१४॥

**हें ज्ञानतेजाचें निखळ। विश्वात्मक केवळ। अनंत हें अढळ। आद्य सकळां॥६१५॥**
**हें तुजवांचोनि अर्जुना। पूर्वी श्रुत दृष्ट नाहीं आना। जें जोगें नव्हे साधना। म्हणोनियां॥६१६॥**

**अर्थ**—हें विश्वरूप, संपूर्ण केवळ ज्ञानतेजाचेंच विश्वात्मक झालें आहे. हें अनंत, अढळ असून सर्व ब्रह्मांडाचें मूळ होय॥५१५॥ अर्जुना! तुझ्यावांचून कोणी तें पाहिलें नाही व ऐकलेंहि नाही; कारण ते साधनाने प्राप्त होण्याजोगें नाही॥६१६॥

**गूढार्थदीपिका**—व्यापक विश्वरूपापेक्षा, एकदेशीय श्रीकृष्ण स्वरूपाचे ठिकाणी प्रेम धरणाऱ्या अर्जुनाची भगवंतांनी या ओव्यांतून निंदा केली, म्हणून श्रीकृष्णस्वरूपापेक्षा विश्वरूप श्रेष्ठ आहे, असेच भगवंताचें म्हणणें आहे, असे कोणी समजू नये.

कारण परब्रह्म अस्फुट, पूर्ण असून, अपूर्ण कधीच होत नाही. नामरूपादि कार्यदशेंतहि तें पूर्णच राहतें. त्याचे ठिकाणीं जीवाला, अपूर्णता भ्रांतीने भासते असा वेदान्तसिद्धान्त असल्यामुळे, ज्ञानदृष्टीने विश्वरूप, अवतार, सर्व नामरूपादि सृष्टि, हे सर्व पूर्णब्रह्मरूपच आहेत, हें आम्ही मागें सांगितलेंच आहे; म्हणून ज्ञानरूप यथार्थदृष्टीने विश्वरूप व श्रीकृष्णस्वरूप यांत श्रेष्ठ, कनिष्ठ भाव मुळींच मानतां येत नाहीत.

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर॥४८॥**

**अर्थ**—या मृत्युलोकाचे ठिकाणीं तुझ्यावांचून दुसऱ्या कोणालाहि वेद, यज्ञ, अध्ययन, दानादिक क्रियेने अथवा उग्रतपाने देखील हें रूप पाहणें शक्य नाही॥४८॥

**याची सोय पातले। आणि वेदीं मौनचि घेतलें। यज्ञ कीर माघौते आले। स्वर्गौनिया॥६१७॥**
**साधकीं देखिला आयासु। म्हणोनि वाळिला योगाभ्यासु। आणि अध्ययनें सौरसु। नाहीं एथ॥६१८॥**
**सीगेचीं सत्कर्मे। धाविन्नलीं स्वसंभ्रमें। तिहीं बहुतेकीं श्रमें। सत्यलोकु ठाकिला॥६१९॥**
**तपीं ऐश्वर्य देखिलें। आणि उभयांचि उग्रपण सांडिलें। एवं तपसाधना जें ठेलें। अपारांतरें॥६२०॥**

**अर्थ**—या स्वरूपापर्यंत येतांच वेदांनी मौन धारण केलें, यज्ञहि स्वर्गापासूनच मागें फिरले॥६१७॥ याच्या प्राप्तिकरितां कराव्या लागणाऱ्या योगाभ्यासांत अत्यंत कष्ट आहेत. असें पाहून, साधकांनी योगाभ्यासाचा मार्ग सोडला आणि वेदशास्त्राध्ययनानेहि हें प्राप्त होत नाही॥६१८॥ पूर्ण झालेलीं सत्कर्मे देखील या स्वरूपाची प्राप्ति करून घेण्याकरितां लगबगीने धांवलीं, पण त्या बहुतेकांनी मोठ्या कष्टाने कसा तरी सत्यलोक गांठला॥६१९॥ तपांनी विश्वरूपात्मक ऐश्वर्य पाहिलें व या विश्वरूपाच्या दर्शनापुढे आपल्या उग्रपणाची कांही मात्रा चालत नाही हें जाणून, त्याने उभ्या उभ्याच आपलें उग्रपण टाकून दिलें. याप्रमाणे तपरूपसाधनापासूनहि हें विश्वरूप फार दूर राहिलें.॥६२०॥

**गूढार्थदीपिका**—उत्पन्न होणारें व नाश पावणारें फळच कर्माने प्राप्त होत असते, पण विश्वरूप हें अनादि स्वयंसिद्ध व अविनाशी असल्यामुळे ज्ञानाशिवाय व भगवत्कृपेशिवाय कर्माने तें प्राप्त होऊं शकत नाही, असा भाव.

**तें हें तुवां अनायासें। विश्वरूप देखिलें जैसें। इये मनुष्यलोकीं तैसे। न फावेचि कवणा॥ ६२१ ॥**
**आजि ध्यानसंपत्तीलागीं। तूंचि एकु आथिला जगीं। हें परमभाग्य आंगीं। विरंचीही नाहीं॥ ६२२ ॥**

**अर्थ**—तुवां अनायासें-म्हणजे केवळ माझ्या कृपेने जसें हें विश्वरूप पाहिलेंस, तसें या मृत्युलोकांत कोणालाच प्राप्त झालें नाही॥ ६२१ ॥ आज या विश्वरूपाच्या ध्यानसंपत्तिकरितां तूंच एक जगांत भाग्यवान निघालास, हें परमभाग्य ब्रह्मदेवालाहि प्राप्त झाले नाही॥ ६२२ ॥

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य॥ ४९ ॥**

**अर्थ**—अशा प्रकारचें हें माझें भयंकर रूप पाहून तूं दुःखी व अविचारी होऊं नकोस. भीति सोडून अत्यंत प्रसन्न अंतःकरणाने पुनः माझें तें विश्वरूपच तूं पहा॥ ४९ ॥

**म्हणोनि विश्वरूपलाभें श्लाघ। एथिंचें भय नेघ नेघ। हें वांचूनि अन्य चांग। न मनीं कांहीं॥ ६२३ ॥**
**हां गा समुद्र अमृताचा भरला। आणि अवसांत वरपडा जाहला। मग कोणीही आथि वोसंडिला। बुडिजेल म्हणोनि॥ ६२४ ॥**
**नातरी सोनयाचा डोंगरु। येसणा न चले हा थोरु। ऐसें म्हणोनि अव्हेरु। करणें घडे॥ ६२५ ॥**
**दैवें चिंतामणि लेईजे। कीं हे ओझें म्हणोनि सांडिजे। कामधेनु दवडिजे। न पोसवे म्हणोनि॥ ६२६ ॥**
**चंद्रमा आलिया घरा। म्हणिजे निगें करितोसि उबारा। पडिसायि पडितोसि दिनकरा। परता सर॥ ६२७ ॥**
**तैसें ऐश्वर्य हें महातेज। आजि हातां आलें आहे सहज। कीं एथ तुज गजबज। होआवी कां॥ ६२८ ॥**
**परि नेणसीच गांवढिया। काय कोपों आतां धनंजया। आंग सांडोनि छाया। आलिंगितोसि मा॥ ६२९ ॥**
**हें नव्हे जो मी साचें। एथ मन करूनियां काचें। प्रेम धरिसी अवगणियेचें। चतुर्भुज जें॥ ६३० ॥**

**अर्थ**—म्हणून या विश्वरूपाच्या प्राप्तीने अपल्याला धन्य समज. विश्वरूपाच्या दर्शनाची भीती बाळगूं नकोस व या विश्वरूपावांचून दुसरें कांही चांगलें आहे, असे मनांतहि कांही आणूं नकोस॥ ६२३ ॥ अमृताने भरलेला समुद्र, अकस्मात् प्राप्त झाला असतां, त्याच्यांत बुडून प्राण जाईल, असें समजून कोणी त्याचा त्याग केला आहे?॥ ६२४॥ किंवा सोन्याचा पर्वत दृष्टीस पडला असतां, एवढा थोर पर्वत नेतां येत नाही, म्हणून त्याची उपेक्षा करावी काय?॥ ६२५ ॥ सुदैवाने चिंतामणि आंगावर घातला गेला की, त्याचें ओझें होतें म्हणून जसा टाकून द्यावा किंवा कामधेनु आपल्याच्याने पोसवत नाही, म्हणून तिला हांकून द्यावे?॥ ६२६ ॥ चंद्र घरीं चालत आला असतां त्याला, तुझ्यापासून आम्हांला उष्णता होते, म्हणून येथून जा असें म्हणावें किंवा सूर्य घरीं आला असतां, सावली पाडतोस, म्हणून दूर हो, असें म्हणावे काय?॥ ६२७॥ त्याप्रमाणे अत्यंत तेजात्मक असें हें माझें विश्वरूप-ऐश्वर्य आज अनायासें तुझ्या हातीं आलें असतांना, तुझा जीव एवढा व्याकुळ कां व्हावा?॥ ६२८ ॥ हे गावंढळ अर्जुना! पण तूं हें कांही जाणत नाहीस. तुझ्यावर काय रागावूं! तूं शरीर सोडून शरीराच्या छायेला आलिंगन देऊं पाहतोस ना!॥ ६२९ ॥ हें विश्वरूप माझें खरें स्वरूप असतांना तू खरें समजत नाहीस. येथें विश्वस्वरूपाचे विषयीं मनांत भीति बाळगतोस आणि माझें कनिष्ठ असे जें चतुर्भुज, त्याचें प्रेम करतोस॥ ६३० ॥

**गूढार्थदीपिका**—या ओव्यांतून श्रीज्ञानेश्वर माऊलींनी, विश्वरूपापेक्षा सगुण एकदेशीय श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणीं आपलें अत्यंत प्रेम दाखविणाऱ्या अर्जुनाला, आंगाला सोडून छायेला आलिंगन देणारा किंवा सत्य विश्वरूपाचे ठिकाणीं अप्रीति दाखवून, एकदेशीय व कनिष्ठ अशा श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणी प्रेम करणारा, व मूर्ख आहेस, असें जें म्हटलें आहे, तें सिद्धान्तभूत मानतां येत नाही.

कारण भगवान श्रीकृष्णांनी किंवा श्रीज्ञानेश्वरमाऊलींनी वेदान्त सिद्धान्ताला बाध येईल, असें कांही प्रतिपादन करणें शक्य नाही.

पूर्ण ब्रह्माच्या ठिकाणीं केवळ अविद्याभ्रमामुळेंच अपूर्णता व तुच्छता मानली जाते. पण परमेश्वर अखंड अविद्यारहितच असतो; म्हणून त्याचे अवतारहि पूर्ण अविद्यारहित असतात. हें मागें सांगितलेंच आहे आणि माउलींनीहि याच अध्यायांत ''श्रीकृष्णच कैवल्य उघडें'' श्रीकृष्ण स्वरूप हें 'उघडे' म्हणजे प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहतां येण्याजोगे, ''कैवल्य'' म्हणजे पूर्ण ब्रह्मस्वरूप होय, असे स्वमुखाने सांगितलें आहे. तसेच पुढे बाराव्या अध्यायांत, ईश्वरस्वरूपाच्या उपासकांपेक्षा एकदेशीय सगुण भगवंताची भक्ति करणारेच युक्ततम होतात, असे स्पष्टच सांगितलें असल्यामुळे ''आंग सांडोनि छाया। आलिंगितोसि मा'' ''प्रेम धरिसी अवगणियेचे। चतुर्भुज जे'' इत्यादि भगवंताचे म्हणणें, श्रीकृष्ण स्वरूपाचे ठिकाणीं अर्जुनाचे किती प्रेम होतें व त्या स्वरूपाविषयीं त्याचा काय अनुभव आहे, हे त्याच्या मुखाने वदविण्याकरितांच होते, वस्तुत: नव्हते, असें म्हणणें भाग आहे.

**तरि अझुनिवरी पार्था। सांडीं सांडीं हे आस्था। इयेविषयीं अनास्था। करिसी झणें॥ ६३१ ॥**
**हें रूप जरी घोर। विकृति आणि थोर। तरी कृतनिश्चयाचें घर। हेंचि करीं॥ ६३२॥**
**कृपण चित्तवृत्ति जैसी। रोवोनि घाली ठेवयापासीं। मग नुसधेनि देहेंसीं। आपण असे॥ ६३३॥**
**कां अजातपक्षिया जवळा। जीव ठेऊनि अविसाळां। पक्षिणी अंतराळा-। माजीं जाय॥ ६३४॥**
**नाना गाय चरे डोंगरीं। परि चित्त बांधिलें वत्सें घरीं। तैसें प्रेम एथिंचें करीं। स्थानपती॥ ६३५॥**
**येरें वरिचिलेनि चित्तें। बाह्य सख्य सुखापुरतें। भोगिजो कां श्रीमूर्तीतें। चतुर्भुज॥ ६३६॥**
**परि पुढतपुढती पांडवा। हा एक बोलु न विसरावा। जे इये स्वरूपौनि सद्भावा। नेदावें निघों॥ ६३७॥**
**हें कहीं नव्हतेंचि देखिलें। म्हणोनि भय जे तुज उपजलें। तें सांडीं एथ संचलें। असों दे प्रेम॥ ६३८॥**
**आतां करूं तुजयासारिखें। ऐसे म्हणितलें विश्वतोमुखें। तरि मागील रूप सुखें। न्याहाळीं पां तूं॥ ६३९॥**

**अर्थ**—अरे अर्जुना! अझून तरी माझ्या चतुर्भुजस्वरूपाची आस्था सोड आणि या विश्वरूपाची उपेक्षा करूं नकोस॥ ६३१ ॥ हें माझें विश्वरूप भयंकर विक्राळ व अमर्याद असलें, तरी भगवंताचें खरें स्वरूप हेच होय; असाच त्याविषयीं निश्चय कर॥ ६३२॥ कृपण पुरुष, ज्याप्रमाणे आपलें चित्त धनापाशीं रोवून ठेवतो व मग नुसत्या देहाने आपण बाहेर असतो॥ ६३३ ॥ किंवा पंख न फुटलेल्या व घरट्यांत राहणाऱ्या पिलापाशीं जीव ठेवून, जशी पक्षिणी आकाशांत फिरते॥ ६३४॥ किंवा गाय डोंगरावर चरत असते, पण तिचें चित्त घरीं असलेल्या वत्साकडे लागलेंले असतें त्याप्रमाणे तूं आपलें प्रेम या एका विश्वरूपाच्या ठिकाणीच राहूं दे॥ ६३५॥ बाकी वरवर चित्ताने, बाहेर सख्यभक्तीचें सुख भोगण्याकरितां, या माझ्या चतुर्भुजमूर्तीचें प्रेम कर॥ ६३६॥ पण अर्जुना! वारंवार सांगायचे हें की, या माझ्या विश्वरूपाहून आपलें प्रेम निघूं देऊं नकोस, हें माझें विश्वरूप विसरूं नकोस॥ ६३७॥ हे केव्हा पूर्वी पाहिलेंच नव्हते, म्हणून तें पाहिल्याबरोबर तुला भीती उत्पन्न झाली. तें भय सोड आणि येथें प्रेम संचलें राहूं दे॥ ६३८॥ विश्वरूपभगवंतांनी 'तुझ्या म्हणण्याप्रमाणे करतो. माझें मागील चतुर्भुजरूप आनंदाने पाहा' असें म्हटलें॥ ६३९॥

*सञ्जय उवाच*

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूय:।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुन: सौम्यवपुर्महात्मा॥ ५०॥**

**अर्थ**—संजय म्हणाला, राजा! भगवान वासुदेवाने, अशाप्रकारें अर्जुनाला म्हणून, परत आपलें पूर्वीचें श्रीकृष्णस्वरूप दाखविलें व असें सौम्यरूप धारण करून, त्या भ्यालेल्या अर्जुनाला धीर दिला॥ ५०॥

**ऐसें वाक्य जी बोलतखेंवो। मागुता मनुष्य जाहला देवो। हें ना परि नवलावो। आवडीचा तिये॥ ६४०॥**
**श्रीकृष्णचि कैवल्य उघडें। वरि सर्वस्व विश्वरूपायेवढें। हातीं दिधलें कीं नावडें। अर्जुनासी॥ ६४१॥**

**अर्थ**—असें वाक्य तोंडातून निघाल्याबरोबर, भगवान मनुष्यासारखा देहधारी झाला, हे मोठेसे आश्चर्य नव्हे. पण भगवंताला अर्जुनाचें जें प्रेम होतें, त्या प्रेमाचेंच आश्चर्य वाटतें॥ ६४०॥ खरोखर पाहतां, भगवान श्रीकृष्ण उघडें म्हणजे डोळ्यांनी पाहतां येणारे, अद्वैत पूर्णब्रह्म होय. त्यांतहि आणखी भगवंतांनी आपलें विश्वरूपासारखें सर्वस्व

अर्जुनाच्या हातांत दिलें; पण अर्जुनाला तें आवडलें नाही॥ ६४१ ॥

**गूढार्थदीपिका—श्रीकृष्णचि कैवल्य उघडें**—या चरणावरूनहि श्रीज्ञानेश्वरमाऊलींना वेदान्तसिद्धान्तानुसार श्रीकृष्णस्वरूपाचें पूर्णब्रह्मत्वच मान्य होतें हें स्पष्ट दिसतें.

**वस्तु घेऊनि वाळिजे। जैसें रत्नासि दूषण ठेविजे। नातरी कन्या पाहूनियां म्हणिजे। मना न ये हे॥ ६४२ ॥**
**तया विश्वरूपायेवढी दशा। करितां प्रीतीचा वाढू कैसा। शेल दिधलीसे उपदेशा। किरीटीसि देवें॥ ६४३ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे एखादी वस्तु घेऊन ती टाकून द्यावी किंवा चांगल्या रत्नास दूषण ठेवावें अथवा मुलीला पाहून ती 'ही पसंत नाही' असें म्हणावें॥ ६४२ ॥ (त्याप्रमाणे) आपल्या श्रीकृष्णस्वरूपाची विश्वरूपा एवढी व्यापकदशा करण्यांत अर्जुनाविषयी भगवंताच्या ठिकाणीं कशी प्रीतीची वाढ झाली पहा, भगवंतांनी अर्जुनाला केलेल्या उपदेशाचा शेवट-म्हणजे सर्वनामरूपासह पूर्ण ब्रह्मच आहे हा अनुभव-आणून दिला. ॥ ६४३ ॥

**गूढार्थदीपिका—शेल दिधलीसे उपदेशा**—श्रीगुरुने केलेल्या उपदेशाचा शेवट ब्रह्मानुभव हा होय. ''द्विधा ब्रह्मप्रतीतिः'' हा ब्रह्मानुभव, आधीं ''अहं ब्रह्मास्मि'' व नंतर ''सर्व खल्विदं ब्रह्म'' असा दोन प्रकारचा आहे, हें मागें आचार्यांचें शतश्लोकींतील वचन प्रमाण देऊन सांगितलेंच आहे.

''सर्व खल्विदं ब्रह्म'' म्हणजे सर्व नामरूपासह एक अद्वैत पूर्णब्रह्मच आहे असा जो शेवटला अनुभव, तोच भगवंतांनी अर्जुनाला विश्वरूपदर्शनाने आणून दिला.

**मोडोनि भांगाराचा रवा। लेणें घडिलें आपलिया सवा। मग नावडे जरी जीवा। तरी आटिजे पुढती॥ ६४४॥**
**तैसें शिष्याचिये प्रीती जाहलें। कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें। तें मना न येचि मग आणिलें। कृष्णपण मागुतें॥ ६४५ ॥**
**हा ठाववरी शिष्याची निकसी। सहाते गुरु आहाती कवणे देशीं। परी नेणिजे आवडी कैशी। संजयो म्हणे॥ ६४६ ॥**
**मग विश्वरूप व्यापूनि भोंवतें। जें दिव्य योगतेज प्रगटलें होतें। तेंचि सामावले मागुतें। कृष्णारूपीं तिये॥ ६४७॥**

**अर्थ**—सोन्याचा रवा वितळवून आपल्या आवडीप्रमाणे त्याचा अलंकार केल्यावर, मनाला आवडला नाही, तर तो पुनः आटून टाकावा॥ ६४४ ॥ त्याप्रमाणे येथेहि शिष्याच्या प्रेमाप्रमाणे झालें. पूर्वी असलेल्या कृष्णरूपाला भगवंतांनी विश्वरूप केलें, पण तें अर्जुनाच्या मनाला आवडलें नाही; म्हणून पुनः पूर्वीचेंच कृष्णरूप धारण केलें॥ ६४५ ॥ संजय म्हणतो, शिष्याने दिलेला त्रास येथपर्यंत सहन करणारे गुरु कोणत्या स्थळीं आहेत? पण भगवंताला अर्जुनाविषयीं कसें विलक्षण प्रेम आहे, हें सांगतां येत नाही॥ ६४६ ॥ मग संपूर्ण नामरूपात्मक जगताला व्यापून सभोंवार जें दिव्यतेज पसरलें होतें, तें संपूर्ण पुनश्च श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणी सांठवलें गेलें॥ ६४७॥

**गूढार्थदीपिका**—वर सांगितल्याप्रमाणे श्रीकृष्णस्वरूप व विश्वरूप या दोघांचा येथे बीजवृक्षाप्रमाणे संबंध दाखवून, बीज व वृक्ष दोन्हीहि, ज्याप्रमाणे एकरूप व सत्य असतात, त्याप्रमाणे विश्वरूप व श्रीकृष्णरूप हीं दोन्हीहि एकरूप व सत्य म्हणजे अनध्यस्तविवर्तरूप किंवा मायारहितविवर्तरूप आहेत हेच येथे दाखविलें आहे.

**जैसें त्वंपद हें आघवें। तत्पदार्थी सामावे। अथवा द्रुमाकारु सांठवे। बीजकणिके जेवीं॥ ६४८ ॥**
**नातरी स्वप्नसंभ्रमु जैसा। गिळी चेइली जीवदशा। श्रीकृष्णें योगु हा तैसा। संहारिला तो॥ ६४९ ॥**
**जैसी प्रभा हारपली बिंबीं। की जळदसंपत्ती नभीं। नाना भरतें सिंधुगर्भी। रिगालें राया॥ ६५० ॥**
**हो कां जे कृष्णाकृतीचिये मोडी। होती विश्वरूपपटाची घडी। ते अर्जुनाचिये आवडी। उकलूनी दाविली॥ ६५१ ॥**
**तंव परिमाणु व रंगु। तेणें देखिले साविया चांगु। तेथ ग्राहकीये नव्हेचि लागु। म्हणोनि घडी केली पुढती॥ ६५२ ॥**
**तैसें वाढीचेनि बहुवसपणें। रूपें विश्व जिंतिलें जेणें। तें सौम्य कोडिसवाणें। साकार जाहलें॥ ६५३ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे त्वंपद तत्पदार्थाचे ठिकाणी ऐक्य पावतें अथवा संपूर्ण वृक्ष छोट्याशा बीजांत सांठविला जातो॥ ६४८ ॥ किंवा ज्याप्रमाणे स्वप्नांतील कल्पित पसारा, जीवाची जागृतदशा गिळून घेते, त्याप्रमाणे भगवान श्रीकृष्णांनी आपल्या स्वरूपाचे ठिकाणीं आपल्या योग ऐश्वर्यांचा उपसंहार केला॥ ६४९ ॥ ज्याप्रमाणे सूर्यादिकाचें तेज, सूर्यादिक बिंबाचे ठिकाणींच लोप पावतें किंवा पाण्याने भरलेले मेघ, आकाशांत नाहीसे होतात किंवा संपूर्ण

भरती समुद्रांतच नाहीशी होते॥ ६५०॥ असें वाटतें की, मर्यादित श्रीकृष्णरूपाच्या आकारांत जी व्यापक विश्वरूपवस्त्राची घडी होती, ती अर्जुनाच्या प्रेमाकरितां उकलून दाखविली॥ ६५१ ॥ तेव्हा अर्जुनाने तिचा विस्तार व रंग चांगलें लक्ष देऊन पाहिलें, पण गिऱ्हाईकीचा संबंध झाला नाही-ग्राहकाला आवडले नाही-म्हणून परत त्याची भगवंताने घडी केली॥ ६५२ ॥ त्याप्रमाणे ज्या विश्वरूपाच्या अपार विस्तारामुळे, संपूर्ण विश्व व्यापिलें गेलें, तेंच सौम्य व गोजिरवाणें असें मर्यादित साकार झालें॥ ६५३ ॥

**गूढार्थदीपिका**—विश्वरूप व श्रीकृष्णस्वरूप हे दोन्ही खरोखर एकरूपच आहेत; म्हणून त्यांचा दोनपणा किंवा भिन्नपणा मानणें, हा भ्रम होय. हेंच तत्व माउलींनी वरील ओव्यांत निरनिराळे दृष्टान्त देऊन प्रतिपादिलें आहे.

**किंबहुना अनंतें। धरिलें धाकुटपण मागुतें। परि आश्वासिलें पार्थातें। बिहालियासी॥ ६५४॥**
**तेथ जो स्वप्नीं स्वर्गा गेला। तो अवसांत जैसा चेइला। तैसा विस्मयो जाहला। किरीटीसी॥ ६५५॥**
**नातरी गुरुकृपेसवें। वोसरलेया प्रपंचज्ञान आघवें। स्फुरें तत्त्व तेवीं पांडवें। श्रीमूर्ति देखिली॥ ६५६॥**
**तया पांडवा ऐसें चित्तीं। आड विश्वरूपाची जवनिका होती। ते फिटोनी गेली परौती। हें भले जाहलें॥ ६५७॥**
**काय काळातें जिणोनि आला। कीं महावातु मागां सांडिला। आपुलिया बाहीं उतरला। सात सिंधु॥ ६५८॥**
**ऐसा संतोषु बहु चित्तें। घेइजत असे पंडुसुतें। विश्वरूपापाठीं श्रीकृष्णातें। देखोनियां॥ ६५९॥**

**अर्थ**—किंबहुना भगवान श्रीकृष्णांनी पुन: लहानसें रूप घेतलें, पण विश्वरूपाला पाहून भ्यालेल्या अर्जुनाला धीर दिला॥ ६५४॥ तेव्हा स्वप्नांत ''मी स्वर्गाला गेलों'' असें पाहणारा पुरुष, जसा अकस्मात जागा होऊन आश्चर्य चकित व्हावा, त्याप्रमाणे अर्जुन आश्चर्यचकित झाला॥ ६५५ ॥ किंवा गुरुची कृपा झाल्याबरोबर, ज्याप्रमाणे संपूर्ण प्रपंचज्ञान मावळून आत्मतत्व अनुभवाला येतें, त्याप्रमाणे अर्जुनाने विश्वरूपानंतर भगवंताची सगुण साकार श्रीकृष्णमूर्ति पाहिली॥ ६५६ ॥ ती श्रीकृष्णमूर्ति पाहिल्यावर, अर्जुनाच्या मनांत असें वाटलें की, श्रीकृष्ण व माझ्यामध्यें जो विश्वरूपाचा पडदा आड होता, तो बाजूला सारला गेला, हें फार बरें झालें॥ ६५७॥ जणुं काय काळाला जिंकून परत आला किंवा भयंकर सोसाट्याच्या वाऱ्याला मागें हटविलें अथवा सातहि समुद्र आपल्या हाताने तरून जाऊन कांठास लागला॥ ६५८ ॥ अशा प्रकारचा अत्यंत संतोष, विश्वरूपानंतर श्रीकृष्णमूर्तीला पाहून अर्जुनाच्या मनाला वाटला॥ ६५९ ॥

**गूढार्थदीपिका**—या ओव्यातून विश्वरूप व श्रीकृष्णस्वरूप या दोन रूपांच्या सुखानुभवांत काय फरक अर्जुनाला वाटला हें दाखविलें आहे.

**मग सूर्याचियां अस्तमानीं। मागुती तारा उगवती गगनीं। तैसी देखों लागला अवनी। लोकांसहित॥ ६६०॥**

**अर्थ**—मग सूर्य अस्तास गेला असतां, ज्याप्रमाणें आकाशांत नक्षत्रे चमकूं लागतात, त्याप्रमाणे श्रीकृष्णमूर्ति बरोबर अर्जुन सर्व भूतसृष्टिसहित पृथ्वी पाहूं लागला॥ ६६० ॥

**गूढार्थदीपिका**—भगवंतांनी अर्जुनाला आपलें विश्वरूप पाहण्याकरितां व्यापक ज्ञानदृष्टि दिली व नंतर ती तिरोहित केली; म्हणून अर्जुनाला पूर्ववत् सृष्टि दिसूं लागली. याचा गूढभाव असा आहे की, श्रीगुरुने आपल्या सामर्थ्याने शिष्याला आत्मानुभव आणून दिला तरी, जोपर्यंत शिष्य, आपल्या प्रयत्नाने तो आंगीं बाणवून घेऊन, आपल्या स्वाधीन करून घेत नाही, तोपर्यंत तो अखंड टिकून राहत नाही.

श्रीमुकुंदराजांनी जयपाळ राजाला समाधि लावून दिल्यावरहि, त्याला विवेकसिंधु इत्यादि ग्रंथ सांगून, ती स्थिति त्याच्याकडून जेव्हा बाणवून घेवविली, तेव्हाच तो कृतार्थ झाला.

**पाहे तंव तेंचि कुरुक्षेत्र। तैसेंचि दोहीं भागीं झालें गोत्र। वीर वर्षताती शस्त्रास्त्र। संघाटवरी॥ ६६१॥**
**तया बाणांचिया मांडवाआंतु। तैसाचि रथु आहे निवांतु। धुरे बैसला लक्ष्मीकांतु। आपण तळीं॥ ६६२॥**

**अर्थ**—अर्जुन पाहतो तों तेंच पूर्वीचें कुरुक्षेत्र, तसेंच दोन्ही दळांना गोत्रज उभे असून, दळांतील वीर परस्परांवर शस्त्रास्त्रांच्या समुदायांचा वर्षाव करीत आहेत॥ ६६१ ॥ आणि त्या बाणांच्या मांडवाआंत रथ स्थिर असून, रथाच्या

धुरेवर भगवान श्रीकृष्ण बसले आहेत आणि आपण त्याच्या खालीं बसलों आहो, असें तो पाहूं लागला॥ ६६२॥

*अर्जुन उवाच*

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन। इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः॥ ५१॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला, हे जनार्दना! तुझें हें मनुष्याकृति असे सौम्य स्वरूप पाहून मी प्रसन्नचित्त झाल्यामुळें, पूर्वीच्या स्वभावस्वास्थ्याला प्राप्त झालों आहे॥ ५१॥

**एवं मागील जैसें तैसें। तेणें देखिलें वीरविलासें। मग म्हणे जियालों ऐसें। जाहलें आतां॥ ६६३॥**
**बुद्धीतें सांडोनि ज्ञान। भेणें वळघलें रान। अहंकारेंसीं मन। देशधडी जाहलें॥ ६६४॥**
**इंद्रियें प्रवृत्ती भुललीं। वाचा प्राणा चुकली। ऐसी आपांपरी होती जाली। शरीरग्रामीं॥ ६६५॥**
**तियें आघवींचि मागुतीं। जिवंत भेटलीं प्रकृती। आतां जिताणें श्रीमूर्ती। जाहलें इयां॥ ६६६॥**
**ऐसें सुख जीवीं घेतलें। मग कृष्णातें जी म्हणितलें। मियां तुमचें रूप देखिलें। मानुष हें॥ ६६७॥**
**हें रूप दाखविणें देवराया। कीं मज अपत्या चुकलिया। बुझावोनि तुवां माया। स्तनपान दिधलें॥ ६६८॥**
**जी विश्वरूपाचां सागरीं। होतों तरंग मवित वांवेवरी। तो इये निजमूर्तीचां तीरीं। निगालों आतां॥ ६६९॥**
**आइकें द्वारकापुर सुहाडा। मज सुकतीया जी झाडा। हे भेटी नव्हे बहुडा। मेघाचा केला॥ ६७०॥**
**सावियाचि तृषा फुटला। तया मज अमृतसिंधु हा भेटला। आतां जिणयाचा फिटला। अभरंवसा॥ ६७१॥**
**माझिया हृदयरंगणीं। होताहे हरिखलतांची लावणी। सुखेंसीं बुझावणीं। जाहली मज॥ ६७२॥**

**अर्थ**—याप्रमाणे पराक्रमाचा खेळ करणाऱ्या अर्जुनाने जसें मागितलें, तसें पाहिलें व मग मनांत म्हणाला, आतां माझ्या कुडींत प्राण आला असें वाटतें॥ ६६३॥ आतां पर्यंत माझें ज्ञान बुद्धीला सोडून विश्वरूपाच्या भीतीने जंगलांत पळालें होतें व अहंकारासहित मन देशोधडीस लागलें होतें॥ ६६४॥ इंद्रियांना कर्में करण्याचें भान राहिले नाही, वाचेचे ठिकाणी शब्द उच्चारण्याची शक्ति राहिली नाही, अशी शरीराचे ठिकाणीं सर्वांची दुर्दशा झाली होती॥ ६६५॥ अर्जुन मनांत म्हणतो, या श्रीमूर्तीच्या योगाने हीं संपूर्ण इंद्रियें पुनः जिवंत प्रकृतीला भेटली म्हणजे सजीव झाली आणि या मूर्तिमुळेच आतां मी वांचलों असे मला वाटत आहे॥ ६६६॥ याप्रमाणे अर्जुन मनात अत्यंत समाधान पावून, मग श्रीकृष्णाला म्हणाला, मी तुमचें मनुष्यासारखें असलेलें हें रूप पाहिलें॥ ६६७॥ देवराया! मला तुम्ही हें रूप दाखविणें म्हणजे आईशीं चुकामुक झालेल्या मज लेंकराचें सांत्वन करून तुंवा आईने स्तनपानच दिलें आहे॥ ६६८॥ जी देवा! जो मी या विश्वरूप सागरांत दोन हातांनी लाटा मोजित होतो, तो आतां मी श्रीकृष्णमूर्तिरूपी तीरास लागलों आहे॥ ६६९॥ हे द्वारकापुरांतील मित्रा! ऐक. मला तूं या रूपाने पुनः भेट दिलीस, ती भेट नसून, सुकूं लागलेल्या मज झाडावर मेघांचा वर्षावच केलास॥ ६७०॥ खरोखरच तृषेने पीडलेल्या मला, तुज कृष्णमूर्तीचें दर्शन म्हणजे अमृताच्या समुद्राचीच प्राप्ति होय. आतां जो जगण्याचा भरंवसा नव्हता, तो नाहीसा झाला॥ ६७१॥ माझ्या हृदयदेशांत हर्षरूपी वेली लावल्या जात असून आतां माझी व सुखाची फारकत नाहीशी होऊन ऐक्य झालें आहे॥ ६७२॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे झाडाची फांदी वाकवितां वाकवितां कांही कालाने ती, स्वाभाविक वांकल्याप्रमाणे होऊन राहते किंवा संसारांत सर्व प्राण्यांचें, आपल्या अपत्याविषयीं जसें स्वाभाविक प्रेम असतें, तेथें प्रेमकरणरूप क्रिया करावी लागत नाही, त्याप्रमाणेच, प्रेमळ भक्ताचें, आपल्या सगुण भगवंताचे ठिकाणीहि असलेलें प्रेम स्वाभाविक होऊन जाते. तेथेंहि प्रेम करण्याची क्रिया राहत नाही, असा भक्तांचा अनुभव असतो, हेंच या ओव्यांतून दाखविलें आहे. श्रीज्ञानेश्वर माऊलींनी, पुढे अठराव्या अध्यायांत ''तैसी क्रिया कीर न साहे। परी अद्वैतीं भक्ति आहे। हे अनुभवाचि जोगें नोहे। बोला ऐसे'' या ओवीने हाच भाव दाखविला आहे.

*श्रीभगवानुवाच*

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम। देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः॥ ५२॥**

**अर्थ**—श्रीभगवान म्हणाले, अर्जुना मला ज्या रूपाने तूं पाहिलें आहेस, त्या रूपाने पाहणें अत्यंत दुर्लभ आहे. देवादिक देखील या माझ्या विश्वरूपाच्या दर्शनाची नित्य उत्कंठा बाळगतात॥ ५२॥

**यया पार्थाचिया बोलासवें। हें काय म्हणितलें देवें। तुवां प्रेम ठेवूनि यावें। विश्वरूपीं कीं॥ ६७३॥**
**मग इये श्रीमूर्ती। भेटावें सडिया आयती। ते शिकवण सुभद्रापती। विसरलासि मा॥ ६७४॥**
**अगा आंधळिया अर्जुना। हाता आलिया मेरूही होय साना। ऐसा आथी मना। चुकीचा भावो॥ ६७५॥**
**तरी विश्वात्मक रूपडें। जें दाविलें आम्हीं तुजपुढें। तें शंभूही परि न जोडे। तपें करितां॥ ६७६॥**
**आणि अष्टांगादिसंकटीं। योगी शिणताती किरीटी। परि अवसरु नाहीं भेटी। जयाचिये॥ ६७७॥**
**तें विश्वरूप एकादे वेळ। कैंसेनि देखों अळुमाळ। ऐसें स्मरतां काळ। जातसे देवां॥ ६७८॥**
**आशेचिया अंजुळी। ठेऊनि हृदयाचां निडळीं। चातक निराळीं। लागलें जैसें॥ ६७९॥**
**तैसें उत्कंठानिर्भर। होऊनियां सुरवर। घोकीत आठही पाहार। भेटी जयाची॥ ६८०॥**
**परि विश्वरूपासारिखें। स्वप्नीही कोण्ही न देखे। तें प्रत्यक्ष तुवां सुखें। देखिलें हें॥ ६८१॥**

**अर्थ**—याप्रमाणे अर्जुन बोलला असतां, देव म्हणाले, बा अर्जुना! हें काय बोलतोस? तूं माझ्या विश्वरूपाचे ठिकाणी प्रेम ठेवून ये॥ ६७३॥ आणि मग तूं एकट्याने (म्हणजे नुसत्या देहाने) या माझ्या श्रीकृष्णमूर्तीला भेटावें, ही जी मी तुला शिकवण दिली, ती तूं सुभद्रापति अर्जुना! विसरलास ना॥ ६७४॥ हे आंधळ्या अर्जुना! अनायासें प्राप्त झालेल्या सुवर्णमेरूचाहि विशेष आदर वाटत नाही, असा हा मनाचा विपरीत स्वभाव आहे॥ ६७५॥ पण आम्ही तुझ्यापुढे आपलें जें विश्वव्यापकरूप दाखविलें, तें कितीहि तप करून शंकराला देखील प्राप्त होत नाही॥ ६७६॥ आणि अत्यंत श्रमदायक अशा योगाच्या यमनियमादि अष्टांगांचा अभ्यास करतांना योगी शीणतात; पण त्यांनाहि ज्या विश्वरूपाच्या भेटीचा योग येत नाही॥ ६७७॥ तें विश्वरूप एखादे वेळीं एवढेसें तरी कसें दिसेल, असें चिंतन करितां करितांच देवांचेंहि आयुष्य जातें॥ ६७८॥ जसें चातकपक्षी आकाशाकडे लागतात म्हणजे सारखी दृष्टि देऊन राहतात त्याप्रमाणे हृदयाच्या कपाळावर आशेची अंजुली ठेऊन, अत्यंत उत्कंठतेने देव, ज्याची भेट व्हावी म्हणून आठहि प्रहर चिंतन करीत असतात॥ ६७९-६८०॥ पण विश्वरूपासारखे कोणाच्या स्वप्नांतहि पाहण्यांत येत नाही. तें विश्वरूप तूं अनायासें प्रत्यक्ष पाहिलेस॥ ६८१॥

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया। शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा॥ ५३॥**

**अर्थ**—अर्जुना! मला तूं ज्याप्रकारचें पाहिलेंस तसें मला वेदाध्ययनाने, तपाने, दानाने किंवा यज्ञाने पाहणें शक्य नाही॥ ५३॥

**पैं उपायांसि वाटा। न वाहती एथ सुभटा। साहीसहित वोहटा। वाहिला वेदीं॥ ८२॥**
**मज विश्वरूपाचिया मोहरा। चालावया धनुर्धरा। तपांचियाही सर्वभारा। नव्हेचि लागु॥ ८३॥**
**आणि दानादि कीर कानडें। मी यज्ञींही तैसा न सांपडें। जैसेनि कां सुरवाडें। देखिला तुवां॥ ८४॥**

**अर्थ**—हे उत्तम योद्ध्या! येथे येण्याकरितां कर्मरूप साधनांना मार्ग नाही, साही शास्त्रांसह वेदाने माघार घेतली॥ ६८२॥ हे धनुर्धारी अर्जुना! माझ्या विश्वरूपाकडे येण्याकरितां नानाप्रकारच्या तपांच्या समुदायांचाहि लाग नाही॥ ६८३॥ आणि ज्याप्रमाणे तूं विश्वरूपाला उत्तम रीतीने पाहिलेस, तसें तें विश्वरूप दानादिकांनी खरोखर प्राप्त होणें कठीण असून, तसा मी यज्ञादिकांनीहि प्राप्त होत नाही॥ ६८४॥

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन। ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परन्तप॥ ५४॥**

**अर्थ**—माझ्या अनन्यभक्तीनेच अशाप्रकारें मला जाणणें, मला पाहणें व माझ्यांत तत्त्वत: प्रवेश करणें-म्हणजे मला मिळून जाणें-शक्य आहे॥ ५४॥

**तैसा मी एकीचि परी। आतुडें गा अवधारी। जरी भक्ति येउनि वरी। चित्तातें गा॥ ६८५॥**

**अर्थ**—माझ्या प्रेमभक्तीने चित्ताला वरलें-म्हणजे माझी प्रेमभक्ति चित्ताला उत्पन्न झाली-तर मात्र या एकाच गोष्टीने माझ्या या रूपाची प्राप्ति होते॥ ५८५॥

**परि तेचि भक्ति ऐसी। पर्जन्याची सुटिका जैसी। धरावांचूनि अनारिसी। गतीचि नेणे॥ ६८६॥**
**कां सकळ जळसंपत्ती। घेऊनि समुद्रातें गिंवसिती। गंगा जैसी अनन्यगती। मिळालीचि मिळे॥ ६८७॥**
**तैसें सर्वभावसंभारें। न धरत प्रेम एकसरें। मजमाजीं संचरे। मीचि होऊनि॥ ६८८॥**

**अर्थ**—पण ती भक्ति अशी आहे, ज्याप्रमाणे पावसाच्या वर्षावाला पृथ्वीवांचून दुसरी गतिच ठाऊक नसते॥ ६८६॥ ज्याप्रमाणे जलसंपत्ति घेऊन, गंगा अनन्यगतिक होऊन समुद्राला मिळते व मिळाल्यानंतरहि मिळतच राहते॥ ६८७॥ त्याप्रमाणे माझ्याशीं ऐक्य पावून व सर्व प्रेमसंबंधाचा समुदाय घेऊन, खंड न पडतां, माझे ठिकाणी एकसारखें प्रेम होत राहतें॥ ६८८॥

**गूढार्थदीपिका**—विश्वरूपाचे ठिकाणी प्रेम लागूं शकत नाही असा अर्जुनाने आपला अनुभव मागें सांगितला आहे आणि "भक्ति सगुणाचीच घडे" (र. च.) भक्ति रामकृष्णादि सगुणस्वरूपाचीच होऊं शकते, असें समर्थानीहि म्हटलें आहे.

येथेहि भक्ति जी सांगितली आहे. ती एकदेशीय सगुण साकार श्रीकृष्णाचीच सांगितली आहे.

ज्याप्रमाणे समुद्राच्या कोणत्याहि एका भागावर बुडी मारली, तरी ती बुडी समुद्रांतच मारली जाते, त्याप्रमाणे एकदेशीय सगुणसाकारस्वरूपहि पूर्णब्रह्मच असल्यामुळे, एकदेशीय सगुणस्वरूपाच्या भक्तीने त्याच्याशीं ऐक्य पावणें म्हणजे विश्वरूपाशीं ऐक्य पावणें होय, हेच या ओवींतून सांगितले आहे.

**आणि तेवींचि मी ऐसा। थडिये माझारीं सरिसा। क्षीराब्धि कां जैसा। क्षीराचाचि॥ ६८९॥**
**तैसें मजलागुनि मुंगीवरी। किंबहुना चराचरीं। भजनासि कां दुसरी। परीचि नाहीं॥ ६९०॥**
**तयाचि क्षणासवें। एवंविध मी जाणवें। जाणितला तरी स्वभावें। दृष्टही होय॥ ६९१॥**

**अर्थ**—आणि त्याचप्रमाणे मीहि असा आहे की, जसा क्षीरसागर कांठाशीं व मध्यें एकसारखा दुधाचाच असतो॥ ६८९॥ तसेंच मजपासून मुंगीपर्यंत, किंबहुना संपूर्ण चराचर विश्वांत, भजण्याकरितां-म्हणजे प्रेम करण्याकरितां माझ्यावांचून दुसरी निराळी वस्तुच नाही॥ ६९०॥ ज्याक्षणीं, असें माझें प्रेम जडतें, त्याक्षणींच मी याप्रमाणें विश्वव्यापक आहे, असा जाणला जातो आणि जाणला गेलों की, सहजच विश्वरूपाने प्रत्यक्ष होतो॥ ६९१॥

**गूढार्थदीपिका—एवंविध मी जाणवें**—एकदेशीय सगुण परमात्म्याच्या भक्तीने, तो एकदेशीय नसून, सर्वनामरूपाने नटला आहे, असाच त्याचा व्यापक अनुभव येतो व तो डोळ्याने दिसतोहि. यालाच "सर्वं खल्विदं ब्रह्म" म्हणजे अन्वयाचा अनुभव म्हणतात.

**मग इंधनीं अग्नि उद्दीपे। आणि इंधन हे भाष हारपे। तें अग्नीचि होऊनि आरोपे। मूर्त जेवीं॥ ६९२॥**
**कां उदय न कीजे तेजाकारें। तंव गगनचि होऊनि असे आंधारें। मग उदैल्यिां एकसरें। प्रकाशु होय॥ ६९३॥**
**तैसें माझिये साक्षात्कारीं। सरे अहंकाराची वारी। अहंकारलोपीं अवधारीं। द्वैत जाय॥ ६९४॥**
**मग मी तो हें आघवें। एक मीचि आथी स्वभावें। किंबहुना सामावे। समरसे तो॥ ६९५॥**

**अर्थ**—मग लांकडाचे ठिकाणीं अग्नि प्रगट झाला असतां, 'लांकूड' हा शब्द नाहीसा होतो व तें लांकूड मूर्तिमंत अग्निच होतें॥ ६९२॥ किंवा जोपर्यंत सूर्यच प्रकाशरूपाने आपला उदय करीत नाही, तोपर्यंत आकाशच काळोखरूप होऊन राहतें आणि सूर्य प्रकाशल्याबरोबर, मग तें आकाश एकसारखें प्रकाशच होऊन राहतें॥ ६९३॥ त्याप्रमाणे (माझ्या प्रेमभक्तीने) माझ्या सगुण स्वरूपाचा साक्षात्कार झाला असतां, अहंकारावर येणें समूळ नाहीसें होतें आणि अहंकार नाहीसा झाला की, द्वैत मुळींच भासत नाही॥ ६९४॥ मग 'मी' व 'तो' हे सर्व स्वभावत: मीच एक होऊन राहतो. इतकेंच नव्हे तर, तो माझे ठिकाणीं समरस ऐक्य पावतो॥ ६९५॥

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः। निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव॥५५॥**

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नामैकादशोऽध्यायः॥ ११॥*

**अर्थ**—अर्जुना! एका माझ्याकरितांच कर्में करणारा, मीच ज्याची शेवटली प्राप्तव्य गति आहे, माझेंच अनन्य प्रेम करणारा, माझ्यावांचून ज्याचें कोठेंहि प्रेम नाही व सर्व भूताचे ठिकाणी शत्रुभाव न ठेवणारा, असा तो मला प्राप्त होतो—म्हणजे माझ्याशीं ऐक्य पावतो॥५५॥

**जो मजचि एकालागीं। कर्में वाहातसे आंगीं। जया मजवांचोनि जगीं। गोमटें नाहीं॥६९६॥**
**दृष्टादृष्ट सकळ। जयाचें मीचि केवळ। जेणें जिणयाचें फळ। मजचि नाम ठेविलें॥६९७॥**
**भूतें हें भाष विसरला। जे दिठी मीचि आहे बांधला। म्हणोनि निर्वैर जाहला। सर्वत्र भजे॥६९८॥**
**ऐसा जो भक्त होये। तयाचें त्रिधातुक हें जैं जाये। तैं मीचि होऊनि ठाये। पांडवा गा॥६९९॥**

**अर्थ**—जो केवळ एका माझ्याकरितांच शरीरादिकांनी होणारीं कर्में करीत असतो, ज्याला माझ्यावांचून जगांत कांहीच गोड वाटत नाही किंवा आवडत नाही॥६९६॥ ज्याचे जिवंतपणीचें व मरणानंतरचें प्राप्तव्य केवळ मीच एक आहे आणि माझी प्राप्ति होणें, हेंच ज्याला जीविताचें फळ आहे असे वाटतें॥६९७॥ अशा माझ्या प्रेमामुळे जो माझ्याहून दुसरें प्राणी आहेत ही भाषाच विसरला, आपल्या दृष्टींत ज्याने मलाच भरून ठेवलें, म्हणून ज्याला कोणी वैरीच उरला नाही आणि सर्वत्र माझेंच भजन करतो॥६९८॥ असा जो माझा भक्त आहे, त्याचे हें वातपित्तकफात्मक शरीर नाहीसें झाले असतां, बा अर्जुना! तो मीच होऊन राहतो॥६९९॥

**गूढार्थदीपिका**—पांचभौतिक देह हा भ्रांतिजन्य असून, दृष्टिसृष्टिवादानुसार त्याचें ज्ञान होतें तोपर्यंतच त्याचें अस्तित्व असतें आणि त्याचा विसर पडला की त्याचें अस्तित्व नाहीसें होतें. भगवंताच्या निःसीम प्रेमामुळे भक्तांना देहाचा विसर पडतो व ते भगवंताशीं पूर्ण ऐक्य पावतात; पण अज्ञानी लोकांना त्यांचा देह दिसतो तोपर्यंत, त्यांच्याठिकाणी जो देव व भक्त असा भेद दिसून पडतो, तोहि त्यांचें शरीर पडल्यानंतर नाहीसा होऊन ते केवळ भगवत्स्वरूपच होऊन राहतात.

**ऐसें जगदुदरदोंदिलें। तेणें करुणारसरसाळें। संजयो म्हणे बोलिलें। श्रीकृष्णदेवें॥७००॥**
**ययावरी तो पांडुकुमरु। जाहला आनंदसंपदा थोरु। आणि कृष्णचरणचतुरु। एक तो जगीं॥७०१॥**

**अर्थ**—जगत् सांठविल्यामुळे पोट मोठे असलेले व करुणारसाने रसाळ असलेले श्रीकृष्णदेव याप्रमाणें बोलले, असे संजयाने धृतराष्ट्राला सांगितलें॥७००॥ यानंतर तो पांडूचा कुमार अर्जुन आनंदसंपदेने संपन्न झाला व तोच एकटा जगामध्ये श्रीकृष्णचरणाची थोरवी जाणणारा चतुर होता॥७०१॥

**गूढार्थदीपिका—कृष्ण चरण चतुर। एक तो जगीं**—जगाचे उत्पत्तिस्थितिलयरूप तटस्थलक्षणात्मक भगवान श्रीकृष्ण असून, ज्ञानरूप स्वरूपलक्षणात्मकहि श्रीकृष्णरूपच आहे; म्हणून श्रीकृष्णाचीं दोन्हीं रूपें पूर्णब्रह्मच आहेत आणि बीजवृक्षाप्रमाणे श्रीकृष्णस्वरूप व विश्वरूप यांचा संबंध असून, दोघांत, स्वरूपाने दृष्टीने कांही फरक नसला तरी, बाहेर स्वाभाविक व निःसीम आत्मप्रेमसुखाचा लाभ, एका श्रीकृष्ण स्वरूपाचे ठिकाणीच होतो; विश्वरूपाचे ठिकाणी होत नाही.

अर्थात् विश्वरूपापेक्षा तेंच अधिक प्रिय होय, असा श्रीकृष्णाच्या चरणाचा महिमा, प्रत्यक्ष अनुभविण्याचें चातुर्य, अर्जुनाचे ठिकाणींच माऊलींना दिसलें; म्हणून माऊलींनी अर्जुनाला ''श्रीकृष्णचरणचतुर'' हें विशेषण दिलें.

**तेणें देवाचिया दोनही मूर्ती। निकिया न्याहाळिलिया चित्तीं। तंव विश्वरूपाहूनि कृष्णाकृती। देखिला लाभु॥७०२॥**

**अर्थ**—त्याने देवाच्या दोन्ही मूर्ती चित्तांत चांगल्या न्याहाळून पाहिल्या तेव्हा त्याला विश्वरूपापेक्षां सगुण श्रीकृष्णमूर्तीचे ठिकाणी सुखाचा विशेष लाभ दिसून आला॥ ७०२॥

**गूढार्थदीपिका**—श्रीकृष्णाच्या चरणाचे माहात्म्य जाणण्याचें चातुर्य अर्जुनाचे ठिकाणीं कोणतें होतें, हें या ओवीतून दाखविलें आहे.

**परि तयाचिये जाणिवे। मानु न कीजेचि देवें। जे व्यापकाहूनि नव्हे। एकदेशी॥ ७०३॥**
**हेंचि समर्थावयालागीं। एक दोन चांगी। उपपत्ती शार्ङ्गी। दाविता जाहला॥ ७०४॥**
**तिया ऐकोनी सुभद्राकांतु। चित्तीं आहे म्हणतु। तरि होय बरवें दोन्हींआंतु। तें पुढती पुसों॥ ७०५॥**
**ऐसा आलोच करूनि जीवीं। आतां पुसती वोज बरवी। आदरील ते परिसावी। पुढें कथा॥ ७०६॥**
**प्रांजळ ओंवीप्रबंधें। गोष्टी सांगिजेल विनोदें। निवृत्तिपादप्रसादे। ज्ञानदेवो म्हणे॥ ७०७॥**
**भरोनि सद्भावाची अंजुळी। मियां वोंवियाफुलें मोकळीं। अर्पिली अंघ्रियुगुळीं। विश्वरूपाच्या॥ ७०८॥**

*इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां एकादशोऽध्यायः॥ ११॥*

**अर्थ**—पण व्यापक विश्वरूपाहून एकदेशी श्रीकृष्णस्वरूप अधिक लाभदायक किंवा श्रेष्ठ असूं शकत नाही, असें म्हणून भगवंतांनी त्याच्या या अनुभवाला मान्यता दिली नाही॥ ७०३॥ आणि आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ भगवंतांनी एक दोन उपपत्ति किंवा दृष्टान्तहि अर्जुनाला सांगितले॥ ७०४॥ सुभद्रापति अर्जुन, त्या उपपत्ति ऐकून मनांत म्हणूं लागला की, दोन्ही मूर्तींमध्यें चांगली लाभदायक कोणती, हें आपण भगवंताला पुढें विचारूं॥ ७०५॥ असा मनांत विचार करून आतां तो श्रीगुरुला प्रश्न विचारण्याची जी सुंदर पद्धति स्वीकारील, ती कथा पुढें ऐका॥ ७०६॥ श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, श्रीनिवृत्तिनाथांच्या चरणप्रसादाने, सरळ ओवीप्रबंधांत ती गोष्ट मी सहज लीलेने सांगणार आहे, ती ऐका॥ ७०७॥ ओवीरूपीं मोकळीं फुलें, मी प्रेमभावाच्या ओंजळींमध्यें भरून विश्वरूपाच्या दोन्ही पायावर अर्पण केलीं॥ ७०८॥

**श्रीसद्‌गुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या अकराव्या अध्यायाचा गूढार्थदीपिकेसह अनुवाद पूर्ण झाला, तो श्रीसद्‌गुरुचरणीं समर्पण असो.**



## समारोप

या अकराव्या अध्यायांतील कथानक म्हणजे शांत व अद्‌भुत या दोन रसांचें मिश्रण आहे. भगवंतांनी अर्जुनाला ब्रह्मज्ञान देऊन त्याच्या ठिकाणी शांतरसाची प्राप्ति करून दिली व त्यानंतर आपलें जें सर्व नामरूपात्मक विश्वरूप तें दाखवून त्याच्या ठिकाणी अद्‌भुतरस उत्पन्न केला. तेथेच बाकींच्या रसांचे मिश्रणहि या अध्यायांत आले आहे. सच्चिदानंद भगवानच सर्व जगद्रूपाने नटला आहे, हें मागील अध्यायांत ऐकून प्रत्यक्ष डोळ्यांनी त्याचा आपण अनुभव घ्यावा अशी अर्जुनाला इच्छा झाली व त्याप्रमाणे विश्वरूप दाखविण्याविषयीं त्याने भगवंताला प्रार्थना केली.

अर्जुन म्हणतो, भगवंता! माझ्यावर अनुग्रह करून आपण मला जें गूढ अध्यात्मज्ञान सांगितलें त्यायोगें माझा आप्तेष्टाविषयींचा मोह नाहीसा झाला. उत्पत्ति, स्थिति, लय आपल्यापासूनच होतात, हा आपला अगाध महिमा मी श्रवण केला. आतां ज्या स्वरूपाने तूं या सर्व ब्रह्मांडरूपाने नटला आहेस, तें तुझें विश्वरूप, मी आपल्या डोळ्यांनी पाहावे, अशी मला अत्यंत इच्छा उत्पन्न झाली आहे; पण ते पाहण्याला मी योग्य असल्यास मला एकदां तें आपलें रूप दाखव.

अर्जुनाने, अत्यंत प्रेमाने अशी इच्छा प्रगट केल्याबरोबर भगवान म्हणतात, अर्जुना! अनंत वर्णांनी, अनंत आकृतींनी भरलेलें व नाना दिव्य रूपांनी व्याप्त असें हें माझें विश्वरूप दाखविलें आहे, तें पहा. त्यांत पूर्वी न पाहिलेले सूर्य, वसु, रुद्र, अश्विनौदेव, मरुत् वगैरे हे संपूर्ण दिसत आहेत, पहा. या माझ्या एकाच स्वरूपाचे ठिकाणी संपूर्ण चराचरात्मक जगत् तुला दिसेल.

भगवंतांनी असें विश्वरूप दाखविलें तरी अर्जुन तें पाहूं शकला नाही; हें जाणून भगवंतांनी अर्जुनाला दिव्य दृष्टि दिली. नंतर अर्जुन भगवंताचें विश्वरूप पाहूं लागला.

भगवंताचें तें विश्वरूप, अनंत तोंडें, अनंत डोळे, अनंत हातपाय व अनंत प्रकारचीं दिव्य वस्त्रें व आभरणें यांनी सुशोभित झालेलें होतें. त्या विश्वरूपाचे आंगावर, दिव्य सुमनांच्या माळा होत्या व दिव्य चंदनाचे लेप लावलेले होते. आकाशांत हजारों सूर्यांचा, विजांचा व अग्नींचा प्रकाश प्रगट झाला असतां जें तेज प्रगट होईल, त्या तेजापेक्षा कितीतरी पटीने तें भगवंताचें विश्वरूप तेजस्वी होतें, त्या विश्वरूपाच्या एका एका भागावर अनेक भिन्न भिन्न प्रकाराने विभक्त झालेलें संपूर्ण जगत् अर्जुन पाहूं लागला. असें तें विश्वरूप पाहतांच अर्जुन अत्यंत आश्चर्ययुक्त होऊन हर्षाने रोमांचित झाला व त्याने भगवंताला नमस्कार करून भगवंतांची स्तुति करण्यास प्रारंभ केला.

त्या विश्वरूपांत भगवंताची कांही रूपें अत्यंत सुंदर होतीं व कांही आक्राळविक्राळ दाढांनी युक्त अशा मुखांनी सर्व सैन्याचा संहार करणारीं दिसत होतीं.

भगवंताने तें भयानक विश्वरूप धारण केलेलें पाहून अर्जुनाला आपल्याहि मृत्यूची शंका येऊं लागली. त्याचा धीर खचला व अत्यंत घाबरून जाऊन त्याने भगवंताला विचारलें की एवढें भयानक रूप धारण करून आपण काय करूं इच्छितां हें मला सांगा. त्यावर भगवान म्हणतात, अर्जुना! सर्व सृष्टीचा संहार करणारा मी काल असून दोन्ही सैन्यांतील युद्धाकरितां सज्ज झालेल्या सर्व लोकांचा संहार करण्याकरितांच मी प्रवृत्त झालों आहे. पण तुम्ही पांडव मात्र त्यांत नाही. कौरवाकडील भीष्म, कर्ण वगैरे सर्व पराक्रमी वीरांना मी पूर्वीच मारले आहे. तूं आतां निमित्तमात्र हो. भगवान श्रीकृष्णाचा असा थोर महिमा पाहून अर्जुनाला, आपण आजपर्यंत सामान्य पुरुष समजून, भगवंतांशीं कसें वागलों, याचा पश्चात्ताप झाला. नंतर अर्जुनाने भगवंताला शतशः प्रणाम करून आपल्या अपराधांची क्षमा मागितली व पुनः पूर्वीचे चतुर्भुजरूपच दाखवा म्हणून भगवंताची प्रार्थना केली.

त्यावर भगवान म्हणाले हे अर्जुना! मी तुझ्या भक्तीने तुजवर प्रसन्न झालों आहे; म्हणूनच कधी कोणी न पाहिलेलें असें अत्यंत देदीप्यमान विश्वरूप तुला दाखविलें आहे. हें विश्वरूप भयंकर असलें तरी त्याचें तूं भय बाळगूं नकोस. येथेच प्रेम ठेव व या माझ्या विश्वरूपापेक्षा चतुर्भुजरूप श्रेष्ठ समजूं नकोस. असे बोलून अर्जुनाचे इच्छेवरून भगवंतांनी त्या विश्वरूपाचा उपसंहार केला व पुनः चतुर्भुजरूप धारण केलें. तें सौम्य चतुर्भुजरूप पाहून अर्जुनाचें समाधान झालें.

भगवान म्हणतात, अर्जुना! या माझ्या विश्वरूपाचें दर्शन, वेदाने, तपाने, दानाने किंवा यज्ञाने देखील होणें शक्य नाहीं. तें एका अनन्य भक्तीनेच होऊं शकतें. संग सोडून व सर्व प्राणिमात्राशीं द्वेषरहित होऊन जो मत्प्रीत्यर्थ कर्म करून मत्परायण व माझा भक्त झाला, तोच मला प्राप्त होतो.

**॥ श्रीमद्‌सद्‌गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय बारावा

**अवतरणिका**—मागील अकराव्या अध्यायांत एकदेशीय सगुण श्रीकृष्णास्वरूपापेक्षा व्यापक विश्वरूपाचे ठिकाणी प्रेम ठेव, असें भगवंतानी अर्जुनाला सांगितलें; पण विश्वरूपापेक्षा एकदेशीय सगुण श्रीकृष्णाचे ठिकाणीच प्रेमभक्ति करणें शक्य, सोपें व भगवंताशीं जाणीवरहित निर्विकल्प ऐक्य करून देणारें आहे, म्हणून उघड ब्रह्मानंद भोगण्याच्या दृष्टीने, विश्वरूपाहून भगवंताचें एकदेशीय स्वरूपच श्रेष्ठ आहे, असा अर्जुनाचा भक्त्यनुभव होता.

अर्थात् भगवंताचें सांगणे अर्जुनाला स्वानुभवाच्या विरुद्ध वाटत होतें. स्वानुभवच सत्य आहे किंवा भगवंताचें म्हणणें सत्य आहे, याचा निर्णय भगवंताच्या मुखानेच करून घ्यावा, या दृष्टीने अर्जुनाने फारच सुंदर व मार्मिक प्रश्न केला आहे. तो असा की, भगवंता! तुझ्या विश्वरूपाचे उपासक व तुझ्या एकदेशीय श्रीकृष्णाचे उपासक या दोहोंपैकीं तुझ्याशीं कोण युक्ततम होतो-म्हणजे तुझ्याशीं कोणाचें जाणीवरहित असे निर्विकल्प ऐक्य होतें-हें मला सांग.

भगवंतांनी या अध्यायांत अर्जुनाचा अनुभवच यथार्थ आहे आणि मागील एकदेशीय स्वरूपाविषयीचे तुच्छत्वादि उद्गार, अर्जुनाचा अनुभव व भक्तिप्रेम पाहण्याकरितां होते, हें आपल्या मुखाने स्पष्ट केलें आहे.

श्रीगुरुच्या ज्या कृपादृष्टीने ज्ञान-भक्तिसंपन्न होऊन शिष्य कृतार्थ होतो, त्या कृपादृष्टीचा येथे महिमा वर्णन करीत माऊलींनी श्रीगुरुची स्तुति केली आहे.

**जय जय वो शुद्धे। उदारे प्रसिद्धे। अनवरत आनंदे। वर्षतिये॥ १ ॥**

**अर्थ**—हे सद्गुरु आई! तूं शुद्ध म्हणजे अखंड अज्ञानादि दोषरहित आहेस, तूं एक अत्यंत उदार म्हणून प्रसिद्ध आहेस व तूं अखंड आनंदस्वरूप किंवा प्रेमरूप असून शिष्याचे ठिकाणी अखंड परमानंदाचा वर्षाव करणारी किंवा परमानंदरूप प्रेमाची प्राप्ति करून देणारी आहेस॥ १ ॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुंचा जयजयकार करून व आपल्याकडे बालपण घेऊन श्रीज्ञानेश्वर महाराज लडिवाळपणाने श्रीगुरुंचें स्तवन करतात.

"नाद्वैतं गुरुणासह" ज्ञानाने आलेल्या ऐक्याची जाणीव नाहीशी होऊन परमानंदाची प्राप्ति होण्याकरितां श्रीगुरुशीं अद्वैत-ऐक्याची वागणूक न ठेवतां नम्रपणाच्या शेवटील टोंकावर शिष्याने राहायला पाहिजे, हीच सर्व आचार्यादि संतांची शिकवणूक आहे.

**जयजय वो शुद्धे**—येथे "शुद्ध" हें विशेषण जीवाच्या ठिकाणी असलेल्या अशुद्धीच्या अपेक्षेने आहे. जीवाच्या ठिकाणी अज्ञान व अज्ञानजन्य अनेकत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व, राग, द्वेष, अभिनिवेश, पाप इत्यादि नाना प्रकारची अशुद्धि आहे. तसेच त्याची ज्ञानदृष्टिहि विपरीत-ज्ञानरूप अशी अशुद्ध असून, त्याचे देहादिक पांचभौतिकहि अशुद्ध आहेत.

पण श्रीगुरुची दृष्टि शुद्ध चिन्मय असून ज्ञानभक्तीने त्याची सगुण साकार मूर्तिहि चिन्मयच झालेली असते-म्हणजे श्रीगुरु आंत-बाहेर पूर्ण चिन्मयच असतात-म्हणून ते सर्वतोपरि उपाधिरहित-म्हणने शुद्ध-आहेत किंवा पूर्ण ब्रह्म आहेत, असें 'शुद्ध' या शब्दाने माउलींनी संबोधून त्यांचा जयजयकार केला आहे.

**उदारे प्रसिद्धे**—जगांत जेवढे उदार व समर्थ म्हणून पुरुष व पदार्थ प्रसिद्ध आहेत, त्या सर्वांनी विनाशी

सुख प्राप्त करून देणाऱ्या वस्तु देऊनच जगांत आपलें औदार्य दाखविलें आहे. कोणीहि आपल्यासारखे दुसऱ्याला केलें नाही.

पण श्रीगुरु, कोणत्याहि साधनाने प्राप्त न होणारी व अप्राप्त असलेली ब्रह्मस्थिति प्राप्त करून देऊन, आपल्यासारखेच सर्व उपाधिरहित असे शुद्ध करून सोडतात. एवढेंच नाही तर दुसऱ्याला आपल्यासारखें पूर्ण करून देण्याचे सामर्थ्यहि त्याला देतात; म्हणून श्रीगुरुच एक उदारांत उदार, म्हणून प्रसिद्ध आहेत. "लोह परिसाची न साहे उपमा" "आपणासारिखे करिती तात्काळ" (तु. गा.) परिस लोखंडाचें सोनें करतो, पण त्याला परिस करीत नाही. श्रीगुरु मात्र शिष्याला आपल्यासारखेच करून सोडतात; म्हणून श्रीगुरुला परिसाची सुद्धां उपमा देतां येत नाही, असें श्रीतुकाराम महाराज म्हणतात.

**अनवरत आनंदे वर्षतिये**—आनंदाचा किंवा सुखाचा भोग होऊन 'मला आनंद झाला, मी सुखी झालों' असे भोक्तृत्व उत्पन्न झालें की, आनंदांत खंड पडतो; म्हणून "अनवरत आनंद" म्हणजे भोक्तृत्व उत्पन्न न होतां आनंदस्वरूप राहणें. अशा आनंदालाच ब्रह्मानंद म्हणतात. श्रीगुरु स्वत: ज्ञानभक्तीने अखंड आनंदांत किंवा अखंड भगवत्प्रेमांत निमग्न राहतात आणि तसेंच ते आपल्या शिष्यालाहि ज्ञानप्राप्ति करून देऊन अखंड आनंदस्वरूप करून सोडतात; म्हणून ते ब्रह्मानंदाचा वर्षाव करणारे आहेत.

**विषयव्याळें मिठी। दिधलिया नुठी ताठी। ते तुझिये गुरुकृपादृष्टी। निर्विष होय॥ २॥**

**अर्थ**—विषयरूपी भयंकर सर्पाने जीवाच्या ठिकाणी मिठी मारल्यामुळे जी त्याला आत्मविस्मृतिरूप मूर्च्छा आली आहे, ती कशानेहि नाहीशी होत नाही, पण हे श्रीगुरो! एक तुझ्या कृपादृष्टीनेच विषयरूपी सर्पाचें विष उतरून ती मूर्च्छा नाहीशी होते॥ २॥

**गूढार्थदीपिका**—परमार्थात संसारनिवृत्तिरूप मोक्षप्राप्तिकरितां ज्ञानभक्तिनिष्ठ श्रीगुरुकृपेवांचून दुसरा उपाय नाही, असा भाव.

**तरि कवणातें तापु पोळी। कैसेनि वो शोकु जाळी। जरि प्रसादरसकल्लोळीं। पूरें येसि तूं॥ ३॥**

**अर्थ**—तुझ्या अंत:करणांत ज्याच्याविषयीं कृपाप्रेमाचा पूर येऊन त्याच्या लाटा उसळूं लागल्या असतां, संसारांतील त्रिविधतापाने कोण पोळला जाईल? व त्याला प्रियवस्तूचा वियोग व अप्रियवस्तूचा संयोग यांच्या विषयींचा शोक कसा जाळूं शकेल?॥ ३॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुच्या कृपेने प्रेमळ शिष्याचे ठिकाणी सर्वत्र एका परब्रह्माचाच आविष्कार आहे, अशी अद्वैतज्ञानदृष्टि उत्पन्न होते व सर्व दु:खाला कारण असणारी द्वैतबुद्धि नाहीशी होऊन सर्व दु:खांचा नि:शेष नाश होतो.

**योगसुखाचे सोहळे। सेवकां तुझेनि स्नेहाळे। सोहंसिद्धीचे लळे। पाळिसी तूं॥ ४॥**

**अर्थ**—हे प्रेमळ सद्‌गुरु आई! तूं आपल्या प्रेमळ अनन्य सेवकांना आपल्या प्रेमानेच योगसुखाचे सोहळे भोगवितेस आणि त्यांचे सोहंसिद्धीचे लळे-म्हणजे आळ-तूं पुरवितेस॥ ४॥

**गूढार्थदीपिका—योगसुखाचे सोहळे। सेवकां तुझेनि स्नेहाळे**—योग म्हणजे जीवब्रह्मैक्य. त्याच्या "सुखाचे सोहळे" म्हणजे ज्ञानाच्या जीवब्रह्मैक्यरूप सत्त्वापत्तिपासून पुढील पुढील भूमिकेंवरील ऐक्याच्या दृढतेमुळे उत्तरोत्तर प्राप्त होणाऱ्या अधिक सुखाचा लाभ.

श्रीगुरुची अत्यंत प्रेमाने सेवा करणारे जे असतात, त्यांना सेवक म्हणतात. अशा सेवकांवर श्रीगुरुहि अत्यंत स्नेहाळ असतात. त्या स्नेहामुळेच श्रीगुरुची कृपा होऊन शिष्याला परमेश्वर ऐक्याचा व त्यामुळे होणाऱ्या सुखाचा लाभ होतो, असे या ओवीच्या पहिल्या दोन चरणांत सांगितलें आहे.

**सोहंसिद्धीचे लळे। पाळिसी तूं**—"गुरुरित्याख्यया लोके विद्यासाक्षाद्धि शांकरी" शंकरापासून प्रगट झालेली जी ब्रह्मविद्या म्हणजे अहंब्रह्मास्मिवृत्तिज्ञान, तेंच विग्रहधारी होऊन या लोकामध्ये 'गुरु' या नांवाने प्रगट झालें आहे, असे माउलींनीच अमृतानुभवांत म्हटलें आहे. म्हणून श्रीगुरु प्रसन्न झाले असता ते शिष्याच्या हृदयांत

अहंब्रह्मास्मिवृत्तिरूपाने स्थिर होतात. हे "सोहंसिद्धीचे लळे। पाळिसी तूं" या चरणाने दाखविलें आहे.

**आधारशक्तीचियां अंकीं। वाढविसी कौतुकीं। हृदयाकाशपालखीं। परिये देसी निजे॥ ५॥**

**अर्थ**—आधारशक्तीच्या मांडीवर, कुंडलिनीशक्ति जागी करून, तिच्या साहाय्याने, सेवकाला कौतुकाने वर नेतेस आणि हृदयाकाशरूपी पाळण्यांत, त्याला आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाच्या ऐक्याचे झोके देतेस॥ ५॥

**गूढार्थदीपिका**—केवळ श्रीगुरुच्या कृपेनेच कुंडलिनीउत्थानादि संपूर्ण योग साधतो, असा अर्थ.

**प्रत्यग्ज्योतीची वोवाळणी। करिसी मनपवनाचीं खेळणीं। आत्मसुखाचीं बाळलेणीं। लेवविसी॥ ६॥**

**अर्थ**—तूं आपल्या सेवकाला प्रत्यग्ज्योतीची ओवाळणी करून मनपवनाची खेळणी करून देतेस व आत्मसुखाचीं बाळलेणीं लेववितेस॥ ६॥

**गूढार्थदीपिका—प्रत्यग्ज्योतीची ओवाळणी**—प्रत्यग्ज्योति-म्हणजे देहापासून बुद्धिपर्यंत जेवढीं स्थूळसूक्ष्म तत्वें आहेत, त्या सर्वांच्या अंतर्यामि राहणारें चैतन्य.

ज्याप्रमाणे आई आपल्या मुलाला प्रेमाने ओवाळते, त्याप्रमाणे श्रीगुरुहि आपल्या प्रेमळ सेवकाला हृदयाकाशाच्या ठिकाणी, स्वयंज्योति अशा प्रत्यक्आत्मचैतन्यरूप ज्योतीने ओवाळतात म्हणजे त्याला सर्व उपाधिरहित प्रत्यक्चैतन्यस्वरूप करून सोडतात.

**करिसी मनपवनाची खेळणीं**—या प्रत्यक्चैतन्याच्या प्राप्तिकरिता मनाचा व प्राणाचा निरोध व्हायला पाहिजे; पण "चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवददृढम्" (गी. अ. ६) "अप्यब्धिपानान्महतः सुमेरून् मूलनादपि। अपि वन्ह्यशनात् साधो विषमश्चित्तनिग्रहः" (पंचदशी-तृप्तिदीप-१२१) इत्यादि श्लोकांतून शास्त्रकारांनी समुद्र पिऊन टाकण्यापेक्षा, मेरुपर्वत उपटून टाकण्यापेक्षा किंवा अग्नि प्राशन करण्यापेक्षा, चित्ताचा निग्रह करणें कठीण आहे, असे सांगून ठेविलें आहे. तसेंच प्राणाचा निग्रह करणेंहि कठीण आहे. पण आईबापांकडून मुलांना, जशी श्रमावांचून सहज खेळणीं मिळतात, त्याप्रमाणे गुरुसेवकाला मनपवनाच्या निरोधाचा अभ्यास सहज साधतो. असा भाव.

**आत्मसुखाचीं बाळलेणीं। लेवविसी**—बाळलेणीं म्हणजे बालपणी घातले जाणारे अलंकार. आई जसें आपल्या मुलाला लहानपणी सोन्याचे अलंकार घालते, त्याप्रमाणें श्रीगुरुआई आपल्या सेवकाला त्याच्या बालपणांत आत्मसुखाचे अलंकार घालते. हें बालपण असें आहे—

"तस्माद्ब्राह्मणः पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्" (बृ. उ. ३-५-१) 'ज्ञान्यांनी पूर्ण ब्रह्मज्ञान झाल्यावर बालाप्रमाणे वागावें', असें श्रुतीत विधान केलें आहे. वाटेल तें खाणें व मलमूत्रांत लोळणें, असें तें बालपण नसून, विकल्प न उठणें. मन, इंद्रियें, अहंकार इत्यादि वृत्तीवर आरूढ न होणें, हे जे बालकाचे ठिकाणी धर्म असतात, ते धर्म ज्ञान्यांनी आपल्या आंगी बाणवून घ्यावें, असा 'बाल्य' या शब्दाचा अर्थ आचार्यांनी "अनाविष्कुर्वन्नन्वयात्" (ब्र. सू. ३-४-५०) या सूत्रांतील भाष्यांत केला आहे.

अर्थात् गुरुसेवकाचें बालपण म्हणजे ज्ञानाहंकाररहित असणें होय. या ज्ञानाहंकाररहिततेमुळेच सेवकाचें आंगी दंभदर्पादिरहित असणें, मनइंद्रियादिक देहाच्या सुखाकरितां विषयाकडे न धांवतां शांत असणें, हर्ष-दुःख, मान-अपमान, इत्यादि द्वंद्वाचे ठिकाणी चित्ताची समता असणें हे सर्व गुण सहज बाणतात व आत्मसुखाची प्राप्ति होते.

हे सर्व श्रीगुरुच्या कृपेनेच साधले जाते, हें 'लेवविसी' या शब्दाने माउलीनी सुचविलें आहे.

**सतरावियेचें स्तन्य देसी। अनाहताचा हल्लरु गासी। समाधिबोधें निजविसी। बुझाउनि॥ ७॥**

**अर्थ**—(तसेंच) त्याला सतराव्या अमृत कलेचें स्तन्य पाजून अनाहताचें गाणें गातेस आणि ऐक्यज्ञानाच्या उपदेशाने त्याचें समाधान करून त्याला समाधि साधून देतेस व निजवितेस॥ ७॥

**गूढार्थदीपिका—सतरावियेचें स्तन्य देसी**—सतरावी-म्हणजे योगशास्त्रांतील अमृतकलां. तिचें स्तन्य म्हणजे दुग्ध.

चंद्राच्या सोळा कला सांगितल्या आहेत. कृष्णपक्षांत एक एक कला क्षीण होऊन अमावस्येला तो चंद्र दिसेनासा होतो व शुक्लपक्षांत एक एक कला वाढत जाऊन पौर्णिमेला सोळा कलांनी तो पूर्ण होतो, असे आपणाला

दिसते. पण हे सर्व पृथ्वीच्या उपाधीमुळे आहे. वास्तविक चंद्र हा अखंड सोळा कलांनी पूर्णच असतो. ही त्याची अखंड पूर्णता सतरावी कला म्हटली जाते.

त्याप्रमाणेच देहउपाधीने जीवाचे ठिकाणी भासणारे जन्ममृत्यु नाहीसे होऊन, तो जीव ज्या स्थितीत आपलें मूळचें अविनाशित्वाचें सुख अनुभवितो, त्या स्थितीला सतरावी कला म्हणतात व त्या सुखभोगाला अमृतपान म्हणतात.

**अनाहताचा हल्लर गासी**—अनाहतनादाचें निरूपण मागें सहाव्या अध्यायांत आम्ही केलेंच आहे.

**समाधिबोधें निजविसी—समाधिबोधें**-म्हणजे जीवब्रह्मैक्यज्ञान करून देऊन.

**निजविसी**—म्हणजे संसारसुख भासूं देत नाहींस.

**बुझाउनी**—म्हणजे आत्मव्यतिरिक्त सर्व मिथ्या आहे-म्हणजे मुळीच नाही-या ज्ञानाने त्याचें समाधान करून.

ज्याप्रमाणे लहान मुलाचा अपल्या आईच्या वचनावर विकल्परहित विश्वास असतो, त्याप्रमाणे सद्‍गुरुवचनावर अत्यंत विश्वास असणाऱ्या शिष्याला वरील सर्व योगसुखाचा अनायासें लाभ होतो. आपल्या बुद्धीने स्वतंत्रपणें विचार करून झालेल्या ज्ञानाचा लाभ, बुद्धीतच विकल्पहि उठत असल्यामुळे लवकर दृढ होत नाही; पण श्रद्धेच्या योगाने झालेला लाभ मात्र तात्काळ दृढ व विकल्परहित होतो.

"**एक श्रीगुरु नसतां शिरावरी। निद्राचि लागें समाधि अवसरी।**" (श्रीगुलाबराव महाराजकृत यष्टि-१४. पा. १४७)

श्रीगुरुकृपेवांचून ब्रह्मज्ञान होंत नाही व समाधिहि साधत नाही, असा भाव.

**म्हणोनि साधकां तूं माउली। पिके सारस्वत तुझियां पाउलीं। याकारणें मी साउली। न संडीं तुझी॥ ८॥**

**अर्थ**—म्हणून, हे सद्‍गुरु आई! तूं साधकाची सतत कृपादृष्टीने सांभाळ करणारी आई आहेस, तुझे चरण ज्या साधकाच्या हृदयांत राहतील, त्याला सर्व प्रकारच्या विद्या प्राप्त होतात. यास्तव मी तुझ्या कृपेची सावली सोडत नाही॥ ८॥

**गूढार्थदीपिका—पिके सारस्वत तुझिया पाउली**—ज्ञानभक्तीची पूर्ण प्राप्ति झालेल्या श्रीगुरुच्या कृपेने देखील साधक निष्णात साहित्यिक होतो, हें श्रीज्ञानेश्वरमाऊलीचे विधान, अतिशयोक्तीचे नसून, यथार्थ आहे. कारण, भगवान जसा सत्यसंकल्प आहे, तसें त्याचे प्रेमळभक्तहि सत्यसंकल्पच असतात. पांच वर्षाचा ध्रुवबाळ, पण भगवंतांनी आपल्या शंखाचा, त्याच्या गालाला स्पर्श केल्याबरोबर, तो भगवंताची स्तुति करूं लागला. तुकाराम महाराजांनी एकाला बारा अभंगाच्या पठणाने महापंडित करून सोडलें. स्वत: श्रीज्ञानेश्वर महाराजांनी रेड्यामुखी वेद बोलविलें. ही उदाहरणें सर्वश्रुतच आहेत.

समर्थ श्रीगुरु, ज्याच्या विषयी 'हा निष्णात साहित्यिक होवो' असा संकल्प करतील तो, तात्काळ तसा होऊं शकतो.

**अहो सद्‍गुरूचिये कृपादृष्टी। तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी। तो सकळ विद्यांचिये सृष्टी। धात्रा होय॥ ९॥**

**अर्थ**—हे सद्‍गुरुचे कृपादृष्टि! तुझ्या करुणेला जो आश्रय होईल, तो सृष्टि निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणे नाना विद्यांची सृष्टि निर्माण करणारा ब्रह्मदेव होतो॥ ९॥

**गूढार्थदीपिका**—पण हा प्रसाद प्राप्त करून घेण्याकरितां, अत्यंत श्रद्धेने श्रीगुरुच्या सर्वस्वी स्वाधीन होऊन जाणें, असा शिष्याचा प्रयत्न मात्र असायला पाहिजे.

**म्हणोनि अंबे श्रीमंते। निजजनकल्पलते आज्ञापीं मातें। ग्रंथनिरूपणीं॥ १०॥**

**अर्थ**—म्हणून हे माते! परमेश्वराप्रमाणे तू षड्‍गुणैश्वर्यसंपन्न असल्यामुळे श्रीमंत आहेस आणि म्हणूनच आपल्या भक्तजनांची कामना पूर्ण करणारा कल्पतरु आहेस. (आतां) मला ग्रंथ निरूपण करण्याला आज्ञा कर॥ १०॥

**नवरसीं भरवीं सागरु। करवीं उचित रत्नांचे आगरु। भावार्थाचे गिरिवरु। निफजवीं माये॥ ११॥**

**साहित्यसोनियाचिया खाणी। उघडवीं देशियेचिया क्षोणी। विवेकवल्लीची लावणी। हो देईं सैंघ॥ १२॥**

**संवादफळनिधानें। प्रमेयांचीं उद्यानें। लावीं म्हणे गहनें। निरंतर॥ १३॥**
**पाखांडाचे दरकुटे। मोडीं वाग्वादअव्हांटे। कुतर्काचीं दुष्टें। सावजें फेडीं॥ १४॥**

**अर्थ—**माझें हें निरूपण नवरस सागरांनी भरून जाऊ दे-म्हणजे माझ्या निरूपणांत नवहि रस अमर्याद भरलेले असूं दे. वेदान्तमान्य अशा सिद्धान्तरूप रत्नांचे तें भांडारगृह कर व त्यांतून गूढार्थाचे मोठमोठे पर्वत निर्माण कर॥११॥ या माझ्या मराठी भाषेच्या भूमींत साहित्य-म्हणजे उपमा, अलंकार इत्यादि-सोन्याच्या खाणी जागोजागीं निघूं दे आणि सर्वत्र आत्मानात्मविवेकरूपी वेलींची लागवण होऊं दे॥ १२॥ (संवाद म्हणजे विरोधि वाक्यांची एकवाक्यता) या संवादरूपी फळाला आश्रयस्थान होणाऱ्या सिद्धान्ताच्या मोठमोठ्या बागा सर्वकाळ लाव-म्हणजे पूर्वोत्तर निरूपणांत परस्पर विरोध राहील व सिद्धान्ताला बाध येईल असें निरूपण होऊं देऊं नकोस॥ १३॥ पाखांड-म्हणजे श्रुतिस्मृतिपुराणे यांना सोडून असणारे विचार, ह्याच कोणी दऱ्या आणि वितंडवादाच्या आडवाटा यांचा विध्वंस कर. कुतर्क-म्हणजे प्रमाणावर उभारले नसलेले तर्क--हेच कोणी हिंसक प्राणी, यांचा नायनाट कर-म्हणजे नास्तिक विचारांचा, वितंडवादाचा व कुतर्कांचा सहज नाश होईल असे माझें निरूपण होऊं दे!॥ १४॥

**गूढार्थदीपिका—**वरील ११ ते १४ ओव्यांतून श्रीज्ञानेश्वरमाऊलींनी अध्यात्मग्रंथ कसा असावा याविषयीं आपलें थोडक्यांत मत दिलें आहे, तें असें—

(१) ग्रंथ शक्य तो साहित्यसंपन्न असून त्यांतून वाचकांच्या मनावर श्रद्धा, प्रेम, यथार्थबोध व आत्मानात्मविवेक यांचा वारंवार ठसा उमटत जावा.

(२) त्यांत पूर्वापार विधानांचा विरोध न दाखवितां, त्यांची एकवाक्यता केलेली असावी.

(३) त्यांत ठिकठिकाणी सिद्धान्त सांगितलेले असावेत.

(४) वेदबाह्यमते, शुष्कवाद, कुतर्क या सर्वांचें त्यांत खंडन असून भगवंताच्या गुणानुवादाने तो भरलेला असावा.

अशाच ग्रंथाच्या श्रवणाने श्रोता ब्रह्मसुखाचा भागी होतो. श्रीसमर्थानीहि "जेणे परमार्थ वाढे। आंगीं अनुताप चढे। भक्तिसाधन आवडे। त्या नांव ग्रंथ॥ ३०॥ जेणें परत्रसाधन। जेणे ग्रंथे होय ज्ञान। जेणें होईजे पावन। या नांव ग्रंथ॥ ३३॥" (दासबोध द. ७-९) या ओव्यांतून हाच भाव प्रगट केला आहे.

**श्रीकृष्णगुणीं मातें। सर्वत्र करीं वो सरतें। राणिवे बैसवीं श्रोते। श्रवणाचिये॥ १५॥**

**अर्थ—**सर्वत्र श्रीकृष्णाचे गुणवर्णन करण्यांत मला उल्हास वाटेल, असे कर आणि श्रोतेजनांना एकाग्र श्रवणांच्या राज्यावर बसव-म्हणजे श्रोत्यांकडून अत्यंत एकाग्रतेने श्रवण होऊं दे॥ १५॥

**गूढार्थदीपिका—**"इतर जे प्रापंचिक। हास्यविनोद नवरसिक। हित नव्हे तें पुस्तक। परमार्थासी" (दासबोध द. ७-९) ज्या ग्रंथांत भगवद्गुणानुवाद नाहीत असा साहित्यसंपन्न ग्रंथ असला, तरी तो व्यर्थ आहे, असे समर्थांनी म्हटलें असून भागवतांत "मृषा गिरस्ता ह्यसतीरसत्कथा न कथ्यते यद्भगवानधोक्षजः" (भाग. स्कं. १२-१२-४८) या श्लोकाने हेंच सांगितले आहे. श्रीतुकाराममहाराजहि "गोविंदावांचूनि वदे ज्याची वाणी। हागवण घाणी पिटपिट ते" (तु. गा. २७८४) या अभंगात असेंच म्हणतात.

**ये म्हाठियेचियां नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं। घेणें देणें सुखचिवरी। हों देईं या जगा॥ १६॥**

**अर्थ—**या मराठी भाषेच्या नगरांत ब्रह्मविद्येचा सुकाळ कर आणि या जगांतील सर्व लोकांचा घेण्यादेण्याचा व्यवहार ब्रह्मसुखाचाच होऊं दे॥ १६॥

**गूढार्थदीपिका—ये म्हाठियेचिया नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळु करी—**श्रीमुकुंदराज महाराज व श्रीज्ञानेश्वर महाराज यांचा अवतार होण्यापूर्वी ब्रह्मविद्या संस्कृत ग्रंथातूनच होती. पुढे या संतमंडळींनी ब्रह्मविद्येचा मराठी भाषेंत सुकाळ करून मराठी भाषिकांवर अनंत उपकार केले आहेत. कोणत्याहि भाषेंतून ब्रह्मविद्या ग्रहण केली तरी ती समफलच देते.

**घेणें देणें सुखचिवरी। हो देईं या जगा**—अद्वैतब्रह्मज्ञान दृढ होऊन सगुण भगवंताच्या प्रेमभक्तींत रंगलेल्या पुरुषांची अद्वैतब्रह्मदृष्टि क्षणभर देखील भंग पावत नसल्यामुळे, त्यांचा व्यवहार म्हणजे ब्रह्माचा ब्रह्माशीं ब्रह्मरूपच व्यवहार होत असतो. अमृतानुभवांतहि श्रीमाऊलींनी "शिव शिव समर्था स्वामी, एवढिये आनंदभूमी। घेपे दीजे एके आम्ही। ऐसें केलें" (अ. प्र. ९) या ओवींत हाच सिद्धान्त मांडला आहे आणि आचार्यादिकांचेहि हेच म्हणणें आहे, सर्व जगाला अशी जीवन्मुक्तस्थिति प्राप्त व्हावीं असें माऊलींनी श्रीगुरुनाथांना आशीर्वचन मागितलें आहे.

**तूं आपुलेनि स्नेहपल्लवें। मातें पांघुरविशील सदैवें। तरि आतांचि हें आघवें। निर्मीन माये॥ १७॥**
**इये विनवणीयेसाठी। अवलोकिलें गुरुकृपादृष्टी। म्हणे गीतार्थेंसीं उठीं। न बोलें बहु॥ १८॥**

**अर्थ**—हे सद्‍गुरु जननी! महद्भाग्यवान पुरुषांनाच प्राप्त होणाऱ्या आपल्या कृपादृष्टिरूप प्रेमपदरानें मला झांकशील, तर वर वर्णन केलेल्या गुणांनी युक्त असें संपूर्ण निरूपण आतांच निर्माण करीन॥ १७॥ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी, अशी सद्‍गुरु निवृत्तिनाथांची प्रार्थना केल्याबरोबर, श्रीनिवृत्तिनाथांनी त्यांच्याकडे कृपादृष्टीने पाहिलें व गीतार्थ सांगण्यास सुरुवात कर, फार बोलू नको, असे ते म्हणाले॥ १८॥

**गूढार्थदीपिका—अवलोकिलें गुरुकृपादृष्टि**—जीवदशा ही सर्व अहंकारयुक्त असते आणि सद्‍गुरुरूप ज्ञानीभक्त, सर्व अहंकाररहित परमेश्वरस्वरूप होऊन राहतात. ही त्यांची अत्यंत आवडती स्थिति असते. शिष्यहि, श्रीगुरुच्या नि:सीम प्रेमाने अत्यंत विनीत होऊन, सर्व अहंकाररहित झाला, की श्रीगुरुची तीं आवडती स्थिति, त्याच्याठिकाणी प्रादुर्भूत होते. हेंच श्रीगुरुचें कृपादृष्टीने अवलोकन करणें होय.

**तेथ जी जी महाप्रसादु। म्हणोनि साविया जाहला आनंदु। आतां निरोपीन प्रबंधु। अवधान दीजे॥ १९॥**

**अर्थ**—श्रीनिवृत्तिनाथांचे वचन ऐकून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, "अहोजी महाराज! हे आपलें म्हणणें म्हणजे महान् प्रसादच आहे" असे म्हणून ते (श्रीज्ञानेश्वर महाराज) फार आनंदित झाले आणि "आतां ग्रंथाचें निरूपण करितो, लक्ष द्यावे" अशी त्यांनी प्रार्थना केली॥ १९॥

*अर्जुन उवाच*

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते। ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमा:॥ १॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला—मागें सांगितल्याप्रमाणे, तुझ्या एकदेशीय सगुणस्वरूपाप्रीत्यर्थ नामस्मरणध्यानादि योगाने तुझ्या सगुणस्वरूपाशी एकरूप होऊन जे भक्त तुझी उपासना करतात आणि जे तुझ्या अविनाशी अशा विश्वरूपाची उपासना करतात, त्या दोघांमध्ये तुझ्याशी अत्यंत समरस ऐक्य कोण पावतात?॥ १॥

**गूढार्थदीपिका-योगवित्तमा:**—येथील "योगवित्तमा:" या शब्दयोजनेचा असा भाव आहे—

परब्रह्म सच्चिदानंदरूप असून, तें निरवयव, अस्फुट व अविकारी-म्हणजे न बदलणारे-आहे, त्याला आपल्या स्वरूपाची जाणीवहि नाही, असें तें अद्वैत आहे. जीवाचे हेंच मूळचें स्वरूप आहे. पण अविद्याभ्रांतीने, तो आपल्याला ब्रह्माहून निराळा आणि अपूर्ण असे समजतो. आत्मज्ञानाने ही भ्रांति नाहीशी होऊन, मी ब्रह्मस्वरूप आहे" अशी ब्रह्मैक्याची जाणीव उत्पन्न होते. ही जाणीव ज्याला उत्पन्न झाली, त्याला "योगवित्" म्हणतात. आणि ही ऐक्याची जाणीवहि नाहीशी होऊन मूळची जाणीवरहित ऐक्यस्थिति ज्याला प्राप्त होते, त्याला "योगवित्तम" म्हणतात.

**तरि सकळवीराधिराजु। जो सोमवंशीं विजयध्वजु। तो बोलता जाहला आत्मजु। पांडुनृपाचा॥ २०॥**
**कृष्णातें म्हणे अवधारिलें। आपण विश्वरूप मज दाविलें। तंव नवल म्हणोनि बिहालें। चित्त माझें॥ २१॥**

**अर्थ**—नंतर संपूर्ण पराक्रमी वीरांमध्ये श्रेष्ठ व जो सोमवंशांतील विजयरूपी ध्वजच होय, असा तो पांडुराजाचा पुत्र अर्जुन भगवंताला म्हणाला॥ २०॥ भगवन श्रीकृष्णाला अर्जुन म्हणतो, ऐकले का देवा! आपण मला जें विश्वरूप दाखविलें, तें पूर्वी कधी न पाहिलेलें असें अद्भुतच होतें; म्हणून तें पाहिल्याबरोबर माझ्या चित्ताला भीति वाटली॥ २१॥

**गूढार्थदीपिका**—विश्वरूप हे प्रेमाचें आलंबन होऊं शकत नाही, हें अर्जुनाने या उद्‍गारावरून स्पष्ट केलें आहे.

**आणि यें कृष्णमूर्तीची सवें। यालागीं सोय धरिली जीवें। तंव नको म्हणोनि देवें। वारिलें मातें॥ २२॥**
**तरि व्यक्त आणि अव्यक्त। हें तूंचि एक निभ्रांत। भक्तीं पाविजे व्यक्त। अव्यक्त योगें॥ २३॥**

**अर्थ**—आणि या तुमच्या श्रीकृष्णमूर्तीच्या सहवासाचा सतत अभ्यास व गोडी असल्यामुळे ती पाहण्याचाच मला ध्यास लागला; पण तसें करणें चांगलें नव्हे, म्हणून आपण मला परावृत्त केले॥ २२॥ पण तुझें व्यक्त-म्हणजे एकदेशीय श्रीकृष्णस्वरूप-व अव्यक्त विश्वरूप हे दोन्ही नि:संशय तूच एक आहेस. भक्तीने तुझें व्यक्तस्वरूप प्राप्त होतें व योगाने तुझें अव्यक्त विश्वरूप प्राप्त होतें॥ २३॥

**गूढार्थदीपिका—तरि व्यक्त आणि अव्यक्त**—मागें अकराव्या अध्यायांत भगवंतांनी अर्जुनाला विश्वरूप दाखविल्यावर भगवंताच्या एकदेशीय श्रीकृष्णस्वरूपाच्या सुखानुभवांत व विश्वरूपाच्या सुखानुभवांत जो फरक आढळून आला, त्याची शहानिशा करण्याकरितांच बाराव्या अध्यायांत अर्जुनाने शंका विचारली असल्यामुळे, येथे "व्यक्त" या शब्दाने भगवंताच्या एकदेशीय श्रीकृष्णस्वरूपाचा व "अव्यक्त" या शब्दाने व्यापक विश्वस्वरूपाचाच उल्लेख केला आहे, हें उघड आहे.

**हें तूंचि एक निभ्रांत**—अव्यक्त विश्वरूप व व्यक्त श्रीकृष्णस्वरूप हीं दोन्ही एका अस्फुट, अद्वैत अशा पूर्ण सच्चिदानंद परब्रह्माचींच रूपें आहेत. या दोहोत सच्चिदानंद भगवंतावाचून दुसरें कांहीच राहूं शकत नाही; म्हणून व्यक्त आणि अव्यक्त दोन्ही भगवंतच आहे, असा भाव.

**भक्तीं पाविजे व्यक्त**—भगवंताचें सगुण, साकार, श्रीकृष्णस्वरूप परब्रह्माच्या ब्रह्मानंदाची मूर्ति किंवा परमप्रेमाची मूर्ति असल्यामुळे ती भक्तिरूप परमप्रेमानेच प्राप्त होते.

**अव्यक्त योगें**—आणि अव्यक्त विश्वरूप चैतन्याचा नामरूपात्मकविलास असल्यामुळेच त्याची प्राप्ति ज्ञानयोगाने होते.

**या दोनी जी वाटा। तूंतें पाववया वैकुंठा। व्यक्ताव्यक्त दारवंठा। रिगिजे येथ॥ २४॥**

**अर्थ**—हे वैकुंठनाथा! तुझ्याशीं ऐक्य पावण्याकरितां भक्तियोग व ज्ञानयोग असे दोन मार्ग असून तुझें एकदेशीय सगुण-साकारस्वरूप व अव्यक्त विश्वरूप हे अनुक्रमें, त्या मार्गाचे दोन दारवंठे आहेत. त्या दारवंठ्यांनी तुझ्या ठिकाणी येतां येते॥ २४॥

**गूढार्थदीपिका—तूतें**-एकदेशीय भगवान श्रीकृष्ण व पूर्ण परब्रह्मस्थिति हे दोन्ही अत्यंत अभिन्न आहेत, हे "तूतें" या शब्दाने दाखविलें आहे.

**पाववया**—म्हणजे तद्रूप होण्याकरितां.

**व्यक्ताव्यक्त दारवंठा**—भगवंताच्या ज्या पूर्ण ब्रह्मस्थितीशी ऐक्य पाववयाचे, त्या पूर्ण ब्रह्मस्थितीचे, ही दोन्ही रूपें दारवंठे आहेत, असें येथे म्हटले आहे; पण त्याचा अर्थ, पूर्ण ब्रह्मस्थिति व व्यक्त-अव्यक्तरूपें हीं दोन्हीं निराळीं आहेत, असा नसून, ज्याप्रमाणे दारवंठा हा घराचाच भाग असतो; म्हणून त्यांत शिरणे म्हणजे घरांतच शिरणें होतें किंवा समुद्रावर उठणारी लाट समुद्राचाच भाग असतो, म्हणून त्यांत शिरलेला मनुष्य समुद्रांतच शिरतो, त्याप्रमाणे अव्यक्त किंवा व्यक्त हीं दोन्ही स्वरूपें पूर्णब्रह्म अशीं विवर्तरूपेंच असल्यामुळे त्यांच्यांत शिरणें म्हणजे पूर्ण ब्रह्मस्थितीशी ऐक्य पावणेंच होय; असा त्याचा अर्थ आहे.

**पैं जे वानी श्यातुका। तेचि वेगळिया वाला येका। म्हणोनि एकदेशीया व्यापका। सरिसा पाड॥ २५॥**
**अमृताचिया सागरीं। जे लाभे सामर्थ्याची थोरी। तेचि दे अमृतलहरी। चुळीं घेतलिया॥ २६॥**

**अर्थ**—पण एका शंभर नंबरी सोन्याच्या लगडीला जो कस असतो; तोच कस त्याच्यांतून तोडलेल्या वालभर सोन्याचा असतो; म्हणून तुझें एकदेशीय, डोळ्यांनी दिसणारें व्यक्तस्वरूप आणि तुझें व्यापक विश्वरूप यांची सारखीच योग्यता आहे॥ २५॥ अमृताच्या समुद्रांत अमर करण्याचें जें थोर सामर्थ्य असतें, तेंच त्याच्या एका लहरींतून निघालेल्या चूळभर अमृतांतहि असतें॥ २६॥

**हे कीर माझां चित्तीं। प्रतीति आथि जी निरुती। परि पुसणें योगपती। तें याचिलागीं॥ २७॥**
**जें देवा तुम्हीं नावेक। अंगिकारिलें व्यापक। तें साचचि कीं कवतिक। हें जाणावया॥ २८॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, भगवंता! त्याप्रमाणेच तुझीं व्यक्त व अव्यक्त हीं दोन्हीं स्वरूपें पूर्ण ब्रह्मस्वरूप आहेत, असाच माझ्या चित्ताचा निश्चित् अनुभव आहे; पण योगपति देवा! तुम्ही जें थोडा वेळ व्यापकरूप धारण केलें, तेंच तुमचें खरें स्वरूप होय, की क्षणभर त्या स्वरूपाचें लीला-कौतुक मला दाखविलें, हें जाणून घेण्याकरितां मी पुढील प्रश्न विचारीत आहे॥ २७-२८॥

**तरि तुजलागीं कर्म। तूंचि जयांचें परम। भक्तीसि मनोधर्म। विकोनि घातला॥ २९॥**
**इत्यादि सर्वोपरी। जे भक्त तूंतें श्रीहरी। बांधोनियां जिव्हारीं। उपासिती॥ ३०॥**
**आणि जें प्रणवापैलीकडे। वैखरीयेसि जें कानडें। कायिसयाहि सांगडें। नव्हेंचि जें वस्तु॥ ३१॥**
**तें अक्षर जी अव्यक्त। निर्देश देशरहित। सोहंभावें उपासित। ज्ञानिये जे॥ ३२॥**

**अर्थ**—ज्यांचीं सर्व कर्मे तुझ्याकरितां होतात, जे तुलाच आपली परमगति समजतात, ज्यांचे सर्व मनोविकार देखील तुझ्या एका प्रेमाकरितांच उठतात॥ २९॥ हे भगवंता! याप्रमाणे तुझ्याठिकाणीं सर्वभाव समर्पण करून व तुला अंत:करणांत सांठवून, जे भक्त तुझ्या एकदेशीय साकारस्वरूपाची उपासना करतात॥ ३०॥ आणि जे ज्ञानीपुरुष प्रणवाच्या पलीकडे असलेल्या, शब्दाचा विषय न होणाऱ्या, किंवा जे कशासारखे आहे असे दाखवितां न येणाऱ्या, अविनाशी, इंद्रियातीत, संपूर्ण दोषरहित—म्हणजे शुद्ध-व देशांनी मर्यादित नसलेल्या, तुझ्या व्यापक स्वरूपाची सोहंभावाने म्हणजे ''मी तें ब्रह्म आहे'' अशा ध्यानाने उपासना करतात॥ ३१-३२॥

**गूढार्थदीपिका**—सगुणस्वरूपाची भक्ति करणाऱ्या भक्तांची, परम प्रेमामुळे जाणीवरहित भगवदाकारता असते आणि ज्ञान्याचे, अव्यक्तस्वरूपाशीं ''मी तें स्वरूप आहे'' अशा जाणीवेने ऐक्य केलें जातें; हा जो भक्ताच्या व ज्ञान्याच्या भगवदैक्यस्थितींत फरक असतो, तो येथे ३० ते ३२ पर्यंतच्या ओव्यांतून माऊलींनी दाखविला आहे.

**तयां आणि जी भक्तां। येरयेरांमाजीं अनंता। कवणें योगु तत्त्वता। जाणितला सांगा॥ ३३॥**
**इया किरीटीचिया बोला। तो जगद्बंधु संतोषला। म्हणे हो प्रश्नु भला। जाणसी करूं॥ ३४॥**

**अर्थ**—असे हे ज्ञानी आणि भक्त या दोहोंमध्यें, हे अनंता! खरें ऐक्याचें स्वरूप कोण जाणतो, हे मला सांग॥ ३३॥ असे अर्जुनाचें भाषण ऐकून तो जगद्बंधु परमात्मा श्रीकृष्ण अत्यंत संतुष्ट झाला व म्हणाला अर्जुना! उत्तम प्रश्न कसा करावा हें तूंच जाणतोस॥ ३४॥

*श्रीभगवानुवाच*

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते। श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मता:॥ २॥**

**अर्थ**—माझ्या एकदेशी सगुण श्रीकृष्ण स्वरूपाचे ठिकाणीच मन लावून व सर्व कर्मे मत्प्रीत्यर्थ करून, जे माझी परम प्रेमाने उपासना करतात, त्यांचेच ठिकाणी माझें मूळचें जाणीवरहित ऐक्य झालेलें असतें असे मी समजतों॥ २॥

**अवतरणिका—भगवंतांनी व श्रीज्ञानेश्वर माउलींनी ''श्रद्धा'' हा शब्द ''प्रेम'' या अर्थी वापरला आहे.**

**तरि अस्तुगिरीचियां उपकंठीं। रिगालिया रविबिंबापाठीं। रश्मी जैसे किरीटी। संचरती॥ ३५॥**

**अर्थ**—सूर्यबिंब अस्ताचलाच्या आड झाले असतां, सूर्यबिंबाच्यामागून ज्याप्रमाणे अर्जुना! त्याचीं किरणेंहि जातात॥ ३५॥

**का वर्षाकाळीं सरिता। जैसी चढों लागें पांडुसुता। तैसी नीच नवी भजतां। श्रद्धा दिसे॥ ३६॥**

**अर्थ**—किंवा अर्जुना! पावसाळ्यांत जसा नदीला पूर येतो, त्याप्रमाणे माझें भजन करीत असतांना ज्याचे ठिकाणी नित्य नवी श्रद्धा किंवा वाढतें प्रेम दिसून येतें॥ ३६॥

**गूढार्थदीपिका—नीच नवी.......श्रद्धा दिसे**—प्रथम क्षणीं जशी उत्कंठा असते, तशीच ती उत्कंठा पुढे देखील

प्रतिक्षणीं कायम राहणें याला "नीच नवी श्रद्धा" म्हणतात.

केलें पाहिजे म्हणून जें केलें जात नाही व जें कितीहि केलें तरी पुरें झालें असें वाटत नाही, किंबहुना जाणून अथवा न जाणून जें करावेसें वाटते, अशा स्वाभाविक प्रेमाला परम प्रेम म्हणतात.

"**भक्त म्हणवितां गोड वाटे। परि मजलागीं जैं कां हृदय फुटे। अकृत्रिम भक्ति जैं उमटे। तैं मी भेटे उद्धवा**"॥ १३२६॥ (ए. भा. अ. ११) यालाच अकृत्रिम भक्ति म्हणतात. या परमभक्तींत क्षणभर देखील भगवंताचा वियोग सहन होत नाही. एवढेच नाही तर भगवंताच्या वियोगाच्या कल्पनेने देखील भक्तांचें हृदय फुटते, असे नाथांनी म्हटले आहे.

वर्षाकालांत जसा नदीला पूर येतो, त्याप्रमाणेच प्रेम वाढतां वाढतां-क्रमाने भक्तांना परमप्रेमाची दशा प्राप्त होते.

**परि ठाकिलियाहि सागरु। जैसा मागीलही यावा अनिवारु। तिये गंगेचिये ऐसा पडिभरु। प्रेमभावा॥ ३७॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गंगा समुद्रास मिळाल्यानंतरहि तिच्या मागच्या प्रवाहाचे वेग सारखे वाहतच असतात, त्याप्रमाणे ज्याच्या प्रेमभावाचा भगवंताकडे अखंड सारखा वेग असतो॥ ३७॥

**गूढार्थदीपिका**—भक्तीने सगुण भगवंताशी ऐक्य पावलेल्या भक्तांचा प्रेमप्रवाह बंद न पडतां, पूर्वीप्रमाणेच सारखा चालू राहतो. अशा या प्रेमभक्तीने भक्ताची जाणीवरहित, निर्विकल्प व अनिर्वाच्य स्थिति होते. हीच त्याची मूळची स्थिति होय, हें मागें आम्हीं सांगितलेंच आहे.

**तैसें सर्वेंद्रियांसहित। मजमाजी सूनि चित्त। जे रात्री दिवस न म्हणत। उपासिती॥ ३८॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे सर्व इंद्रियांसह माझ्या ठिकाणी चित्त ठेऊन-म्हणजे एका मलाच आपल्या सर्व इंद्रियांसह मनाचा विषय करून-जे अहोरात्र न पाहतां माझी उपासना करतात॥ ३८॥

**गूढार्थदीपिका**—या ओवींतून भक्ताच्या एकनिष्ठतेचें वर्णन केलें आहे. ज्याप्रमाणे अज्ञानी लोकांच्या अहोरात्रींच्या यच्चयावत् सर्व व्यवहारांचा देहसुख पाहणें, हाच एक उद्देश असतो, त्याप्रमाणे भक्तांचीं सर्व इंद्रियें, मन यांचा विषय एक परमात्माच असून त्याच्या सुखाच्या उद्देशानेच भक्तांचे यच्चयावत् व्यापार होतात, असा अर्थ. "**विषय तो त्यांचा झाला नारायण। नावडे धन जन माता पिता**" (तु. गा. अ. १९९७)

**इयापरी जे भक्त। आपणपें मज देत। तेचि मी योगयुक्त। परम मानीं॥ ३९॥**

**अर्थ**—याप्रमाणे ज्या भक्तांनी आपल्याला माझ्या ठिकाणी संपूर्ण समर्पण केलें, तेच माझ्याशीं अत्यंत ऐक्य पावले, असे मी समजतो.॥ ३९॥

**गूढार्थदीपिका—आपणपें मज देत**—जीवाला ही अशी जाणीवरहित परम प्रेमरूप निर्विकल्पस्थिति प्राप्त झाली, की तो ऐक्याच्या जाणीवेवांचून सर्वस्वीं भगवंतांत मिळून जात असल्यामुळे युक्ततम किंवा परमयुक्त म्हटला जातो.

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते। सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम्॥ ३॥**
**सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः। ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः॥ ४॥**

**अर्थ**—दुसरें, आपल्यापासून प्राणिमात्राला सुख व्हावें अशा बुद्धीने वागून किंवा सर्व भूतमात्रांचे समानसुखरूप असें जें परब्रह्म, त्याचेच ठिकाणी रममाण होऊन, सर्व इंद्रियांचा निरोध करून व सर्वत्र समबुद्धि धारण करून, जे पुरुष, अविनाशी, शब्दाने सांगतां न येण्याजोगे, इंद्रियातीत, सर्वत्र व्यापक, मनानेहि ज्याचें चिंतन करतां येत नाही, सदासर्वदा एकसारखे राहणाऱ्या अशा अविकारी, स्थिर व नित्य परब्रह्माची उपासना करतात, तेही मलाच प्राप्त होतात॥ ३-४॥

**अवतरणिका—निर्गुणस्वरूपाची प्राप्ती करून घेणाऱ्याला "अहं ब्रह्मास्मि" या वृत्तीच्या द्वाराच ऐक्याचें चिंतन किंवा ध्यान कां करावें लागतें व त्यांच्या चित्ताची निर्गुणस्वरूपाशीं तद्रूपता का होऊं शकत नाही, हें आतां माऊली पुढें सांगत आहेत.**

**आणि येर तेही पांडवा। जे आरूढोनि सोहंभावा। झोंबती निरवयवा। अक्षरासी॥ ४० ॥**

**अर्थ—**अर्जुना! आणि दुसरें जे "ब्रह्म मी आहे" अशा वृत्तीचा अभिमान धरून निरवयव व अविनाशी अशा ब्रह्मस्वरूपाला कवटाळतात॥ ४० ॥

**गूढार्थदीपिका—**मागील श्लोकांत, एकदेशीय सगुण श्रीकृष्णस्वरूपाचीं भक्ति करणारे युक्ततम होतात असे जसे म्हटलें आहे, तसे निरवयव अशा ब्रह्माची "मी ते ब्रह्म आहे" अशी ऐक्याची जाणीव ठेवून ध्यानाने ऐक्य करणारे निर्गुण उपासक युक्ततम होतात, असे म्हटलें नाही. आणि तसे न म्हणण्याचें कारण, त्यांचे ठिकाणी अहंभाव व अहंभावामुळे जाणीव, यांचा भास कायम राहतो, हें होय.

**मनाची नखी न लगे। जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे। इंद्रियां कीर जोगें। कायि होईल॥ ४१ ॥**
**परि ध्यानाही कुवाडें। म्हणोनि एकें ठायीं न सांपडे। व्यक्तीसि माजिवडें। कवणेही नोहे॥ ४२ ॥**
**जया सर्वत्र सर्वपणें। सर्वांही काळीं असणें। जें पावूनि चिंतवणें। हिंपुटी जाहलें॥ ४३ ॥**
**जें होय ना नोहे। जें नाहीं ना आहे। ऐसें म्हणोनि उपाये। उपजतीचिना॥ ४४ ॥**
**जें चळे ना ढळे। सरे ना मैळे। तें आपुलेनीचि बळें। आंगविलें जिहीं॥ ४५ ॥**

**अर्थ—**ज्या अव्यक्त परब्रह्मवस्तुचे ठिकाणी मनाचा स्पर्श देखील होऊं शकत नाही व बुद्धीची दृष्टि प्रवेश करूं शकत नाही, मग तें इंद्रियांनी ग्रहण करण्याजोगें होईल काय?॥ ४१ ॥ इतकेंच नाही, तर ती एखाद्या मर्यादित वस्तुरूपानेच प्राप्त करून घेण्याजोगी नसल्यामुळे, त्याचें ध्यानहि होणें शक्य नाही॥ ४२ ॥ जी वस्तु सर्वत्र, सर्वभावाने व सर्वकाळीं आहे असें पाहून, चिंतनहि अत्यंत कष्टी होते-म्हणजे चिंतनहि करतां येंत नाही॥ ४३ ॥ जी उत्पन्न होत नाही किंवा नाहीशी होत नाही, जी नाही किंवा आहे म्हणतां येत नाही. असे असल्यामुळे जिच्या प्राप्तीचे उपायच उत्पन्न होत नाहीत॥ ४४ ॥ जी इकडे तिकडे क्षुब्ध पावत नाही किंवा हालत नाही आणि जी संपत नाही व मलीनहि होत नाही, अशी ती परब्रह्मवस्तु ज्यांनी "तेंच मी आहे" या वृत्तीच्या अभ्यासबळाने आपल्या ठिकाणी प्राप्त करून घेतली॥ ४५ ॥

**अवतरणिका—निर्गुण परब्रह्माच्या तद्रूपतेचा अनुभव घेण्याकरितां योगाभ्यासच केला पाहिजे असे माऊली पुढें सांगत आहेत.**

**पैं वैराग्यमहापावकें। जाळूनि विषयांचीं कटकें। अधपलीं तवकें। इंद्रियें धरिलीं॥ ४६ ॥**
**मग संयमाची धाटी। सूनि मुरडिलीं उफराटीं। इंद्रियें कोंडिलीं कपाटीं। हृदयाचिया॥ ४७ ॥**
**अपानींचिया तोंडा। लावोनि आसनमुद्रा सुहाडा। मूळबंधाचा हुडा। पन्नासिला॥ ४८ ॥**
**आशेचे लाग तोडिले। अधैर्याचे कडे झाडिले। निद्रेचें शोधिलें। काळवखें॥ ४९ ॥**
**वज्राग्नीचियां ज्वाळीं। करूनि सप्तधातूंची होळी। व्याधींच्या सिसाळीं। पूजिलीं यंत्रें॥ ५० ॥**

**अर्थ—**ज्यांनी वैराग्यरूपी अत्यंत प्रखर अग्नींत पंचविषयांचे समूह जाळून, त्या अग्नीने होरपळलेलीं इंद्रियें धैर्याने आवरून ठेवलीं॥ ४६ ॥ आणि ज्यानी मग त्यांना संयमाच्या (धारणा, ध्यान व समाधि यांच्या) मार्गांत घालून-म्हणजे त्यांना त्यांचा (संयमाचा) अभ्यास लावून हृदयाकडे मुरडवून हृदयाच्या पोकळींत कोंडले॥ ४७ ॥ ज्यांनी अपानवायूच्या तोंडाशीं वज्रासनाची दृढ मुद्रा लावून मूळबंधाचा किल्ला बांधला॥ ४८ ॥ ज्यानी आशेचे संबंध तोडून टाकलें, घाबरटपणाचे कडे नाहीसे केलें आणि तिचा काळोख नाहीसा केला-म्हणजे अहंवृत्तीला सुषुप्तिरूपी अज्ञानांत लीन होऊं दिलें नाही॥ ४९ ॥ वज्रासनाच्या योगाने पेटलेल्या अग्नीच्या ज्वाळेंत सप्त धातु (रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व रेत) यांची होळी करून व्याधींच्या मुंडक्यांचे यंत्रांना बळीदेऊन त्यांचें पूजन केलें-म्हणजे पोटांतील घाण नाहीशी करून सर्व रोगांचा उद्भवच नाहीसा केला॥ ५० ॥

**गूढार्थदीपिका—**अशा रीतीने योग्यांच्या स्थूलदेहांचें निरसन होतें, हें येथें सांगितलें आहे.

**मग कुंडलिनियेचा टेंभा। आधारीं केला उभा। तया चोजवलें प्रभा। निमथावरी॥ ५१ ॥**

**नवद्वारांचिया चौचकीं। बाणूनि संयतीची आडवंकी। उघडली खिडकी। ककारांतींची॥५२॥**
**प्राणशक्तिचांमुडे। प्रहारूनि संकल्पमेंढे। मनोमहिषाचेनि मुंडें। दिधलीं बळी॥५३॥**

**अर्थ**—आणि मग, त्याच वज्राग्नीच्या प्रखर उष्णतेने तेजस्वी झालेल्या कुंडलिनीशक्तीचा टेंभा, आधारचक्रावर उभा करून, त्याच्या योगाने ब्रह्मरंध्रापर्यंतचा सुषुम्नानाडीचा मार्ग ज्यांनी प्रकाशित केला॥५१॥ शरीराच्या नवद्वारांच्या कवाडांना निग्रहाची खीळ घालून, ककारांतीची खिडकी (म्हणजे हृदयापासून ब्रह्मरंध्रापर्यंत गेलेल्या सुषुम्नानाडीचे शेवटील द्वार) उघडी केली॥५२॥ प्राणशक्ति हीच कोणी चामुंडादेवी, तिला संकल्परूपी मेंढे मारून मनोरूपी महिषासुराच्या मुंडक्यासह बळी दिले॥५३॥

**गूढार्थदीपिका**—प्राणशक्तीने सुषुम्नानाडींत प्रवेश करून तिची ऊर्ध्व ब्रह्मरंध्राकडे गति होऊं लागली असतां, मन व मनाचे संकल्प विकल्प हे संपूर्ण नाहीसे होतात, असा अर्थ.

**चंद्रसूर्यां बुझावणी। करूनि अनाहताची सुडावणी। सतरावियेचें पाणी। जिंतिलें वेगें॥५४॥**

**अर्थ**—इडा, पिंगळा यांचें ऐक्य करून व अनाहतनादाला स्पष्ट करून, ज्यांनी सतराव्या कलेचे अमृतरूप पाणी वेगाने प्राप्त करून घेतलें॥५४॥

**गूढार्थदीपिका**—चंद्र किंवा इडा नाडी, ही डाव्या नाकपुडीच्या ठिकाणी असून, त्या नाडीवाटे डाव्या नाकपुडींतील वायु वाहत असतो. सूर्य किंवा पिंगळा नाडी, ही उजव्या नाकपुडीच्या ठिकाणी असून, त्या नाडीचे द्वारा उजव्या नाकपुडींतून वायु वाहत असतो. इडा, पिंगळा या नाड्यांचा निग्रह करून-म्हणजे त्यांना आपआपल्या नाडींतून वाहूं न दिले असतां-त्यांची बुझावणी म्हणजे ऐक्य होतें. असें ऐक्य झालें असतां हृदयांतील अनाहतनादहि स्पष्ट ऐकूं येऊं लागतो व सतराव्या कलेचें अमृतपान होतें.

या भूमिकेवर योग्याच्या सूक्ष्म किंवा लिंगदेहाचें निरसन होतें.

**मग मध्यमा मध्यविवरें। तेणें कोरिवें दादरें। ठाकिलें चवरें। ब्रह्मरंध्र॥५५॥**

**अर्थ**—मग मध्यमा-म्हणजे प्राण व अपान या दोन नाड्यांच्या मध्ये असणारी जी सुषुम्ना नाडी-हेच कोणी विवर, त्या विवरांत असणाऱ्या षट्चक्रांच्या पाकळ्या व मात्रा यांनी कोरलेल्या जिन्याने, ज्यांनी सर्वांच्या शेवटीं असलेलें ब्रह्मरंध्र गांठलें.॥५५॥

**वरी मकारांत सोपान। तें सांडोनिया गहन। काखे सूनियां गगन। भरलें ब्रह्मीं॥५६॥**

**अर्थ**—मग, मकारान्त म्हणजे धन-अज्ञानसुषुप्तिरूप जो कारण देह-हीच कोणी पायरी-ही बिकट पायरी ओलांडून, आकाशहि काखेंत मारून, योगी ब्रह्मरूपाशीं ऐक्य पावतो॥५६॥

**गूढार्थदीपिका**—या भूमिकेवर योग्याच्या कारणदेहाचा निरास होतो.

**ऐसे जे समबुद्धी। गिळावया सोहंसिद्धी। आंगविताति निरवधी। योगदुर्गें॥५७॥**

**अर्थ**—अशा रीतीने जे समबुद्धि म्हणजे ब्रह्मबुद्धि होतात, ते "मी ब्रह्म आहे" ही आपली सोहंसिद्धीची जाणीव नाहीशी करण्याकरितां-म्हणजे मूळची जाणीवरहित स्थिति प्राप्त होण्याकरितां-बिकट योगरूपी किल्ले स्वाधीन ठेवण्याचा अखंड-म्हणजे मरेपर्यंत-प्रयत्न करतात॥५७॥

**गूढार्थदीपिका**—ब्रह्मज्ञान्याला योगाभ्यासाचे मरेतोपर्यंत अखंड कष्ट करून, सोहंसिद्धीची जाणीव, समाधीने नाहीशी करावी लागते, तेव्हा ते मरणानंतर जाणीवनेणीवरहित अशा निर्विकल्प विदेहमुक्तीला प्राप्त होतात. पण इतके कष्ट करूनहि प्रकृतीअधीन जीवाला, योगाने किल्ले स्वाधीन करून घेणें अत्यंत दुष्कर असल्यामुळे, अमुक अवधींत ते स्वाधीन होतील असें मुळींच सांगतां येत नाही, हे माऊलींनी "आंगवितातिनिरवधि" या पदाने दाखविलें आहे. मागें सहाव्या अध्यायांतहि योगाचें दु:साध्यत्व सांगतांना माऊलींनी "जया मार्गींचा कापडी। महेश अझूनि" या योगमार्गाचा भगवान शंकरहि अझूनपर्यंत अभ्यास करीतच आहेत, असें म्हटलें आहे.

**आपुलिया साटोवाटी। शून्य घेती उठाउठी। तेही मातेंचि किरीटी। पावती गा॥५८॥**

**अर्थ**—जे योगी, आपला जीवभाव निःशेष नाहीसा करून, त्याच्या मोबदल्यांत तात्काळ शून्यस्वरूप अशी निर्विकल्प ब्रह्मस्थिति प्राप्त करून घेतात, तेहि अर्जुना! भक्ताप्रमाणे मलाच प्राप्त होतात॥ ५८॥

**गूढार्थदीपिका**—येथे "शून्य" हा शब्द बौद्धमताप्रमाणे अभाववाचक नसून केवळ सत्तारूप निर्विकल्प परब्रह्मवाचक आहे. माऊलींनी या अर्थी हा "शून्य" शब्द ज्ञानेश्वरींतून पुष्कळ ठिकाणीं वापरला आहे.

एकदेशीय सगुण साकार श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणी प्रेम करणारे भक्त, हे जसे निर्विकल्प होतात, तसेच योगाने असंप्रज्ञात अशी निर्विकल्प समाधि साधणारेहि निर्विकल्प होतात. फरक इतकाच की परमप्रेमामुळे भक्तांची अखंड निर्विकल्प समाधि असते व योगी समाधीकालींच निर्विकल्प असतात आणि प्रारब्धबळाने समाधींतून जेव्हा व्युत्थान होतें, तेव्हा ते "अहंब्रह्मास्मि" द्वारा ब्रह्मैक्याचे चिंतन करीत असतात.

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते॥ ५॥**

**अर्थ**—देहधारी पुरुषाला, निराकार, इंद्रियातीत अशा परब्रह्माची प्राप्ति अत्यंत कष्टानेच होऊं शकते; म्हणून निराकार, इंद्रियातीत ब्रह्मस्वरूपाची आसक्ति ज्यांचें चित्तांत आहे, अशांना भक्तापेक्षा एका क्लेशाचीच अधिक प्राप्ति आहे. ॥ ५ ॥

**वांचूनि योगाचेनि बळें। अधिक कांही मिळे। ऐसें नाहीं आगळें। कष्टचि तया॥ ५९॥**

**अर्थ**—माझ्या प्राप्तिवांचून योगाने योगाभ्यासाच्या बळावर योग्यांना अधिक कांही प्राप्त होते असे नाही. भक्तापेक्षा योग्यांना एका कष्टाचीच अधिक प्राप्ति असते॥ ५९॥

**जिहीं सकळभूतांचिया हिती। निरालंबीं अव्यक्तीं। पसरलिया आसक्ती। भक्तीवीण॥ ६०॥**

**अर्थ**—जे कोणी सगुण स्वरूपाच्या भक्तिवांचून, सर्व प्राणिमात्रांचे एक समान कल्याणरूप किंवा सुखरूप असणारें, चित्ताचे आलंबन न होणारें, इंद्रियातीत असें जें परब्रह्म, त्याच्या प्राप्तीची मनांत तीव्र इच्छा धारण करतात॥ ६०॥

**अवतरणिका—सगुण भगवंताच्या भक्तिवांचूत केवळ योगमार्गाचे अवलंबन करणाऱ्यांना जीं विघ्नें येतात व कष्ट सोसावे लागतात, त्याचें माउली आतां वर्णन करीत आहे.**

**तयां महेंद्रादि पदें। करिताति वाटवधें। आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें। पडोनि ठाती॥ ६१॥**

**अर्थ**—त्यांना महेंद्रादि देव, त्यांच्या परमार्थमार्गांत वाटमारेपणा करतात-म्हणजे त्यांच्या ठिकाणीं इंद्रादिपदाच्या प्राप्तीची इच्छा उत्पन्न करून परमेश्वरप्राप्तिपासून भ्रष्ट करतात-आणि ऋद्धिसिद्धीच्या जोड्या प्राप्त होऊन त्यांच्या परमार्थमार्गाच्या आड येतात-म्हणजे ऋद्धिसिद्धि त्यांना प्राप्त होऊन त्या सुखांत ते गुंतून पडतात॥ ६१॥

**गूढार्थदीपिका—"त्वां सेवतां सुरकृता बहवोऽन्तरायाः"** (भाग. स्कं. ११-४-१०) सगुण भगवंताच्या भक्तिवांचून योगाभ्यास करणाऱ्यांच्या परमार्थमार्गांत देवता, नानाप्रकारचीं विघ्नें उत्पन्न करतात, असें जें श्रीभागवतांत म्हटलें आहे, त्याचेंच येथे माउली वर्णन करीत आहेत.

**कामक्रोधांचे विलग। उठावती अनेग। आणि शून्येंसीं आंग। झुंझवावें कीं॥ ६२॥**
**ताहानें ताहानचि पियावी। भुकेलिया भूकचि खावी। अहोरात्र वावीं। मवावा वारा॥ ६३॥**
**उन्निद्रेयाचें पहुडणें। निरोधाचें वेल्हावणें। झाडासि साजणें। चावळावें गा॥ ६४॥**
**शीत वेढावें। उष्ण पांघुरावें। वृष्टीचिया असावें। घराआंतु॥ ६५॥**
**किंबहुना पांडवा। हा अग्निप्रवेशु नीच नवा। भातारेंवीण करावा। तो हा योगु॥ ६६॥**

**अर्थ**—कामक्रोधादि विकारांचे अनेक उपद्रव चित्तांत उठावणी करतात आणि त्यांचा प्रतिकार करणें म्हणजे शून्याशींच शरीराने भांडण्यासारखे आहे॥ ६२॥ किंवा तहान लागलेल्या पुरुषानें तहान पिऊनच तहान शमवावी, भूक लागलेल्या पुरुषाने अन्न न खाता भूक खाऊनच तृप्ति मानावी, किंवा वारा मोजू पाहणाऱ्यांनी अहोरात्र दोन्ही हात पसरून ठेऊनच तो मोजावा॥ ६३॥ किंवा जागण्यांतच निद्रेचें सुख मानावें, इंद्रियनिग्रहांतच इंद्रियांचे सुख मानावें

व झाडाशीं सख्य करून मैत्रीचें सुख भोगावें ॥ ६४ ॥ शीताचें वेष्टण करायचे, उष्णताच पांघरायची आणि पावसाच्या घरांत राहायचे (अशासारखे योगसुख आहे) ॥ ६५ ॥ किंबहुना अर्जुना! हा योग म्हणजे पतिवांचून करावा लागणारा नित्यनवा अग्निप्रवेश आहे ॥ ६६ ॥

**गूढार्थदीपिका**—भक्तिवांचून निर्गुण प्राप्ति कशी अशक्य आहे, हे माउलींनी वरील ओव्यांतून प्रतिपादिलें आहे. याचें विवरण मागें अकराव्या अध्यायांतील ५९४ ओवीवरील गूढार्थदीपिकेंत आम्ही केलेंच आहे.

**एथ स्वामीचें काज। ना बापिकें व्याज। परि मरणेंसीं झुंज। नीच नवें॥ ६७॥**

**अर्थ**—येथें पतीच्या उद्धाराचें किंवा पित्याच्या उद्धाराचे निमित्त नाही. पण मरणाशीं नित्य युद्ध करावें लागतें ॥ ६७ ॥

**गूढार्थदीपिका**—उभयोर्वंशयोः स्वर्गो भर्तुरात्मन एव च ॥ ६३ ॥

**सुरापं विप्रहन्तारं सर्वपापयुतं पतिम् । पङ्कात्पूतं नयेत् स्वर्गं भर्तारं याऽनुगच्छति॥ ६७॥**

पतिव्रता स्त्री, पतीने जन्म घेतलेल्या कुळाचा व आपण जन्म घेतलेल्या कुळाचा उद्धार करते. तसेंच दारु पिणारा, ब्रह्महत्या करणारा व सर्व पापयुक्त असा पति असला, तरी त्याला ती, पापपङ्कांतून शुद्ध करून स्वर्गांत नेते, असें पद्मपुराणांत सांगितलें आहे.

**ऐसें मृत्यूहूनि तिख। कां घोंटे कढत विख। डोंगर गिळितां मुख। न फाटे काई॥ ६८॥**
**म्हणोनि योगाचिया वाटा। जे निगाले गा सुभटा। तयां दुःखाचाचि वाटा। भागा आला॥ ६९॥**
**पाहें पां लोहाचे चणे। जैं बोचरिया पडती खाणें। तैं पोट भरणें कीं प्राणें। शुद्धी म्हणो॥ ७०॥**

**अर्थ**—किंवा असें हें योगाचें कष्ट, अत्यंत कढत विष पिण्यासारखें मृत्यूच्या दुःखापेक्षाहि तीव्र आहे. डोंगर गिळला असतां मुख फाटणार नाही काय? ॥ ६८ ॥ हे उत्तम योद्ध्या अर्जुना! जे योगमार्गाचा अभ्यास करण्याला निघाले, त्यांच्या वांटेला नुसतें दुःखच आलें ॥ ६९ ॥ अर्जुना! विचार कर. बोचऱ्या (दंतहीन) माणसाला लोखंडाचे चणे खाण्याचा प्रसंग आला असतां, ते त्याचे पोट भरणें म्हणावें लागेल की प्राणें-म्हणजे प्राणांतिक प्रायश्चित घेऊन-शुद्ध होणें म्हणावें लागेल. ॥ ७० ॥

**गूढार्थदीपिका**—प्राणांतिक प्रायश्चित्ताने महापापाची शुद्धि होते, असे शास्त्रांतून सांगितलें आहे.

**म्हणोनि समुद्र बाहीं। तरणें आथि केंही। कां गगनामाजीं पायी। खोलिजत असे॥ ७१॥**
**वळघलिया रणाची थाटी। आंगीं न लागतां काठी। सूर्याची पाउठी। कां होय गा॥ ७२॥**
**यालागीं पांगुळा हेवा। नव्हे वायूसि पांडवा। तेवीं देहवंतां जीवां। अव्यक्तीं गति॥ ७३॥**
**ऐसाही जरी धिंवसा। बांधोनियां आकाशा। झोंबती तरी क्लेशा। पात्र होती॥ ७४॥**
**म्हणोनि येर ते पार्था। नेणतीचि हे व्यथा। जे कां भक्तिपंथा। वोटंगले॥ ७५॥**

**अर्थ**—म्हणून हाताने समुद्र तरणें किंवा पायाने आकाशांत चालणें कधी तरी होईल काय? ॥ ७१ ॥ हे अर्जुना! युद्धाला सज्ज झालेल्याला रणांगणांत उतरल्यानंतर शरीराला काठीचा देखील प्रहार न लागतां (स्वर्गप्राप्तिकरितां) सूर्यमंडळाची प्राप्ति होईल काय? ॥ ७२ ॥ म्हणून अर्जुना! ज्याप्रमाणे पांगळा मनुष्य, वायूशीं गतींत स्पर्धा करूं शकत नाही, त्याप्रमाणे देहधारी जीवाला निराकार इंद्रियातीत अशा ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होणें अत्यंत कठीण आहे ॥ ७३ ॥ असे असूनहि, आकाशासारख्या शून्यरूप निराकार परब्रह्माशीं झोंबण्याचें धैर्य धरलेच, तर ते क्लेशालाच पात्र होतात ॥ ७४ ॥ म्हणून, अर्जुना! दुसरे जे सगुण भगवंताच्या भक्तिमार्गाचा अवलंब करतात, त्यांना असें दुःख भोगण्याचा कधी प्रसंगच येत नाही ॥ ७५ ॥

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि सन्न्यस्य मत्पराः। अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते॥ ६॥**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्। भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम्॥ ७॥**

**अर्थ**—पण जे आपलीं सर्व कर्में कर्मकर्तृत्वासह मला अर्पण करून मत्परायण होऊन व अनन्यभावाने माझें

ध्यान करीत, माझी उपासना करतात॥ ६॥ त्यांनी आपलें चित्त माझ्या ठिकाणीच लावले असल्यामुळे मी, या मृत्युरूपी संसारसागरांतून त्यांचा तात्काळ उद्धार करणारा होतों॥ ७॥

**कर्मेंद्रियें सुखें। करिती कर्मे अशेखें। जियें कां वर्णविशेखें। भागा आलीं॥ ७६॥**

**अर्थ**—भगवंतांनी निरनिराळ्या वर्णाश्रमाला धरून जीं कर्मे विहित केलीं असतील, तीं सर्व कर्मे भक्त, भगवंताची आज्ञा समजून कर्मेंद्रियांच्या द्वारा, प्रेमाने करीत असतात॥ ७६॥

**विधीतें पाळित। निषेधातें गाळित। मज देऊनि जाळित। कर्मफळें॥ ७७॥**

**अर्थ**—जें करावें म्हणून सांगितलें असेल, तेंच भक्त करतात व जें करूं नये म्हणून सांगितलें असेल; तें ते कधी करीत नाहीत. अशा रीतीने मला कर्म समर्पण करून संपूर्ण कर्मांचीं फळें ते जाळून टाकतात—म्हणजे आपल्या भोगाकरितां कर्माचें फळ ते उत्पन्न होऊं देत नाहीत॥ ७७॥

**गूढार्थदीपिका—मज देऊनि जाळित कर्मफळें—**

भगवंताची आज्ञा समजून भगवत्प्रीत्यर्थ कर्म केल्याने कर्माचें फळ मिळत नाही, असा भाव.

**ययापरी पाहीं। अर्जुना माझे ठायीं। संन्यासूनि नाहीं। करिती कर्मे॥ ७८॥**

**अर्थ**—याप्रमाणे, अर्जुना! माझे ठिकाणी सर्व कर्मांचा संन्यास करून कर्मे नाहीशी करतात, पहा॥ ७८॥

**गूढार्थदीपिका—संन्यसूनि नाहीं। करिती कर्मे**—कर्म कर्तृत्व व भोक्तृत्व यांना जाणणारा मी, या सर्वांहून निराळा ज्ञानस्वरूप आहे, यांचा माझा कांही संबंध नाही, असा अनुभव येणें, हा संन्यासाचा खरा अर्थ आहे. आणि स्वत:चें कर्तृत्व व भोक्तृत्व न वागवितां, परमेश्वरच कर्ता व भोक्ता आहे, अशा भावनेने कर्मे केलीं असतां कर्माचा संबंध वागविला जात नाही; म्हणून यालाहि संन्यासच म्हटलें आहे.

**आणिकही जे जे सर्व। कायिक वाचिक मानसिक भाव। तयां मीवांचूनि धांव। आनौती नाहीं॥ ७९॥**

**अर्थ**—आणखीहि शरीर, वाणी, मन यांच्याकडून होणाऱ्या सर्व कर्मांची एक माझ्यावांचून दुसरीकडे प्रवृत्तिच नसते-म्हणजे भक्तांचे संपूर्ण व्यापार केवळ एका भगवंताला विषय करूनच होतात॥ ७९॥

**गूढार्थदीपिका**—वरील ७६-७९ पर्यंतच्या ओव्यांतून माउलींनी भक्तांच्या अनन्यत्वाचें लक्षण केलें आहे.

**ऐसे जे मत्पर। उपासिती निरंतर। ध्यानमिषें घर। माझें झालें॥ ८०॥**
**जयांचिये आवडी। केली मजशीं कुळवाडी। भोग मोक्ष बापुडीं। त्यजिलीं कुळें॥ ८१॥**
**ऐसें अनन्ययोगें। विकले जीवें मनें आंगें। तयांचें कायि एक सांगें। जें सर्व मी करीं॥ ८२॥**

**अर्थ**—असे अनन्य व मत्परायण झालेले भक्त, माझी अखंड उपासना करतात व त्या अखंड उपासनेने माझें ध्यान होऊन त्यांचें चित्त, माझें राहण्याचें घर होऊन बसतें॥ ८०॥ ज्यांच्या आवडीनें एका माझ्याशींच संपूर्ण व्यवहार केला व माझ्या प्रेमसुखाच्या दृष्टीने तुच्छ भासणारें विषयसुख व मोक्षसुख या दोन्ही कुळांचा त्याग केला॥ ८१॥ अशा रीतीने अनन्य होऊन ज्यांनी आपलें शरीर, मन व जीवभाव मला समर्पण केले, त्यांचे सर्व काम मीच करीत असल्यामुळे कोणतें एखादेंच काम करतों, सांग बरें!॥ ८२॥

**गूढार्थदीपिका-अनन्य योगें**—"अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता" (नारदभक्तिसूत्र) सर्व समर्थ अशा एका भगवंतावांचून दुसऱ्या कोणत्याहि देवतेचा यत्किंचितहि आश्रय न करणें, याला अनन्यता म्हणतात.

**विकलें जीवें**—ज्याप्रमाणे अज्ञानी जीवाने आपला जीवभाव देहाला विकला आहे म्हणजे तो क्षणभर देखील देहाला सोडून राहूं इच्छित नाही; म्हणूनच मरण समयीं देह सोडण्याचा प्रसंग येतो तेव्हा त्यांचा जीव अत्यंत कासाविस होतो, त्याचप्रमाणे "त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम्" (भाग. स्कं. १०-३१-१५) "तूं डोळ्यासमोर क्षणभर दिसला नाहीस तर तो क्षण आम्हांला युगासारखा वाटतो" या गोपींच्या म्हणण्याप्रमाणे किंवा "जीवनावेगळी मासोळी। तुका तैसा तळमळी" या श्रीतुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणे, क्षणभर परमात्मा दिसला नाही, एवढेंच नाही तर भगवंताच्या वियोगाच्या कल्पनेने देखील मनाला मरणासारखें दु:ख होते, याला "परमेश्वराला जीवें विकणें" म्हणतात.

**विकलें मनें**—जेव्हा मनाला भगवंतावांचून दुसरे कांहीच गोड वाटत नाही, म्हणून मन, भगवंतावांचून दुसरे कशाचेंहि ध्यान करीत नाही, तेव्हा "भगवंताला मन विकलें" म्हटले जातें.

**विकलें अंगें**—त्याचप्रमाणे ज्याच्या शरीराचे संपूर्ण व्यापार स्वत: विषयसुख भोगण्याकरितां न होतां, केवळ एका भगवंताला सुख देण्याकरितांच होतात, तेव्हा तो अंगाने भगवंताला विकला गेंला, असें म्हटले जातें.

**जे मी सर्व करी**—"नित्यसमाधियुक्तानां गोपीनां व्यवहारनिष्पत्तिर्भगवतैव परमकारुणिकेन निर्वाह्यते तासु भूतावेशन्यायेन प्रवेशोपगमात्" ज्याप्रमाणे भूतसंचार झालेल्या माणसाचे व्यापार भूताचेच असतात, त्याचे नसतात, त्याप्रमाणे जीवाने, मनाने व अंगाने विकलेल्या भक्ताचे व्यापार, त्याच्या हृदयांत असलेल्या भगवंताकडूनच होतात, असें प्रेमरसायन खंड १ श्लोक १०२ यावरील टीकेंत विश्वनाथांनी म्हटलें आहे आणि माझ्या सद्‌गुरु आईंनीहि हाच भाव—

ऐसिया नित्यप्रेमसमाधिस्थांच्या शरीरीं। भूतावेशन्यायें प्रवेशोनि हरी। प्रारब्ध व्यवहार आघवा करी। म्हणोनि भक्ता प्रारब्धाभिभवो"॥ ९३॥ श्रीगुलाबराव महाराजकृत (प्रेमनिकुंजवल्ली चवथी)

या ओव्यांतून दाखविला आहे; म्हणूनच भक्तांना प्रारब्धभोग होत नाही. श्रीतुकाराम महाराजांनीहि,

"संचित क्रियमाण। भक्तां प्रारब्ध नाहीं जाण" "मन मिळाले रे मना। भोग अंतरीचा पावे नारायणा" "भक्तासी सोहळे देवाचिया आंगें। देव त्याच्या संगे क्रीडा करी".

इत्यादि अभंगांतून वरील तत्वच प्रतिपादिलें आहे. (येथे "संगें" या शब्दाचा "त्याच्याबरोबर" असा अर्थ नसून "भक्ताच्या शरीर, मन, वाणी इत्यादिकांच्या द्वारा" असा अर्थ आहे.) सारांश, भगवंताला विकल्या गेलेल्या पुरुषाचे जीव, मन व अंग किंवा शरीर हे सर्व पूर्णब्रह्म श्रीकृष्णस्वरूपच होऊन जातात, असा भाव.

**किंबहुना धनुर्धरा। जो मातेचिया ये उदरा। तो मातेचा सोयरा। केतुला पां॥ ८३॥**

**अर्थ**—किंबहुना अर्जुना! जो मातेच्या उदरीं येतों, तो मातेचा कितपत सोयरा असतो, बरें॥ ८३॥

**गूढार्थदीपिका**—आईच्या उदरीं आलेला गर्भ मातेचा कितीसा सोयरा असतो, असें म्हणून, माउलींचे पोटच्या मुलावर स्वाभाविक प्रेम असतें व सोयरेसंबंधीचे प्रेम गुणदोषांवर अवलंबून असल्यामुळे तें कमी-अधिक होतें, हें येथे सुचविले आहे.

**तेवीं मी तयां। जैसे असती तैसियां। कळिकाळ नोकोनियां। घेतला पटा॥ ८४॥**

**अर्थ**—त्याप्रमाणेच माझे भक्त जशा स्थितींत असतील तशा स्थितींत मी त्यांच्यावर, प्रेम करून व त्यांच्या कळिकाळाचें निर्दाळन करून, त्यांना आपल्या पदरांत घेतलें आहे॥ ८४॥

**गूढार्थदीपिका-जैसे असती तैसिया**—आई जशी आपल्या मुलाच्या गुणदोषांचा विचार न करतां स्वाभाविक प्रेम करते, तसेच भगवानहि आपल्या प्रेमळ भक्तावर, त्याचे गुणदोष न पाहतां स्वाभाविक प्रेम करतो. "हे जैसे असती तैसिया" या चरणाने दाखविलें आहे. "अंतकाळी तैसा संकटाचे वेळीं। हरि तया सांभाळी अंतर्बाह्य" (हरिपाठ ज्ञानदेवकृत)

**एऱ्हवीं तरी माझिया भक्तां। आणि संसाराची चिंता। काय समर्थाची कांता। कोरान्न मागे॥ ८५॥**

**अर्थ**—(भगवान म्हणतात, अर्जुना!) माझ्या भक्ताला संसाराची कधी चिंता नसते. समर्थाच्या स्त्रियेला कोरान्न (म्हणजे कोरडी भिक्षा) मागण्याचा प्रसंग येतो काय?॥ ८५॥

**गूढार्थदीपिका**—सकाम व निष्काम असे दोन प्रकारचे भक्त असतात, हे मागें सातव्या अध्यायांत सांगितलेंच आहे. 'भगवान आपल्या भक्ताचा संसार सुखाचा करून ठेवतो म्हणून भक्ताला संसाराची चिंता नसते' असा अर्थ, निष्काम-भक्ताच्या बाबतीत करतां येत नाहीं. ज्याप्रमाणे संपन्न पुरुषाच्या स्त्रियेला दारिद्र्याचा कधीच अनुभव येत नाही, म्हणून तिला कधीच भिक्षा मागावी लागत नाही, त्याप्रमाणे ज्यांना एक भगवंतच गोड वाटतो व भगवंताच्या ध्यानाने ज्यांना सर्व संसार भगवत्स्वरूप भासतो, अशा निष्काम भक्तांना संसाराचा भासच नसतो;

नग संसाराची चिंता कोठून असणार? पण अशाहि भक्ताचे, अभक्तांना उणे दिसून त्यांच्याकडून भक्ताची विटंबना भगवंत होऊं देत नाही, असा भाव.

तसेंच ज्याप्रमाणे संपन्न पुरुष आपल्या स्त्रियेची सर्व इच्छा पूर्ण करीत असल्यामुळे तिला कोरान्न मागण्याचा प्रसंग येत नाहीं, त्याप्रमाणे सर्व समर्थ भगवानहि, आपल्या सकाम एकनिष्ठ भक्ताला संसाराची चिंता करण्याचा प्रसंग येऊं देत नाही. आणि शेवटीं सकाम भक्तहि अत्यंत निष्काम होतो.

**तैसे ते माझें। कलत्र हें जाणिजे। कायिसेनिही न लाजें। तयांचेनि मी॥ ८६॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे माझा भक्त म्हणजे माझी पत्नी होय, असें समज. म्हणून (ज्याप्रमाणे आपल्या पत्नीचे पडेल तें काम करायला पुरुषाला लाज वाटत नाही, त्याप्रमाणे) भक्ताचे पडेल तें काम करण्यास मलाही लाज वाटत नाही॥ ८६॥

**गूढार्थदीपिका**—स्वत:चे कितीहि नीच काम असलें, तरी तें स्वत: करण्यांत मनुष्याला लाज वाटत नाही. पतिपत्नीच्या प्रेमसंबंधांत पतिपत्नी एकरूप होऊन गेलेले असतात; म्हणूनच पतीला तिचें कोणतेंहि काम करण्यांत लाज वाटत नाही. त्याप्रमाणेच भक्तावरील भगवंताच्या व भगवंतावरील भक्ताच्या परम प्रेमामुळे भगवान व भक्त एकरूप होऊन गेलेले असतात; म्हणूनच भगवंतालाहि आपल्या एकरूप झालेल्या भक्ताचे कोणतेहि नीच काम करण्यांत लाज वाटत नाही.

या ओवींत माऊलींनी भगवान व भक्त यांना पतिपत्नीचा दृष्टान्त देऊन पतिपत्नीभावाने केल्या जाणाऱ्या भक्तींत, भक्त भगवंताशीं अत्यंत एकरूप होतो, हें सुचविलें आहे.

**जन्ममृत्यूचियां लाटीं। झळंबती इया सृष्टी। तें देखोनियां पोटीं। ऐसें जाहलें॥ ८७॥**

**अर्थ**—ही भूतसृष्टि, भवसमुद्रांतील जन्ममृत्यूंच्या लाटांमध्ये सारखी गटांगळ्या खात आहे. तें पाहून माझ्या पोटांत असे झाले आहे की॥ ८७॥

**भवसिंधूचेनि माजें। कवणासि धाकु नुपजे। तेथ जरी कीं माझे। बिहिती हन॥ ८८॥**
**म्हणोनि गा पांडवा। मूर्तीचा मेळावा। करूनि त्यांचिया गांवा। धांवतु आलों॥ ८९॥**

**अर्थ**—(अशा रीतीने) हा संसारसमुद्र खवळलेला पाहून कोणाला त्याची भीती वाटणार नाही आणि तेथे न जाणो, माझे भक्तहि कदाचित् त्याला पाहून भितील॥ ८८॥ म्हणून, अर्जुना! त्यांचा सांभाळ करण्याकरितां मी सगुणसाकार रामकृष्णादि मूर्ती धारण करून, त्यांच्या या संसाररूपी गावांत धांवून आलों॥ ८९॥

**गूढार्थदीपिका**—आपल्या लहान बाळाचा सांभाळ करण्याकरितां आईच्या पोटांत ज्याप्रमाणे अखंड कळवळा असतो, त्याप्रमाणे भगवंताच्या पोटांतहि आपल्या भक्ताचा सांभाळ करण्याचा अखंड कळवळा असतो, असा भाव.

**नामाचिया सहस्त्रवरी। नावा इया अवधारीं। सजूनियां संसारीं। तारू जाहलों॥ ९०॥**

**अर्थ**—माझी रामकृष्णादि जीं अनंत नामें, ह्याच नावा होत, असे समज. हा संसार तरून जाण्याकरितां, त्या नामरूपी नावा संसारसमुद्रावर सज्ज करून मी भक्तांचा नावाडी झालों आहे॥ ९०॥

**गूढार्थदीपिका**—सगुण भगवंताच्या प्राप्तीची इच्छा ठेऊन भगवंताच्या एका नुसत्या अखंड नामस्मरणाने देखील, जीव भगवंताला प्राप्त होतो असे येथें सुचविलें आहे. "या वै साधनसंपत्तिः पुरुषार्थचतुष्टये। तया विना तदाप्नोति नरो नारायणाश्रयः" पुरुषार्थाकरितां जीं कांही साधनें सांगितलीं आहेत, ती न करतां, एका भगवंताचाच आश्रय केला असतां सर्व साधनसंपत्तिसह पुरुषार्थ प्राप्त होतो, असे पुराणवचनहि आहे.

**सडे जे देखिले। ते ध्यानकासे लाविले। परिग्रही घातले। तरियावरी॥ ९१॥**

**अर्थ**—एकटे जे असतील त्यांना मी ध्यानमार्गाची कांस लावली आणि जे गृहस्थाश्रमी आहेत त्यांना मी नामरूपी नावेवर बसविले॥ ९१॥

**गूढार्थदीपिका—सडे जे देखिले। ते ध्यान कासे लाविले**—सडे म्हणजे तीव्र वैराग्यामुळे सर्वसंग परित्याग

करून असंग झालेले पुरुष. हे विशेषत: ध्यानरूप क्रियामार्गाचे अधिकारी असतात; कारण त्यांचे चित्त वैराग्याने रुक्ष होत असल्यामुळे, प्रथम विशेष प्रेमसंपन्न राहू शकत नाही. परंतु वैराग्यामुळे ते विक्षेपरहित व निष्पाप होतात व त्यांना भगवंताच्या प्राप्तीची इच्छा असल्यामुळे भगवंताच्या स्वरूपाच्या ध्यानरूप भक्तिमार्गाचा अवलंब करून, क्रमाने ते प्रेमसंपन्न होतात व कृतार्थ होतात.

**परिग्रही घातले। तरियावरी**—परिग्रही म्हणजे गृहस्थाश्रमी—जे गृहस्थाश्रमी असून रामकृष्णादि सगुण भगवंताच्या प्राप्तीची इच्छा करणारे आहेत, ते अत्यंत विरक्त नसतात व अत्यंत विषयासक्तहि नसतात; म्हणून त्यांच्याकरितां विशेषत: भगवन्नामस्मरणरूप भक्तिमार्ग प्रगट केला आहे. या अशा भगवन्नामस्मरणाने ते (गृहस्थाश्रमी) निष्पाप व वैराग्यसंपन्न होतात व त्यांना भगवंताचें प्रेमहि उत्पन्न होतें.

**प्रेमाची पेटी। बांधली एकाचियां पोटीं। मग आणिले तटीं। सायुज्याचियां॥ ९२॥**

**अर्थ**—मी आपल्या प्रेमाची पेटी एकाच्या पोटांत बांधली आणि मग सर्वांना सायुज्याच्या तटीं आणलें-म्हणजे संसार समुद्राचे परतीर जे माझें सगुणस्वरूप, त्या सगुण स्वरूपाशीं त्यांचें ऐक्य केलें॥ ९२॥

**गूढार्थदीपिका—प्रेमाची पेटी। बांधली एकाचां पोटीं**—प्रेमाची पेटी बांधली—म्हणजे चित्तांत आपले अखंड प्रेम दिलें.

पूर्वी अनेक जन्मांत भगवंताप्रीत्यर्थ आचारलेल्या भागवतधर्मामुळे, ज्यांच्या चित्तांत भगवन्नामस्मरण, भगवत्कथाश्रवण इत्यादिकांविषयीं जें स्वाभविक प्रेम उत्पन्न झालेलें असतें, तें भगवत्कृपेनेच झालेलें असतें; म्हणूनच येथे "मी त्यांच्या पोटांत प्रेमाची पेटी बांधली" असें भगवान म्हणत आहेत.

"एकाचिया" या पदाने "एवंभूता भक्तिप्रधाना विरला" (श्री. टी. भाग. स्कं. ६-१-१५) अशा प्रकारचे भाग्यवान क्वचित्च असतात, हें सुचविलें आहे.

**परि भक्तांचेनि नांवें। चतुष्पदादि आघवे। वैकुंठीचिये राणिवे। योग्य केलें॥ ९३॥**

**अर्थ**—इतकेच नव्हे तर, 'भक्त' या नांवास पात्र झालेल्या पश्वादि प्राण्यांना देखील वैकुंठाच्या राज्यावर बसण्यास योग्य केलें॥ ९३॥

**गूढार्थदीपिका**—"तथा न ते माधव तावका: क्वचिद् भ्रश्यन्ति मार्गात्त्वयि बद्धसौहृदा:" (भागवत स्कं० १०)

प्रेमाने भगवंताशीं बद्ध झालेले भगवद्भक्त कोणत्याहि योनींत गेले, तरी भक्तिमार्गापासून भ्रष्ट होत नाहीत, असा भाव.

**म्हणोनि गा भक्तां। नाहीं एकही चिंता। तयांतें समुद्धर्ता। आथि मी सदा॥ ९४॥**

**अर्थ**—म्हणून, हे अर्जुना! भक्तांना कशाचीहि चिंता नसते. त्यांना सर्व संकटातून मुक्त करण्याकरितां मी सर्वदा सज्ज असतो.॥ ९४॥

**गूढार्थदीपिका**—"त्वयाभिगुप्ता विचरन्ति निर्भया विनायकानीकपमूर्धसु प्रभो" (भाग. १०-२-३३) भगवान अखंड त्यांचे संरक्षण करीत असल्यामुळे सर्व विघ्नांच्या डोक्यावर पाय ठेऊन ते निर्भय असतात, असे भागवतांत म्हटलें आहे.

**"आम्हां हरीच्या दासां कांहीं। भय नाहीं त्रैलोक्यी॥ १॥ देव उभा मागे पुढें। उगवीं कोडें संकट"॥ २॥**

(तु. गा. १७२८)

**आणि जेव्हांचि कां भक्तीं। दिधली आपुली चित्तवृत्ती। तेव्हांचि मज सूती। तयांचिये नाटीं॥ ९५॥**

**अर्थ**—आणि ज्या क्षणीं भक्त आपली चित्तवृत्ति मला नि:शेष समर्पण करतात, त्या क्षणीं ते मला आपल्या सर्व व्यवहारांत घालतात—म्हणजे त्या क्षणापासून त्यांचा सर्व व्यवहार मीच करीत असतो॥ ९५॥

**गूढार्थदीपिका**—मागें ८२ व्या ओवींत भक्तांचे जीवभाव, मन व अंग भगवंताला समर्पण झाल्यामुळे ते भगवंताहून यत्किंचितहि अलग राहत नाहीत; म्हणून भक्तांचे ठिकाणी दिसत असलेले सर्व व्यवहार 'भूतावेशन्यायाने'

भगवंताचेच असतात, असा जो आम्ही अर्थ केला आहे, तोच अर्थ, माउलींनी पुन: या ओवींत व्यक्त केला आहे.

**याकारणें गा भक्तराया। हा मंत्र तुवां धनंजया। कीजे जे यया। मार्गा भजिजे॥ ९६॥**

**अर्थ**—म्हणूनच भक्तश्रेष्ठ अर्जुना तूं किंवा सर्वच जीवांनी माझ्या या भक्तिमार्गाचाच आश्रय करावा, हाच माझा गूढ उपदेश आहे, हें पक्कें जाणून घे॥ ९६॥

**गूढार्थदीपिका**—भगवद्गीतेंत कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग या तिन्ही मार्गांचे वर्णन केलें असलें, तरी भगवंतांनी अर्जुनाच्या मनावर मुख्यत: सोप्या व निर्विघ्न अशा भक्तिमार्गाचेंच श्रेष्ठत्व बिंबविलें आहे, असे जे आम्हीं मागें सांगितले आहे, तेच या ओवीने माऊलींनी स्पष्ट केलें आहे.

**अवतरणिका—येथून भगवंतांनी, आपल्या शुद्ध परब्रह्मस्वरूपाशीं जीवाला ऐक्य करतां येईल, अशा प्रक्रिया सांगितल्या आहेत.**

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय। निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशय:॥ ८॥**

**अर्थ**—आपलें मन माझेच ठिकाणी स्थिर कर. आपली बुद्धि माझ्या ठिकाणी प्रविष्ट कर. असें झाल्यानंतर तूं माझ्या ठिकाणीच राहशील—म्हणजे माझ्याशीं अखंड ऐक्य पावशील—यांत संशय नाही॥ ८॥

**अगा मानस हें एक। माझां स्वरूपीं सवृत्तिक। करूनि घालीं निष्टंक। बुद्धि निश्चयेंसीं॥ ९७॥**

**अर्थ**—बा अर्जुना! तूं आपलें संपूर्ण वृत्तिसह एक हें मन व तसेच निश्चयव्यापारासह बुद्धि माझ्या स्वरूपाच्या ठिकाणी दृढ लावून घाल॥ ९७॥

**गूढार्थदीपिका**—देह, इंद्रियें, अहंकार मन, बुद्धि इत्यादि तत्त्वांमध्ये, मन व बुद्धि हीं दोन तत्वेंच मुख्य असल्यामुळे, तीं परमेश्वराच्या ठिकाणी लागलीं असतां, बाकींची सर्व तत्वें आपोआप परमेश्वरपरायण होऊन जीवाचा जीवभाव नाहीसा होतो व तो परमेश्वराशीं ऐक्य पावतो; म्हणून पुढील सर्व प्रक्रियेंतून भगवंताचे ठिकाणी मन व बुद्धि स्थिर करण्याचे निरनिराळे उपायच सांगितले आहेत.

**इयें दोनीं सरिसीं। मजमाजीं प्रेमेंसीं। रिगालीं तरि पावसी। मातें तूं गा॥ ९८॥**
**जे मन बुद्धि इहीं। घर केलें माझ्या ठायीं। तरि सांगें मग काई। मी तूं उरे॥ ९९॥**

**अर्थ**—बुद्धि आणि मन हीं दोन्ही माझ्या ठिकाणी प्रेमाने सारखींच जडली तर तूं मला प्राप्त होशील॥ ९८॥ कारण मन व बुद्धि यांनी माझ्या स्वरूपाचे ठिकाणी अखंड वस्ती केली असतां ''मी-तूं'' असा जो भेद दिसतो तो मग, राहील काय? हें सांग॥ ९९॥

**गूढार्थदीपिका—मी तूं उरे**-''मी'' व ''तूं'' या शब्दांनी दोन भिन्न पदार्थांचा भेद दाखविला आहे. तो भेद असा-'मी' या वृत्तीने चैतन्यच स्फुरत असल्यामुळे येथे 'मी' या शब्दाने जाणणारा चेतन दृष्टा घेतला आहे आणि जाणल्या जाणाऱ्या दृश्य पदार्थांना ''तूं'' हा शब्द लावला जात असल्यामुळे ''तूं'' या शब्दाने त्या चैतन्याहून निराळे देहादिक पदार्थ घेतले आहेत.

चैतन्य हे एक अद्वितीय व व्यापक असल्यामुळे या चैतन्याहून दुसरा पदार्थच राहूं शकत नाही; म्हणून 'तूं' या शब्दाने निर्देशिल्या जाणाऱ्या देहादिक पदार्थांची मनानेच कल्पना केली असून, बुद्धीने त्याच्या अस्तित्वाचा निश्चय केला आहे. अशा रीतोने मनबुद्धिमुळेच 'मी-तूं' हा भेद झाला आहे.

एक परमात्माच सत्य आहे, त्यावांचून दुसरी वस्तुच नाही, असा बुद्धीचा दृढ निश्चय झाला असतां, बुद्धि परमेश्वरस्वरूपाचे ठिकाणी दृढ स्थापन होते. बुद्धीच्या पाठीमागें मनाला भगवंताचें ध्यान लागून, तेहि सर्व वृत्तिसह देहादिकांची कल्पना सोडून देते व परमेश्वराचे ठिकाणी स्थिर होते. अशारीतीने मन, बुद्धि परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर झाली असतां 'मी-तूं' या शब्दांनी भासणारा भेद मुळींच उरत नाही व जीव अद्वैतब्रह्मस्वरूप होतो.

**म्हणोनि दीप पाल्वे। सवेंचि तेज माल्वें। कां रविबिंबासवें। प्रकाशु जाय॥ १००॥**
**उचलल्लेया प्राणासरिसीं। इंद्रियेंही निगती जैसीं। तैसा मनोबुद्धिपासीं। अहंकारु ये॥ १०१॥**

**अर्थ**—म्हणून ज्याप्रमाणे दिव्याला फडक्याने वारा घातल्याबरोबर दिव्याचा प्रकाश नाहीसा होतो किंवा ज्याप्रमाणे सूर्यबिंब अस्तास गेलें असतां, त्याचा प्रकाशहि जातो॥ १००॥ किंवा ज्याप्रमाणे प्राण निघून गेल्याबरोबर इंद्रियेंहि प्राणाबरोबर निघून जातात, त्याप्रमाणे मन व बुद्धि जेथे जडतात तेथेच अहंकारहि राहतो॥ १०१॥

**गूढार्थदीपिका**—'मी' म्हणून स्फुरणाऱ्या चैतन्याचे देहाशीं जें ऐक्य झालें आहे, तें अहंकारानेच झालें आहे; म्हणून अहंकार हा दोन वस्तूंचे ऐक्य करणारा आहे. मन व बुद्धि ज्या वस्तूचे ठिकाणी लागतात त्या वस्तूशींच अहंकाराने ऐक्य होतें, असा सर्व जीवांचा अनुभव आहे.

मन व बुद्धि परमेश्वराचे ठिकाणी स्थिर झाल्याबरोबर त्यांच्यापाशीच अहंकार येतो-म्हणजे देहाशीं झालेल्या ऐक्याचा अहंकार सुटून परमेश्वराशीं झालेल्या ऐक्याचा अहंकार स्फुरूं लागतो.

**म्हणोनि माझिया स्वरूपीं। मनबुद्धि इयें निक्षेपीं। येतुलेनि सर्वव्यापी। मीचि होसी॥ १०२॥**

**अर्थ**—म्हणून माझ्या स्वरूपाचे ठिकाणी (अर्जुना!) आपली मनबुद्धि लाव म्हणजे एवढ्यानेच सर्वव्यापी असा जो मी तोच तूं होशील॥ १०२॥

**गूढार्थदीपिका**—ही अनुभवाची प्रक्रियाच, भगवंतांनी अर्जुनाला आपल्या स्वरूपाशीं ऐक्य करण्याकरितां सांगितली आहे.

**यया बोला कांहीं। अनारिसें नाहीं। आपली आण पाहीं। वाहतु असे गा॥ १०३॥**

**अर्थ**—हें माझें बोलणें यत्किंचितहि अन्यथा नाही, हें मी आपली शपथ वाहून सांगतों॥ १०३॥

**गूढार्थदीपिका**—भगवान अर्जुनाशीं मित्रत्वाच्या नात्यांनी बोलत असल्यामुळे आपलें बोलणें, अर्जुनाने या कानाने ऐकून त्या कानाने सोडूं नये व आपल्या बोलण्यावर अर्जुनाचा अविश्वास होऊं नये, म्हणून भगवान येथे आपली शपथ वाहत आहेत.

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्। अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय॥ ९॥**

**अर्थ**—अर्जुना! जर कदाचित् माझे ठिकाणी तूं आपलें चित्त (एकदम) स्थिर ठेवूं शकत नसलास, तर वारंवार चित्त स्थिर करण्याच्या अभ्यासाचे द्वारा मला प्राप्त करून घेण्याची इच्छा कर॥ ९॥

**अथवा हें चित्त। मनबुद्धीसहित। माझ्या हातीं अचुंबित। न शकसी देवों॥ १०४॥**
**तरि गा ऐसें करीं। ययां आठां पाहारांमाझारीं। मोटकें निमिषभरी। देतु जाय॥ १०५॥**
**मग जें जें कां निमिख। देखेल माझें सुख। तेतुलें अरोचक। विषयीं घेईल॥ १०६॥**
**जैसें शरत्कालु रिगे। आणि सरिता वोहटूं लागे। तैसें चित्त काढेल वेगें। प्रपंचौनि॥ १०७॥**
**मग पुनवेहूनि जैसें। शशिबिंब दिसें दिसें। हारपत अंवसे। नाहींचि होय॥ १०८॥**
**तैसें भोगाआंतूनि निगतां। चित्त मजमाजीं रिगतां। हळू हळू पांडुसुता। मीचि होसील॥ १०९॥**
**अगा अभ्यासयोगु म्हणिजे। तो हा एकु जाणिजे। येणें कांहीं न निपजे। ऐसें नाहीं॥ ११०॥**

**अर्थ**—किंवा मनबुद्धिसहित हें चित्त जर एकदम माझ्या स्वाधीन करूं शकत नसलास॥ १०४॥ तर, हे अर्जुना! असें कर की, या चोवीस तासांमध्ये घटकाभर थोडेसें माझ्याकडे चित्त लावण्याचा प्रयत्न करीत जा॥ १०५॥ मग असा प्रयत्न करीत असतां, माझें सुख अनुभविण्यांत जसा जसा क्षण जाईल तसा तसा चित्ताला विषयसुखाचा कंटाळा येत जाईल॥ १०६॥ ज्याप्रमाणे शरदृतूला प्रारंभ झाला असतां नद्यांचे पाणी ओसरूं लागते, त्याप्रमाणे विषयसुखाचा वीट येतां येतां, तुझें चित्त विषयसुखांतून वेगाने निघेल॥ १०७॥ मग ज्याप्रमाणे चंद्रबिंब, पौर्णिमेपासून दिवसेंदिवस कमी होत होत अमावस्येला नाहीसें होतें॥ १०८॥ त्याप्रमाणे चित्त विषयसुखाच्या वासनेंतून क्रमाने निघून, माझ्याठिकाणी प्रविष्ट होऊं लागलें असतां अर्जुना! तूं हळूहळू मीच होशील॥ १०९॥ बा अर्जुना! ज्याला अभ्यासयोग म्हणतात, तो हाच होय, असें जाण. या अभ्यासयोगांने प्राप्त होत नाही असे कांहीहि नाहीं॥ ११०॥

**गूढार्थदीपिका**—दुसऱ्याची मुलगी, विवाहाने घरीं आल्यावर अभ्यासाने तिच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न होतें

आणि दत्तक मुलाचेहि अभ्यासाने स्वपुत्रवत् प्रेम जडतें. जीवाचा असा अनुभव असल्यामुळे त्या अनुभवानुसारच येथे परमेश्वर प्राप्तीकरितां अभ्यासाची प्रक्रिया सांगितली आहे.

**पैं अभ्यासाचेनि बळें। एकां गति अंतराळें। व्याघ्र सर्प प्रांजळे। केले एकीं॥ १११॥**
**विष कीं आहारीं पडे। समुद्रीं पायवाट जोडे। एकी वाग्ब्रह्म थोकडें। अभ्यासें केलें॥ ११२॥**
**म्हणोनि अभ्यासासि कांहीं। सर्वथा दुष्कर नाहीं। यालागीं माझां ठायीं। अभ्यासें मिळ॥ ११३॥**

**अर्थ**—कारण अभ्यासाच्या बळाने कोणी आकाशगामी झाले. कोणी व्याघ्र, सर्प अशा दुष्ट प्राण्यांना सुस्वभावी केले॥ १११॥ अभ्यासाने विषहि आहार होऊं शकतें, समुद्रावरूनहि पायवाटाप्रमाणें चालतां येते. कोणी अभ्यासाच्या बळाने संपूर्ण वेदादिशास्त्रें मुखोद्गत केलीं॥ ११२॥ याप्रमाणे अभ्यासाला कांहीहि एक असाध्य नाही; म्हणून अभ्यासांने माझी प्राप्ति होऊं शकते॥ ११३॥

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव। मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि॥ १०॥**

**अर्थ**—(अर्जुना!) असा अभ्यासयोग करण्यास तूं समर्थ नसशील, तर केवळ एका माझ्या प्राप्तीच्या उद्देशानेच कर्म करणारा हो. केवळ माझ्या प्राप्तीच्या उद्देशानेहि कर्में करून तुला ऐक्यरूप सिद्धि प्राप्त होईल॥ १०॥

**कां अभ्यासाही लागीं। कसु नाहीं तुझां आंगीं। तरी आहासी जया भंगीं। तैसाचि अस॥ ११४॥**

**अर्थ**—किंवा हा अभ्यास करण्याचेंहि तुझ्या आंगीं सामर्थ्य नसेल तर तुझी क्षात्र-प्रकृति या गुणभागाची बनली असेल तशा प्रकृतींतच तूं राहा॥ ११४॥

**गूढार्थदीपिका**—पूर्वकर्मानुसार ज्या गुणाची प्रकृती बनली असेल ती बदलविण्याची आवश्यकता नाही त्या प्रकृतीनुसार विहित असलेलीं कर्में होत असतांना, परमेश्वर प्राप्ति कशी करून घेतां येते, ही प्रक्रिया येथे माउलींनी सांगितली आहे.

**इंद्रियें न कोंडीं। भोगातें न तोडीं। अभिमानु न संडीं। स्वजातीचा॥ ११५॥**
**कुळधर्मु चाळीं। विधिनिषेध पाळीं। मग सुखें तुज सरळी। दिधली आहे॥ ११६॥**
**परि मनें वाचा देहें। जैसा जो व्यापारु होये। तो मी करीतु आहें। ऐसें न म्हणें॥ ११७॥**

**अर्थ**—इंद्रियांचा निग्रह करूं नकोस, विषयभोगाचा त्यागहि करूं नकोस व आपल्या जातीचाहि अभिमान सोडूं नकोस॥ ११५॥ कुलपरंपरागत धर्माचे आचरण कर. अमुक कर व अमुक करूं नकोस, असे जे शास्त्रांनी तुला सांगितले असेल, त्या विधिनिषेधांचे पालन कर. याप्रमाणे तुला वागण्याची सुखाने मोकळीक दिली आहे॥ ११६॥ पण मन-वाचा-शरीर यांच्याकडून जसा व जो व्यापार होईल, तो मी करीत आहे, असे मात्र म्हणू नकोस-म्हणजे असे तुझ्या चित्तांत उठतां कामा नये॥ ११७॥

**गूढार्थदीपिका**—मन, वाणी, देह यांच्याकडून होणारा व्यापार किंवा कर्म व त्यांचे कर्तृत्व हे सर्व प्रकृतीचे कार्य आहे व प्रकृतींतच त्या सर्वांचा अंतर्भाव होतो आणि प्रकृतीचा नियंता परमेश्वर आहे; म्हणून कर्माचे कर्तृत्व जीवाकडे येत नाही, असे वेदान्तशास्त्राने व सर्व संतांनी मानिले आहे. पण 'मी कर्म करतो' असा कर्तृत्वाचा अहंकार, जीव व्यर्थच धारण करतो व संसारदुःखांत पडतो. म्हणूनच माउलींनी येथे कर्माचे कर्तृत्व आपल्यावर ओढवून घेऊ नये, असे सांगितले आहे.

**करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणे। विश्व चळतसे जेणें। परमात्मेनि॥ ११८॥**

**अर्थ**—अद्वैत व पूर्ण सच्चिदानंदस्वरूप परमात्म्यावरच कर्म स्फुरत असल्यामुळे, उत्पन्न होणाऱ्या कर्माच्या पूर्वी, कर्मांत व कर्माचे शेवटीं तोच असतो. त्याच्याच योगाने विश्वांतील सर्व घडामोडी होतात; म्हणून कर्म करणे किंवा न करणे हे त्यालाच माहित (असे समजावे)॥ ११८॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वर नित्य ज्ञानसंपन्न असल्यामुळे त्याचे ठिकाणी कर्तृत्व मुळींच नाही. पण जीव कर्तृत्वभोक्तृत्व उपाधींतून मुक्त होऊन परमेश्वरस्वरूप व्हावा म्हणून, परमेश्वराच्या सान्निध्याने सृष्टींतील सर्व

घडामोडीरूप कर्म होतें-म्हणजे परमेश्वरच सर्व कर्मांचा कर्ता आहे-असे जीवाने मानावें, असें येथे सांगितलें आहे.

उपनिषदांतूनहि हीच प्रक्रिया, ''एष एव साधुकर्म कारयति'' हा परमात्माच पूर्वकर्मानुसार जीवाकडून बरे-वाईट कर्मे करवितो, या पंक्तीने सांगितली असून आचार्यांनीहि त्या पंक्तीवर भाष्य करतांना ''सर्वास्वेव प्रवृत्तिष्वीश्वरो हेतुकर्तेति श्रुतेः अवसीयते'' (ब्र. सू. भा. २-३-४१) जीवाच्या सर्व प्रकृतीच्या ठिकाणी ईश्वरच निमित्तकारण आहे असें श्रुतिवरून दिसतें, असे म्हटले आहे. जीव ज्यांचा ज्याचा अभिमान धारण करतो तें तें त्याला चिकटतें व ज्याचा ज्याचा अभिमान धारण करीत नाही तें तें परमेश्वराला समर्पण होतें असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे. त्या सिद्धान्तानुसारच जीवाने कर्तृत्वाचा अभिमान सोडला असतां कर्म बाधक-म्हणजे संसारदायक-होत नाही.

**उणयापुरेयाचें कांहीं। उरों नेदीं आपुलां ठायीं। स्वजातीचि करूनि घेईं। जीवत्व हे॥ ११९॥**

**अर्थ**—हें कर्म उणें झालें की पुरें झालें असे कांही एक मनांत राहूं देऊं नकोस. आपलें जीवत्व-म्हणजे जीवन सजात-म्हणजे केवळ कर्माच्या जातीचे किंवा केवळ कर्मरूपच-करून घे॥ ११९॥

**माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें। तया पाणिया ऐसें केलें। होआवें गा॥ १२०॥**

**अर्थ**—जसें पाणी, माळी जिकडे नेतो तिकडे तें शांतपणें जातें, त्या पाण्याप्रमाणे तूं आपलें कर्म होऊं दे॥ १२०॥

**गूढार्थदीपिका**—या उदाहरणाने माऊलींनी आपला जीवभाव कसा सजात करायचा हें सांगितलें आहे.

**म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती। इयें वोझीं नेघें मती। अखंड चित्तवृत्ती। माझ्या ठायीं॥ १२१॥**

**अर्थ**—म्हणून मी कर्म करतो आणि मी कर्म करीत नाही, असे दोन्ही प्रवृत्ति-निवृत्तिरूप कर्माचें ओझें बुद्धींत वागवूं नकोस, म्हणजे कल्पनारहित झालेली चित्तवृत्ति माझे ठिकाणीच अखंड राहील॥ १२१॥

**गूढार्थदीपिका**—निरनिराळ्या कल्पनेमुळेच जीवाचें जीवत्व आहे. परमात्मा कल्पनारहित आहे; म्हणून प्रारब्धानुसार होणारीं कर्मे जशी होतील तशीं होऊं देऊन, जीवाने उणें-पुरें इत्यादि कोणतीहि कल्पना केली नाही, तर जीवाचें कल्पनारूप जीवपण नाहीसे होऊन तो कल्पनारहित होतो-म्हणजे परमेश्वरस्वरूप होतो-असा भाव.

''आतां ब्रह्मज्ञानाची किल्ली। सांगेन एक्याची बोलीं। जयांची कल्पना निमाली। ते प्राप्तपुरुष''॥ ४२१॥ (स्वात्मसुख) असें श्रीएकनाथ महाराजांनीहि स्वात्मसुखांत म्हटलें आहे.

**एऱ्हवीं तरी सुभटा। उजू कां अव्हांटा। रथु काई खटपटा। करितु असे॥ १२२॥**
**आणि जें जें कर्म निपजे। तें थोडें बहु न म्हणिजे। निवांतचि अर्पिजे। माझ्या ठायीं॥ १२३॥**

**अर्थ**—हे उत्तम योद्ध्या अर्जुना! रथ आपण होऊन सरळ मार्गाने किंवा आडमार्गांने जाण्याची खटपट करतो काय?॥ १२२॥ आणि जें जें कर्म होत जाईल, तें थोडें झालें किंवा बहु झालें असें न म्हणतां, स्वस्थ चित्ताने माझे ठिकाणी अर्पण करावें॥ १२३॥

**ऐसिया मद्भावना। तनुत्यागीं अर्जुना। तूं सायुज्यसदना। माझिया येसी॥ १२४॥**

**अर्थ**—हे अर्जुना! याप्रमाणे माझी भावना करून कर्म करीत राहिलें असतां, देहपातानंतर तूं माझ्या ऐक्यरूपी मंदिरांत प्राप्त होशील॥ १२४॥

**गूढार्थदीपिका**—अशा रीतीने कर्तृत्व सोडून कर्म केलें असतां भोक्तृत्वहि नाहीसे होऊन जीव कर्तृत्व-भोक्तृत्वरहित असा ब्रह्मस्वरूप होतो.

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः। सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्॥ ११॥**

**अर्थ**—'मत्प्रीत्यर्थ कर्म करणें' या योगाचा आश्रय करून तूं कर्म करण्यास समर्थ नसलास, तर मनाचा निग्रह करून सर्व कर्मांच्या फळांचा त्याग कर॥ ११॥

**ना तरी हेंही तुज। नेदवे कर्म मज। तरी गा तूं भज। पांडुकुमरा॥ १२५॥**
**बुद्धीचिये पाठीं पोटीं। कर्माआदि कां शेवटीं। मातें बांधणें किरीटी। दुवाड जरी॥ १२६॥**

**अर्थ**—अथवा पांडुकुमारा अर्जुना! जर आपल्या कर्मकर्तृत्वाचा अहंकार सोडून तुझ्याच्याने संपूर्ण कर्म मला अर्पण करवत नसेल, तर तूं अशा रीतीने मला भज॥ १२५॥ बुद्धीच्या आंत-बाहेर व कर्माच्या आदि किंवा अंतीं, मला बांधून ठेवणें, अर्जुना! तुला कठीण वाटत असेल॥ १२६॥

**गूढार्थदीपिका—बुद्धीचिये पाठीं पोटीं। मातें बांधणें**—ज्याप्रमाणें पाण्यावर उठणाऱ्या लाटांच्या आंतबाहेर पाणीच असतें, त्याप्रमाणे व्यापक परमेश्वरावर स्फुरणाऱ्या बुद्धीच्या आंत-बाहेर एक परमेश्वरचैतन्यच भरलें आहे आणि म्हणूनच कर्माच्या आदि व शेवटीं तोच असल्यामुळे तोच कर्ता होऊं शकतो, असें समजणें, हेच बुद्धीच्या पाठीं-पोटीं व कर्माचें शेवटीं परमेश्वराला बांधणे होय. हीच प्रक्रिया वरील श्लोकांत सांगितली आहे.

**तरि हेंही असो। सांडीं माझा अतिसो। परि संयतिसीं वसो। बुद्धि तुझी॥ १२७॥**

**अर्थ**—पण ही परमेश्वराला कर्तृत्व समर्पण करण्याची प्रक्रिया राहूं दे. कर्माच्या आदि-अंतीं माझी आठवण ठेवण्याचा ध्यासहि सोड पण आपल्या बुद्धीने इंद्रियांचा व मनाचा निग्रह करून राहा-म्हणजे इंद्रियें व मन यांना स्वैर सोडून, त्यांच्या स्वाधीन बुद्धीला होऊं देऊं नकोस॥ १२७॥

**गूढार्थदीपिका—परी संयतीसी वसो। बुद्धि तुझी**—येथें प्रक्रिया सांगण्यापूर्वी बुद्धीने, मन व इंद्रियें यांचा निग्रह करण्यास सांगितलें आहे. याचें कारण असें आहे कीं, बुद्धि, विषय व विषयसुखाला सत्य समजते, म्हणूनच मन व इंद्रियें विषयसुखाचे ठिकाणीं आसक्त असतात. कर्मफलाची आसक्ति सोडण्याकरितां, त्यापूर्वी, बुद्धीने आत्मानात्मविवेकसंपन्न होऊन आणि विषय व विषयसुखाला मिथ्या समजून, मन व इंद्रियें यांच्या स्वाधीन न होतां, भगवत्स्वरूपाचे ठिकाणी स्थिर राहून, त्यांचा निग्रह करायला पाहिजे, असें "संयतीसी वसो बुद्धी तुझी" या चरणाने सांगितलें आहे.

**अवतरणिका—वरील ओव्यांतून कर्तृत्व सोडल्याने भोक्तृत्वहि सुटून जीव ब्रह्मस्वरूप होतो, ही प्रक्रिया सांगितली, आतां पुढील ओव्यांतून माउली भोक्तृत्व सोडण्याची प्रक्रिया सांगत आहे. भोक्तृत्व-अहंकार सुटल्याने कर्तृत्व-अहंकार नाहीसा होतो व जीव ब्रह्मस्वरूप होतो; अशी ही प्रक्रिया आहे.**

**आणि जेणें जेणें वेळें। घडती कर्में सकळें। तयांचीं तियें फळें। त्यजितु जाय॥ १२८॥**

**अर्थ**—आणि ज्या ज्या वेळीं जें जें कर्म घडेल, त्याचें मिळणारें फळ टाकीत जा. -म्हणजे त्याचें फळ मिळण्याची मुळींच इच्छा करूं नकोस॥ १२८॥

**गूढार्थदीपिका**—या ओवींत सांगितलेल्या प्रक्रियेंत, नुसतें कर्मफळाचें भोक्तृत्व सोडायला सांगितलें आहे-म्हणजें कर्म करतांना "या कर्माचें सुखफळ मला मिळो" या इच्छेने कर्म करूं नये असें सांगितलें आहे.

**वृक्ष कां वेली। लोटती फळें आलीं। तैसीं सांडीं निपजलीं। कर्में सिद्धें॥ १२९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वृक्ष किंवा वेल, आलेल्या फळांचा उपयोग न करतां तशीच राहूं देऊन अखेर गळूं देतात, त्याप्रमाणे झालेलीं कर्में फलाशा न धरतां टाकून दे॥ १२९॥

**गूढार्थदीपिका**—कर्माच्या फळाची इच्छा धरून मनुष्य कर्म करतो; म्हणून कर्माचें कर्तृत्वाचा अहंकार त्याचे ठिकाणी स्फुरतो. कर्माच्या फळाची इच्छा नाहीशी झाली, की कर्तृत्वाचा अहंकार क्षीण होत जातो व शेवटी नाहीसा होतो. अशा रीतीने कर्माचा संबंध सुटून, जीव कर्तृत्वभोक्तृत्वरहित होऊन परमेश्वरस्वरूप होतो.

**परि मातें मनीं धरावें। कां मज उद्देशें करावें। हें कांहीं नको आघवें। जाऊं दे शून्यीं॥ १३०॥**

**अर्थ**—कर्म करतांना माझें ध्यान ठेऊन किंवा माझ्या प्राप्तीच्या उद्देशाने कर्म केलें पाहिजे असे कांही एक मनांत वागवूं नकोस. हीं कर्में शून्यांत जाऊं दे-म्हणजे निरालंब कर्में कर॥ १३०॥

**गूढार्थदीपिका**—कर्माच्या फळाची इच्छा धरून केलेल्या काम्यकर्मात, आपल्या सुखाचीच इच्छा असल्यामुळे आपणच तेथें आलंबन होतो व निष्काम कर्मात, भगवत्प्रीत्यर्थ कर्म केलें जात असल्यामुळे तेथें भगवान आलंबन असतो. हीं दोन्हीं आलंबन सोडून केलेलें कर्म कांहीच फळ देऊं शकत नाही. अशा रीतीने कर्म कर्तृत्व, भोक्तृत्व

यांचा संबंध सुटून जीव अनायासें ईश्वरस्वरूप होतो.

**खडकीं जैसें वर्षलें। कां आगीमाजीं पेरिलें। कर्म मानीं देखिलें। स्वप्न जैसें॥ १३१॥**

**अर्थ**—होणारें कर्म हें खडकावर झालेल्या वर्षावाप्रमाणे किंवा अग्नींत पेरलेल्या बीजाप्रमाणे अथवा स्वप्न पाहिल्याप्रमाणे समज॥ १३१॥

**गूढार्थदीपिका**—जोपर्यंत बुद्धि, विषयादिकांना सत्य समजते, तोपर्यंत विषयसुखाची इच्छा, कर्म, कर्तृत्व, भोक्तृत्व यांचा संबंध नाहीसा होणें शक्य नाही. म्हणूनच कर्मादिकांना येथे स्वप्नाप्रमाणे काल्पनिक मानण्यास सांगितलें आहे.

**अगा आत्मजेच्या विषीं। जीवु जैसा निरभिलाषी। तैसा कर्मीं अशेषीं। निष्कामु होईं॥ १३२॥**
**वन्हीची ज्वाळा जैसी। वायां जाय आकाशीं। क्रिया जिरों दे तैसी। शून्यामाजीं॥ १३३॥**
**अर्जुना हा फलत्यागु। आवडे कीर असलगु। परि योगामाजीं योगु। धुरेचा हा॥ १३४॥**

**अर्थ**—बा अर्जुना! मनुष्य जसा आपल्या कन्येच्या ठिकाणीं यत्किंचितहि कामाभिलाष ठेवित नसतो, त्याप्रमाणे संपूर्ण कर्माचे ठिकाणीं तूं फलेच्छारहित हो॥ १३२॥ ज्याप्रमाणे अग्नीची ज्वाळा व्यर्थच आकाशांत जाते, त्याप्रमाणे तूझी संपूर्ण क्रिया शून्यांत जाऊं दे. किंवा निरालंब होऊं दे॥ १३३॥ अर्जुना! हा फलत्याग अत्यंत सोपा दिसतो खरा, पण सर्व योगांमध्ये हा अग्रसर योग आहे॥ १३४॥

**गूढार्थदीपिका—योगांमाजी योग। धुरेचा हा**—अल्पसायासाचे व सर्व रोगनिवारक असें सुलभ व स्वस्त औषध असले तरी तें जसें सर्वांपेक्षां श्रेष्ठ असतें, तसाच फलत्याग खरोखर सोपा दिसत असला, तरी पूर्ण परमेश्वररूप प्राप्ति करून देणारा आहे, हें माउलींनी ''धुरेचा योग'' या पदाने सुचविलें आहे.

**येणें फलत्यागें सांडें। तें तें कर्म न विरूढे। एकचि वेळे वेळुझाडें। वांझें जैसीं॥ १३५॥**
**तैसें येणेंचि शरीरें। शरीरा येणें सरे। किंबहुना येरझारे। चिरा पडे॥ १३६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वेळूचीं झाडें एकदांच फळून वांझ होतात, त्याप्रमाणे या फलत्यागाने ज्या ज्या कर्माचा आपला संबंध सुटतो, तें तें कर्म पुढे फलद्रूप होत नाही॥ १३५॥ त्याचप्रमाणे या प्राप्त शरीराबरोबर पुन: शरीराला येणें नाहीसे होतें. किंबहुना जन्ममरणरूपी फेऱ्याच बंद पडतात॥ १३६॥

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते। ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम्॥ १२॥**

**अर्थ**—अभ्यासापासून लाभदायक अशी आत्मज्ञानाची प्राप्ति होते. आत्मज्ञानापासून विशेष अशी ध्यानाची प्राप्ति होते. ध्यानाने कर्मफलत्याग होऊन, कर्मफलत्यागानंतर शांति प्राप्त होते॥ १२॥

**पैं अभ्यासाचिया पाउटीं। ठाकिजे ज्ञान किरीटी। ज्ञानें येइजे भेटी। ध्यानाचिये॥ १३७॥**

**अर्थ**—अर्जुना! अभ्यासाच्या पायरीने आत्मज्ञान प्राप्त करून, पुढे आत्मज्ञानाच्या द्वारा ध्यानाच्या भूमिकेची भेट घ्यावी॥ १३७॥

**गूढार्थदीपिका—अभ्यासाचिये पाउटी**—म्हणजे मन, इंद्रियें यांचा निरोध करून कर्मफलत्याग करण्याचा जो अभ्यास, त्या अभ्यासाच्या पायरीने.

अभ्यासाने आत्मज्ञान प्राप्त होऊन, त्या ज्ञानाचें, भगवंताचे ध्यानांत पर्यवसान होते. असें झालें तरच अभ्यास व ज्ञान यांचे सार्थक झालें असें समजावें, असा भाव.

**मग ध्यानासि खेंव। देती आघवेचि भाव। तेव्हां कर्मजात सर्व। दूरी ठाके॥ १३८॥**

**अर्थ**—याप्रमाणे भगवंताचें ध्यान चित्तांत दृढ झालें असतां, चित्ताचे व इंद्रियांचे सर्व व्यापार सहजच ध्यानांत असलेल्या भगवंताला समर्पण होतात आणि जीवाचा संपूर्ण कर्मांशीं संबंध सुटतो॥ १३८॥

**गूढार्थदीपिका**—जसें सर्व अज्ञानी जीवांचे ''मी देह'' म्हणून देहाशीं ऐक्य झालें असल्यामुळे त्यांच्या अंत:करणांत देहाचेंच ध्यान असतें व त्यांच्या मन, इंद्रियें इत्यादिकांचा सर्व व्यापार देहाप्रीत्यर्थ होतो; म्हणूनच ते

कर्माने बांधले जातात, तसेंच अभ्यासाने भगवंताचे ज्ञान व ज्ञानाने त्यांचें अंत:करणांत ध्यान दृढ झालें असतां, सर्व व्यापार भगवंताप्रीत्यर्थच होत जाऊन "कृष्णी ज्याचें निश्चळ मन। त्याचें कर्म तितुकें कृष्णार्पण। त्यासीं न अर्पिताहि जाण। सहजें मदर्पण होतसे" (ए. भा. १०-६६) या नाथांच्या वचनाप्रमाणे, अनायासें जीवाचा कर्माशीं संबंध सुटतो.अर्थ—याप्रमाणे भगवंताचें ध्यान चित्तांत दृढ झालें असतां, चित्ताचे व इंद्रियांचे सर्व व्यापार सहजच ध्यानांत असलेल्या भगवंताला समर्पण होतात आणि जीवाचा संपूर्ण कर्मांशीं संबंध सुटतो॥ १३८॥

**गूढार्थदीपिका**—जसें सर्व अज्ञानी जीवांचे "मी देह" म्हणून देहाशीं ऐक्य झालें असल्यामुळे त्यांच्या अंत:करणांत देहाचेंच ध्यान असतें व त्यांच्या मन, इंद्रियें इत्यादिकांचा सर्व व्यापार देहाप्रीत्यर्थ होतो; म्हणूनच ते कर्माने बांधले जातात, तसेंच अभ्यासाने भगवंताचे ज्ञान व ज्ञानाने त्यांचें अंत:करणांत ध्यान दृढ झालें असतां, सर्व व्यापार भगवंताप्रीत्यर्थच होत जाऊन "कृष्णी ज्याचें निश्चळ मन। त्याचें कर्म तितुकें कृष्णार्पण। त्यासीं न अर्पिताहि जाण। सहजें मदर्पण होतसे" (ए. भा. १०-६६) या नाथांच्या वचनाप्रमाणे, अनायासें जीवाचा कर्मांशीं संबंध सुटतो.

**कर्म जेथ दुरावे। तेथ फलत्यागु संभवे। त्यागास्तव आंगवे। शांति सगळी॥ १३९॥**

**अर्थ**—कर्माचा नि:शेष संबंध सुटला असतांच कर्मफळ भोगण्याचा प्रसंग येत नाही, म्हणून कर्मफलत्याग होतो. अशा कर्मरूपत्यागानेच चित्त पूर्ण शांत होते॥ १३९॥

**गूढार्थदीपिका**—येथे शांति म्हणजें चित्ताची निर्वासन स्थिति होऊन तें ब्रह्मज्ञानांत निमग्न होणें.

**म्हणोनि यावया शांति। हाचि क्रम सुभद्रापती। अभ्यासचि प्रस्तुतीं। करणें एथ॥ १४०॥**

**अर्थ**—म्हणून चित्ताला अशी निर्वासन स्थिति प्राप्त होण्याकरितां, हे अर्जुना! आतां सांगितलेला हाच क्रम इष्ट असून, येथे प्रथम अभ्यासच केला पाहिजे॥ १४०॥

**अभ्यासाहूनि गहन। पार्था मग ज्ञान। ज्ञानापासोनि ध्यान। विशेषिजे॥ १४१॥**
**मग कर्मफलत्यागु। तो ध्यानापासोनि चांगु। त्यागाहूनि भोगु। शांतिसुखाचा॥ १४२॥**
**ऐसिया यया वाटा। इहींचि पेणा सुभटा। शांतीचा माजिवटा। ठाकिला जेणें॥ १४३॥**

**अर्थ**—हे अर्जुना! अभ्यासापासूनच दुर्गम असें आत्मज्ञान प्राप्त होते. मग त्या ज्ञानापासून विशेष अशा ध्यानाची प्राप्ति होते॥ १४१॥ त्या ध्यानापासून उत्तम असा कर्मफलत्याग प्राप्त होऊन, त्या त्यागापासून परमेश्वराच्या शांतिसुखाचा किंवा निर्वासन अशा ब्रह्मसुखाचा लाभ होतो॥ १४२॥ हे उत्तम योद्ध्या अर्जुना! अशा या ब्रह्मसुखाच्या प्राप्तीच्या निरनिराळ्या प्रक्रियामार्गांने व याच टप्प्याटप्प्याने जाऊन, ज्याने निर्वासन अशी पूर्णब्रह्मस्थिति प्राप्त करून घेतली॥ १४३॥

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च । निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी॥ १३॥**
**सन्तुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः । मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः॥ १४॥**

**अर्थ**—जो कोणत्याहि प्राण्यांचा द्वेष न करणारा व हितकर्ता आहे, जो सर्व प्राण्यांवर दया करणारा आहे, जो 'मी व माझे' असा अहंकार वागवित नाही, जो दु:ख व सुख समान समजतो, तसेंच जो लोकांचे सर्व अपराध सहन करतो॥ १३॥ आत्मस्वरूपाविषयीं दृढ निश्चय व इंद्रिय-मनोनिग्रह करून जो ज्ञानयोगी अखंड संतुष्ट झाला आहे आणि माझें सगुणस्वरूपाचे ठिकाणीं आपली मनबुद्धि अखंड स्थापन करून जो माझा भक्त झाला आहे, तोच मला प्रिय आहे.॥ १४॥

**जो सर्व भूतांच्या ठायीं। द्वेषातें नेणेंचि कहीं। आप पर नाहीं। चैतन्या जैसा॥ १४४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सर्वव्यापी चैतन्याला आप-पर भाव मुळींच नाही, त्याप्रमाणे अद्वैतचैतन्यस्वरूप झाल्यामुळे ज्याला आप-पर भासतच नाही, म्हणून जो कोणत्याहि प्राण्याचे ठिकाणी द्वेष करीत नाही॥ १४४॥

**गूढार्थदीपिका**—आपला-परका, लहान-मोठा, उत्तम-अधम इत्यादि सर्व भिन्न भिन्न भासणाऱ्या भावाला

भेदभाव किंवा विशेषभाव म्हणतात. भेदभाव जेथे राहत नाही त्याला सामान्यभाव म्हणतात. विशेषभाव मर्यादित असतो किंवा मर्यादित तितका विशेषभाव म्हटला जातो आणि सामान्यभाव हा व्यापक असतो. पण सामान्यभावावरच विशेषभाव भासत असल्यामुळे सामान्यभावाचा विशेषभावाशीं विरोध नसतो.

चैतन्य हें अणुरेणुपासून सर्वव्यापक असल्यामुळे तें अत्यंत सामान्यस्वरूप आहे व त्यावरच सर्व जगद्रूपी विशेषभाव भासतात. साधु पुरुष, आत्मज्ञानाने अत्यंत सामान्यभावरूप अशा चैतन्य स्वरूपाशीं ऐक्य पावतात व सर्वत्र मीच आहे अशी त्यांची अद्वैतबुद्धि होत असते, म्हणूनच येथून वर्णन केलेलें अद्वेष्टत्वादि संपूर्ण सद्‌गुण त्यांचे ठिकाणीं सहजच असतात.

**उत्तमातें धरिजे। अधम तरि अव्हेरिजे। हें कांहींचि नेणिजे। वसुधा जेवीं॥ १४५॥**
**कां रायाचें देह चाळूं। रंका परौतें गाळूं। हें न म्हणेचि कृपाळू। प्राणु पैं गा॥ १४६॥**
**गाईची तृषा हरूं। कां व्याघ्रा विष होऊनि मारूं। ऐसें नेणेचि कां करूं। तोय जैसें॥ १४७॥**
**तैसी आघवांचि भूतमात्रीं। एकपणें जया मैत्री। कृपेसी धात्री। आपण जो॥ १४८॥**

**अर्थ**—उत्तम वस्तूंना धारण करावे व सर्व वाईट वस्तूंना दूर लोटावे असा भेदभाव करण्याचे, ज्याप्रमाणे पृथ्वी मनांत आणीत नाही॥ १४५॥ किंवा, बा अर्जुना! राजाच्या देहाचें चलनवलन करीन आणि दरिद्र्याचा देह टाकून देईन, असे सर्वांवर दया करणारा प्राण कधी म्हणत नाही॥ १४६॥ किंवा फक्त गाईचीच तहान भागवीन, पण व्याघ्राचा मात्र विष होऊन प्राण घेईन, असे पाणी कधी करूं इच्छित नाही॥ १४७॥ त्याप्रमाणे सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी एकपणें-म्हणजे प्राणिमात्रांचे ठिकाणी मीच एक आहे या अद्वैत-जाणीवेने जो सर्वांशीं मैत्री करतो-म्हणजे सर्वांच्या हिताची इच्छा ठेवतो-व सर्व प्राणिमात्रावर केल्या जाणाऱ्या कृपेची आपणच जो जन्मदात्री आई होतो॥ १४८॥

**गूढार्थदीपिका—कृपेसी धात्री। आपण जो**—येथे साधुपुरुषाची भूतमात्राचे ठिकाणी मैत्री असते व तो कृपेची धात्री असतो, असें जें म्हटलें आहे त्याचा, "साधुपुरुष भूतमात्राचें भौतिक सुख साधून देतो", असा अर्थ करतां येत नाही; कारण सर्व भूतमात्राचें भौतिकसुख भिन्न भिन्न व त्यांच्या कर्माधीनहि असल्यामुळे भूतमात्रांचें हें भौतिक सुख साधणें शक्य नसतें व भौतिक सुखांत दु:खाचा मोठा वांटा असल्यामुळे अशा भौतिक सुखाची जीवाला प्राप्ति करून देऊन, त्यांना त्या सुखांत अधिक गुंतवून, चिरकाल दु:खांत पाडावें, असे सत्पुरुषांना, ते दयाळू असल्यामुळे कधी वाटत नाही, हें "म्हणोनियां तुका येतो काकुळती। पुरे यातायाती गर्भवास" इत्यादि संतांच्या वचनावरून सिद्ध आहे. अर्थात् त्यांची सर्व भूतांशीं मैत्री व सर्व भूतांवर कृपा, एक-अखंड सुखरूप अशा परमेश्वराची प्राप्ति करून देण्याकरितांच असते.

**आणि मी तूं हे भाष नेणे। माझें कांहींचि न म्हणे। सुखदु:ख जाणणें। नाहीं जया॥ १४९॥**

**अर्थ**—आणि हा देह म्हणजे मी, असा देहाहंकार ज्यांना कधी उठत नाही, म्हणून माझे कांही आहे अशी ज्यांच्या चित्तांत आसक्ति नसते व ज्यांना सुखदु:खांचा भोगहि होत नाही॥ १४९॥

**गूढार्थदीपिका-सुखदु:ख जाणणें**—म्हणजे सुखदु:खाचा भोग होणें होय. किंवा सुखदु:खाचा भोग होणें म्हणजें सुखदु:ख जाणणेंच होय.

**तेवींचि क्षमेलागीं। पृथ्वीसि पवाडु आंगीं। संतोषा उत्संगीं। दिधलें घर॥ १५०॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणें क्षमेच्या दृष्टीने ज्याच्या आंगीं पृथ्वीचाच विस्तार झाला आहे आणि ज्याने आपल्या ओसंगींच संतोषाला राहण्याला नेहमीं जागा दिली॥ १५०॥

**वार्षियेवीण सागरु। जैसा जळें निर्भरु। तैसा निरुपचारु। संतोषी जो॥ १५१॥**
**वाहूनि आपुली आण। धरी जो अंत:करण। निश्चया साचपण। जयाचेनि॥ १५२॥**
**जीवु परमात्मा दोन्ही। बैसले ऐक्यासनीं। जयाचिया हृदयभुवनीं। विराजती॥ १५३॥**

अर्थ—ज्याप्रमाणे वर्षाऋतुवांचून देखील समुद्र पूर्ण पाण्याने भरला असतो, त्याप्रमाणे सुखभोग प्राप्त न होतां देखील जो अखंड प्रसन्नचित्त असतो॥ १५१॥ शपथ वाहून जो आपलें अंत:करण आपल्या स्वाधीन ठेवतो- अंत:करणाच्या स्वाधीन होत नाही-आणि ज्याचा निश्चय इतका दृढ असतो की त्याच्याच योगाने निश्चयाला सत्यपणा आलेला आहे॥ १५२॥ ज्याच्या हृदयामध्ये जीव परमात्मा हे दोघेंहि एकाच आसनावर बसून विराजमान झालेले असतात॥ १५३॥

**गूढार्थदीपिका**—जीव व परमात्मा यांचे ऐक्य व दोनपणा अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे, केवळ शुद्ध बुद्धीनेच तो जाणतां येण्याजोगा आहे. तो दाखविण्याकरितां मानला आहे. पाणी व तरंग, सोनें व अलंकार, यांचें ऐक्य व दोनपणा ज्या विचाराने प्रतिपादिला जातो, त्यालाच विवर्तवाद म्हणतात.

या वादांत एकवस्तुत्वाच्या दृष्टीने ऐक्य व भासणाऱ्या रूपांतरामुळे त्या एक वस्तुचाच दोनपणा मानला जातो. ब्रह्मचैतन्यावर स्फुरणाऱ्या सर्व कार्यपदार्थांत, आंत-बाहेर ब्रह्मच भरलेंले असलें, तरी हृदयामध्येच जीव व परमात्मा यांची विशेष अभिव्यक्ति आहे असें ''य वा एष आत्मा हृदि तस्यैतदेव निरुक्तं हृद्यमिति'' (छां. उ. ८-३-३) या श्रुतीने सांगितलें असल्यामुळे माऊलींनी येथे ''जीव परमात्मा दोनी.......हृदयभुवनीं विराजती'' असें म्हटलें आहे.

ज्यप्रमाणे पसरलेलें पाणी, जेव्हा आपणच आपल्यावर मर्यादितपणे स्फुरतें, तेव्हा आपण त्या स्फुरणाला तरंग म्हणतो व तरंगभाव सोडून तरंगभावाच्या आधाराला पाणी म्हणतो, त्याप्रमाणेच वृत्तिरूपाने स्फुरणाऱ्या चैतन्याला जीव म्हणतात आणि वृत्तीला आधार असणाऱ्या चैतन्याला ईश्वर म्हणतात. पण तरंग व तरंगाचा आधार, या दोन्ही ठिकाणी पाणीच असून त्यांचे यत्किंचित्हि वेगळेपण होत नसल्यामुळे त्यांचा दोनपणा जसा शब्दमात्र असतो, त्याप्रमाणे वृत्तिरूप जीव व परमात्मा यांचे वस्तुत्वरूपाने ऐक्यच असून दोनपणा शब्दमात्र असतो. ज्याप्रमाणे तरंगरूप मर्यादित स्फुरण व त्याचा आधार हे दोन्ही एका पाणीरूप वस्तुचेंच असतात, त्याप्रमाणेच वृत्तिरूप जीव व वृत्तीला आधार असणारा परमात्मा हा दोन्ही प्रकारचा भास एका व्यापक ब्रह्मचैतन्यवस्तूचाच असल्यामुळे येथे माउलींनी ब्रह्मचैतन्याला ''एकासन'' म्हटलें आहे.

श्रीनाथांनीहि जीवशीवांचे ऐक्य व दोनपणा कसा आहे, हें ''प्रभा दीपु दवडीना वेगळा। दीपु प्रभेसि नव्हे निराळा। तेविं जीवशिवूंचा मेळा। एकत्र स्वलीला नांदती स्वयें'' (ए. भा. अ. ११-१६६) या ओवीने निरोपिलें आहे.

**ऐसा योगसमृद्धि। होऊनि जो निरवधि। अर्पी मनोबुद्धि। माझ्या ठायीं॥ १५४॥**

**अर्थ**—अशा रीतीने योगसंपत्तीने समृद्ध होऊन, जो माझ्या सगुण स्वरूपाचे ठिकाणीं मनबुद्धि अखंड अर्पण करतो॥ १५४॥

**गूढार्थदीपिका**—योग म्हणजे आत्मज्ञानाने परमेश्वराच्या निर्गुणस्वरूपाशीं ऐक्य पावणें.

समृद्धि म्हणजे अव्देष्टुत्वादि गुणसंपत्ति.

**आंतु बाहेरि योगु। निर्वाळलेंयाही चांगु। तरि माझा अनुरागु। सप्रेम जया॥ १५५॥**

**अर्थ**—आंतबाहेर दृढ ऐक्य साधल्यावरहि माझ्या सगुण स्वरूपाच्या ठिकाणीं ज्याचें अत्यंत प्रेम आहे॥ १५५॥

**गूढार्थदीपिका**—स्थूल देहादिकांचा व्यतिरेक करून ''मी ब्रह्म आहे'' असें अंत:करणवृत्तीने निर्गुण आत्मस्वरूपाशीं ऐक्य साधणें, याला आतील योग म्हणतात. व बाहेरहि सर्व नामरूपांचे ठिकाणी तेंच आत्मस्वरूप भरलें आहे, अशा अन्वयाने सर्व नामरूपांचे परमेश्वराशीं ऐक्य करणें, याला बाहेर योग म्हणतात.

अशा रीतीने व्यतिरेक व अन्वय असा दोन्ही प्रकारचा योग साधल्यावरहि, ज्ञानी पुरुषाचे सगुण रामकृष्णस्वरूपाच्या ठिकाणी प्रेम असायला पाहिजे, असें माऊलीचें म्हणणें आहे. कारण ''सर्वत्र नास्ति विद्वेष: साध्यसाधनपूर्वके। साक्षाद्विज्ञानिनां विप्रा उपेक्षा बुद्धिरेव हि॥ ७३॥ (सू. सं. य. वै. खं. अ. २) ज्ञानी पुरुषांना जरी कशाविषयींच द्वेष नसतो, सर्वाविषयीं उपेक्षाबुद्धिच असते, तरी

**विशुद्धं ज्ञानमुत्पन्नं यस्य तस्य महात्मनः। शिव रुद्र महादेव ब्रह्मेशानादि नामसु॥ ६९॥**
**रुद्रमूर्तिषु सर्वासु शांतिदांत्यादि साधने। तिर्यक् त्रिपुंड्रे रुद्राक्षे तथा भस्मावगुंठने॥ ७०॥**
**शिवलिंगस्य पूजायां शिवस्थानेषु सुव्रतः। प्रियबुद्धिः प्रजायेत स्वभावादेव सर्वदा॥ ७१॥**
**यस्य विज्ञानिनस्तेषु प्रद्वेषो यापि जायते। उपेक्षा वा न स ज्ञानी पशुर्विज्ञानवंचकः॥ ७२॥**

ज्याला शुद्ध आत्मज्ञान प्राप्त झालें आहे अशा महात्म्याला शिवादिकांचीं नांवें, मूर्ती, शांतिदांत्यादि साधनें, त्रिपुंड्रे, रुद्राक्ष, भस्मावगुंठन, शिवलिंगपूजा, शिवक्षेत्र इत्यादि ठिकाणी मात्र स्वभावतःच प्रेम असतें ज्या ज्ञान्याचे ठिकाणी यांच्याविषयीं द्वेष किंवा उपेक्षा असेल, तो ज्ञानीच नव्हे, असे सूतसंहितेंत स्पष्ट म्हटलें आहे.

मधुसदून सरस्वतींनीहि आपल्या गीतेवरील टीकेच्या उपोद्घातांत "अद्वेष्टुत्वादिवत्तेषां स्वभावो भजनं हरेः" ज्ञान्याच्या ठिकाणी अद्वेष्टुत्वादि गुणांची, जशी स्वाभाविक आवडी असते, तशीच त्याच्या ठिकाणी रामकृष्णादि सगुणस्वरूपाची प्रेमभक्ति स्वाभाविकच असते, असें म्हटलें आहे.

पुनः परमात्मा त्रिगुणातीत असल्यामुळे त्यांच्याशीं ऐक्य पावण्याकरितां जीवालाहि त्रिगुणातीत झालें पाहिजे व याकरितांच वैराग्य. ज्ञान व भक्ति हीं साधनें सांगितलीं आहेत.

वैराग्य अपर व पर असे दोन प्रकारचे आहे. इहपरलोकांतील विषयसुखाची आवडी नाहीशी होणें, हें पहिलें- म्हणजें ज्ञानप्राप्ति पूर्वीचें विषयवैतृष्ण्यरूप अपर वैराग्य असून अद्वेष्टुत्वादि सात्विक गुणांची आवड नांहीशी होणें, हें ज्ञानप्राप्तीनंतर होणारें गुणवैतृष्ण्यरूप दुसरें परमवैराग्य होय.

विषयवैराग्य व आत्मज्ञान या योगाने रजोगुण, तमोगुण यांची निवृत्ति होऊन सत्वगुण बाणतो व त्यामुळे त्यांच्या (ज्ञान्याच्या) ठिकाणी ज्ञानस्थिति व अद्वेष्टुत्वादि सत्वगुणाची आवडी उत्पन्न होते. या सत्वगुणाच्या बंधनांतून ज्ञान्याला, परमेश्वराची भक्तिच सुलभ, निश्चित व लवकर मुक्त करूं शकते, असा "ईश्वरप्रणिधानाद्वा" या योगसूत्राचा आशय असून, भगवंतांनीहि चवदाव्या अध्यायांत "मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते। सगुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते" या श्लोकाने असेच सांगितलें आहे.

"शांति क्षमा दया। त्याहि नको पंढरीराया" भगवंता! तुझ्या प्रेमगोडीवांचून शांति, क्षमा, दया इत्यादि सात्विक गुणांची आवडहि मला नकोशी झाली आहे, असे निळोबामहाराजहि म्हणतात.

त्याचप्रमाणे परब्रह्म, अस्फुट, अद्वैतरूप असल्यामुळे ते अखंड, पूर्ण व आनंदरूप असतें. त्याचे ठिकाणी माया मुळीच नाही; म्हणून श्रेष्ठ-कनिष्ठ, न्यून-पूर्ण, सामान्य-विशेष इत्यादि भेदभावहि त्याचे ठिकाणी मुळीच नाहीत. तें सदासर्वदा कोणत्याहि अवस्थेंत तसेंच पूर्णानंदस्वरूप राहतें. पण मायाभ्रांतीने बद्ध झालेल्या जीवानेच त्याचे ठिकाणी सर्व भेद कल्पिले आहेत.

आत्मज्ञानानंतर भेदाची कल्पना नाहीशी झाली, तरी ज्ञान्याचे ठिकाणी उरलेल्या अविद्यालेशाने भेदाचा भास राहतो व त्यामुळे व्युत्थानकालीं त्याचा निर्गुण ब्रह्मानंद भंग पावतो. भेदाभास नाहीसा होऊन ब्रह्मानंद अखंड स्थिर होण्याकरितां निर्गुणस्वरूपाच्या अनुभवानंतरहि ज्ञानीपुरुषाने भगवंताच्या निरुपाधिक साकार सगुण स्वरूपाची प्रेमभक्ति केली असतां भगवंताचे निर्गुणनिराकार व सगुण-साकार हीं दोन्हीही रूपें समसमान पूर्ण ब्रह्मस्वरूपाने अनुभवाला येतात. व्युत्थानकालींहि त्याचा ब्रह्मानंद कायम राहतो, हेंच रहस्य श्रीज्ञानेश्वरमाउलींनी या ओवींत दाखविले आहे.

**अर्जुना गा तो भक्तु। तोचि योगी तोचि मुक्तु। तो वल्लभा मी कांतु। ऐसा पढिये॥ १५६॥**

**अर्थ**—अर्जुना तोच भक्त आहे, तोच योगी आहे व तोच मुक्त आहे, असे समज, मी पति व तो पत्नी असा तो मला प्रिय असतो॥ १५६॥

**गूढार्थदीपिका—अर्जुना तो भक्तु। तोचि योगी तोचि मुक्तु**—ज्याला निराकार अशा अद्वैत साक्षात्काराच्या नंतर सगुणाची भक्ति आहे, असा भक्तच खरोखर आत्मस्वरूपाशीं ऐक्य पावलेला व मुक्त झालेला ज्ञानी होय.

''भावेविण भक्ति भक्तिवीणें मुक्तिः......बोलूं नये'' असे हरिपाठांतील अभंगांतहि श्रीमाउलींनी म्हटले आहे.

**तो वल्लभा मी कान्त**—निर्गुण स्वरूपाचें जसे स्वाभाविक नि:सीम प्रेम असतें, तसेंच भगवंताच्या सगुणस्वरूपाचेंहि स्वाभाविक प्रेम असणें, याला भक्ति म्हणतात. ही ज्ञानानंतरची साहजिक स्थिति आहे आणि ''माझिये सहज स्थिति। भक्ति नाम'' असे पुढे अठराव्या अध्यायांत माउलींनी म्हटलेंहि आहे.

येथें माउलींनी भक्त व भगवान यांच्या परस्पर नि:सीम प्रेमाला पति व पत्नी यांचा दृष्टान्त दिला आहे.

व्यवहारांत जसे लालन, वात्सल्य, सख्य व माधुर्य या चार संबंधाने प्रेम केले जातें, तसेच भक्तहि भगवंताचे ठिकाणी या चार प्रकारांनीच प्रेमाचा संबंध लावतांना दिसतात. या सर्व प्रेमसंबंधांत भक्त, भगवंतापासून यत्किंचितहि सुखाची इच्छा करीत नसतात.

**लालन प्रेम**—या लालन प्रेमभावांत भक्त, आपल्या ठिकाणी बालभाव धारण करून भगवंताचे मातृपितृभावाने प्रेम करीत असतात व प्रारब्धानुसार अहंकारादि विकार उठले असतां भगवंताचा धांवा करींत असतात.

**वात्सल्य प्रेम**—म्हणजे भगवंताला आपळे बाळ समजून सर्वतोपरि आईप्रमाणें भगवंतावर प्रेम करणें.

**सख्य प्रेम**—म्हणजे भगवंताचें ठिकाणी मित्रभावाने प्रेम करणें.

**माधुर्य प्रेम**—म्हणजे आपल्या स्वत:ला भगवंताची पतिव्रता स्त्री समजून ''भोज्येषु माता'' या श्लोकांत सांगितल्याप्रमाणे वरील सर्व भावांचे द्वारा भगवंताला सुख समर्पण करणें.

हे चारहि प्रकारचे प्रेमसंबंध दृढ अपरोक्षज्ञानाने स्थूल, सूक्ष्म व कारण या तिन्ही देहांचा निरास झाल्यानंतरच केले जातात, असे अगस्तिसंहितेंत ''देहत्रय विनाशं च कृत्वादौ गुरुवक्त्रत:। तत: संबंधयोग्यत्वं प्राप्नोतिमुनिसत्तम'' या श्लोकाने सांगितलें आहे.

लालनादि तीन प्रेमसंबंधांत, सर्व प्रकारच्या प्रेमसंबंधाने प्रेम करतां येत नसल्यामुळे, तेथे भगवंताला मर्यादितच प्रेम समर्पण होतें; पण माधुर्यभक्तींत सर्व प्रेमसंबंध अर्पण होऊन ''तत्सुखसुखित्वम्'' या श्रीनारदसूत्रांत सांगितल्याप्रमाणे केवळ भगवंताच्या सुखांतच भक्त सुख मानित असल्यामुळे, माधुर्यप्रेम लालनादि प्रेमापेक्षां श्रेष्ठ म्हटलें जातें. म्हणूनच माउलींनी भगवंताचे भक्ताच्या ठिकाणी व भक्ताचे भगवंताच्या ठिकाणी असणारे जें नि:सीम प्रेम, तें ''वल्लभा व कान्त'' हा दृष्टांत देऊन व्यक्त केलें आहे. अखंड नि:सीम प्रेम करणाऱ्या भक्ताचें उदाहरण म्हणून भगवान नारदांनीहि ''यथा व्रजगोपिकानाम्'' या आपल्या भक्तिसूत्राने भक्तश्रेष्ठ म्हणून माधुर्यभक्ति करणाऱ्या केवळ गोपिकांचाच उल्लेख केला आहे व प्राधान्याने लालनभक्ति करणाऱ्या श्रीतुकाराम महाराजादि संतांनीहि भगवंताचे ठिकाणी वात्सल्य, सख्य, माधुर्य इत्यादि भावद्वारा भगवंताला प्रेम समर्पण केलें आहे. श्रीज्ञानेश्वरमाउलींनी तर अनेक अभंगांतून माधुर्यप्रेमाने भगवंताला आळविलें आहे आणि येथेहि ''तो वल्लभा मी कान्त'' या चरणाने तेंच माधुर्यप्रेमाने नि:सीमत्व दाखविलें आहे.

प्रेमरसायनकारांनीहि ''नित्यसमाधियुक्तानाम्'' असें गोपिकांना विशेषण लावून त्या, भगवंताच्या अखंड समाधींतच राहत असत असें म्हटलें आहे.

**ऐसा पढियें**—पतिव्रता स्त्रियेचें नि:सीम प्रेम पाहून जसा पतिहि तिच्यावर नि:सीम प्रेम करतो, त्याप्रमाणे पत्निभावाने केल्या जाणाऱ्या प्रेमांत भक्ताच्या प्रेमाची नि:सीम वाढ होत असल्यामुळे अर्थात्च भगवंताचेहि अशा भक्तावर नि:सीम प्रेम असतें.

**हें ना तो आवडे। मज जीवाचेनि पाडें। हेंही एथ थोकडें। रूप करणें॥ १५७॥**

**अर्थ**—एवढेंच नाही, तर असा तो ज्ञानी भक्त मला माझ्या प्राणाप्रमाणे आवडतो. पण हीहि उपमा, त्याच्यावर असलेलें माझें प्रेम वर्णन करण्यास कमीच पडते॥ १५७॥

**तरी पढियंतयाची कहाणी। हे भुलीची भारणी। इयें तंव न बोलणीं। परि बोलवी श्रद्धा॥ १५८॥**

**अर्थ**—प्रेमळ भक्तांची कथा म्हणजे चित्ताला भूल किंवा विसर पाडणारीच होय; म्हणून ती शब्दाने बोलून दाखविण्यासारखी नाही, तरीपण तुझें माझ्यावरील प्रेमच मला बोलायला लावते॥ १५८॥

**म्हणोनि गा आम्हां। वेगा आली उपमा। एऱ्हवीं काय प्रेमा। अनुवादु असे॥ १५९॥**

**अर्थ**—म्हणूनच अर्जुना! भक्तावर माझें प्रेम कसें असतें, हें सांगतांना "तो वल्लभा मी कान्त" "जीवाचेनि पाडें" अशा उपमा माझ्या तोंडांतून एकदम बाहेर पडल्या. येऱ्हवीं पाहतां हें प्रेम शब्दाने सांगतां येतें काय?॥ १५९॥

**गूढार्थदीपिका**—"अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम्। मूकास्वादनवत्" प्रेमाचें स्वरूप शब्दाने सांगतां येत नाही, असे भक्तिसूत्रकार श्रीनारदाचार्यांनी म्हटलें असून "प्रेम नये सांगतां बोलतां दावितां" असे तुकाराममहाराजहि म्हणतात.

"प्रेमा द्वयो रसिकयोरपि दीप एव हृद्वेश्म भासयति निश्चलमेव भाति। द्वारादय वदनतस्तु बहिष्कृतश्चेन्निर्याति शीघ्रमथवा लघुतामुपैति" (प्रेमसंपुटे) दोघांचे प्रेम हे दिव्यासारखे असून जसा वारा लागला असतां दिवा विझतो किंवा मंद तरी होतो, त्याप्रमाणेच प्रेम बोलून दाखविलें गेलें असतां, तें नाहीसें होतें किंवा कमी तरी होतें, असे एका कवीनेहि म्हटलें आहे.

**आतां असो हें किरीटी। पैं प्रियाचिया गोष्टी। दुणा थांव उठी। आवडी गा॥ १६०॥**

**अर्थ**—अर्जुना! आतां हें असो. पण प्रेमळाच्या गोष्टी करण्याने मात्र प्रेम दुप्पट उफाळून येतें. ॥ १६०॥

**गूढार्थदीपिका**—प्रेमळांच्या कथेचा असा प्रभाव असल्यामुळेच भगवंताच्या व भक्तांच्या कथा श्रवण करण्याचा पुराणादिकांतून उपदेश केला आहे.

**तयाही वरी विपायें। प्रेमळु संवादिया होये। तिये गोडीसि आहे। कांटाळें मग॥ १६१॥**
**म्हणोनि गा पांडुसुता। तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता। वरी प्रियाची वार्ता। प्रसंगें आली॥ १६२॥**
**तरि आतां बोलों। भले या सुखा मीनलों। ऐसें म्हणतखेंवों डोलों। लागले देवो॥ १६३॥**
**मग म्हणे जाण। तया भक्ताचें लक्षण। जया मी अंतःकरण। बैसों घालीं॥ १६४॥**

**अर्थ**—तशांतहि कदाचित् प्रेमळ भक्तांच्या कथा श्रवण करणारा श्रोताहि प्रेमळच असला, तर मग त्या प्रेमगोडीची कशाशीं तुलना करतां येईल काय?॥ १६१॥ म्हणून हे अर्जुना! तूंच माझा अत्यंत प्रेमळ असा प्रिय भक्त आहेस आणि तूंच प्रेमळ श्रोताहि असून, त्यांतच प्रसंगाने प्रेमळाचें निरूपण आलें आहे॥ १६२॥ तर आतां प्रेमळाची कथाच बोलतो. भाग्याने प्रेमळाच्या कथा सांगण्याचें हें सुख प्राप्त झालें, असें म्हणतांक्षणींच देव डोलूं लागलें॥ १६३॥ मग देव म्हणाले, अर्जुना! ज्याला मी बसायला आपल्या अंतःकरणाचें आसन घालतो, त्या भक्ताचें लक्षण ऐक॥ १६४॥

**गूढार्थदीपिका**—भक्त, जसे भगवंताला अंतःकरणात अखंड वागवितो तसे भगवानहि, भक्तांना आपल्या अंतःकरणांत अखंड वागवितात, असा भाव.

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः। हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः॥ १५॥**

**अर्थ**—ज्याच्यापासून लोकांना क्षोभ उत्पन्न होत नाही व लोकांपासून ज्याला क्षोभ उत्पन्न होत नाही; जो हर्ष, क्रोध भय, उद्वेग इत्यादि उर्मीपासून मुक्त झाला आहे; तो मला प्रिय आहे॥ १५॥

**तरी सिंधूचेनि माजें। जळचरां भय नुपजे। आणि जळचरीं नुबगिजे। समुद्रु जैसा॥ १६५॥**
**तेविं उन्मत्तें जगें। जयासि खंती न लगे। आणि जयाचेनि आंगें। न शिणे लोकु॥ १६६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे समुद्रांत भयंकर खळबळ माजली, तरी समुद्रांतील प्राण्यांना भय वाटत नाही आणि समुद्राच्या पाण्यांत भयंकर प्राणी असले तरी समुद्र कंटाळत नाही॥ १६५॥ त्याचप्रमाणे जगाच्या उन्मत्त वागणुकीची सत्पुरुषाला खंती वाटत नाही आणि ज्याच्या वागण्याने लोकांनाहि दुःख होत नाही॥ १६६॥

**गूढार्थदीपिका—तेविं उन्मत्तें जगें। जयासि खंती न लगे**—संपूर्ण जगांत मीच एक असून माझ्यावरच संपूर्ण जगाचा मिथ्या भास भासत आहे, या जाणीवेमुळे ज्ञानी पुरुषाला जगाच्या उन्मत्त वागणुकीची खंती वाटत नाही किंवा

आत्मसुखांत रत असलेल्या पुरुषांना बाह्य विषयसुखाची यत्किंचितहि आसक्ति नसल्यामुळे प्रारब्धानुसार

विषयसुखाकरितां होणारा त्यांचा प्रयत्न कोणी उन्मत्त लोकांनी हाणून पाडल्यास ते यत्किंचितहि दु:खी होत नाहीत.

**आणि जयाचेनि आंगें। न शिणे लोकु**—आपल्या सुखाकरितां दुसऱ्याला दु:ख देण्याची ज्ञानी पुरुषांची प्रवृत्तिच नसते. ते दुसऱ्याच्या सुखांतच सुख मानून राहतात; म्हणून त्यांच्या वागणुकीने कोणालाहि दु:ख होत नाही.

**किंबहुना पांडवा। शरीर जैसें अवयवां। तैसा नुबगे जीवां। जीवपणें जो॥ १६७॥**

**अर्थ**—किंबहुना, हे अर्जुना! ज्याप्रमाणे शरीर अपल्या अवयवांचा कंटाळा करीत नाही, त्याप्रमाणे जो पुरुष, सर्व जीवांचे ठिकाणी जीवपणाने मीच आहे असे समजून, कोणाचाहि कंटाळा करीत नाही॥ १६७॥

**गूढार्थदीपिका—तैसा नुबगे जीवा। जीवपणें जो**—आपल्याला जसे दु:ख नको असून सुखच पाहिजे असतें, तसेच सर्व जीवांना दु:ख नको व सुखच पाहिजे असतें; असें जीवांचें साम्य किंवा ऐक्य लक्षांत घेऊन वागणें, याला ''जीवपणें जीवा नुबगणें'' म्हणतात.

पण हें जीव साम्य लक्षांत घेऊन असतांना ''धर्माणामविरोधेन सर्वेषां प्रियमाचरेत्'' ही धर्माज्ञा पाळूनच ते प्राणिमात्रांना सुख देत असतात.

**जगचि देह जाहलें। म्हणोनि प्रियाप्रिय गेलें। हर्षामर्ष ठेले। दुजेनविण॥ १६८॥**
**ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु। भयोद्वेगरहितु। याही वरि भक्तु। माझ्या ठायीं॥ १६९॥**
**तरि तयाचा गा मज मोहो। काय सांगों तो पढियावो। हें असो जीवें जीवो। माझेनि तो॥ १७०॥**
**जो निजानंदें धाला। परिणामु आयुष्या आला। पूर्णते जाहला। वल्लभु जो॥ १७१॥**

**अर्थ**—(सर्व जगांत मीच आहे या जाणीवेने) सर्व जगच ज्याचा देह बनला. त्याच्याहून भिन्न कांही राहिले नाही, म्हणून त्याची आवड-नावड, हर्ष-क्रोध हे संपूर्ण नाहीसे झाले॥ १६८॥ अशा रीतीने जो सर्व द्वंद्वमुक्त होऊन भयोद्वेगरहित झाला आणि शिवाय माझ्या सगुणस्वरूपाचें प्रेम करणारा भक्त असला॥ १६९॥ तर अर्जुना! त्याचा मला कसा मोह असतो व तो मला कसा प्रिय असतो, हें काय सांगूं! हे असो. ''माझेनि जीवें'' म्हणजे मी सगुणस्वरूपाने प्रगट झालों आहे, म्हणूनच तो जगतो॥ १७०॥ जो आत्मानंदाने तृप्त झाला आणि आत्मानंदाचा परिणाम-म्हणजे शेवट-जो ब्रह्मानंद, तोच जणुं जन्माला आला, असा जो पूर्ण ब्रह्मस्थितीचा पति झाला॥ १७१॥

**गूढार्थदीपिका—पूर्णते जाहला वल्लभु जो**—पूर्णता-म्हणजे आंत निर्गुणानंद व बाहेर सगुणानंद, अशा दोन्ही आनंदाने अखंड पूर्ण ब्रह्मानंदस्वरूप होऊन राहणें, ज्ञानीभक्तच अखंडानंदरूप पूर्ण ब्रह्मस्वरूप होतात, हा मागील सिद्धान्तच माउलींनी पुन: येथें मांडला आहे.

**अनपेक्ष: शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथ:। सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्त: स मे प्रिय:॥ १६॥**

**अर्थ**—जो कशाचीहि अपेक्षा करीत नाही, जो आंतबाहेर शुद्ध आहे, जो तत्वाकडे दृष्टि देणारा आहे, जो आत्मव्यतिरिक्तवस्तूचे ठिकाणी उदासीन आहे, जो संसारविरहित झाला आहे, जो सर्व सकामकर्मांचा त्याग करणारा आहे आणि याशिवाय जो माझ्या सगुणस्वरूपाचे ठिकाणी प्रेमभक्ति करतो, तो मला प्रिय आहे॥ १६॥

**जयाचिया ठायीं पांडवा। अपेक्षे नाहीं रिगावा। सुखासि चढावा। जयाचें असणें॥ १७२॥**

**अर्थ**—ज्याच्या अंत:करणांत विषयसुखाच्या वासनेचा शिरकावच होत नाही, म्हणून ज्याचें असणें-म्हणजे ज्याची संगति-दुसऱ्याच्या सुखाची वृद्धि करणारी असते॥ १७२॥

**गूढार्थदीपिका—सुखासि चढावा। जयाचें असणें**-सत्पुरुष, भक्तिसुख भोगण्याकरितां किंवा भक्तीचा प्रसार करण्याकरितां जिवंत राहत असल्यामुळे त्यांच्या जिवंत राहण्याने भक्तिमार्गाचा प्रसार होऊन, विषयासक्त पुरुषांचीहि क्षणिक अशा विषयसुखाची वासना नाहीशी होत जाऊन, ते अविनाशी अशा ब्रह्मानंदाच्या ठिकाणी स्थिर होत जातात.

**मोक्ष देऊनि उदार। काशी होय कीर। परि वेंचणें लागे शरीर। तिये गांवीं॥ १७३॥**

**अर्थ**—काशीक्षेत्र अत्यंत पुण्य भूमि असून निश्चयाने मोक्ष देण्यास उदार आहे, पण त्या क्षेत्रांत मरायला पाहिजे॥ १७३॥

**गूढार्थदीपिका-मोक्ष**—म्हणजे स्थूल, सूक्ष्म व अज्ञानरूप कारण अशा तिन्ही प्रकारच्या देहादि उपाधिदोषापासून मुक्त होणें.

काशी क्षेत्रांत मरण्याने मोक्ष मिळतो असें येथें सांगितलें आहे आणि ''ज्ञानदेव तु कैवल्यम्'' ज्ञानाने मोक्ष मिळतो, असें श्रुति म्हणते; म्हणून दोन्ही वचनांचा जरी विरोध दिसतो, तरी ''यत्र साक्षान्महादेवो देहान्ते स्वयमीश्वरः। व्याचष्टे तारकं ब्रह्म तत्रैव ह्यविमुक्तके''॥ ४६॥ (पद्मपुराण आदिखंड अ. ३३) काशीक्षेत्रांत मेलेल्या जीवांना भगवान काशीविश्वेश्वर तारकब्रह्माचा उपदेश करून ज्ञान करून देतात व त्यांच्या द्वाराच त्यांना मोक्ष होतो, असे पुराणादिकांतून सांगितले असल्यामुळे दोन्ही वचनांचा विरोध येत नाही.

**अन्यक्षेत्रे कृतं पापं काशीक्षेत्रे विनश्यति। काशीक्षेत्रे कृतं पापं वज्रलेपो भविष्यति॥**

असेहि वचन आहे; म्हणून काशी क्षेत्रांत राहून विश्वेश्वराचें दर्शन न घेणारे व गंगेचे स्नान न करतां पाप करणारे पापी लोक भूत-पिशाच्च योनींत जाऊन शिवाच्या सान्निध्यांत शिवगण होऊन राहतात व तें प्रारब्ध संपल्यानंतर काशीविश्वेश्वराच्या उपदेशाने शेवटीं मुक्त होतात.

काशीक्षेत्रांत केलेलें पाप, भगवंताच्या संकल्पाने एकदम प्रारब्धरूप होतें, म्हणून मेल्यानंतर तें भोगावें लागतें व तें भोगल्यानंतर मनुष्य मुक्त होतो असे शिवपुराणांत सांगितलें आहे (अ. ५० श्लो. २-४)

**हिमवंतु दोष खाये। परि जीवितांची हानि होये। तैसें शुचित्व नोहे। सज्जनाचें॥ १७४॥**

**अर्थ**—हिमालयभूमि निष्पाप करणारी आहे; पण तेथे जो प्राणाला मुकतो, त्यालाच ती निष्पाप करणारी होते. ज्ञानभक्तीने अत्यंत पुनीत झालेल्या सज्जनांचे पावन करणें तशा प्रकारचे (म्हणजे काशीसारखे किंवा हिमालयाच्या भूमीसारखे) नाही-(म्हणजे त्यापेक्षाहि विशेष आहे असा अर्थ)॥ १७४॥

**शुचित्वें शुचि गंगा होये। आणि पाप तापही जाये। परि तेथें आहे। बुडणें एक॥ १७५॥**

**अर्थ**—सर्व पवित्र पदार्थांत अत्यंत पवित्र, गंगा होय आणि तिच्या योगाने सर्व पाप व त्रिविध ताप नाहीसे होतात-म्हणजे पुरुष मुक्त होतो-पण या लाभाकरितां गंगेंत बुडून मरावें लागतें॥ १७५॥

**गूढार्थदीपिका—पाप तापहि जाये**-कुतो वीचिर्वीचिस्तव यदि गता लोचनपथम्। त्वमापीता पीताम्बरपुरनिवासं वितरसि॥ (शंकराचार्य-गंगास्तुति)

'माते गंगे! तुझ्या ठिकाणी उठणारा जलतरंग ज्याच्या दृष्टीस पडतो, त्याचें संपूर्ण पाप नाहीसे होऊन नरकाची वार्ताहि त्याच्या कानीं पडत नाही आणि ज्यांनी तुझें जल प्राशन केलें त्याला तूं विष्णुलोकाची प्राप्ति करून देतेस.' असे भगवान आचार्यांनी गंगेच्या स्तोत्रांत म्हटलें आहे. पण हें फळ, गंगेविषयीं अत्यंत आदर ठेऊन, गंगेच्या योगाने विष्णुपदाला जाईन, असा गंगेच्या माहात्म्याविषयीं दृढ विश्वास ठेऊन बुडणाऱ्यांनाच मिळते, असें समजावें. कारण ''अतित्यायी बुडे गंगे। पाप लागे त्याचे त्या'' (तु. गा. २६७९)

**थोड्यासाठी राग आला। जीव दिला गंगेत॥ त्यासी परलोकी नाही मुक्ति। अधोगति चुकेना॥** (तु. गा. २४३२)

इत्यादि वचनांनी रागारागाने गंगेंत जीव देणाऱ्यांना दुर्गति चुकत नाही, असें तुकाराममहाराजांनी म्हटलें आहे.

**खोलिये पारु नेणिजे। तरी भक्तीं न बुडिजे। रोकडाचि लाहिजे। न मरतां मोक्षु॥ १७६॥**

**अर्थ**—ज्ञानभक्तीने संतांना जे पावित्र्य येते, या पवित्रतेच्या खोलीला पारच नाही; तरी भक्त त्यांत बुडत नाही आणि न मरतां—म्हणजे जीवंतपणीच, रोकडाचि-म्हणजे प्रत्यक्ष-त्यांना मोक्षाचा लाभ होतो॥ १७६॥

**गूढार्थदीपिका-न मरतां मोक्षु**—जी विदेहमुक्ति ज्ञान्यांना मरणानंतर होते, त्या विदेहमुक्तींतील सुखस्थिति, भक्तांना जीवंतपणीच प्राप्त होते असा भाव. ''याच देहीं याच डोळां। भोगिजे मुक्तीचा सोहळा'' (आनंदलहरी-एकनाथकृत) असे श्रीनाथहि म्हणतात.

**संताचेनि अंगलगें। पापातें जिणणें गंगें। तेणें संतसंगें। शुचित्व कैसें॥ १७७॥**

**अर्थ**—पाप्याचें पाप आपण घेऊन, त्याला निष्पाप करणारी गंगा, ज्या संतांच्या अंगस्पर्शाने शेवटीं निष्पाप

होते; त्या संताच्या संगाने जो पवित्रपणा येतो तो किती अगाध म्हणावा!॥ १७७॥

**म्हणोनि असो जो ऐसा। शुचित्वें तीर्थां कुवासा। जेणें उल्लंघविलें दिशा। मनोमळ॥ १७८॥**

**अर्थ**—म्हणून हें पुरे. जो सत्पुरुष असा थोर पवित्र असल्यामुळे सर्व तीर्थांना आश्रय झाला, ज्याने आपल्या मनाचे दोष दिशांच्या पलीकडे पळवून लावले॥ १७८॥

**गूढार्थदीपिका-मनोमळ**—म्हणजे रजस्तमोगुणजन्य आवरण, विक्षेप, असत्प्रवृत्ति, अविश्वास, संदेह, विपरीत भावना इत्यादि मनांतील दोष.

संत, ज्ञानभक्तीच्या योगाने नि:शेष रजोगुणतमोगुणरहित होऊन शुद्ध सात्विक होतात, असा भाव.

**आंतु बाहेरि चोखाळु। सूर्य तैसा निर्मलु। आणि तत्त्वार्थींचा पायाळु। देखणा जो॥ १७९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सूर्य, आंतबाहेर निर्मळ असतो, त्याप्रमाणे जो पुरुष आंत म्हणजे अंत:करणांत व बाहेर म्हणजे शरीराचे ठिकाणी अत्यंत शुचिर्भूत असतो आणि पायाळू माणसाप्रमाणे सर्वत्र तो ब्रह्मतत्त्वरूपी अर्थच पाहात असतो॥ १७९॥

**गूढार्थदीपिका**—भक्तीच्या योगाने सर्व मळ नाहीसे होऊन अनायासें ब्रह्मसाक्षात्कार कसा होतो, हें मागें नवव्या अध्यायांत ओवी १८८ वरील गूढार्थदीपिकेंत भागवतांतील श्लोक प्रमाण देऊन सांगितलेंच आहे.

ज्याप्रमाणे सूर्यकान्तमण्यांत सूर्याचीं किरणें केंद्रीभूत झालीं असतां, त्यांत सूर्याप्रमाणे जाळण्याची शक्ति येते, त्याप्रमाणे ज्ञानभक्तीने सदेह सच्चिदानंद झालेल्या संताचें निर्मलत्व किंवा पवित्रपणा पूर्ण परब्रह्मासारखाच असीम असतो.

**व्यापक आणि उदास। जैसें कां आकाश। तैसें जयाचें मानस। सर्वत्र गा॥ १८०॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आकाश सर्वत्र व्यापक असून सर्वांपासून अलिप्त असतें, त्याप्रमाणे ज्याचें मन व्यापक असून सर्वत्र अलिप्त असतें॥ १८०॥

**गूढार्थदीपिका**—वस्तु जितकी सूक्ष्म होते, तितकी ती व्यापक होते व तितकीच ती अलिप्तहि असते. परब्रह्मवस्तु सर्वांपेक्षा सूक्ष्म असल्यामुळे ती व्यापक व सर्वांहून अलिप्त अशी ठरली गेली आहे. अशा व्यापक व उदास परब्रह्माशीं ज्ञानवृत्तीने ऐक्य पावलेल्या सत्पुरुषांचे मनहि सर्वत्र व्यापक व अलिप्त असतें.

**संसारव्यथें फिटला। जो नैराश्यें विनटला। व्याधाहातोनि सुटला। विहंगमु जैसा॥ १८१॥**
**तैसा सतत जो सुखे। कोणीही टवंच न देखे। नेणिजे गतायुषें। लज्जा जेवीं॥ १८२॥**

**अर्थ**—तसेंच पारध्याच्या हातांतून सुटलेल्या पक्षाची जशी दु:खांतून सुटका होते, त्याप्रमाणे अंत:करणांत तीव्र विषयवैराग्य बाणल्यामुळे जो विषयसुखाची नि:शेष आशा सोडून संसारदु:खापासून मुक्त झाला॥ १८१॥ ज्याप्रमाणे मेलेल्या पुरुषाला मुळीच लज्जा नसते, त्याप्रमाणे आत्म्याचें सतत सुख प्राप्त झाल्यामुळे ज्याला कांहीच दु:ख भासत नाही॥ १८२॥

**आणि कर्मारंभालागीं। जया अहंकृती नाहीं आंगीं। जैसे निरिंधन आगी। विझोनि जाय॥ १८३॥**
**तैसा उपशमचि भागा। जयासि आला पैं गा। जो मोक्षाचिया आंगा। लिहिला असे॥ १८४॥**

**अर्थ**—कर्म करण्याकरितां लागणारा देहाहंकारच ज्याच्या ठिकाणीं उत्पन्न होत नाही-म्हणजे ज्याच्या ठिकाणीं "मी ब्रह्म आहे" ही वृत्ति इतकी दृढ झाली आहे की त्याला "मी ब्रह्म आहे" असें चिंतनच करावे लागत नाहीं. ज्याप्रमाणे अग्नींत लांकडें घातली नाहीत, तर अग्नि जसा विझून जातो, त्याप्रमाणे मोक्षाचे अंग म्हणून जो उपशम सांगितला आहे, तो उपशमच पूर्णपणें ज्याच्या वांटेला आला आहे॥ १८३-१८४॥

**गूढार्थदीपिका-कर्मारंभालागीं जया अहंकृती नाहीं आंगीं**—"अहंभावोदयाभावो बोधस्य परमावधि:" (वि. चू. ४२५) आत्मज्ञानाची परमावधि म्हणजेच यत्किंचितहि देहाहंकार न स्फुरणें होय, असें आचार्य विवेकचूडामणींत म्हणतात. दृढज्ञान्याच्या ठिकाणी देहाहंकृतिच स्फुरत नसल्यामुळे तो आपण होऊन कर्म करूं शकत नाही, असा अर्थ.

**तैसा उपशमचि भागा। जयासी आला पैं गा। जो मोक्षाचिया आंगा। लिहिला असे**—"वृत्तेर्दृश्यपरित्यागः" वैराग्याने विषयभोगाला कंटाळलेलीं इंद्रियें पुढे जेव्हा आपणच विषयांकडे धांवत नाहीत, तेव्हा त्याला उपरति किंवा उपशम म्हणतात.

मोक्षाचीं त्रिविधदु:खनिवृत्ति व अखंड परमानंदप्राप्ति अशीं दोन अंगें आहेत. "ज्ञानादेव तु कैवल्यम्" या श्रुतीने ज्ञानानेच मोक्ष होतो, असें म्हटलें आहे खरें, पण ज्ञान दृढ होण्याकरितां, उपशम आवश्यक आहे; म्हणून उपशमाला मोक्षाचें अंग म्हटलें आहे. या उपशमपूर्वक ज्ञानाने मोक्षाचें त्रिविधदु:खनिवृत्तिरूप प्रथम अंग सिद्ध होतें. यालाच ज्ञान्याची जीवन्मुक्त अवस्था म्हणतात.

विद्यारण्यस्वामींनी सूतसंहितेंतील मुक्तिखंड अध्याय २-श्लोक ५४ वरील आपल्या टीकेंत, ज्ञान्याची जीवन्मुक्तदशा कशी असते हें सांगतांना असे म्हटलें आहे की "तिस्रोहि मायावस्थाः। दृश्यस्य वास्तवत्वाभिमानात्मिका प्रथमा। सायुक्तिशास्त्रजनित विवेकज्ञानान्निवर्तते। तन्निवृत्तावपि प्रागिव साभिनिवेशव्यवहारहेतु द्वितीया। सा तत्त्वसाक्षात्कारान्निवर्तते। तन्निवृत्तावपि देहाभासजगदवभासहेतुरूपा तृतीया। सा प्रारब्धकर्मणावसाने निवर्तते।"

मायेच्या तीन अवस्था आहेत, दृश्य जगत् सत्य आहे, असें वाटणें ही मायेची पहिली अवस्था होय. ही शास्त्र व तदनुकूल युक्तिविचाराने उत्पन्न झालेल्या विवेकज्ञानाने नाहीशी होते. ती नाहीशी झाल्यावरहि पुर्वीप्रमाणेच अभिनिवेशपूर्वक होणाऱ्या व्यवहाराला निमित्त असणारी मायेची दुसरी अवस्था होय. ती आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर नाहीशी होते; पण ती निवृत्त झाल्यावरहि, जो देहाचा भास व जगताचा भास होत राहतो, त्याला निमित्त असणारी मायेची तिसरी अवस्था होय. हीच ज्ञान्याची जीवन्मुक्त अवस्था असते. ही अवस्था प्रारब्धकर्म संपल्यावर म्हणजे ज्ञानी जेव्हा विदेह मुक्तींत जातो तेव्हाच नाहीशी होते.

अशा या ज्ञान्याच्या जीवन्मुक्ति अवस्थेच्या वर्णनावरून जीवन्मुक्ति अवस्थेंत ज्ञान्याची जी तुर्या अवस्था किंवा साक्षी अवस्था असते, तींत देहाच्या व जगताच्या मिथ्या भासाची व त्याबरोबर आत्मस्वरूपाची जाणीव कायम राहते, हें उघड आहे.

समर्थांनीहि "जाणे ब्रह्म जाणे माया। जाणे अनुभवाचे ठाया। ते एक म्हणावी तूर्या। सर्व साक्षिणी"॥ ४९॥ (दासबोध द. ७ स ४) असेंच जीवन्मुक्ताच्या तुर्या अवस्थेचें वर्णन केलें आहे. ब्रह्मानंदाचे लक्षण करतांना विद्यारण्यस्वामींनीच पंचदशीच्या योगानंदनामक अकराव्या प्रकरणांत श्लोक ५४ मध्ये "स्त्रीपरिष्वक्तवद्वेद न बाह्यं नापि चांतरम्" ब्रह्मानंदांत आंतील किंवा बाहेरील कशाचीच जाणीव नसते, असें म्हटलें आहे.

अर्थात् विद्यारण्यस्वामींच्या या दोन वचनांचा विचार केला असतां, ज्ञानी पुरुषाच्या जीवन्मुक्त अवस्थेंतहि देह व जगत् यांच्या मिथ्याभासामुळे ज्ञान्याच्या त्रिविध दु:खाची निवृत्ति होते; पण त्यांना सुषुप्ति व समाधि या कालावांचून, इतर कालीं ब्रह्मानंदाची प्राप्ति नसते. अर्थात् ते अखंड ब्रह्मानंदांत तल्लीन नसतात, हें उघड होतें.

**अर्जुना हा ठाववरी। जो सोहंभावो सरोभरी। तो द्वैताच्या पैलतीरीं। निगों सरला॥ १८५॥**

**अर्थ**—अर्जुना! हा "ठाववरी" म्हणजे पूर्ण अहंकृतिरहित होऊन व उपशम साधून जो "मी ब्रह्म आहे" अशा अखंड निदिध्यासनाच्या बळावर द्वैताच्या पलीकडील तीराला म्हणजे अद्वैतरूप तीरावर जावयाला निघाला॥ १८५॥

**गूढार्थदीपिका—द्वैताच्या पैलतींरी। निगों सरला**—"द्वितीयाद्वै भयं भवति" द्वैतबुद्धि हीच सर्व दु:खाला कारण आहे. ती नाहीशी करण्याकरितां द्वैतबुद्धीचें पैलतीर म्हणजे अद्वैतबुद्धि झाली पाहिजे. या निर्गुणसाक्षात्काराने जें मोक्षाचें अंग प्राप्त होतें, तें दु:खनिवृत्तिरूपच अंग होय.

ही निर्गुणप्राप्तिहि उत्तम अधिकाऱ्यांनाच होते. "कानावचनाचिये भेटी। सरिसाचि पैं किरीटी। वस्तु होऊनि उठी। कवणी एक जो" (ज्ञा. अ. १८-९९१) असे माउलींनी उत्तम अधिकाऱ्याचें लक्षण केलें आहे. मोक्षाची संपूर्ण साधनसंपत्ति आंगीं बाणून ज्याच्या चित्ताचा उपशम झाला तोच उत्तम अधिकारी होय, असा या ओवीचा भाव आहे.

पण असा उत्तम अधिकारी "कृतोपासनस्य मुख्याधिकारिण:" ज्यांनी ज्ञानापूर्वी सगुणाची उपासना केली आहे, तोच होतो असे अद्वैतवेदान्तावरील तत्त्वानुसंधान नामक ग्रंथाच्या अद्वैतकौस्तुभटीकेंत म्हटले असून, आचार्यानीहि "मोक्षकारणसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी" असे विवेकचूडामणींत म्हटलें आहे. आणि "युतूजानानामभक्तानां प्राणायामादिभिर्मन:। अक्षीणवासनं राजन् दृश्यते पुनरुत्थितम्" या श्लोकाने भक्तिवांचून माझ्या ठकाणी प्राणायामादिकांनी स्थिर करूं पाहणाऱ्यांचें मन, वासना क्षीण होत नसल्यामुळे, स्थिर होत नाही, तें वारंवार व्युत्थान पावतें, असें भगवंतांनी मुचकुंदाला सांगितलें आहे.

मधुसूदन सरस्वति, गीतेच्या आरंभीं उपोद्घातांत म्हणतात की "पूर्वभूमौ कृतां भक्ति उत्तरां भूमिमानयेत्। अन्यथा विघ्नबाहुल्यात् जीवन्मुक्तिस्तुदुर्लभा." ब्रह्मज्ञान होण्यापूर्वी जी भक्ति केली जाते, ती पुढें ज्ञानानंतर कायम ठेवल्यासच, जीवन्मुक्ति साधली जाते, नाही तर अनेक प्रतिबंध उत्पन्न होऊन, ती साधली जात नाही.

सारांश, निर्गुणस्वरूप साक्षात्कार व त्याच्या साह्याने साधणारें मोक्षाचें दु:खनिवृत्तिरूप अंग हीं दोन्ही ज्ञानापूर्वी भक्ति केल्यावांचून साधली जात नाहीत असाच महंतांचा अनुभव आहे.

**कीं भक्तिसुखालागीं। आपणपेंचि दोही भागीं। वांटूनिया आंगीं। सेवकै बाणी॥ १८६॥**

**अर्थ**—किंवा भक्तिसुख भोगण्याकरितां जो आपणच आपल्याला दोन भागांत वाटून घेऊन एका अंगाने सेवक किंवा भक्त होतो.

**गूढार्थदीपिका—भक्ति सुखालागीं**-"भक्ति सगुणाचीच घडे" (र. च. स. १५) भगवंताच्या सगुण स्वरूपाचीच भक्ति होऊं शकते, असे समर्थादि सर्व संतांचें म्हणणें आहे, "स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते" "स्वात्मतत्वानुसंधानं भक्तिरित्यपरे जगु:" (वि. चू. २-३३). आपल्या निर्गुण स्वरूपाचें अनुसंधान करणें, असे आचार्यांनी विवेकचूडमणींत भक्तीचें जें लक्षण केलें आहे, तें देहादिकांचा व्यतिरेक करून जाणलेल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी, स्वाभाविक असलेल्या प्रेमामुळे, जें वारंवार अनुसंधान केलें जाते, त्या प्रेमाने होणाऱ्या अनुसंधानाला भक्ति हें नांव दिलें आहे. अर्थात् भक्ति म्हणजे प्रेम, हाच अर्थ तेथेहि आहे.

सच्चिदानंद परब्रह्माचा नामरूपांत अन्वय असल्यामुळे नामरूपें हीं सच्चिदानंद परब्रह्मस्वरूपच आहेत; म्हणून नामरूपाने नटलेल्या परब्रह्माचें, आत्मवत् स्वाभाविक प्रेम करणें, यालाच संतांनी भक्ति हें नांव दिलें आहे. या भक्तीचाच ज्ञानानंतर उपयोग आहे. या सगुणभक्तीने ज्ञानी अखंड ब्रह्मानंदांतच निमग्न राहूं शकतो. असा हा निर्गुणस्वरूपाचा प्राप्तिपेक्षा सगुणस्वरूपाच्या भक्तींत विशेष लाभ आहे.

"**इतर मी सांगूं काई। मोक्ष सुखाचिया ठायीं। या सुखाची गोडी नाहीं। धन्य पाही हरिभक्त**" (ए. भा. १४-२०३) असें नाथांचें म्हणणें असून तुकाराम महाराजहि

"**सोन्याचे पर्वत करवती पाषाण। अवघे रानोरान कल्पतरु॥ परी हे दुर्लभ विठोबाचे पांय। तेथे हे उपाय न सरती॥ २॥**

**तुका म्हणे मोक्ष राहे ऐलीकडे। इतर वापुडे काय तेथे॥ ६॥** (तु. गा. २९११)

**भक्ति प्रेम सुख नेणवे आणिका। पंडित वाचकां ज्ञानियासी॥ १॥**

**आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त। तरी भक्तिसुख दुर्लभ त्या॥ २॥** (तु. गा. ३००२)

या अभंगांत असेच सांगत आहेत.

भागवतांत ध्रुवांनी भगवंताची स्तुति करतांना असे म्हटलेंहि आहे की "या निर्वृतिस्तनुभृतां तव पादपद्म ध्यानाद्भवज्जनकथा श्रवणेन वा स्यात्। सा ब्रह्मणि स्वमहिमन्यपि नाथ मा भूत्........................" (भाग. स्कं. ४-९-१०) हे भगवंता! तुझ्या सगुणस्वरूपाच्या चरणकमलाच्या ध्यानाने किंवा तुझ्या भक्तांच्या कथाश्रवणाने जीवाला जें सुख प्राप्त होतें, तें केवळ सच्चिदानंदस्वरूपाने स्थित असलेल्या निर्गुण ब्रह्माचे ठिकाणीहि प्राप्त होत नाही.

हाच भाव माऊलींनी येथें "भक्तिसुखालागीं" या पदाने व्यक्त केला आहे.

**आपणपें दोहीं भागीं। वाटूनियां आंगीं। सेवकै बाणी**-अद्वैतानंतरहि, अद्वैत न मोडतां, सगुण परमेश्वराची भक्ति होऊं शकते, हेंच येथें प्रतिपादिलें आहे.

"सागर सरिता जीवन एक। परी मिळणीं भजन दिसे अधिक। तैसें एकपणेंचि देख। भजन सुख उल्हासे" "वामसव्य दोन्ही भाग। परी दो नामीं एकचि अंग। तैसे देवभक्त विभाग। देवपणीं सांग आभासे" (ए. भा.) असे नाथांनी आपल्या ग्रंथांतून सांगितलें असून श्रीमाऊलींनीहि अमृतानुभवांत "द्वैतदशेचें आंगण। अद्वैत ओळगे आपण भेद तंव तंव दूण। अभेदासी"॥ २८॥ (अमृ. प्र. ९) "देव देऊळ परिवारु। कीजे कोरोनि डोंगरु तैसा भक्तीचा व्यवहारु। कां न व्हावा" "कोणी एक अकृत्रिम। भक्तीचें हें वर्म। योगज्ञानादि विश्राम। भूमिका हे" इत्यादि ओव्यांतून हाच भाव व्यक्त केला आहे.

**येरा नाम मी ठेवी। मग भजती वोज बरवी। न भजतया दावी। योगिया जो॥ १८७॥**

**अर्थ**—दुसऱ्या भागाला मी म्हणजे देव, हें नांव ठेवतो व मग माझ्या सगुण स्वरूपाचें भजन न करणाऱ्या ज्ञान्यादि योगियांना, अद्वैतांतहि होणाऱ्या सगुण भक्तीचें श्रेष्ठस्वरूप दाखवितो॥ १८७॥

**गूढार्थदीपिका—न भजतयां दावी। योगिया जो**-ज्ञानाने प्राप्त होणाऱ्या त्रिविधदु:खनिवृत्तिरूप मोक्षसुखापेक्षा श्रेष्ठ असलेलें व सगुणाच्या प्रेमभक्तीने प्राप्त होणारें ब्रह्मसुख अखंड प्राप्त करून घेण्याकरितां—म्हणजे स्वार्थाकरितां-ज्ञानी सगुणाचे भजन करतो, असे "भक्तिसुखालागीं" या पदाने माऊलींनी सांगितलें असल्यामुळे "न भजतया दावी योगिया जो" या चरणाचा "ज्ञानीपुरुष ज्ञानानंतर सगुणाचें जें भजन करीत असतो ते, भजन न करणाऱ्या अज्ञ लोकांना केवळ मार्ग दाखविण्यासाठी-म्हणजे लोकसंग्रहार्थ करतो" असा अर्थ भावार्थ घेतां येत नाही, "स्वत:ला अखंड ब्रह्मसुख प्राप्त व्हावें, म्हणून सगुणाची भक्ति करीत असतांना, अनायासें भक्ति न करणाऱ्या योगियांना तो मार्ग दाखवितो" असाच अर्थ करावा लागतो.

ज्ञानीपुरुष भगवंताचें भजन, लोकसंग्रहार्थ करीत नसून भगवंताच्या केवळ नि:सीम प्रेमानेच करीत असतो आणि म्हणूनच भगवंताला भक्ताचे नि:सीम प्रेम असतें. असा माउलींनीच पुढील ओव्यांतून आशय दाखविला आहे.

**तयाचें आम्हां व्यसन। आमुचें तो निजध्यान। किंबहुना समाधान। तो मिळे तैं॥ १८८॥**
**तयालागीं मज रूपा येणें। तयाचेनि मज एथें असणें। तया लोण कीजे जीवें प्राणें। ऐसा पढिये॥ १८९॥**

**अर्थ**—असा जो ज्ञानी भक्त असतो, त्याचें आम्हांला वेडच लागतें, तोच आमच्या अखंडध्यानाचा विषय असतो. किंबहुना त्याच्याच भेटींत आम्हांला समाधान होते॥ १८८॥ अशा प्रेमळ भक्ताकरितां मी सगुणस्वरूप होतो, त्याच्याकरितांच मी या जगांत असतो आणि तो मला इतका प्रिय असतो की, त्याच्यावरून आम्ही आपले जीव, प्राण ओवाळून टाकावे असें वाटतें॥ १८९॥

**गूढार्थदीपिका**—परमप्रेमरूप ज्ञानोत्तरभक्ति, ही मूळांत निर्गुण निराकार, सच्चिदानंदस्वरूप असणाऱ्या भगवंताला-त्याचें हें स्वरूप कायम ठेवनूच-स्वरूपानुबंधि, अपरिमित व षड्गुणैश्वर्याने युक्त अशा सगुण साकार स्वरूपाने व्यक्त करून भगवंताच्या अखंड तद्रूपतेमुळे ज्ञान्याच्या चित्ताचें व्युत्थान न होऊं देतां, ज्ञान्याला सगुण भगवंताच्या अखंड प्रेमसमाधींत निमग्न ठेवणारी आहे. म्हणून ज्ञानीपुरुष अखंड समाधिलाभाकरितां सगुण भगवंताची भक्ति करतो, लोकसंग्रहार्थ करीत नाही, हें उघड आहे.

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति। शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्य: स मे प्रिय:॥ १७॥**

**अर्थ**—ज्याला हर्ष होत नाही, ज्याला द्वेष नाही, जो शोक करीत नाही, जो कशाचीहि इच्छा करीत नाही आणि सर्व पुण्यपापरूप कर्मांचा त्याग करून, जो सगुण भगवंताचे ठिकाणी भक्तिसंपन्न झाला, तोच मला प्रिय आहे॥ १७॥

**जो आत्मलाभासारिखें। गोमटें कांहींचि न देखे। म्हणोनि भोगविशेखें। हरिखे ना जो॥ १९०॥**

**आपणचि विश्व जाहला। तरि भेदभावो सहजचि गेला। म्हणोनि द्वेषु ठेला। जया पुरुषा॥ १९१॥**
**पैं आपुलें जें साचें। ते कल्पांतींही न वचे। हें जाणोनि गताचें। न शोची जो॥ १९२॥**
**आणि जयापरौतें कांहीं नाहीं। तें आपणपेंचि आपुलां ठायीं। जाहला यालागीं जो कांहीं। आकांक्षी ना॥ १९३॥**
**वोखटें कां गोमटें। हें कांहींचि तया नुमटे। रात्रिदिवस न घटे। सूर्यासि जेवीं॥ १९४॥**
**ऐसा बोधुचि केवळु। जो होऊनि असे निष्कळु। त्याहीवरी भजनशीळु। माझ्या ठायीं॥ १९५॥**
**तरि तया- ऐसें दुसरें। आम्हां पढियंतें सोयरें। नाहीं गा साचोकारें। तुझी आण॥ १९६॥**

**अर्थ**—ज्याला आत्मप्राप्तिवांचून कांहीच गोड वाटत नाही, म्हणूनच विशेष विषयभोग त्याला प्राप्त झालें तरी आनंद होत नाही॥ १९०॥ संपूर्ण विश्वांत आत्मस्वरूपाने मीच एक भरलेला आहे, या दृढ ज्ञानाने सहजच ज्याला, आपल्याहून दुसरी वस्तुच दिसत नाही आणि म्हणूनच ज्याला कोठेहि द्वेष नसतो॥ १९१॥ मी खरोखर आत्मस्वरूप आहे व तें आत्मस्वरूप कधींहि नाश पावत नाही, या दृढ विचाराने जो नाश वस्तुबद्दल कधी दु:ख करीत नाही॥ १९२॥ आणि ज्या अद्वैत आत्मवस्तूहून दुसरी वस्तुच नाही, ती आत्मवस्तु मीच आहे, असे कळून आल्यामुळे जो कशाचीहि इच्छा करीत नाही॥ १९३॥ ज्याप्रमाणे सूर्याला रात्री व दिवस यांचा अनुभव येत नाही, त्याप्रमाणे ज्याच्या अंत:करणांत हें चांगलें, हें वाईट असे भावच उत्पन्न होत नाहीत॥ १९४॥ याप्रमाणे कशाचीहि जाणीव न होतां जो देहासह संपूर्ण केवळ जाणीवरहित चिन्मात्रस्वरूप होऊन राहिला आणि त्यांतहि माझ्या सगुणस्वरूपाचे ठिकाणी प्रेमभक्ति करणें हा ज्याचा स्वभावच बनला॥ १९५॥ भगवान म्हणतात, अर्जुना! अशा ज्ञानीभक्तासारखा खरोखर दुसरा आमचा प्रिय सोयराच नाही, हे मी तुझी शपथ घेऊन सांगतों॥ १९६॥

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः। शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः॥ १८॥**

**अर्थ**—शत्रु, मित्र, मान, अपमान, शीत, उष्ण, सुख, दु:ख यांचे ठिकाणी ज्याची समबुद्धि असून जो संग सोडून असंग झाला॥ १८॥

**पार्था जयाचिया ठायीं। वैषम्याची वार्ता नाहीं। रिपुमित्रां दोहीं। सरिसा पाडु॥ १९७॥**
**कां घरींचियां उजियेडु करावा। पारकियां आंधारु पाडावा। हें नेणेचि गा पांडवा। दीपु जैसा॥ १९८॥**
**जो खांडावया घावो घाली। कां लावणी जयानें केली। दोघां एकचि साउली। वृक्षु दे जैसा॥ १९९॥**
**नातरी इक्षुदंडु। पाळितया गोडु। गाळितया कडु। नोहेचि जेवीं॥ २००॥**
**अरिमित्रीं तैसा। अर्जुना जया भावो ऐसा। मानापमानीं सरिसा। होतु जाय॥ २०१॥**
**तिहीं ऋतूं समान। जैसें कां गगन। तैसें एकचि मान। शीतोष्णीं जया॥ २०२॥**
**दक्षिण उत्तर मारुता। मेरु जैसा पांडुसुता। तैसा सुखदुःखप्राप्तां। मध्यस्थु जो॥ २०३॥**
**माधुर्ये चंद्रिका। सरिसी राया रंका। तैसा जो सकळिकां। भूतां समु॥ २०४॥**
**आघविया जगा एक। सेव्य जैसें उदक। तैसें तयातें तिन्हीं लोक। आकांक्षिती॥ २०५॥**
**जो सबाह्य संगु। सांडोनिया लागु। एकाकी असे आंगु। आंगी सूनीं॥ २०६॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याच्या ठिकाणी आपपर अशा विषमभावांचा स्पर्श नसतो व जो शत्रु-मित्र या दोघांनाहि सारखेच लेखतो॥ १९७॥ अर्जुना! ज्याप्रमाणे, दिवा जें नेहमीं घरांत राहणारे आहेत त्यांना प्रकाश द्यावा व बाहेरून आलेल्या परक्यांना आंधार द्यावा, असे कधी करीत नाही॥ १९८॥ किंवा तुकडे करण्याकरितां कुऱ्हाडीने प्रहार करूं इच्छिणाऱ्याला व झाड लावून त्याची वाढ करणाऱ्याला झाड आपली एकसारखी सावलीच देतो॥ १९९॥ किंवा ज्याप्रमाणे ऊस पाणी घालून वाढविणाऱ्याला गोड व त्याला चरक्यांत घालून पिळणाऱ्याला कडू असा कधीच होत नाही॥ २००॥ त्याप्रमाणे अर्जुना! जो शत्रु-मित्र, मान-अपमान यांचे ठिकाणी एकसारखी समबुद्धि ठेवतो॥ २०१॥ ज्याप्रमाणे आकाश तिन्ही ऋतूंमध्ये एकसारखें समानच असतें, त्याप्रमाणे थंडी व ऊन या दोहोंना जो सारखाच लेखतो॥ २०२॥ हे अर्जुना! मेरुपर्वत, ज्याप्रमाणे दक्षिणेकडून किंवा उत्तरेकडून येणाऱ्या वाऱ्याला सारखेच मानतो,

त्याप्रमाणे प्राप्त होणाऱ्या सुखदु:खांना जो सारखे लेखून निर्विकार राहतो॥ २०३ ॥ ज्याप्रमाणे चांदणें, दरिद्र्याला व राजाला सारखेच आल्हादकारक वाटते, त्याप्रमाणे जो पुरुष सर्व भूतमात्राचे ठिकाणी एक दयाबुद्धिच ठेवतो॥ २०४॥ एक पाणी, जसें सर्व जगाला प्यावेसें वाटतें, तसे तिन्ही लोक कृपा व्हावी म्हणून ज्याची इच्छा करतात॥ २०५॥ अंतर्बाह्य संगरूप विषयांचा संबंध सोडल्यामुळे, शरीराच्या ठिकाणीच शरीर घालून जो एकटा आहे॥ २०६॥

**गूढार्थदीपिका—सबाह्य संगु**-म्हणजे अंतर्बाह्य संग.

आसक्तिमुळे अंतकरणाशीं विषयांचा संग होतो व बाहेर विषयभोगाने विषयाशीं देहाचा संग होतो.

**एकाकी असे आंग आंगी सूनी**-म्हणजे शरीराचा किंवा अंत:करणाचा बाह्य विषयाशीं संबंध न होऊं देतां शरीराचे ठिकाणी शरीर ठेऊन म्हणजे केवळ शरीराने राहिला.

**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केनचित्। अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः॥ १९॥**

**अर्थ—**निंदा व स्तुति ह्या दोन्ही सारख्याच समजणारा, मौन धारण करणारा, कशांतहि संतुष्ट असणारा, एकाच ठिकाणचा आश्रय करून न राहणारा व बुद्धि स्थिर करून असणारा, असा असून जो माझ्या सगुण स्वरूपाचे ठिकाणीं प्रेम करतो, तो पुरुष मला प्रिय आहे.॥ १९॥

**जो निंदेतें नेघे। स्तुति न श्लाघे। आकाशा न लगे। लेपु जैसा॥ २०७॥**
**तैसें निंदे आणि स्तुती। मानु करूनि एके पांती। विचरे प्राणवृत्ती। जनीं वनीं॥ २०८॥**
**साच लटिकें दोन्हीं। न बोले जाहला मौनी। जे भोगितां उन्मनी। आरायेना॥ २०९॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे आकाशाला कशाचाहि लेप लागत नाही, त्याप्रमाणे जो निंदा झाली असे समजून खेद मानीत नाही व स्तुति झाली असे समजून हर्षहि मानीत नाही॥ २०७॥ त्याप्रमाणे निंदा आणि स्तुति या दोघांनाहि एका पंक्तीस बसवून म्हणजे दोघांनाहि सारखेच समजून, प्राणाप्रमाणे लोकांत व वनांत सारखाच वावरतो॥ २०८॥ खरें किंवा खोटे असे दोन्ही प्रकारचे बोलणें सोडून देऊन जो मौन धारण करतो व ज्याला उन्मनी अवस्था भोगतांना पुरें म्हणवत नाही॥ २०९॥

**जो यथालाभें न तोखे। अलाभें न पारुखे। पाउसेंवीण न सुके। समुद्रु जैसा॥ २१०॥**
**आणि वायूसि एके ठायीं। बिढार जैसें नाहीं। तैसा न धरीच केंहीं। आश्रयो जो॥ २११॥**
**आघवाचि आकाशस्थिति। जेवीं वायूसि नित्य वसति। तेवीं जगचि विश्रांति-। स्थान जया॥ २१२॥**
**हें विश्वचि माझें घर। ऐसी मती जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपण जाहला॥ २१३॥**

**अर्थ—**प्रारब्धानुसार मिळणाऱ्या सुखलाभाने देखील ज्याला आनंद होत नाही व पाऊस न पडला तरी समुद्र जसा सुकत नाही, तसा सुखलाभ न झाला असतांहि जो खिन्न होत नाही॥ २१०॥ आणि ज्याप्रमाणे वायु एका ठिकाणी स्थिर राहत नाही, त्याप्रमाणे जो एकाच ठिकाणचा आश्रय करीत नाही॥ २११॥ ज्याप्रमाणे वायु, अखंड आकाशांत, आकाशस्वरूपच होऊन राहतो. त्याप्रमाणे संपूर्ण जगत् ज्याचें राहण्याचें स्थान असतें॥ २१२॥ या संपूर्ण चराचरांत "मी मी" म्हणून स्फुरणारा मीच एक आहे असें केवळ व्यतिरेकज्ञानच नाही, तर सर्व चराचर रूपाने मीच एक भासतो असें अन्वयज्ञानहि ज्याच्या बुद्धींत दृढ झालें आहे॥ २१३॥

**मग यावरीही पार्था। माझां भजनीं आस्था। तरी तयातें मी माथां। मुकुट करीं॥ २१४॥**

**अर्थ—**अर्जुना! मग मी 'यावरीही'-म्हणजे व्यतिरेक व अन्वयज्ञान दृढ झाल्यावरहि-माझ्या सगुणस्वरूपाचें प्रेमाने भजन करण्याची ज्याला गोडी व श्रद्धा आहे, त्याला मी आपल्या शिरावरील मुकुटच करतो-म्हणजे आपल्या शिरावर मुकुटाप्रमाणे धारण करतो॥ २१४॥

**गूढार्थदीपिका—**वर सांगितल्याप्रमाणे व्यतिरेक व अन्वय यांच्या योगाने पूर्ण ज्ञान झालेल्या ज्ञान्याच्या ठिकाणी मीच एक आहे, अशी जी केवळ आपल्या अद्वैतपणाची जाणीव राहते, ती जाणीव म्हणजे "विजातीयभेद "मी देह" म्हणणें। सजातीय भेद मी जीवपणें। स्वगत भेद मी ब्रह्मस्फुरणें। हे तिन्ही नेणें परमात्मा॥ ५२५॥"

(ए. भा. अ. २८) ज्ञान्याने ''मी अद्वैत ब्रह्मस्वरूप आहे'' अशी जाणीव वागविणें म्हणजे परमात्म्याहून आपलें थोडें निराळें व्यक्तित्व मिरविण्यासारखें असल्यामुळे तो स्वगत म्हणजे ब्रह्मांतच भेद होतो, तो भगवंताशीं समरस मिळत नाही, असे श्रीनाथंचेहि म्हणणें आहे.

सगुण परमात्म्याच्या प्रेमभक्तींत भक्ताला मीपणा मिरविण्याला संधिच सांपडत नसल्यामुळे त्याला मीपण स्फुरतच नाही आणि ''मीपणाविण अवघा देवो। हा समर्थांचा भक्त्यनुभवो।'' (श्रीगुलाबरावमहाराज कृत ''भगवद्भक्तिसौरभ'' प्रथम पराग-१५) मीपणा स्फुरत नसल्यामुळे भगवंताशीं समरस होऊन जातो व त्या स्थितींत एक भगवानच उरतो, असा सर्व संताचा अनुभव आहे. तसेंच जाणीव स्फुरते तोपर्यंत ब्रह्मानंदाचा लाभ होत नाही, हे मागें सांगितलेच आहे.

याप्रमाणे निर्विकल्प ऐक्याचा व ब्रह्मानंदाचा विशेष लाभ, ज्ञानापेक्षा प्रेमभक्तींतच होत असल्यामुळे अद्वैतज्ञान प्राप्त झाल्यानंतरहि सगुण भगवंताचीं भक्ति करणाऱ्यांची येथे प्रशंसा केली आहे. ही केवळ स्तुतिमात्र नाही, हें उघड आहे.

**उत्तमासि मस्तक। खालविजे हें काय कौतुक। परि मानु करिती तीन्हीं लोक। पायवणिया॥ २१५॥**
**तरि श्रद्धावस्तूसि आदरु। करिता जाणिजे प्रकारु। जरी होय श्रीगुरु। सदाशिवु॥ २१६॥**

**अर्थ**—अशा घोर भक्तापुढे माझ्यासारख्या एखाद्याने मस्तक लववावे यांत कांही आश्चर्य नाही, पण माझ्या या उत्तम भक्ताच्या चरणतीर्थाचा तिन्ही भुवनांतील लोक आदर करतात॥ २१५॥ जर भगवान शंकर सद्‌गुरु प्राप्त झाले, तरच श्रद्धावस्तूचा-म्हणजे माझ्यावरील परमप्रेमवस्तूचा-आदर म्हणजे जपणूक-कशा प्रकारें केली पाहिजे, हें जाणता येते॥ २१६॥

**गूढार्थदीपिका**—या अध्यायांत श्रीमाउलींनी ''श्रद्धा'' हा शब्द प्रेमार्थी वापरला आहे हे मागें श्लोक दोन वर निरूपण करतांना सांगितलेंच आहे.

**जरी होय श्रीगुरु सदाशिव**—''शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिव:'' शिवाचें हृदय विष्णु आहे व विष्णूचें हृदय शिव होय, असें शास्त्र-वचन आहे. याचा अर्थ असा आहे की शिवाचें विष्णूला व विष्णूचें शिवाला असे परस्परांचे परस्परांना परमप्रेम व ध्यान आहे. शिवाचें परमप्रेम कसें करायचें हें एक विष्णुच जाणतात; म्हणून शिवभक्तांनी शिवाचें प्रेम संपादन करण्याकरितां विष्णूला गुरु मानिलें पाहिजे. तसेंच विष्णूचें प्रेम करावें; हें एक शंकरच जाणतात, म्हणून विष्णुभक्ताने विष्णूचें प्रेम संपादन करण्याकरितां शिवाला गुरु केलें पाहिजे.

भगवान शंकराने परमप्रेमाचा विषय जो भगवान विष्णु, त्याच्या चरणाचें तीर्थ जी गंगा, तिला आपल्या शिरावर धारण करून विष्णूचे ठिकाणी असलेलें आपलें परमप्रेम व्यक्त केलें आहे.

तसेंच पांडुरंगाने आपल्या शिरावर शिवलिंगधारण करून आपलें शिवावरील प्रेम व्यक्त केलें आहे.

भगवान शंकर, हे भगवान विष्णूचे भक्त शिरोमणि असल्यामुळेंच ''माझ्या भक्तिप्रेमाची जोपासना कशी करावी, हें समजण्याकरीतां भगवान शंकर सद्‌गुरु पाहिजे'' असे माउलींनी येथे म्हटले आहे.

**परि हें असो आतां। महेशातें वानितां। आत्मस्तुति होता। संचारु असे॥ २१७॥**
**ययालागीं हे नोहे। म्हणितलें रमानाहें। अर्जुना मी वाहें। शिरीं तयातें॥ २१८॥**
**जे पुरुषार्थसिद्धी चौथी। घेऊनि आपुलिया हातीं। रिगाला भक्तिपंथीं। जगा देतु॥ २१९॥**

**अर्थ**—पण आतां हें पुरे. भगवान शंकराच्या थोर प्रेमाचें वर्णन करूं लागलों, तर आत्मस्तुतीचा संचार होईल म्हणजे पर्यायाने आत्मस्तुतीच केल्यासारखे होईल॥ २१७॥ म्हणून रमापति श्रीकृष्ण म्हणाले, शंकराच्या प्रेमाची थोरवी गात नाही, पण अर्जुना! (एवढेच सांगतों की) अशा भक्ताला मी शिरावर धारण करतों॥ २१८॥ (कारण) असा हा माझा भक्त, सगुण सायुज्यतारूपी चौथ्या पुरुषार्थाची सिद्धि आपल्या हातीं घेऊन ती, भक्तिमार्गाने जगाला देत निघाला॥ २१९॥

**गूढार्थदीपिका**—भक्तच जगांत भक्तिमार्गाची स्थापना करतात असा भाव. पद्मपुराणांतर्गत भागवत माहात्म्यांत "घटते कृष्णदासस्य भक्तेः संस्थापना सदा" (अ. २-५५) असेंच म्हटलें आहे.

मन्वादि ऋषी जसे कर्ममार्गाची प्रवृत्ति करणारे अधिकारिक व याज्ञवल्क्यादि ऋषी ज्ञानमार्गाचे प्रवर्तक असे अधिकारिक म्हणून भगवंताकडून ठरले आहेत, तसेच नारदादि संत भक्तिमार्गाची प्रवृत्ति करणरे म्हणून अधिकारिक ठरले गेलें आहेत.

**कैवल्याचा अधिकारी। मोक्षाची सोडीबांधी करी। कीं जळाचिये परी। तळवटु घे॥ २२०॥**

**अर्थ**—कैवल्याचा-म्हणजे जीवब्रह्मैक्यरूप अद्वैतब्रह्मज्ञानाचा-जो अधिकारी असेल, त्याला स्वसामर्थ्याने मोक्ष देतो. इतकें सामर्थ्य असूनहि पाणी ज्याप्रमाणे नेहमीं सखोल जमीनीकडे वाहते, त्याप्रमाणे तो आपण सर्वापेक्षा कनिष्ठ होऊन सर्वांना आपल्यापेक्षा परमेश्वरस्वरूप समजतो॥ २२०॥

**गूढार्थदीपिका**—"लघुत्वाचेनि मुद्दलें। बैसला गुरुत्वाचेहि सेले" (अमृ. प्र. २-२१) या अमृतानुभवांतील ओवीचा अर्थच माऊलींनी येथें सांगितला आहे.

**म्हणोनि गा नमस्कारूं। तयातें आम्ही माथां मुकुट करूं। तयाची टांच धरूं। हृदयीं आम्ही॥ २२१॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! म्हणून आम्ही त्यांनांच नमस्कार करूं. त्यांना आपल्या शिरावर मुकुट करूं व त्यांचे चरण आम्ही आपल्या हृदयांत धरूं॥ २२१॥

**गूढार्थदीपिका**—भक्ताला भगवान जसा अत्यंत प्रिय व वंदनीय असतो, तसेच भगवंताला भक्तहि अत्यंत प्रिय व वंदनीय असतात.

**तयाचिया गुणांची लेणीं। लेववूं आपुलिये वाणी। तयाची कीर्ति श्रवणीं। आम्ही लेऊं॥ २२२॥**

**अर्थ**—त्यांच्या गुणांचे अलंकार आम्ही आपल्या वाणीवर घालूं-म्हणजे त्यांच्या गुणाचें अखंड वर्णन करूं-व त्यांची कीर्ति हाच कोणी अलंकार आपल्या कानाचे ठिकाणी घालूं-म्हणजे त्यांची कीर्तीच आपल्या कानाने श्रवण करूं॥ २२२॥

**गूढार्थदीपिका**—भक्ताला जशी भगवंताच्या गुणसंकीर्तनाची अत्यंत आवडी असते, तशी भगवंतालाहि भक्ताच्या गुणकीर्तनाची आवडी असते.

**तो पहावा हे डोहळे। म्हणोनि अचक्षूसी मज डोळे। हातींचेनि लीलाकमळें। पुजूं तयातें॥ २२३॥**
**दोंवरी दोनी। भुजा आलों घेऊनी। आलिंगावयालागुनी। तयाचें आंग॥ २२४॥**
**तया संगाचेनि सुरवाडें। मज विदेहा देह धरणें घडे। किंबहुना आवडे। निरुपमु॥ २२५॥**

**अर्थ**—मी नेत्ररहित असतांहि त्यांना पाहावें या उत्कट इच्छेने नेत्र धारण केले व मी लीलेकरिता घेतलेल्या हातांतील कमळाने त्यांची पूजा करीत असतों॥ २२३॥ त्यांच्या शरीराला आलिंगन देण्याकरितांच दोन भुजावर आणखी दोन भुजा घेऊन आलों-म्हणजे चतुर्भुज झालों (दोन भुजांनी आलिंगन देऊन आलिंगनाचें पूर्ण सूख भोगतां येणार नाही, असे वाटून चतुर्भुज झालों, असा अर्थ)॥ २२४॥ भक्ताच्या संगतींत देखील ब्रह्मसुख असतें, म्हणुनच मी विदेही असूनहि त्यांची संगति करण्याकरितां देह धारण करतों. फार काय सांगू! अशा ज्ञानीभक्तांचें मला जें प्रेम असतें, तें कशाचीहि उपमा देऊन सांगतां येण्याजोगें नाही॥ २२५॥

**गूढार्थदीपिका**—या २२३ ते २२५ पर्यंतच्या ओव्यांतून भगवान मायेने सगुण होत नसून भक्ताच्या निःसीम प्रेमप्रवृत्तीने सगुण होतो असें माउलीचें म्हणणें आहे, अर्थात् निःसीम प्रेम, परब्रह्माचेंच स्वरूप असल्यामुळें आणि निःसीम प्रेम, परब्रह्माचे ठिकाणींच होऊं शकत असल्यामुळे भगवंताच्या निःसीम प्रेमाचा विषय भक्त व भक्ताच्या निःसीम प्रेमाचा विषय भगवान या दोघांचे विग्रह, "आनंद विग्रह श्रीकृष्ण" या नाथवचनाप्रमाणे "**वै सदेह सच्चिदानंद कां नोहावे ते**" या माउलीच्या वचनाप्रमाणे पूर्णब्रह्म व नित्य असतात; हाच सिद्धान्त आहे. स्कंदपुराणांतर्गत भागवत माहात्म्यातील "कामास्तु वांछितास्तस्य गावो गोपाश्च गोपिकाः। नित्या सर्वे विहाराद्या आप्तकामस्ततस्त्वयम्" या श्लोकाने हाच सिद्धान्त सांगितला आहे.

**तेणेंसीं आम्हां मैत्र। एथ कायसें विचित्र। परि तयाचें चरित्र। ऐकती जे॥ २२६॥**
**तेही प्राणापरौते। आवडती हें निरुतें। जे भक्तचरित्रातें। प्रशंसिती॥ २२७॥**
**जो हा अर्जुना साद्यंत। सांगितला प्रस्तुत। भक्तियोगु समस्त। योगरूप॥ २२८॥**
**जे मी प्रीति करीं। कां मनीं शिरसा धरीं। येवढी थोरी। जया स्थितिये॥ २२९॥**

**अर्थ**—अशा भक्ताशीं माझें अत्यंत सख्य असतें, यांत कांही आश्चर्य नाही; पण जे कोणी माझ्या भक्तांचें चरित्र श्रवण करतात॥ २२६॥ तसेच जे कोणी माझ्या भक्तांच्या चरित्राची स्तुति करतात-म्हणजे गुणकीर्तन करतात-ते देखील मला माझ्या प्राणापेक्षा प्रिय असतात, हें अत्यंत सत्य आहे॥ २२७॥ अर्जुना! तुला मी आतांच जो संपूर्ण भक्तियोग सांगितला, त्यांत माझ्याशीं ऐक्य करणारे जेवढे योग आहेत, त्या सर्वांचा अंतर्भाव होतो-म्हणजे भक्तियोगाने सर्व प्रक्रिया अवगत होतात किंवा साधतात॥ २२८॥ ज्या भक्तिस्थितीची एवढी थोरवी आहे की, त्या भक्तिप्रेमामुळेच मीहि आपल्या भक्तांचें अत्यंत प्रेम करतो किंवा त्याला शिरावर धारण करतो॥ २२९॥

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते। श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः॥ २०॥**

**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः॥ १॥**

**अर्थ**—जे कोणी धर्माला धरून असणाऱ्या व अमृतस्वरूप अशा भक्तियोगाचें अत्यंत श्रद्धा व आदर ठेवून व माझ्या सगुणाची प्राप्ति हीच आपली परमगति होय, असें समजून, सांगितल्याप्रमाणे आचरण करतात, ते भक्त मला अत्यंत प्रिय होतात॥ २०॥

**ते हे गोष्टी रम्य। अमृतधारा धर्म्य। करिती प्रतीतिगम्य। आइकोनि जे॥ २३०॥**

**अर्थ**—धर्म्य-म्हणजे अवश्य आचरणीय-व चित्ताला मोहक अशी ही अमृताची धारा-म्हणजे अखंड अविनाशी-अशी भक्तियोगाची कथा ऐकून जे कोणी आपल्या अनुभवाला आणून घेतील॥ २३०॥

**गूढार्थदीपिका-गोष्टी रम्य**—म्हणजे ही भागवतधर्माची कथा मनाला गोडी लावणारी आहे.

**अमृतधारा**-अमृत म्हणजे अविनाशी परब्रह्म, त्याची धारा-म्हणजे अखंड ब्रह्मस्थिति कायम ठेवणारी.

**धर्म्य**-म्हणजे धर्माला विरुद्ध नसणारी. हा भक्तियोगरूपी भागवतधर्म वैदिकधर्माच्या विरुद्ध नसून तोच मुख्य व श्रेष्ठ वैदिक धर्म आहे असा अर्थ.

**एष मे सर्व धर्माणां धर्मोऽधिकतमो मतः। यद्भक्त्या पुण्डरीकाक्षं स्तवैरर्चेन्नरः॥ ८॥**

**-सदा सर्वदा स्तुति-स्तोत्र**-नामस्मरणादिकांनी भगवंताचे प्रेमभावाने भजन करणें; हाच सर्व श्रौत-स्मार्त धर्मामध्ये श्रेष्ठ धर्म आहे, असे भीष्मांचार्यांनीहि विष्णुसहस्रनामांत म्हटलें आहे.

**तैसाचि श्रद्धेचेनि आदरें। जयांचां ठायीं विस्तरे। जीवीं जयां थारे। जे अनुष्ठिती॥ २३१॥**
**परि निरूपली जैसी। तैसीच स्थिति मानसीं। मग सुक्षेत्रीं जैसी। पेरणी केली॥ २३२॥**
**परि मातें परम करूनि। इये अर्थी प्रेम धरूनि। हेंचि सर्वस्व मानूनि। घेती जे पैं॥ २३३॥**
**पार्था गा जगीं। तेचि भक्त तेचि योगी। उत्कंठा तयांलागीं। अखंड मज॥ २३४॥**
**ते तीर्थ ते क्षेत्र। जगीं तेचि पवित्र। भक्तिकथेसी मैत्र। जयां पुरुषां॥ २३५॥**
**आम्ही तयाचें करूं ध्यान। तो आमुचें देवतार्चन। तेवांचूनि आन। गोमटे नाहीं॥ २३६॥**
**तयाचें आम्हां व्यसन। तो आमुचें निधिनिधान। किंबहुना समाधान। तो मिळे तैं॥ २३७॥**
**पैं प्रेमळाची वार्ता। जे अनुवादती पांडुसुता। ते मानूं परमदेवता। आपुली आम्ही॥ २३८॥**
**ऐसें निजजनानंदें। तेणें जगदादिकंदें। बोलिलें मुकुंदें। संजयो म्हणे॥ २३९॥**
**राया जो निर्मळु। निष्कल लोककृपाळु। शरणागतां प्रतिपाळु। शरण्यु जो॥ २४०॥**
**जो पैं सुरसहायशीळु। लोकलालनलीळु। प्रणतप्रतिपाळु। हा खेळु जयाचा॥ २४१॥**
**जो धर्मकीर्तिधवळु। अगाधदातृत्वें सरळु। अतुलबळें प्रबळु। बळिबंधनु॥ २४२॥**

**जो भक्तजनवत्सलु। प्रेमळजनप्रांजळु। सत्यसेतु सकळु। कलानिधि॥ २४३॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे अत्यंत श्रद्धा व आदर यांच्या योगाने ज्यांच्या ठिकाणी हा भक्तियोग विस्तार पावला व ज्यांच्या अंत:करणात तो दृढ होऊन जे त्या भक्तीचें अनुष्ठान करतात॥ २३१॥ पण चांगल्या मशागत केलेल्या क्षेत्रांत जशी पेरणी केली जाते, त्याप्रमाणे वर सांगितली तशीच, ज्यांच्या मनाची अत्यंत प्रेमळ स्थिति आहे॥ २३२॥ आणि जे माझ्या सगुण स्वरूपालाच आपली परमगति समजतात, ज्यांना माझ्या सगुणस्वरूपाच्या प्राप्तीचें प्रेम असतें व जे माझ्या सगुण स्वरूपाला सर्वस्व मानून घेतात॥ २३३॥ बा अर्जुना! या जगांत तेच खरे भक्त व तेच खरे योगी होत. मला त्यांच्याच भेटीची अत्यंत उत्कंठा असते.॥ २३४॥ माझ्या भक्तिकथेशीं ज्यांचे सख्य झालें, ते पुरुषच खरोखर पवित्र तीर्थ व पवित्र क्षेत्र होत. त्यांच्यासारखे जगांत दुसरें कांहीहि पवित्र नाही॥ २३५॥ अशा भक्ताचें आम्ही ध्यान करूं तेच आमच्या पूंजेंतील देव आहेत. त्यांच्यावांचून आम्हालां कांहीहि एक गोड वाटत नाही॥ २३६॥ आम्हांला त्यांचाच छंद असतो. तेच आमच्या द्रव्याचे सांठे होत. एवढेच नाही. तर त्यांची भेट झाली असतांच आमच्या मनाचें समाधान होतें.॥ २३७॥ अर्जुना! पण जे कोणी अशा प्रेमळ भक्तांच्या गोष्टी करतात किंवा कथा गातात, त्यांना देखील आम्ही आपली परम देवता मानतो॥ २३८॥ संजय म्हणतो, धृतराष्ट्रा! आपल्या भक्तजनांचा ब्रह्मानंद व जगद्रूपी कार्याचें मूळ कारण असा जो भगवान श्रीकृष्ण, तो याप्रमाणे अर्जुनाशीं बोलला॥ २३९॥ राजा धृतराष्ट्रा! जो अविद्यादोषरहित असा शुद्ध आहे, ज्याची कीर्ति कलंकरहित आहे, जो सर्व लोकांवर कृपा करणारा आहे, जो शरणागतांवर आईप्रमाणे प्रेम करणारा आहे आणि जो सर्वांना शरण जाण्याला योग्य आहे॥ २४०॥ देवांचा कैवार घेऊन त्यांना साह्य करण्याचा ज्याचा स्वभाव आहे, त्रैलोक्याचे संगोपन करणें ही ज्याचीं क्रीडा आहे व शरण आलेल्यांचा प्रतिपाळ करणें हाच ज्याचा खेळ आहे (भगवान, भजन करणाऱ्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांचा सांभाळ करणारा होतो. असा भाव.)॥ २४१॥ धर्माप्रमाणेच वागणारा अशी ज्याची कीर्ति आहे, अगाध दातृत्वामुळे ज्याचे सम वागणें आहे, अमर्याद सामर्थ्यानें समर्थ असल्यामुळे जो प्रबळ अशा बळीला बंधन करणारा झाला आहे॥ २४२॥ जो आपल्या भक्तजनांवर आईप्रमाणे प्रेम करणारा आहे आणि प्रेमळजनांशीं निष्कपट आहे. जो आपल्या सत्यस्वरूपाने जगाचे धारण करणारा आहे व जो संपूर्ण कलांचा निधि आहे॥ २४३॥

**गूढार्थदीपिका-सत्यसेतु**—'सेतु' या शब्दाचा "सेतुर्विधृति:" (छां. उ. ८-४-१) असा अर्थ छांदोग्योपनिषदांत दिला आहे. परस्परांचा नाश करणाऱ्या अनेक पदार्थांनी भरलेल्या जगताचा नाश होऊं न देतां, भगवान आपल्या सत्य स्वरूपाचे द्वारा किंवा सत्यादिधर्माचे द्वारा जगताचे धारण करतो, म्हणून भगवंताला येथे माउलींनी सत्यकेतु म्हटलें आहे.

**तो श्रीकृष्ण वैकुंठींचा। चक्रवर्ती निजांचा। सांगतुसे येरु दैवाचा। आइकतु असे॥ २४४॥**
**आतां ययावरी। निरुपिती परी। संजयो म्हणे अवधारीं। धृतराष्ट्रातें॥ २४५॥**
**तेंचि रसाळ कथा। मऱ्हाठिया प्रतिपथा। आणिजेल आतां। अवधारिजो॥ २४६॥**
**ज्ञानदेव म्हणे तुम्ही। संत वोळगावेति आम्ही। हें पढविलों जी स्वामी। निवृत्तिदेवे॥ २४७॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वादशोऽध्याय:॥ १२॥**

**अर्थ**—जो वैकुंठीचा स्वामी असून आपल्या भक्तांचा सार्वभौम राजा आहे तो श्रीकृष्ण सांगत असून भाग्यवान अर्जुन श्रवण करीत आहे॥ २४४॥ संजय राजा धृतराष्ट्राला म्हणतो, आतां यापुढें भगवान श्रीकृष्ण काय बोलतात ते ऐका॥ २४५॥ तीच रसाळ कथा मराठी भाषेच्या रूपांतरांत आणली जाईल, आतां लक्ष द्या॥ २४६॥ श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, आम्हीं तुम्हां संतांचे चरण धरावें, हेंच श्री स्वामी निवृत्तिदेवांनी आम्हांला शिकविलें॥ २४७॥

**गूढार्थदीपिका**—संतांना शरण जाणें व त्यांच्या चरणांचा आश्रय करणें हेंच सर्व साधनांत सारभूत साधन आहे. असेंच सर्व संतांचें म्हणणें आहे, असा भाव.

**श्रीसद्गुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाचा गूढार्थदीपिकेसह अनुवाद पूर्ण झाला, तो श्रीसद्गुरुचरणीं समर्पण असो!**



## समारोप

मागील अकराव्या अध्यायांत भगवंतांनी आपल्या एक देशीय सगुण श्रीकृष्णस्वरूपापेक्षा विश्वरूप श्रेष्ठ असून, त्यावरच प्रेम असूं दे असे म्हटलें; हें ऐकून अर्जुनाला भगवंताचें म्हणणें आपल्या अनुभवाशीं विरुद्ध आहे, असें वाटून भगवंताच्या मुखानेच कोणतें रूप श्रेष्ठ आहे, याचा निर्णय करून घेण्याकरितां, विश्वरूप व सगुण चतुर्भुज या दोहोपैकी कोणत्या रूपाचें, प्रेमभक्तीने अखंडानंदरूप परब्रह्माशीं, निर्विकल्प ऐक्य होऊं शकतें, असा मोठा मार्मिक प्रश्न, अर्जुनाने भगवंताला केला.

भगवंतांनी अर्जुनाच्या या प्रश्नाचें उत्तर या अध्यायांत देऊन अर्जुनाच्या अनुभवालाच पुष्टि दिली आहे.

भगवान म्हणतात, अर्जुना! माझ्या सगुण स्वरूपाचे ठिकाणी अखंड मन लावून, जे माझी अत्यंत प्रेमाने भक्ति करतात, तेच युक्ततम होतात-म्हणजे माझ्याशीं निर्विकल्प ऐक्य पावतात, हें जाण आणि अविनाशी, निर्दिष्ट न करतां येण्याजोगे, इंद्रियातीत, सर्व व्यापक, अचिंत्य, कूटस्थ व अचल अशा माझ्या विश्वरूपाची प्रेमपूर्वक उपासना करतां येंणें शक्य नसल्यामुळे, सर्व इंद्रियांचा रोध करून व सर्वत्र समबुद्धि ठेऊन सर्व भूतांचे हिताचे ठिकाणीं रत होऊन, ते मी आहे अशा जाणीवेने, जे माझी उपासना करतात, तेहि शेवटीं मलाच प्राप्त होतात.

पण देहधारी जीवांना, या माझ्या अतींद्रिय विश्वरूपाची प्राप्ति अत्यंत क्लेश सोसूनच होते.

जे काणी, आपल्या संपूर्ण कर्मांचा माझ्या ठिकाणी संन्यास करून, माझे ध्यान करून माझी उपासना करतात, त्यांना कांही एक कष्ट पडू न देतां व फार वेळ लागूं न देतां मी या संसारसमुद्राच्या पार करतो. भगवान म्हणतात, अर्जुना! माझे ठिकाणींच आपलें प्रेम लाव व माझेच ठिकाणी आपली बुद्धि स्थिर कर म्हणजे तूं मला निश्चयाने प्राप्त होशील, यांत संशय नाही. जर तूं आपलें चित्त, माझे ठिकाणी स्थिर करूं शकत नसशील, तर माझ्या ठिकाणीं चित्त लावण्याचा अभ्यास केला असतां हळूहळू माझ्या ठिकाणीं चित्त स्थिर होऊन, तूं मला प्राप्त होशील. जर असाहि अभ्यास तुझ्याच्याने होत नसेल, तर संपूर्ण कर्मे मत्प्रीत्यर्थ करीत जा. मत्प्रीत्यर्थ कर्म केल्यानेहि तुला ऐक्यसिद्धि प्राप्त होईल. हेंहि तुला साध्य होत नसेल, तर जेवढीं कर्मे होतील, त्यांच्या फळांची मुळींच इच्छा करूं नकोस.

अभ्यासानेहि ज्ञानरूपी विशेष उत्पन्न होतो. ज्ञानापासून ध्यान, ध्यानापासून कर्मफलत्याग व त्यागापासून शांति उत्पन्न होते, कोण्याहि भूतांचा द्वेष न करणारा, कोण्याहि भूताशी मैत्री करणारा, करुणासंपन्न, अहंता-ममतारहित, सुखदुःख सारखे मानणारा, क्षमावान्, अखंड संतुष्ट, दृढनिश्चयीं, मनोनिग्रही, असा असून, प्रेमाने ज्याने आपली मनबुद्धि मला समर्पण केली आहे, असा भक्त मला प्रिय असतो.

ज्याच्यापासून लोकांना त्रास होत नाही व लोकांपासूनहि ज्याला त्रास होत नाही व जो हर्ष, शोक, भयरहित झाला आहे आणि इतके असूनहि जो माझ्या सगुण स्वरूपाची भक्ति करतो, तो मला प्रिय आहे. ज्याला कशाचीच अपेक्षा नाही. जो आंत-बाहेर शुचिर्भूत असून, आत्मप्राप्ति करून घेण्यांत दक्ष आहे, बाह्य विषयांचे ठिकाणी जो उदासीन होऊन, शोकरहित झाला आहे आणि सर्वकर्मारंभाचा त्याग करून, जो माझ्या सगुण स्वरूपाच्या ठिकाणी प्रेम करतो, तो मला प्रिय आहे.

ज्याला विषयप्राप्तींत आनंद होत नाही किंवा जो विषयांचा द्वेष करीत नाही, जो कशाची इच्छा करीत नाही व जो कशाबद्दल शोकहि करीत नाही, जो पापपुण्याची बुद्धि सोडून देऊन एक सगुण भगवंताचे ठिकाणीं भक्तिमान् झाला, तोच मला प्रिय आहे.

शत्रु-मित्र, मान-अपमान, शीत-उष्ण, सुख-दुःख या सर्व द्वंद्वाचे ठिकाणी समबुद्धि धारण करणारा, सर्वसंगरहित, निंदा-स्तुति सम लेखणारा, मौन धारण करून कशाहि स्थितींत संतुष्ट असणारा, कोणा एक देशाचा आश्रय न करणारा व आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर बुद्धि झालेला आणि माझे ठिकाणीच संपन्न असणारा, मला अत्यंत प्रिय आहे.

अशा या अविनाशी परमधर्मरूप भक्तिमार्गाची, अत्यंत श्रद्धापूर्वक, मत्परायण होऊन, सांगितल्याप्रमाणे जे, माझ्या सगुण स्वरूपाची उपासना करतात, ते भक्त, मला अत्यंत प्रिय असतात व माझ्या भक्तांची कथा सांगणारे व ऐकणारेहि मला आवडतात.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय तेरावा

अवतरणिका-मागील बाराव्या अध्यायांत माउलींनी ब्रह्मज्ञानानंतरहि सगुण साकार भगवंताच्या भक्तीची आवश्यकता व थोरवी गायिली आहें.

भगवंताचें मूळचें निर्गुण स्वरूप अपरिणामी, अस्फुट, अद्वैत, सच्चिदानंदस्वरूप असल्यामुळे व तें स्वरूप मायाबद्ध नसल्यामुळे या स्वरूपाचे ठिकाणीं विवर्तरूपाने असणारें त्याचें सगुण स्वरूपहि अनध्यस्त म्हणजे पूर्णब्रह्मस्वरूपच असतें, हें आम्हीं आतांपर्यंत अनेक ठिकाणीं दाखविलेंच आहे.

ज्याप्रमाणे सोन्याची पारख झाल्यावांचून हा अलंकार सोन्याचा आहे अशी खात्री होत नाही व त्याचें प्रेम वाटत नाही, त्याप्रमाणेंच भगवंताच्या निर्गुण स्वरूपाचें निःसंदिग्ध ज्ञान झाल्याखेरीज भगवंताच्या सगुण स्वरूपाचेंहि पूर्णब्रह्मत्व कळून येत नाही.

निर्गुणस्वरूपच अंतःकरणवृत्तींत प्रतिबिंबित झालें असतां त्यास क्षेत्रज्ञ म्हटलें जातें. क्षेत्रज्ञ हा क्षेत्राचा ज्ञाता आहे व क्षेत्र हें जाणलें जाणारें आहे. तो ( क्षेत्रज्ञ ) क्षेत्राहून निराळा आहे; पण क्षेत्राचे ठिकाणींच क्षेत्रज्ञ असल्यामुळे त्या दोघांचें मिश्रण झालें आहे; म्हणून आकाशाहून अति सूक्ष्म असलेल्या क्षेत्रज्ञाला जाणण्याकरितां संपूर्ण क्षेत्राचा विस्तार कळणें आवश्यक असतें. क्षेत्राचा विस्तार कळला की अनायासें क्षेत्राला जाणणारा क्षेत्रज्ञ क्षेत्राहून निराळा होतो. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांना परस्परांहून निराळें करणें, यालाच वेदान्तांत व्यतिरेक म्हणतात.

हा व्यतिरेक मागेंहि सांगितला गेला आहे; तरीपण क्षेत्रज्ञाचें स्वरूप अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे तें एकदांच सांगितल्याने किंवा श्रवण केल्याने समजत नाही व दृढ होत नाही; म्हणून वेदान्तांत "आवृत्तिरसकृदुपदेशात्" ( ब्र. सू. ४-१-१ ) क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या व्यतिरेकाचें वारंवार श्रवण करावें, असे सांगितलें आहे. या सिद्धान्ताप्रमाणे या अध्यायांत भगवंतांनी व श्रीमाउलींनी पुनः क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा व्यतिरेक सांगितला आहे.

**जयांचे केलिया स्मरण। होय सकळ विद्यांचें अधिकरण। तेचि वंदूं श्रीचरण। श्रीगुरुचे ॥ १ ॥**
**जयांचेनि आठवें। शब्दसृष्टी आंगवे। सारस्वत आघवें। जिव्हेसि ये ॥ २ ॥**
**वक्तृत्व गोडपणें। अमृतातें पारुष म्हणे। रस होती वोळगणें। अक्षरांसी ॥ ३ ॥**
**भावाचें अवतरण। अवतरविती खूण। हाता चढें संपूर्ण। तत्त्वबोध ॥ ४ ॥**
**श्रीगुरूचे पाय। जैं हृदय गिवंसूनि ठाय। तैं येवढें भाग्य होय। उन्मेषासी ॥ ५ ॥**

**अर्थ**—ज्या चरणांचें अत्यंत परम आदराने स्मरण केले असतां पुरुष संपूर्ण विद्येचें वसतिस्थान होतो, त्याच श्रीगुरुच्या चरणांना आतां नमस्कार करूं ॥ १ ॥ ज्या चरणांचें स्मरण झालें असतां इष्ट अर्थ प्रगट करणारें शब्दभांडार स्वाधीन होतें आणि वाणीचे ठिकाणीं संपूर्ण रसाळ वक्तृत्व प्रगट होतें ॥ २ ॥ रसाळ वक्तृत्वाच्या गोडपणापुढे अमृतहि फिकें वाटतें आणि नवरस अक्षरांना धरूनच राहतात ॥ ३ ॥ आत्मबोधाचें रहस्य प्रगट करणारी खूण ठिकठिकाणीं भावार्थाला प्रगट करते आणि त्यामुळे अंतःकरणांत आत्मबोध पूर्णपणें यथार्थ अवगत होतो ॥ ४ ॥ जेव्हा श्रीगुरुचे पाय आपल्या हृदयांत राहतात, तेव्हाच ज्ञानाचें एवढें सद्भाग्य प्राप्त होतें ॥ ५ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानभक्तीने पूर्णब्रह्मस्वरूप झालेल्या श्रीगुरुचे ठिकाणीं ज्याचे निःसीम प्रेम आहे, तोहि त्यांच्याप्रमाणेच ज्ञानभक्तीने पूर्ण साक्षात्कारी होतो व त्याच्याकडून होणारा ग्रंथ अनेक प्रक्रियांनी, रहस्यांनी व साहित्यांनी भरलेला असतो, असा भाव.

"श्रवण करूनि रचित ग्रंथ। तेथ शब्दज्ञान होत। मननैंकरूनि रचित ग्रंथ। तेथ अनुमाने कळती सिद्धान्त आणि पूर्वपक्षच्छेदक बहुत युक्ती असती॥ ११४॥ निदिध्यासक रचित ग्रंथ। तेथ प्रक्रियासहित असती सिद्धान्त। परी निदिध्यासक जी प्रक्रिया करीत तींचि प्रधान राहे॥ ११५॥ ब्रह्मसंपन्न रचित ग्रंथ। तेथ अवर्णनीय अनुभूत सिद्धान्त। नाना प्रक्रिया संभरित। सर्व कांहीं मिळत निःसंशय॥ ११६॥" (श्रीगुलाबराव महाराजकृत भगवद्गीतासंगति)

**ग्रंथकार पांच प्रकारचे असतात—**

(१) श्रुति, स्मृति, पुराण यांना प्रमाण न मानतां केवळ आपल्या बुद्धीने लिहिलेल्या ग्रंथांत संतांनी अनुभविलेल्या मोक्षमार्गाचा मागमूसहि नसतो; म्हणून ते ग्रंथ मुमुक्षूंना निरुपयोगी असतात.

(२) ज्यांनी श्रुति, स्मृति, पुराण यांचें पुष्कळ श्रवण केलें आहे. अशा पुरुषांनी लिहिलेल्या ग्रंथांत केवल शब्दज्ञान (म्हणजे केवळ प्रमाणवचनांचा संग्रह) पुष्कळ सांपडतें.

(३) सिद्धान्तांचें मनन करणाऱ्या पुरुषांनी लिहिलेल्या ग्रंथांत, सिद्धान्तपोषक व पूर्वपक्षीय शंका निवारण करणाऱ्या युक्त्या पुष्कळ असतात.

(४) निदिध्यासन करणाऱ्या पुरुषांनी लिहिलेल्या ग्रंथांत, त्यांच्या स्वतःच्या निदिध्यासन प्रक्रियेचेंच विशेष वर्णन असतें.

आणि (५) ज्ञानभक्तीने पूर्णब्रह्मस्वरूप झालेल्या सत्पुरुषांचे ग्रंथांत अनेक अनुभूत सिद्धान्त, आत्मसाक्षात्काराच्या प्रक्रिया व रहस्यें हे ठिकठिकाणीं आढळतात.

अशा सत्पुरुषांचेच ग्रंथ सर्व मुमुक्षूंना उपयोगाचे असतात.

**ते नमस्कारूनि आतां। तो पितामहाचा पिता। लक्ष्मीयेचा भर्ता। ऐसें म्हणे॥ ६॥**

**अर्थ—**म्हणून त्या चरणांना आम्ही आतां नमस्कार करतो; जो ब्रह्मदेवाचा पिता व लक्ष्मीचा पति होय तो भगवान श्रीकृष्ण पुढें असें म्हणाला॥ ६॥

*श्रीभगवानुवाच*

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते। एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः॥ १॥**

**अर्थ—**श्रीभगवान म्हणतात—हे कुंतिपुत्रा अर्जुना! या शरीरालाच क्षेत्र हें नांव आहे, याला जो जाणतो तो क्षेत्रज्ञ होय, असें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांना जाणणारे म्हणतात॥ १॥

**तरि पार्था परिसिजे। देह हें क्षेत्र म्हणिजे। हेंचि जाणे तो बोलिजे। क्षेत्रज्ञु एथें॥ ७॥**

**अर्थ—**तरी हे अर्जुना! ऐक देहाला क्षेत्र म्हणतात व देहाला जो जाणतो त्यालाच येथें क्षेत्रज्ञ म्हटलें आहे॥ ७॥

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत। क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम॥ २॥**

**अर्थ—**अर्जुना! सर्व शरीराचे ठिकाणीं जो क्षेत्रज्ञ आहे तो मीच आहे, असें जाण, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या स्वरूपाचे जें यथार्थ ज्ञान तेंच खरें ज्ञान होय, असें मी समजतो॥ २॥

**तरि क्षेत्रज्ञु जो एथें। तो मी जाण निरुतें। जो सर्व क्षेत्रातें। संगोपोनि असे॥ ८॥**

**अर्थ—**शरीरांत जो क्षेत्रज्ञ म्हणून येथें सांगितला आहे व जो सर्व प्राणिमात्रांच्या शरीरांत व्यापून आहे, तो खरोखर मीच आहे, असे जाण॥ ८॥

**गूढार्थदीपिका—**आपल्या ठिकाणीं 'मी' म्हणून स्फुरणारी चैतन्यवृत्तिच संपूर्ण देहादि क्षेत्राला जाणत असल्यामुळें तिलाच क्षेत्रज्ञ म्हणतात. हा क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्राला जाणणारा म्हणून सर्व क्षेत्रांहून खरोखर निराळा व एकच आहे. त्याचा क्षेत्राशीं कांही एक संबंध नाही. त्याचे ठिकाणी भ्रांति नसल्यामुळे तो क्षेत्राशीं आपलें ऐक्य करीत नाही व आपल्याला क्षेत्रापुरतें मर्यादित समजत नाही; म्हणूनच तो सर्व क्षेत्राचें संगोपन करतो. क्षेत्रज्ञाची ही स्वरूपस्थिति नित्य अशीच राहत असल्यामुळे त्या स्वरूपस्थितीला धरून त्याला 'ईश्वर' संज्ञा आहे.

आणि देहादि क्षेत्र म्हणजे "मी" अशी क्षेत्रज्ञाचे ठिकाणी जी अनादि भ्रांति दिसून पडते, त्या भ्रांतीला धरून

क्षेत्रज्ञाला 'जीव' म्हटलें जातें.

**क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें। जाणणें जें निरुतें। ज्ञान ऐसें तयातें। मानूं आम्हीं॥ ९॥**

**अर्थ**—क्षेत्र म्हणजे काय आणि क्षेत्रज्ञ कोण हें यथार्थ जाणणें यालाच आम्ही ज्ञान म्हणतों॥ ९॥

**गूढार्थदीपिका**—क्षेत्राची व्याप्ति व क्षेत्रज्ञाची स्थिति जाणल्याने संपूर्ण क्षेत्राहून क्षेत्रज्ञ अगदीं निराळा आहे हें कळून येऊन जशी अज्ञानभ्रांतीची व सर्व दु:खांची निवृत्ति होते तशी दुसऱ्या कोणत्याहि ज्ञानाने होत नाही; म्हणून क्षेत्रक्षेत्रज्ञाचे ज्ञान हेंच खरें ज्ञान होय-म्हणजे क्षेत्रक्षेत्रज्ञ यांच्या ज्ञानाहून इतर ज्ञान हें ज्ञान नसून अज्ञानच होय-असा भगवंताच्या व माउलीच्या म्हणण्याचा आशय आहे.

क्षेत्रक्षेत्रज्ञाच्या व्यतिरेकज्ञानाला ब्रह्मज्ञानहि म्हणतात.

**तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत्। स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु॥ ३॥**

**अर्थ**—तें क्षेत्र कोणतें? कशा प्रकारचें आहे? त्याचे विकार कोणते? तें कशापासून उत्पन्न होतें? तसेच तो क्षेत्रज्ञ कोण? त्याची शक्ति काय आहे? हे सर्व माझ्यापासून संक्षेपाने श्रवण कर॥ ३॥

**तरि क्षेत्र येणें नांवें। हें शरीर जेणें भावें। म्हणितलें तें आघवें। सांगो आतां॥ १०॥**
**हें क्षेत्र कां म्हणिजे। कैसें कें हें उपजे। कवण कवणीं वाढविजे। विकारा एथ॥ ११॥**
**हें औट हात मोटकें। कीं केवढें पां केतुकें। बरड कीं पिके। कोणाचें हें॥ १२॥**
**इत्यादि सर्व। जे जे याचे भाव। ते बोलिजती सावेव। अवधान देईं॥ १३॥**
**पैं याचि स्थळाकारणें। श्रुति सदा बोबाणें। तर्कु येणेंचि ठिकाणें। तोंडाळु केला॥ १४॥**

**अर्थ**—तर आतां हें शरीर ज्या उद्देशाने क्षेत्र या नांवाने संबोधिलें जातें तें संपूर्ण आतां सांगतों॥ १०॥ शरीराला क्षेत्र कां म्हणतात? तें कसें व कशापासून उत्पन्न होतें? कोणकोणत्या कार्यरूपाने त्याची वाढ होते?॥ ११॥ हें एवढेसें साडे तीन हातच आहे किंवा केवढें मोठें आहे? व त्याची मर्यादा किती? तें नापीक आहे किंवा पिकणारें आहे आणि तें कोणाचें आहे?॥ १२॥ इत्यादि जे सर्व भाव असतील ते संपूर्ण सांगतों, लक्ष देऊन ऐक॥ १३॥ उपनिषदांनी सारखा आक्रोश करून या क्षेत्राविषयींच विचार सांगितला आणि याच स्थळाने तर्काला बडबड करायला लावली॥ १४॥

**गूढार्थदीपिका-पैं याचि स्थळाकारणें**—श्रुतीने क्षेत्राचा वारंवार विचार करून क्षेत्रज्ञ अद्वैत. सच्चिदानंद व क्षेत्र जड-विनाशी, मिथ्या, असे हे परस्पराहून भिन्न आहेत, असें दाखविलें आहे, असा अर्थ.

**तर्कु येणेंचि ठिकाणें। तोंडाळु केला**—श्रुतीचें म्हणणें पटवून देण्याकरितां तर्काने आपली पराकाष्ठा केली, असा भाव.

**चाळितां हेचि बोली। दर्शनें शेवटा आलीं। तेवींचि नाहीं बुझाविलीं। अझुनि द्वंद्वें॥ १५॥**

**अर्थ**—या क्षेत्राची चर्चा करण्यांतच दर्शनांचा शेवट झाला, तरी त्यांच्यातील परस्पर विरोध नाहीसा झाला नाही॥ १५॥

**गूढार्थदीपिका-चाळितां हेचि बोली। दर्शनें शेवटा आलीं**—''**सर्वेषां प्रस्थानकर्तृणां मुनीनां विवर्तवाद-पर्यवसानेनाद्वितीये परमेश्वरे एव वेदान्तप्रतिपाद्ये तात्पर्यम्। न हि ते मुनयो भ्रान्ताः सर्वज्ञत्वातेषाम्**'' (महिम्न स्तोत्र-मधुसूदनी टीका) दर्शनकार हे भ्रांत नसून सर्वज्ञ आहेत. ते चुकणें शक्य नाही; म्हणून त्यांच्या दर्शनग्रंथांत वरवर मतभिन्नता किंवा विरोध दिसत असला तरी त्यांनी अधिकाऱ्यानुसार आपआपल्या दर्शनाची रचना केली असून शेवटीं त्यांच्या प्रतिपादनाचें पर्यवसान साक्षात् किंवा परंपरेने अद्वैत परब्रह्माचें प्रतिपादन करण्यांत आहे, असे सर्वच अद्वैतवादी मानतात.

**तेवींचि नाहीं बुझाविलीं। अझुनी द्वंद्वें**—द्वैतवाद्यांना मात्र दर्शनकारांत खरोखरच मतभेद आहे, असें वाटतें व ते परस्परांत वाद घालतात.

**शास्त्रांचिये सोयरिके। विचळिजे येणेंचि एकें। याचेनि एकवंके। जगासि वादु॥ १६॥**

**अर्थ**—या एका क्षेत्रामुळेच निर्णयशास्त्रांच्या सोयरीक संबंधांत बिघाड उत्पन्न झाला आणि क्षेत्राचे ठिकाणींच एकनिष्ठ झाल्यामुळे जगांत वाद माजला॥ १६॥

**गूढार्थदीपिका-शास्त्रांचिये सोयरिके**—"नित्यश्चमोक्ष: सर्वैर्मोक्षवादि-भिरभ्युपगम्यते" (ब्र. सू. शं. भा. १-१-४) सर्व दर्शनकारांनी मोक्ष स्वीकाराला असून तो नित्य मानला आहे. मोक्ष म्हणजे जीवाची संपूर्ण दु:खांपासून अखंड मुक्ति होणें असें इतर शास्त्र मानतात, तर दु:खाचीं अत्यंत निवृत्ति होऊन परमानंद प्राप्ति होणें, असा वेदान्तांत मोक्ष मानला आहे.

कर्माने प्राप्त होणारी कोणतीहि स्थिति नाशिवंत असल्यामुळे नित्य दु:खरहित अशी मोक्षस्थिति कर्माने प्राप्त होऊं शकत नाही. जीवाची ती स्वत:सिद्ध स्थितिच असायला पाहिजे, तरच ती नित्य होईल. नित्यदु:खरहित अशा स्वत:सिद्ध ज्ञानरूप स्थितीलाच वेदांन्तांत परब्रह्म म्हटलें आहे. म्हणून सर्व दर्शनकारांच्या प्रतिपादनाचें पर्यवसान साक्षात् किंवा परंपरेने एका परब्रह्माचे ठिकाणींच आहे, असें म्हणावें लागतें. हीच शास्त्रांची सोयरीक होय. अर्थात् शास्त्रकारांचा विरोध आत्मवस्तूच्या किंवा ब्रह्मवस्तूच्या प्रतिपादनांत नाही.

**याचेनि एकवंकें। जगा वाद**-क्षेत्रज्ञाला सोडून व क्षेत्राला सत्य मानून क्षेत्राच्याच ठिकाणीं एकनिष्ठ राहिल्याने जगांत वाद माजला आहे.

**तोंडेंसी तोंडा न पडे। बोलेंसी बोला न घडे। इया युक्ती बडबडे। त्राय जाहली॥ १७॥**
**नेणों कोणाचें हें स्थळ॥ परि कैसें अभिलाषाचें बळ। जे घरोघरीं कपाळ। पिटवीत असे॥ १८॥**

**अर्थ**—एकाचें तोंड दुसऱ्याच्या तोंडासमोर होत नाही व एकाचा युक्तिवाद दुसऱ्यास पटत नाही. अशा युक्तिवादामुळे बडबडण्याची सीमा झाली॥ १७॥ हें शरीर कोणाच्या मालकींचें आहे, हें सांगता येत नाही, तरीपण याची आसक्ति इतकी प्रबळ आहे की, घरोघर याच्या करितांच कपाळपिटी होत असते॥ १८॥

**गूढार्थदीपिका—नेणों कोणाचें हें स्थळ**-क्षेत्रज्ञाच्या स्वरूपाचा विचार केला असतां तो अद्वैत सच्चिदानंदस्वरूप असल्यामुळे त्याहून दुसरी वस्तुच नाही-म्हणजे क्षेत्र मिथ्या कल्पनामात्र आहे-असा अनुभव येतो. अर्थात् क्षेत्रही नाही व त्याचा कोणी मालकहि नाही, असा भाव.

**परि कैसें अभिलाषाचें बळ**-जीव हा अस्तित्वांत नसलेल्या, म्हणून मिथ्या, अशा शरीरादि क्षेत्राला सत्य समजून त्याचा अभिमान धरतो व त्यांत आसक्त होऊन तें अखंड राहावें अशी इच्छा करतो.

**जे घरोघरीं कपाळ। पिटवीत असें**-काल्पनिक क्षेत्र नाशिवंतच असणार. हें न समजतां तें नाहीसें होऊं नये अशी जीव इच्छा करतो; म्हणून तें नाहीसें झालें असतां व्यर्थ शोक करण्याचा प्रसंग येतो.

**नास्तिका द्यावया तोंड। वेदांचें गाढें बंड। तें देखोनि पाखांड। आनचि वाजे॥ १९॥**

**अर्थ**—नास्तिकांच्या कुतर्कांचें खंडन करण्याकरितां त्यांना तोंड देऊन वेदांनी त्यांच्याविरुद्ध थोर बंड उभारलें, हें पाहून पाखंड्यांनी भलतेंच बोलायला सुरुवात केली॥ १९॥

**गूढार्थदीपिका-नास्तिक**—म्हणजे देहालाच चेतन आत्मा रामजणारे. ते ईश्वर, वेद, वेदाचें ईश्वरप्रणीतत्व, पाप-पुण्यकर्मे, कर्मानुसार गति, परलोक, पुनर्जन्म, मोक्ष इत्यादि जें श्रुतिमान्य सिद्धान्त आहेत ते मुळींच मानीत नाहीत.

**नास्तिका द्यावया तोंड**-म्हणजे नास्तिकांचीं अविचारमूलक मतें खोडून काढण्याकरितां.

**वेदांचें गाढें बंड**—म्हणजे वेदाने अनुमान व अनुभव यांच्या भक्कम आधारावर उभारलेले युक्तिसिद्ध विचार.

**पाखंडी**—वेदादि शास्त्रांच्या युक्तिअनुभवसिद्ध विचारांचा व सिद्धान्तांचा त्याग करून, विचारास न पटणारे व अनुभवास कधीं न येणारे स्वकपोलकल्पित सिद्धान्त प्रतिपादन करणाऱ्यांना पाखंडी म्हणतात. "पाखंड" या शब्दाने आर्हत किंवा जैनादी अवैदिक मतांचा माउलींनी येथे उल्लेख केला आहे, असें "नागवीं लुंचिती मुंडे" या पुढील ओव्यांतील चरणावरून स्पष्ट होतें.

**म्हणे तुम्ही निर्मूळ। लटिकें हें वाग्जाळ। ना म्हणसी तरी पोफळ। घातलें आहे॥ २०॥**
**पाखांडाचिये कडे। नागवीं लुंचिती मुंडे। नियोजिलीं वितंडें॥ तळासि येती॥ २१॥**
**मृत्युबळाचेनि माजें। हें जाईल वीण काजें। तें देखोनियां व्याजें। निघाले योगी॥ २२॥**

**अर्थ**—(वेद प्रमाण मानणाऱ्या आस्तिकाला पाखंडी म्हणतो-) तुमचें म्हणणें निराधार व केवळ वायफळ पांडित्य आहे. ''नाही! आमचें म्हणणेंच यथार्थ आहे'' असें म्हणत असाल, तर ही आम्ही प्रतिज्ञेची सुपारी ठेविली आहे-म्हणजे पैजेने आम्ही आपलें म्हणणें सिद्ध करून देऊं शकतों॥ २०॥ असे हे, पाखंडाचे डफ वाजवून नागवे राहतात व डोक्याचे केस उपटतात आणि आपलें मत प्रतिपादन करण्याकरितां स्वीकारलेल्या वितंडवादानेच ते सर्वांच्या खालीं येतात म्हणजे आपणच आपलीं मतें निराधार ठरवितात॥ २१॥ मृत्यूचें सामर्थ्य अनिवार असल्यामुळें हें क्षेत्र व्यर्थच मृत्यूच्या स्वाधीन होईल, हें जाणून योगी देहाच्या आसक्तीने आयुर्मर्यादा वाढविण्यास निघाले॥ २२॥

**मृत्यूनि आधाधिले। तिहीं निरंजन सेविलें। यमदमांचे केले। मेळावे पुरे॥ २३॥**

**अर्थ**—देहाच्यां आसक्तिमुळे मृत्यूला पाहून घाबरलेले ते एकान्तात जाऊन राहिले व त्यांनी नाना प्रकारच्या यमनियमांचे समुदाय आचरणांत आणलें॥ २३॥

**गूढार्थदीपिका**—''योगिया साधली जीवनकळा'' (ज्ञा. हरिपाठ) योगी, आयुष्य वाढविण्याकरितां योगाच्या यमनियमादि अष्टांगसाधनांचा अभ्यास करतात. अर्थात् तेहि क्षेत्राला सत्य समजतात, वेदान्ताप्रमाणें मिथ्या समजत नाहीत, हें सिद्ध आहे.

**येणेंचि क्षेत्राभिमानें। राज्य त्यजिलें ईशानें। गुंति जाणोनि स्मशानें। वासु केला॥ २४॥**
**ऐसिया पैजा महेशा। पांघुरणें दाही दिशा। लांचकर म्हणोनि कोळसा। कामु केला॥ २५॥**

**अर्थ**—या देहाचा अभिमान धरूनच कैलासाचें राज्य करण्यांत बंधन आहे, हें जाणून भगवान शंकराने कैलासाचा त्याग केला व श्मशानांत वास केला॥ २४॥ अशा त्याग करण्याच्या या प्रतिज्ञेनेच शंकराला दिशा पांघराव्या लागल्या-म्हणजे दिगंबर होऊन राहावें लागलें व कामोत्पादक वनशोभेची लांच देऊं पाहणाऱ्या मदनाला जाळून शंकराने त्याचा कोळसा केला.॥ २५॥

**गूढार्थदीपिका**—पुराणांतून शंकर, विष्णु व ब्रह्मदेव यांच्या ज्या अशा प्रकारच्या कथा वर्णिलेल्या आहेत, त्या परार्थगा असतात-म्हणजे त्यांचें तात्पर्य दुसऱ्यांना उपदेश करण्यांत असतें. वरील २४ व २५ या ओव्यांत वर्णिलेल्या भगवान शंकराच्या कथेने सामान्य जीवांना असा उपदेश केला आहे, की क्षेत्र सत्य वाटतें, म्हणूनच त्याच्या आसक्तीने कामक्रोधादि विकार उत्पन्न होतात व काम क्रोधाधिकांच्या नाशाचा प्रयत्न होतो. क्षेत्र मिथ्या आहे अशी दृढ भावना झाल्यास कामक्रोध उठत नाहीत व त्यांच्या नाशाचा प्रयत्नहि होत नाही; म्हणून मोक्षप्राप्तिकरितां क्षेत्र मिथ्या आहे ही भावना दृढ व्हायला पहिजे.

**लांचकर**—ज्याप्रमाणे लांच देणारा पुरुष लांच देऊन, आपल्या इच्छेप्रमाणे अधिकाऱ्याकडून काम करवून घेतो, त्याप्रमाणे शंकराने पार्वतीचा अंगीकार करावा म्हणून मदनहि नाना प्रकाराने वन शृंगारून कामोत्पादक वनसौंदर्याची लांच शंकरापुढे करून त्याला आपल्या वश करून घेऊं पाहत होता, म्हणून मदनाला येथे 'लांचकर' म्हणजे लांच पुढें करणारा किंवा लांच दाखविणारा असें म्हटलें आहे.

**पैं सत्यलोकनाथा। वदनें आलीं बळार्था। तरी तो सर्वथा। जाणेचिना॥ २६॥**

**अर्थ**—बुद्धीचें सामर्थ्य वाढवून क्षेत्रक्षेत्रज्ञाचा विचार करण्याकरितां ब्रह्मदेवाला चार तोंडें प्राप्त झालीं, तरी त्याला क्षेत्राचा निर्णय करतां आला नाही॥ २६॥

**गूढार्थदीपिका**—ब्रह्मदेवासारखें बुद्धिबळ प्राप्त झालें, तरी अशा बुद्धिबळानेहि मनुष्याला अनुभवी श्रीगुरुच्या साहाय्यावांचून क्षेत्राचें यथार्थ स्वरूप समजूं शकत नाही.

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् । ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः॥ ४॥**

**अर्थ**—वसिष्ठादिक ऋषींनी बहु प्रकारांनी या क्षेत्रक्षेत्रज्ञाचें वर्णन केलें असून नानाप्रकारांनी त्यांचें विवेकपूर्वक वर्णन केलें आहे. तसेंच परब्रह्माचा निश्चित बोध करून देणाऱ्या युक्तियुक्त वाक्यांनी व पदांनीहि त्यांचें वर्णन केलें आहे ॥ ४ ॥

**अवतरणिका—आतां पुढील ओव्यांनी क्षेत्राविषयीं दर्शनकारांचीं मतें माऊली सांगत आहेत. त्यांत प्रथम पूर्वमीमांसादर्शनकाराचें मत सांगत आहे.**

**एक म्हणती हें स्थळ। जीवाचेंचि समूळ। मग प्राण हें कूळ। तयाचें एथ॥ २७॥**

**अर्थ**—एक म्हणतात क्षेत्र हें स्थळ जीवाच्याच मालकीचें आहे आणि प्राण हा जीवरूपी मालकाची शेती वाहणारें कूळ आहे ॥ २७ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे जमिनीचा मालक माझी जमीन म्हणतो, म्हणून तो मालक होतो आणि जमिनीची वाही कूळ करतें, त्याप्रमाणे जीव माझा देह म्हणतो, म्हणून येथे जीवाला देहाचा मालक म्हटलें आहे आणि प्राण आहे तोपर्यंत देहाचे व्यापार चालतात, म्हणून प्राणाला कूळ म्हटलें आहे.

**हे स्थळ जीवाचेंचि समूळ**—म्हणजे जीव हा क्षेत्राचा कर्ता भोक्ता आहे. (कर्ता-म्हणजे कर्म करून कर्माप्रमाणे शरीर प्राप्त करून घेणारा व भोक्ता-म्हणजे कर्माप्रमाणे त्या शरीराचे द्वारा सुखदु:खाचा भोग भोगणारा).

याप्रमाणे वस्तुत: असंग असलेल्या क्षेत्रज्ञाला कर्ता-भोक्ता मानून त्याच्याशी जडविनाशी क्षेत्राचा कधीं नाहीसा न होणारा संबंध, मीमांसादर्शनाने स्वीकारला आहे.

**जया प्राणाचां घरीं। अंगे राबती भाऊ चारी। आणि मना ऐसा आवरी। कुळवाडीकर ॥ २८॥**

**अर्थ**—ज्या प्राणाचे, अपान, व्यान, उदान व समान हे चार भाऊ अंगाने घरींच राबतात आणि येथें जीव, या मालकाच्या तर्फे शेतीची देखरेख करून शेती करणारे मन, हें वहिवाटदार आवारी आहे ॥ २८ ॥

**गूढार्थदीपिका**—देहाच्या ठिकाणीं होणारे सर्व व्यापार प्राणाचे स्वाधीन असून प्राण हा मनाचे स्वाधीन आहे, असा भाव.

**तयातें इंद्रियबैलांची पेटी। न म्हणे अवसीं पाहाटीं। विषयक्षेत्रीं आटी। काढी भली॥ २९॥**

**अर्थ**—त्याच्या (मनाचे) जवळ ज्ञानेंद्रियरूप व कर्मेंद्रियरूप बैलाच्या जोड्या असून त्यांच्या साहाय्याने तो रात्र व दिवस न पाहतां शब्दस्पर्शादि विषयरूप शेतांत खूप श्रम करतो ॥ २९ ॥

**मग विधीची वाफ चुकवी। आणि अन्यायाचें बीज वाफवी। कुकर्माचा करवी। राबु जरी॥ ३०॥**
**तरी तयाचिसारिखें। असंभाव्य पाप पिके। मग जन्मकोटी दु:खें। भोगी जीवु॥ ३१॥**
**नातरी विधीचिये वाफे। सत्क्रियाबीज आरोपे। तरी जन्मशत मापें। सुखचि मविजे॥ ३२॥**

**अर्थ**—शास्त्रोक्तकर्मरूपी बीजाला ऊब न देतां निषिद्धकर्मरूपी बीजालाच ऊब देऊन वाढविले व अशा रीतीने इंद्रियांकडून कुकर्म करण्याचे जर श्रम करविले ॥ ३० ॥ तर त्या कुकर्मानुसार पापाचेंच अपार पीक येऊन कोटीजन्मपर्यंत जीव दु:खच भोगित राहील ॥ ३१ ॥ किंवा शास्त्रानुसार आचरणरूपी उचित सत्क्रियारूप बीज पेरलें, तर शेंकडों जन्माच्या मापाने जीव सुखच मोजित राहील ॥ ३२ ॥

**गूढार्थदीपिका**—"असंगो ह्ययं पुरुष:" क्षेत्रज्ञ पुरुष असंग म्हणजे सर्वांहून निराळा व अलिप्त आहे, असें श्रुतींनी सांगितलें असतांना जैमिनीमतामध्यें शरीर, कर्म, सुख, दु:ख इत्यादि क्षेत्रान्तर्गत पदार्थ सत्यत्वाने मानले आहेत; म्हणून माऊली म्हणतात त्या मतांत क्षेत्रक्षेत्रज्ञाचा योग्य निवाडा झाला नाही.

**अवतरणिका—आतां माउली सांख्याचें मत सांगत आहेत.**

**तंव आणिक म्हणती हें नव्हे। हें जीवाचेंचि न म्हणावें। आमुतें पुसा आघवें। क्षेत्राचे या॥ ३३॥**
**अहो जीवु एथ उखिता। वस्तीकरु वाटे जातां। आणि प्राणु हा बलैता। म्हणोनि जागे॥ ३४॥**

**अर्थ**—हें ऐकून दुसरे कित्येक म्हणतात, हें तुमचें म्हणणें बरोबर नाही. हें शरीर जीवाच्या मालकीचें आहे,

असें म्हणूं नका. या क्षेत्राविषयीं जें काय विचारायचें आहे तें सर्व आम्हांला विचारा॥ ३३ ॥ अहो! जीव हा वाटेने जात असतां या शरीराचे ठिकाणीं घटकाभर वस्ती करणारा वाटसरू आहे आणि प्राण हा वतनदार असल्यामुळे क्षेत्रांत जागल्याचे काम करतो॥ ३४ ॥

**गूढार्थदीपिका-वाटे जातां**—जीव हा मुळांत प्रकृतीहून निराळा असा असंग आहे; पण तो अविवेकाने प्रकृतीशीं ऐक्य पावून जन्ममरणाच्या वाटेने जातांना क्षेत्राचा आश्रय करतो, हे "वाटे जातां" या पदाने सुचविलें आहे.

**उखिता वस्तीकर**—विवेकज्ञान उत्पन्न होईपर्यंतच त्याचा (जीवाचा) व देहाचा संबंध असतो हें "उखिता वस्तीकर" या पदाने सांगितलें आहे.

**अनादि जे प्रकृती। सांख्य जियेतें गाती। क्षेत्र हे वृत्ती। तियेचि जाणा॥ ३५ ॥**

**अर्थ**—सांख्य जिला प्रकृति म्हणतात ती अनादि असून क्षेत्र हें तिचें राहण्याचें ठिकाण आहे॥ ३५ ॥

**गूढार्थदीपिका**—सांख्यशास्त्राप्रमाणे मूळप्रकृति अनादि व अव्यक्त असल्यामुळे ती आपल्या मूळ अव्यक्त अवस्थेंत गोचर होऊं शकत नाही. क्षेत्ररूप कार्यरूपानेच ती गोचर होते-म्हणजे प्रकृतिच क्षेत्ररूपाने प्रकट होते.

**आणि तियेतेंचि आघवा। आथी घरमेळावा। म्हणोनि ते वाहिवा। घरीं वाहे॥ ३६ ॥**

**अर्थ**—आणि तिचे काम करणाऱ्यांचा सर्व मेळावा घरचाच आहे; म्हणून ती घरींच सर्व वाहित करते॥ ३६ ॥

**गूढार्थदीपिका**—प्राण, मन, इंद्रियें यांच्या उत्पत्तीचे व व्यापाराचें कर्तृत्व प्रकृतिकडे आहे, आत्म्याकडे नाही, असा सांख्याचा सिद्धान्त आहे.

**वाहिव्याचिये रहाटी। जे कां मुदल तिघे इये सृष्टी। ते तियेचिया पोटीं। जाहाले गुण॥ ३७॥**
**रजोगुण पेरी। तेतुलें सत्त्व सोंकरी। एकलें तम करी। सवंगणी॥ ३८ ॥**

**अर्थ**—क्षेत्राची वाही करण्याच्या कामामध्ये मूलभूत जे या सृष्टींत तीन गुण आहेत, ते या प्रकृतीच्या पोटीं उत्पन्न झाले आहेत॥ ३७ ॥ रजोगुण, कर्मरूपी बीजाची पेरणी करतो, सत्वगुण, जितकी पेरणी झाली तितक्याचें रक्षण करतो आणि मग यथाकाळीं तमोगुण हा त्याची कापणी करतो॥ ३८ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रकृति ही आपल्या सत्व, रज, तम या तीन गुणांच्या द्वारा क्षेत्राची उत्पत्ति, स्थिति, लय करते, असा अर्थ.

**रचूनि महत्तत्त्वाचें खळें। मळी एकें काळुगेनि पोळें। तेथ अव्यक्ताची मिळे। सांज भली॥ ३९ ॥**

**अर्थ**—पुढें त्यापासून महत्तत्वाचें म्हणजें समष्टिबुद्धीचें खळें निर्माण होतें आणि काळरूपी एकट्या बैलाने त्याची मळणी केली जाते. हे करीत असतांना शेवटीं अव्यक्तरूपी संध्याकाळ होते॥ ३९ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे खळ्यांत धान्य एकत्र करून व त्याची मळणी करून धान्य व भूस निराळे केले जातात, त्याप्रमाणे बुद्धीच्या साहाय्याने बरें-वाईट, पुण्य-पाप अशी कर्माची विभागणी करून त्याचें सृष्टींत कालांतराने सुखदु:खरूप फळ, प्रकृति पुरुषाला प्राप्त करून देते, असे होत होत शेवटीं सर्व सृष्टि अव्यक्त प्रकृतींत लीन होते. या सांख्यमतांत पुरुष चेतन व असंग आहे. ती तो कर्म करीत नाही! पण त्याच्या सांनिध्याने प्रकृति कर्म करते व त्याच्या ठिकाणीं अविवेक आहे तोपर्यंत क्षेत्रान्तर्गत सुख दु:खाचा संबंध व विवेक झाल्यानंतर सुखाचा संबंध मानला असल्यामुळे त्याच्या (पुरुषाच्या) असंगत्वाला बाध येतो; म्हणून वेदान्त दृष्टीने पाहतां, या मतांतहि क्षेत्रक्षेत्रज्ञाचा निवाडा योग्य रीतीने झाला नाही, असे माउलींचें म्हणणें आहे.

**अवतरणिका—येथून आतां माउली योगशास्त्राचें मत सांगत आहेत.**

**तंव एकीं मतिवंतीं। या बोलाचिया खंती। म्हणितलें यया ज्ञप्ती। अर्वाचीनां॥ ४० ॥**

**अर्थ**—हें सांख्याचें मत ऐकून व त्या प्रतिपादनाची खंती वाटून बुद्धिमान योगी म्हणतात, अहो; हें सर्व तुमचें ज्ञान अलीकडील आहे॥ ४० ॥

**गूढार्थदीपिका—तव एकीं मतिवंति**—केवळ चेतनाच्या सांनिध्याने जड कार्यकारी होतांना दिसत नाही.

चेतनाच्या प्रेरणेने ते कार्यकारी होऊं शकतें. असें पाहण्यांत येतें; म्हणून योगशास्त्रात, ज्याचे ठिकाणीं सत्वगुणाचा अत्यंत उत्कर्ष झाला आहे, असा पुरुषविशेष ईश्वर मानून त्याच्या चित्तांत स्फुरण पावणाऱ्या सृष्टिसंकल्परूप प्रेरणेने प्रकृति कार्यरूप होते, असें मानलें असल्यामुळे येथें सांख्यवाद्यांपेक्षा योग्यांना मतिवान म्हटले आहे.

**हां हो परतत्त्वाआंतु। कें प्रकृतीची मातु। हा क्षेत्रवृत्तांतु। उगेंचि आइका॥ ४१॥**
**शून्यसेजशालिये। सुलीनतेचिये तुळिये। निद्रा केली होती बळियें। संकल्पें येणें॥ ४२॥**

**अर्थ**—अहो; परतत्व म्हणजे प्रकृतीच्या पलीकडे असलेल्या असंग अशा पुरुषाचे ठिकाणी संबंध कसा राहील? ह्या क्षेत्राच्या उत्पत्तीचा वृत्तांत निवान्तपणे ऐंका॥ ४१॥ शून्यसेजशालिये म्हणजे शून्यमय अव्यक्तदशेच्या शय्यागृहांत भगवंताच्या सृष्टि निर्माण करणाऱ्या इच्छारूप संकल्पाने लीनतेच्या गादीवर निद्रा केली होती॥ ४२॥

**गूढार्थदीपिका—"प्रकृष्टसत्वोपादानात् ईश्वरस्य शाश्वतिकःउत्कर्षः"** (यो. सू. २४-समाधिपाद-व्यासभाष्य)

संसारतप्त जीवांचा, ज्ञानोपदेशद्वारा उद्धार करण्याकरितां आवश्यक असलेलीं शास्त्रें व बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादि कार्यसृष्टीचा संहार होऊन पुनः तीं निर्माण व्हावीं म्हणून भगवान "शुद्धसत्वात्मकचित्त मी ग्रहण करीन" असा संकल्प करतो व सृष्टीचा संहार होऊन त्या सृष्टिबरोबर भगवंताचा संकल्पहि प्रकृतीच्या साम्यभावाला प्राप्त होतो- म्हणजे प्रकृतींत लीन होतो नंतर ज्याप्रमाणे एखादा मनुष्य मी सकाळीं चार वाजतां उठून अमुक काम करीन असा संकल्प करून निजतो व त्या संकल्पानुसार तो जागा होऊन ठरलेलें काम करतो, त्याप्रमाणे प्रलयाचा अवधि संपल्यावर प्रकृतींत लीन असलेला हा भगवंताचा संकल्प उद्भुत होऊन भगवान सर्व सृष्टि निर्माण करतो.

**तो अवसांत चेइला। उद्यमीं सदैव भला। म्हणोनि ठेवा जोडला। इच्छावशें॥ ४३॥**

**अर्थ**—तो सर्गारंभीं अकस्मात् जागा झाला आणि प्रयत्न करण्यांत तो सदा तत्पर असल्यामुळे त्याने क्षेत्राचा ठेवा इच्छेने प्राप्त करून घेतला॥ ४३॥

**गूढार्थदीपिका-उद्यमीं सदैव भला**—हा संकल्प अनादिकालापासून सृष्टीची उत्पत्ति व संहार करीत आहे; असा अर्थ.

**निरालंबींची वाडी। होती त्रिभुवनायेवढी। हे तयाचिये जोडी। रूपा आली॥ ४४॥**

**अर्थ**—ही अव्यक्तदशेची वाडी त्रिभुवनाएवढीच असल्यामुळे संकल्पाच्या साहाय्याने ती त्रिभुवनरूप कार्यरूपाने व्यक्त झाली॥ ४४॥

**गूढार्थदीपिका-निरालंबींची वाडी। होती त्रिभवनाएवढीं**—कोण्याहि भावरूप वस्तूचा अव्यक्तभाव तिच्या भावाएवढाच असतो. या नियमानुसार प्रलयकालीं त्रिभुवनाची झालेली अव्यक्तदशा ही त्रिभुवनाएवढीच असूं शकते. हेंच "निरालंबींची वाडी। होती त्रिभुवनांएवढी" या दोन चरणांनी माउलींनी सांगितलें आहे.

**मग महाभूतांचें एकवाट। सैरा वेंटाळूनि भाट। भूतग्रामांचे आघाट। चिरिले चारी॥ ४५॥**
**यावरी आदी। पांचवटेयांची बांधी। बांधली प्रभेदीं। पांचभौतिकीं॥ ४६॥**
**कर्माकर्माचे गुंडे। बांध घातले दोन्हींकडे। नपुंसकें बरडें। रानें केलीं॥ ४७॥**

**अर्थ**—मग पंचमहाभूतरूप पडीत जमीन संपूर्ण एकत्र करून जीवांचे चार भाग निर्माण केले॥ ४५॥ यानंतर आधीं पांचभौतिकांचा समुदाय पांचभौतिकरूपानेच निरनिराळ्या भेदाने विभागला गेला॥ ४६॥ मनुष्यशरीररूपीं क्षेत्राच्या दोहों बाजूला कर्म-अकर्मरूपी दगडांचें बांध घातले आणि 'नपुंसकें'-म्हणजे मनुष्यव्यतिरिक्त प्राणी नापीक जमीन बनविली॥ ४७॥

**गूढार्थदीपिका—कर्माकर्माचे गुंडे। बांध घातले दोहींकडे-**

**कर्माकर्म**—म्हणजे विधिनिषेध.

हे कर्माकर्म मनुष्यप्राण्याकरितांच सांगितले आहेत. मनुष्य, विहित कर्माप्रमाणे आचरण करून त्या पुण्याचें उत्कर्षरूप पीक प्राप्त करून घेतो व अकर्माचे आचरण करून पापजन्य दुर्गतिरूप पीक घेतो.

**नपुंसकें बरडें। रानें केलीं—**

**नपुंसकें**—म्हणजे मानवयोनी नाहीत अशा वृक्षादीयोनी.

**बरडे रानें केलीं**—म्हणजें ज्यांत क्रियमाण कर्म उत्पन्न होत नाही, अशा केल्या.

मानवयोनिव्यतिरिक्त इतर पशुपक्ष्यादि योनींतील जीवांना, शास्त्राने कर्माकर्माचे किंवा धर्माधर्माचे विधान लागूं केलें नसल्यामुळे त्या योनींतील जीवांकडून पुण्यपापरूप क्रियमाण कर्म होत नाही; म्हणून त्या योनीतील कर्माने सुखदु:खरूप फळहि मिळत नाही. केवळ प्रारब्धरूप झालेल्या पूर्वीच्या पापकर्मांचें सुखदु:खरूप फळ भोगणाऱ्या त्या योनी आहेत, असा अर्थ.

**तेथ येरझारेलागीं। जन्ममृत्यूची सुरंगी। सुहाविली निलागी। संकल्पें येणें॥ ४८॥**
**मग अहंकारासि एकलाधी। करूनि जीवितावधी। वाहाविलें बुद्धी। चराचर॥ ४९॥**

**अर्थ**—मग जेथे लाग नाही त्या स्थितींत पुन: पुन: जन्ममरणाची येरझार करण्याकरितां या संकल्पाने जन्ममृत्यूंचें भूयार तयार केलें॥ ४८॥ मग आयुष्य आहे तोपर्यंत हा संकल्प अहंकाराशीं ऐक्य करून बुद्धिकडून चराचराची वहिवाट करवितो-म्हणजे क्षेत्रज्ञाला कर्माच्या कर्तृत्वाचा व त्या कर्मानुसार सुखदु:खरूप फळाच्या भोगाचा अनुभव घ्यायला लावतो. ॥ ४९॥

**गूढार्थदीपिका—केवळ अहंकारामुळेच जीवाचा क्षेत्राशीं संबंध येतो.**

**यापरी निराळीं। वाढे संकल्पाची डाहाळी। म्हणोनि तो मुळीं। प्रपंचा यया॥ ५०॥**

**अर्थ**—याप्रमाणे शून्यरूपी अव्यक्तदशेंत संकल्पाची डाहाळी वाढलीं; म्हणून या प्रपंचाला संकल्प मूळ कारण आहे॥ ५०॥

**गूढार्थदीपिका**—याप्रमाणे योगमतांत सत्वगुण, इच्छा, संकल्प, सृष्टि इत्यादि पदार्थ सत्य मानून त्यांचा क्षेत्रज्ञाशीं संबंध मानला आहे; पण वेदान्तदर्शनाने क्षेत्रज्ञाला अद्वैतस्वरूप ठरवून तद्व्यतिरिक्त सर्वच मिथ्या मानलें आहे. म्हणून वेदान्तदृष्टीने पाहतां योगमतांतहि क्षेत्रक्षेत्रज्ञाचा निवाडा बरोबर झाला असें दिसत नाही.

**ययापरी मतमुक्तकीं। तेथ पडिघायिले आणिकीं। म्हणती हां हो विवेकी। तरी तुम्हीं भले॥ ५१॥**
**परतत्त्वाचियां गावीं। संकल्पसेज देखावी। तरी कां पां न मनावी। प्रकृति तयांची॥ ५२॥**
**परि असो हें नव्हे। तुम्ही या न लगावें। आतांचि हें आघवें। सांगिजेल॥ ५३॥**

**अर्थ**—याप्रमाणे निराधार मतांचीं मौक्तिकें मुखांतून बाहेर काढणाऱ्यावर दुसऱ्यांनी प्रहार केले. ते म्हणतात, "अहो! तुम्ही कसा विचार करतां?"॥ ५१॥ प्रकृतीच्या पलीकडे असणाऱ्या तत्त्वांच्या ठिकाणीं तुम्ही जर संकल्पशय्या पाहतां तर मग त्याची प्रकृतिच कां मानूं नये?॥ ५२॥ पण असो. तुमचें म्हणणें बरोबर नाही. तुम्ही या मताचे भ्रांतींत पडूं नये हें सर्व आतां आम्ही सांगतों॥ ५३॥

**अवतरणिका—आतां येथून क्षेत्राविषयीं नैय्यायिकांचें मत माउली सांगत आहे.**

**तरि आकाशीं कवणें। कोणें केलीं मेघाचीं भरणें। अंतरिक्षीं तारागणें। धरी कवण॥ ५४॥**
**गगनाचा चांदवा। कोणें ओढिला केधवां। पवन हिंडतु असावा। हें कवणाचें मत॥ ५५॥**
**रोमां कवण पेरी। कोण समुद्र भरी। पर्जन्याचिया करी। धारा कवण॥ ५६॥**
**तैसें क्षेत्र हें स्वभावें। हे वृत्ती कवणाची नव्हे। हें वाहे तया फावे। येरां तुटे॥ ५७॥**

**अर्थ**—आकाशामध्ये मेघांचा भरणा कोण करतो? अंतरिक्षांत नक्षत्रे कोण धारण करतो?॥ ५४॥ हें आकाशाचें छत कोणी केव्हां ताणून लावलें? वाऱ्याने वाहत असावें ही कोणाची आज्ञा होय?॥ ५५॥ शरीराचे ठिकाणी रोमरंध्रें कोण करतो? समुद्र कोण भरतो? पावसाच्या धारा कोण करतो?॥ ५६॥ याप्रमाणें क्षेत्र हे स्वभावत: कोणाच्या मालकीचें नसतांना त्याची जो मालकी वागवितो, त्याला तें प्राप्त होतें, जो मालकी वागवित नाही त्याचा संबंध सुटतो॥ ५७॥

**गूढार्थदीपिका**—''ईश्वरः कारणं पुरुषकर्माफल्यदर्शनात्'' (न्या. सू. १९-४-१) पुरुषाचे प्रयत्नरूप कर्म निष्फळ होतांना दिसत असल्यामुळे ईश्वर निमित्तकारण आहे.

न्यायमतांत परमेश्वर सृष्टीचें निमित्तकारण आहे व त्याच्या इच्छामात्रेकरून चतुर्विध भूतांच्या परमाणूंचा संयोग होऊन द्व्यणुकादि क्रमाने सर्व सृष्टि उत्पन्न होते, असें मानलें जातें.

याहि मतांत शरीरादिक क्षेत्र सत्य असून त्याचा असंग अशा क्षेत्रज्ञाशीं संबंध होतो व क्षेत्रज्ञाचे ठिकाणीं इच्छा, द्वेष, प्रयत्न, सुख, दु:ख हे धर्म मानले असल्यामुळे या मतांतहि क्षेत्रक्षेत्रज्ञाचा योग्य विवेक झाला नाही.

**अवतरणिका—यानंतर आतां माउली क्षेत्राविषयीं वैशेषिकांचें मत सांगत आहेत.**

**तंव आणिकें एकें। क्षोभें म्हणितलें निकें। तरि भोगिजे एकें। काळें केवीं हे॥ ५८॥**
**तरि ययाचा मारु। देखतांति अनिवारु। परी स्वमतीं भरु। अभिमानियां॥ ५९॥**
**हें जाणे मृत्यू रागिटा। सिंहाडयाचा दरकुटा। परी काय कीजे वांजटा। पूरीजत असे॥ ६०॥**
**महाकल्पापरौती। कव घालूनि अवचितीं। सत्यलोकभद्रजाती। आंगविजे॥ ६१॥**
**लोकपाळ नित्य नवे। दिग्गजांचे मेळावे। स्वर्गीचिये आडवे। रिगोनि मोडी॥ ६२॥**
**येर ययाचेनि अंगवातें। जन्ममृत्यूचिये गर्ते। निर्जिवें होऊनि भ्रमतें। जीवमृगें॥ ६३॥**
**न्याहाळा पां केव्हडा। पसरलासे चवडा। करूनियां माजिवडा। आकारगज॥ ६४॥**
**म्हणोनि काळाची सत्ता। हा बोल निरुता। ऐसे वाद पांडुसुता। क्षेत्रालागीं॥ ६५॥**

**अर्थ**—तेव्हां हे ऐकून, दुसरें कित्येक क्षुब्ध होऊन म्हणतात, तुमचें म्हणणें जर खरें मानलें, तर तें क्षेत्र एका काळाचेंच स्वाधीन कां दिसून येतें?॥ ५८॥ या काळाचा सर्वांवर अचूक घाला पडतो; पण ते अभिमानाने आपल्या मतावरच भर देतात॥ ५९॥ शरीर हें मृत्युरूपीं क्रुद्ध सिंहाच्या राहण्याची दरी आहे, हें आपण सर्व जाणतों, पण काय करावें? व्यर्थ बडबड करणाऱ्याशीं कधीं पुरें पडतां येतें काय?॥ ६०॥ या मृत्युरूपी काळाने महाकल्पाच्या पलीकडेहि अकस्मात् मिठी मारून ब्रह्मलोकरूपी जो हत्ती त्याच्या ठिकाणींहि तो प्राप्त झाला आहे॥ ६१॥ (हा काळ) स्वर्गरूपी अरण्यांत शिरून नित्य नवे लोकपाळ व दिग्गजांचे समुदाय नाहीसे करतो॥ ६२॥ बाकीचे जीवरूपी पशु याच्या आंगच्या वाऱ्यानेच निर्जीव होऊन जन्ममृत्यूच्या खड्ड्यांत भ्रमत राहतात॥ ६३॥ कालरूपी सिंहाने संपूर्ण आकाररूपी हत्ती आंत सांठवून केवढा मोठा तोंडाचा चवडा पसरला आहे, पाहा!॥ ६४॥ म्हणून या क्षेत्रावर काळाचीच सत्ता आहे, हेंच म्हणणें योग्य आहे. अर्जुना! याप्रमाणें क्षेत्राविषयीं मतें आहेत॥ ६५॥

**गूढार्थदीपिका**—''कारणे कालः'' (वै. सू. २५-७-५) सर्व सृष्टीचें निमित्तकारण काल आहे असें वैशेषिकदर्शनसूत्र असल्यामुळें हें मत वैशेषिकाचें आहे, हें उघड आहे.

या वैशेषिकमतांत काळाला सृष्टीचें निमित्तकारण मानलें असलें तरी क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें स्वरूप नैय्यायिकांप्रमाणेच स्वीकृत असल्यामुळे वेदान्तदृष्टीने पाहतां क्षेत्रक्षेत्रज्ञाचा निवाडा या मतांतहि झालेला नाही.

**हे बहु उखिविखी। ऋषीं केली नैमिषीं। पुराणें इयेविषीं। मतपत्रिका॥ ६६॥**
**अनुष्टुभादि छंदें। प्रबंधीं जियें विविधें। तें पत्रावलंबन मदें। करितातिअज्ञुनी॥ ६७॥**
**वेदींचे बृहत्सामसूत्र। देखणेपणें पवित्र। परी तयाही हे क्षेत्र। नेणवेचि॥ ६८॥**

**अर्थ**—असा हा पुष्कळ प्रकारचा वादविवाद ऋषींनी नैमिषारण्यांत केला असून पुराणेंहि, या विषयींची मतें दर्शविणाऱ्या पत्रिका आहेत-म्हणजे पुराणांतूनहि हीं भिन्न भिन्न मतें दर्शविलीं आहेत॥ ६६॥ (पुराणादि) प्रबंधांतून अनुष्टुभादि अनेक छंदांनी ह्या ज्या मतपत्रिका ग्रंथित केलेल्या आहेत, त्यांचे लोक आग्रहाने अवलंबन करतात॥ ६७॥ (ज्यांत इंद्रादिकांचें परमेश्वररूपाने वर्णन आलें आहे तें) सामवेदांतील बृहत्सामसूत्र ईश्वराला अनुलक्षून स्तवन करणारें असल्यामुळे सर्व धर्मांपेक्षा तें अत्यंत पवित्र करणारें आहे, हें खरें; पण त्यालाहि या क्षेत्रक्षेत्रज्ञाचा निवाडा बरोबर समजला नाही॥ ६८॥

**गूढार्थदीपिका**—"**त्वामिद्धि हवामहे**" या बृहत्सामसूत्रांत क्षेत्रज्ञ परमेश्वराची स्तुति केली असली, तरी ती क्षेत्राचा संबंध घेऊनच केली असल्यामुळे त्यावरूनहि क्षेत्रक्षेत्रज्ञाचा निवाडा योग्य रीतीने होत नाही, असा भाव.

**आणीक आणीकींही बहुतीं। महाकवीं हेतुमंतीं। ययालागीं मती। वेंचिलिया॥ ६९॥**
**परी ऐसें हें एवढें। कीं अमुकेयाचेंचि फुडें। हें कोणाही वरपडे। होयचिना॥ ७०॥**
**आतां यावरी जैसें। क्षेत्र हें असे। तुज सांगों तैसें। साद्यंतु गा॥ ७१॥**

**अर्थ**—आणखी उपपत्तिपूर्वक प्रतिपादन करणाऱ्या पुष्कळ महान् कवींनी या क्षेत्राचा ऊहापोह करण्यात आपली बुद्धि चालविली आहे॥ ६९॥ पण क्षेत्र हें असें आहे, एवढे आहे किंवा अमक्याचें आहे, हें कोणालाहि निःसंशय कळून आलें नाही॥ ७०॥ अर्जुना! आतां यानंतर हें क्षेत्र जसें आहे तसें तुला संपूर्ण सांगतों॥ ७१॥

**महाभूतान्यहङ्कारो बुद्धिरव्यक्तमेव च । इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः॥ ५॥**
**इच्छा द्वेषः सुखं दुःखं सङ्घातश्चेतना धृतिः। एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम्॥ ६॥**

**अर्थ**—सूक्ष्म पंचमहाभुतें, अहंकार, बुद्धि, अव्यक्त, दहा इंद्रियें, एक मन व ज्ञानेंद्रियाला गोचर होणारे पांच विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, या सर्वांचा संघात, चेतना व धृति असे हे संक्षेपाने विकारासह क्षेत्र तुला सांगितलें॥ ५-६॥

**तरि महाभूतपंचकु। आणि अहंकारु एकु। बुद्धि अव्यक्त दशकु। इंद्रियांचा॥ ७२॥**
**मन आणीकही एकु। विषयांचा दशकु। सुख दुःख द्वेषु। संघात इच्छा॥ ७३॥**
**आणि चेतना धृती। एवं क्षेत्रव्यक्ती। सांगितली तुजप्रती। आघवीचि॥ ७४॥**

**अर्थ**—तरी पांच सूक्ष्म महाभूतें आणि एक अहंकार, तसेच बुद्धि, अव्यक्त व दहा इंद्रियें, आणखी एक मन, दहा इंद्रियांचे दहा विषय, द्वेष, सुख, दुःख, संघात, इच्छा, चेतना व धृति याप्रमाणें तुला क्षेत्राचे संपूर्ण स्वरूप सांगितलें॥ ७२-७४॥

**आतां महाभूतें कवणें। कवण विषयो कैसीं करणें। हें वेगळालेपणें। एकैक सांगों॥ ७५॥**
**तरी पृथ्वी आप तेज। वायु व्योम इयें तुज। सांगितलीं बुझ। महाभूतें पांचें॥ ७६॥**

**अर्थ**—आता महाभूतें कोणतीं, विषय कोणते व इंद्रियें कशीं आहेत हें तुला एक एक वेगळेपणाने सांगतों॥ ७५॥ तरी पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं तुला सांगितलेलीं पांच महाभूते होत, असें समज॥ ७६॥

**आणि जागतिये दशे। स्वप्न लपालें असे। नातरी अंवसे। चंद्र गूढु॥ ७७॥**
**ना ना अप्रौढबाळकीं। तारुण्य राहे थोकीं। कां न फुल्तां कळिकीं। आमोदु जैसा॥ ७८॥**
**किंबहुना काष्ठीं। वन्हि जेवीं किरीटी। तेवीं प्रकृतिचियां पोटीं। गोप्य जो असे॥ ७९॥**
**जैसा ज्वरु धातुगतु। अपथ्याचें मिष पाहातु। मग जालिया आंतु। बाहेरि व्यापी॥ ८०॥**
**तैसा पांचांही गांठी पडे। जैं देहाकार उघडे। तैं नाचवी चहूंकडे। तो अहंकार गा॥ ८१॥**

**अर्थ**—आणि ज्याप्रमाणे जागृतिअवस्थेंत स्वप्न लपलेलें असतें किंवा अमावस्येला चंद्र गुप्त असतो अथवा प्रौढदशेला न आलेल्या मुलाचे ठिकाणीं तारुण्य दडलेलें असतें किंवा न फुललेल्या कळीचे ठिकाणीं सुगंध जसा गुप्त असतो॥ ७७-७८॥ एवढेंच नाही, तर लांकडाचे ठिकाणीं, अर्जुना अग्नि गुप्त असतो, त्याप्रमाणे मूळ प्रकृतीचे ठिकाणीं जो गुप्त असतो॥ ७९॥ ज्याप्रमाणे धातुगत ज्वर केवळ कुपथ्याचें निमित्त पाहत असतो आणि मग कुपथ्य झाल्याबरोबर शरीराच्या आंत-बाहेर तो व्यापतो॥ ८०॥ त्याप्रमाणे पांचहि भूतांची एकत्र गांठ पडून, जेव्हा देहाचा आकार व्यक्त होतो, तेव्हा जो जीवाला चहूंकडून नाचवितो, तोच अहंकार होय॥ ८१॥

**गूढार्थदीपिका**—देहांत 'अहं' 'अहं' म्हणून स्फुरण होतें, त्या वृत्तीने पांचभौतिक जड देहाशीं ऐक्य केलें असतां, त्या देहाकारावर झालेल्या 'अहंला' अहंकार म्हणतात; असें येथें अहंकाराचें स्वरूप सांगितले आहे. अर्थात् देहाचें ऐक्य नाहीसें होऊन नुसती राहिलेली अहंवृत्ति हें शुद्ध जीवाचें किंवा परमेश्वराचें स्वरूप होतें.

**नवल अहंकाराची गोठी। विशेषें न लगे अज्ञानापाठीं। सज्ञानाचे झोंबे कंठीं। नाना संकटीं नाचवी॥ ८२॥**

**अर्थ**—या अहंकाराची अशी गंमत आहे की तो विशेषत: अज्ञान्याच्या पाठीस लागत नाही; पण तो सज्ञान्याच्या कंठास झोंबून त्याला नाना संकटांत पाडतो॥ ८२॥

**गूढार्थदीपिका**—अहंकार हा जाणीववृत्तीच्याच आश्रयाने राहत असल्यामुळे अज्ञान्यापेक्षा ज्ञान्याच्या ठिकाणीं अहंकाराचें प्राबल्य विशेष असतें व त्यामुळेच मनुष्य संकटांत पडतो, असा अर्थ.

**आतां बुद्धि जे म्हणिजे। ते ऐसिया चिन्हीं जाणिजे। बोलिलें यदुराजें। तें आइकें सांगों॥ ८३॥**
**तरी कंदर्पाचेनि बळें। इंद्रियें वृत्तीचेनि बळें। विभांडूनि येती पाळे। विषयांचे॥ ८४॥**
**तो सुखदु:खांचा नागोवा। जेथ उमाणों लागे जीवा। तेथ दोहींसी बरवा। पाडु जे धरी॥ ८५॥**
**हें सुख हें दु:ख। हें पुण्य हें दोष। कां हें मैळ हें चोख। ऐसें निवडी॥ ८६॥**
**जिये अधमोत्तम सुझे। जिये सानें थोर बुझे। जिया दिठी पारखिजे। विषो जीवें॥ ८७॥**
**जे तेजतत्त्वाची आदी। जे सत्त्वगुणाची वृद्धी। जे आत्मया जीवाची संधी। वसवीत असे॥ ८८॥**

**अर्थ**—आतां जिला बुद्धि म्हणतात, ती अशा लक्षणावरून जाणावी, असें भगवान श्रीकृष्णांनी म्हटलें, तेंच आतां सांगतों, ऐक॥ ८३॥ प्रबळ झालेल्या कामवासनेने इंद्रियें, वृत्तीच्या साहाय्याने विषयांचे समुदाय जिंकून येंतात-म्हणजे विषयांचा भोग घेऊन येतात॥ ८४॥ जीवाला ज्या सुखदु:खांच्या लुटीचा अनुभव येतो, त्या दोघांचा जी अगदीं बरोबर भेद दाखविते॥ ८५॥ हें सुख, हें दु:ख, हें पुण्य, हें पाप हें मलीन, हें शुद्ध अशी जी निवड करते॥ ८६॥ जिला उत्तम, कनिष्ठ हें समजतें, जिला लहान, मोठें समजतें, अशा रीतीने जिच्या दृष्टीच्या सहाय्याने जीव विषयाची परीक्षा करतो॥ ८७॥ जी ज्ञानेंद्रियांचें कारण आहे, जी सत्वगुणाचा उत्कर्ष होय आणि जी आत्मा व जीव यांच्या संधींत राहते॥ ८८॥

**गूढार्थदीपिका**—जीवाचे ठिकाणीं जी जाणीवरूप ज्ञानवृत्ति स्फुरते, ती बुद्धि होय असे येथें बुद्धीचें लक्षण केलें आहे. या बुद्धींत सत्वगुणाचा उत्कर्ष असल्यामुळे ती मूळांत निर्मळ आहे. म्हणूनच तिच्यांत ज्ञानरूप आत्मा प्रतिबिंबित होतो. त्या ज्ञानप्रकाशाने युक्त असलेली बुद्धिवृत्ति आपल्या पलीकडे असलेल्या शुद्ध आत्मस्थितींला व अलीकडे असलेल्या जीवस्थितीला जाणत असते, म्हणूनच ती आत्मा व जीव यांच्या संधींत असते, असें म्हटलें आहे.

**अर्जुना ते गा जाण। बुद्धि तूं संपूर्ण। आतां आइकें वोळखण। अव्यक्ताची॥ ८९॥**

**अर्थ**—अर्जुना! ही सर्व बुद्धि आहे, असें तूं जाण. आतां अव्यक्ताची ओळख ऐक॥ ८९॥

**पैं सांख्यांचिया सिद्धांतीं। प्रकृती जे महामती। तेचि एथें प्रस्तुतीं। अव्यक्त गा॥ ९०॥**
**आणि सांख्ययोगमतें। प्रकृती परिसविली तूंतें। ऐसी दोहीं परी जेथें। विवंचिली॥ ९१॥**
**तेथ दुजी जे जीवदशा। तिये नांव वीरेशा। येथें अव्यक्त ऐसा। पर्याय हा॥ ९२॥**
**तऱ्ही पाहालया रजनी। तारा लोपती गगनीं। कां हारपे अस्तमानीं। भूतक्रिया॥ ९३॥**
**ना तरी देहो गेलिया पाठीं। देहादिक किरीटी। उपाधि लपे पोटीं। कृतकर्माच्या॥ ९४॥**
**कां बीजमुद्रेआंतु। थोके तरु समस्तु। कां वस्त्रपण तंतु-। दशे राहे॥ ९५॥**
**तैसें सांडोनियां स्थूळधर्म। महाभूतें भूतग्राम। लया जाती सूक्ष्म। होऊनि जेथें॥ ९६॥**
**अर्जुना तया नांवें। अव्यक्त हें जाणावें। आतां आइकें आधवे। इंद्रियभेद॥ ९७॥**

**अर्थ**—हे बुद्धिमान अर्जुना! सांख्यवाद्यांनी आपल्या सिद्धान्तांत जडविनाशी क्षेत्राचें कारण म्हणून जी प्रकृति मानली आहे. तीच येथें प्रस्तुत "अव्यक्त" या शब्दाने सांगितली आहे॥ ९०॥ सांख्य व योग यांच्या मताप्रमाणे प्रकृतीचें स्वरूप तुला ऐकविलेंच आहे आणि तेथें 'तीं दोन प्रकाराची आहे, हेंहि सांगितलें गेलें॥ ९१॥ तेथें दुसरी जी जीवदशा म्हणून पराप्रकृति सांगितली, तिलाच हे वीरश्रेष्ठा! येथें अव्यक्त' हा पर्याय शब्द आहे॥ ९२॥ रात्र संपून

उजाडल्यावर आकाशांत तारे नाहीसे होतात किंवा सूर्यास्त झाल्यावर प्राण्यांचे व्यापार बंद पडतात॥ ९३ ॥ किंवा हे अर्जुना! देह नाहीसां झाला की पूर्वी केलेल्या कर्माच्या पोटांतच देहादिक उपाधी लीन होतात॥ ९४॥ किंवा बीजाच्या आकारांतच संपूर्ण वृक्ष गुप्त असतो किंवा सुताच्या दशेंत वस्त्रपण गुप्त राहतें॥ ९५ ॥ त्याप्रमाणे संपूर्ण पंचमहाभूतें व सर्व प्राणी आपले स्थूल धर्म सोडून देऊन व सूक्ष्म होऊन जेथें लय पावतात॥ ९६ ॥ अर्जुना! त्या स्थितीला ''अव्यक्त'' या नांवाने जाण. आतां इंद्रियांचे संपूर्ण भेद ऐक॥ ९७॥

**तरी श्रवण नयन। त्वचा घ्राण रसन। इयें जाणें ज्ञान। करणें पांचें॥ ९८ ॥**
**इये तत्त्वमेळापंकीं। सुख-दुःखाची उखिविखी। बुद्धि करिते मुखीं। पांचें इहीं॥ ९९ ॥**
**मग वाचा आणि कर। चरण आणि अधोद्वार। पायु हे प्रकार। पांच आणिक॥ १००॥**
**कर्मेंद्रियें म्हणिपती। तीं इयें जाणिजती। आइकें कैवल्यपती। सांगतसे॥ १०१ ॥**
**पैं प्राणाची अंतौरी। क्रियाशक्ति जे शरीरीं। तियेचि रिगिनिगी द्वारीं। पांचें इहीं॥ १०२॥**
**एवं दाहाही करणें। सांगितलीं देवो म्हणे। परिस आतां फुडेपणें। मन तें ऐसें॥ १०३॥**

**अर्थ**—तरी कान, डोळे, त्वचा, घ्राण, जिह्वा, हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत, असें जाण॥ ९८ ॥ या छत्तीस तत्त्वांच्या समुदायरूपी चिखलांत या पांच ज्ञानेंद्रियरूप मुखांच्या द्वारा बुद्धि सुखदु:खाचा निवाडा करते॥ ९९ ॥ मग वाणी, हात, पाय, गुदद्वार, उपस्थ असे आणखी पांच प्रकार आहेत. कैवल्याचे देणारे भगवान श्रीकृष्ण म्हणतात. अर्जुना! ऐक. ज्यांना कर्मेंद्रियें म्हणतात, तीं ही जाण॥ १००-१०१ ॥ प्राणाची पत्नी म्हणून जी क्रियाशक्ति या शरीराचे ठिकाणीं आहे. तिचें आंत येणें व बाहेर जाणें या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारा होत असतें॥ १०२ ॥ देव म्हणतात, याप्रमाणे तुला दहा इंद्रियें कोणतीं तीं सांगितलीं. आतां मन स्पष्टपणें असें आहें, तें ऐक॥ १०३ ॥

**जें इंद्रियां आणि बुद्धी। माझारिलिये संधी। रजोगुणाचां खांदी। तरळत असे॥ १०४॥**
**नीळिमा अंबरीं। कां मृगतृष्णाल्हरी। तैसें वायांचि फरारी। वावो जाहलें॥ १०५ ॥**
**आणि शुक्रशोणिताचा सांधा। मिळतां पांचांचा बांधा। वायुतत्त्व दशधा। एकचि जाहलें॥ १०६ ॥**
**मग तिहीं दाहीभागीं। देहधर्माच्या खैवंगीं। अधिष्ठिलें आंगीं। आपुलाल्या॥ १०७॥**
**तेथ चांचल्य निखळ। एकलें ठेलें निढाळ। म्हणोनि रजाचें बळ। धरिलें तेणें॥ १०८॥**
**तें बुद्धीसी बाहेरी। अहंकाराचिया उरावरी। ऐशा ठायीं माझारीं। बळियावलें॥ १०९॥**

**अर्थ**—जें इंद्रियें आणि बुद्धि यांच्या मध्यसंधींत रजगुणाच्या खांदीवर चंचळ असें भासत असते॥ १०४॥ आकाशात जसा नीळा रंग किंवा मृगाला तहानेमुळे भासणारी जशी जलाची लहरी, त्याप्रमाणे वायूचें जें व्यर्थ स्फुरण झालें (त्यालाच मन हें नांव आहे)॥ १०५॥ आणि पुरुषाचे रेत व स्त्रियाचें शोणित यांचें मिश्रण होऊन पांच महाभूतांचा बांधा जें शरीर तें उत्पन्न झालें असतां एकच वायुतत्त्व दहा प्रकारचें होतें॥ १०६ ॥ मग त्या दहा भागांनी आपआपल्या आंगाचा, देहधर्माच्या सामर्थ्याला आश्रय दिला॥ १०७॥ तेथें त्या मनाचे ठिकाणीं एक निव्वळ चंचलताच राहिली, म्हणून तें एकटेंच राहिलें व त्याने रजोगुणाचेंच बळ धरलें॥ १०८॥ तें बुद्धीच्या नंतर व अहंकाराच्या पूर्वी असे मध्यसंधींत बळकट झालें आहे॥ १०९ ॥

**गूढार्थदीपिका—बुद्धीसी बाहेरी। अहंकाराच्या उरावरी**—कल्पना करणारें मन बुद्धीच्या ज्ञानाने जाणलें जाऊन बुद्धीचा विषय होतें, म्हणून तें बुद्धीच्या बाहेर आणि कल्पनारूप मन स्फुरल्यानंतर त्याचा अहंकार धरला जातो, म्हणून अहंकाराच्या उरावर म्हणजे पूर्वी, असे बुद्धीच्या आणि अहंकाराच्या संधींत मनाची शक्ति बळकट होते, असें सांगितलें आहे.

**ऐसें ठायीं माझारीं। बळियावलें**—मनाने चैतन्यरूप जीवाला आपल्या सर्वस्वीं स्वाधीन करून ठेवलें आहे; म्हणून त्याला ''बळियावलें'' म्हणजे बलवान झालें, असें म्हटलें आहे.

**वायां मन हें नांव। एऱ्हवीं कल्पनाचि सावेव। जयाचेनि संगें जीव-। दशा वस्तु॥ ११०॥**

**अर्थ**—त्याला मन हें व्यर्थच नांव आहे. खरोखर मन म्हणजे कल्पनाच होय. ज्याच्या संगतीने परब्रह्मवस्तूला जीवदशा प्राप्त झाली आहे ॥ ११० ॥

**गूढार्थदीपिका—जयाचेनि संगें जीव-। दशा वस्तु**-अद्वैत, अस्फुट आत्मवस्तूचे ठिकाणी जीव म्हणून त्याहून दुसरी वस्तु राहणेंच शक्य नाही. या आत्मवस्तूचे ठिकाणीं जीवदशा ही केवळ काल्पनिक आहे. म्हणजे मी खरोखर अज्ञानी आहे, मी आत्मस्वरूप जाणत नाही, मी कर्मकर्ता आहे, मी सुखदु:खांचा भोक्ता आहे, मी देहरूप आहे इत्यादि ज्या विपरीत कल्पना ''अहं'' किंवा ''मी'' या वृत्तिरूप आत्मस्वरूपाचे ठिकाणीं बळावल्या आहेत. या कल्पनेमुळेच ''अहं'' ला जीव म्हटलें जातें. पण ज्याप्रमाणे दोरीवर भ्रमाने कल्पिलेल्या सर्पाच्या योगाने दोरींत अणुमात्रदेखील बदल होत नाही, त्याप्रमाणेच जीवदशेच्या कल्पनेनेहि शुद्ध आत्मवस्तूंत अणुमात्र देखील बदल न होतां, ती तशीच्या तशीच शुद्ध राहते, असें आचार्यांनी ब्रह्मसूत्रावरील आरंभीच्या अध्यासभाष्यांत ''यत्र यदध्यास: तत्कृतेन दोषेण गुणेनाऽणुमात्रेणापि स न संबध्यते'' या वचनाने सांगितलें आहे.

जीवदशा कल्पनामूलक आहे, म्हणूनच जीवदशा काल्पनिक आहे हें सिद्ध आहे. विपरीत कल्पना नाहीशी झाली की जीवाला आपल्या अनादि मुक्ततेचा अनुभव येतो.

**जें प्रवृत्तीसि मूळ। कामा जयाचें बळ। जें अखंड सूये छळ। अहंकारासी ॥ १११ ॥**
**जें इच्छेतें वाढवी। आशेतें चढवी। जें पाठी पुरवी। भयासि गा ॥ ११२ ॥**
**द्वैत जेथें उठी। अविद्या जेणें लाठी। जें इंद्रियांतें लोटी। विषयांमाजी ॥ ११३ ॥**
**संकल्पें सृष्टी घडी। सवेंचि विकल्पूनि मोडी। मनोरथांचिया उतरंडी। उतरी रची ॥ ११४ ॥**

**अर्थ**—जें सर्व कर्मप्रवृत्तीचें कारण आहे, ज्याच्यामुळे कामवासना ही बलवान होते आणि जीं अहंकाराला नेहमीं उसळवितें ॥ १११ ॥ जें इच्छा वाढवितें, आशेची वृद्धि करतें, जें भयाला वाढवितें ॥ ११२ ॥ केवळ ज्याच्या योगाने द्वैत भासतें, ज्याच्या योगाने आत्मविस्मृतिरूप अविद्या दृढ होते, जें इंद्रियांना विषयांत घालतें ॥ ११३ ॥ जें नुसत्या संकल्पाने म्हणजे 'आहे' या कल्पनेने-सृष्टि उत्पन्न करतें व लगेच नाही अशी कल्पना करून सृष्टि नाहीशी करते, याप्रमाणे नाना प्रकारच्या मनोरथांच्या उतरंडी रचतें व खालीं करतें ॥ ११४ ॥

**गूढार्थदीपिका—न ह्यस्त्याविद्या मनसोऽतिरिक्ता। मनोह्यविद्या भवबंधहेतु: ॥**
**तस्मिन्विनष्टे सकलं विनष्टम्। विजृम्भतेऽस्मिन्सकलं विजृम्भते ॥ १७१ ॥**

(वि. चू.)

अविद्या ही मनापासून निराळी नाही. मन म्हणजे मूर्तिमंत अविद्याच होय. म्हणूनच मन आहे तोपर्यंत सर्व अविद्याजन्य द्वैत भासत राहतें व मन नाहीसे झालें की संपूर्ण द्वैत आटतें, असें आचार्यांनीहि म्हटलें आहे.

**जें भुलीचें कुहर। वायुतत्त्वाचें अंतर। बुद्धीचें द्वार। झांकविलें जेणें ॥ ११५ ॥**

**अर्थ**—जें भ्रमाचें कोठार असून वायुतत्त्वाचें आंतील अंग आहे आणि बुद्धीचें आत्मज्ञानरूपी द्वार ज्यांने झांकलें आहे ॥ ११५ ॥

**गूढार्थदीपिका**—बुद्धि सात्त्विक असल्यामुळें तिने एका आत्मतत्त्वाचाच निश्चय करायला पाहिजे, पण या कल्पनारूप मनाच्या स्वाधीन झाल्यामुळें ती आत्मतत्त्वाचा निश्चय करीत नाही.

**तें गा किरीटी मन। या बोला नाहीं आन। आतां विषयाभिधान-। भेदु आइकें ॥ ११६ ॥**

**अर्थ**—अर्जुना! तेंच मन होय; हें म्हणणें खोटें नाही. आतां ज्याला विषय हे नांव आहे, त्याचे भेद ऐक ॥ ११६ ॥

**तरी स्पर्शु आणि शब्दु। रूप रस गंधु। हा विषयो पंचविधु। ज्ञानेंद्रियांचा ॥ ११७ ॥**
**इहीं पांचै द्वारीं। ज्ञानासि धांव बाहेरी। जैसा कां हिरविया चारीं। भांबावे पशु ॥ ११८ ॥**

**मग स्वर वर्ण विसर्गु। अथवा स्वीकार त्यागु। संक्रमण उत्सर्गु। विण्मूत्राचा॥ ११९॥**
**हे कर्मेंद्रियांचे पांच। विषय गा साच। जे बांधोनियां माच। क्रिया धांवे॥ १२०॥**
**ऐसे हे दाही। विषय गा इये देहीं। आतां इच्छा तेही। सांगिजैल॥ १२१॥**

**अर्थ**—शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध असा हा ज्ञानेंद्रियांचा पांच प्रकारचा विषय आहे ॥११७॥ ज्याप्रमाणे हिरवा चारा पाहून पशु भांबावून जिकडे तिकडे चरत जातो, त्याप्रमाणे या पांच ज्ञानेंद्रियांच्या द्वारा ज्ञानाची धांव बाहेर विषयाकडे असते॥ ११८॥ मग स्वरवर्णाचा उच्चार करणें, वस्तूचा स्वीकार-त्याग करणें, चालणें व मलमूत्रांना बाहेर सोडणें असे, हे अर्जुना! वाणी, हस्त, पाद, गुद व उपस्थ या पांच कर्मेंद्रियांचे पांच विषय आहेत. या पांच कर्मेंद्रियांचा माळा बांधूनच-म्हणजें त्यांच्या आश्रयानेच-क्रिया होत असतात॥ ११९-१२०॥ अर्जुना! असे हे दहा विषय देहांत-म्हणजें क्षेत्रांत-आहेत. आतां, इच्छा म्हणजे काय, तेंहि सांगतों॥ १२१॥

**तरि भूतलें आठवे। कां बोलें न झांकवे। ऐसियावरि चेतवे। जे गा वृत्ती॥ १२२॥**
**इंद्रियांविषयांचिये भेटी-। सरसीच जेगा उठी। कामाची बाहुटीं। धरूनियां॥ १२३॥**
**जियेचेनि उठिलेपणें। मना सैंघ धांवणें। न रिगावें तेथ करणें। तोंडें सूती॥ १२४॥**
**जिये वृत्तीचिया आवडी। बुद्धी होय वेडी। विषयां जिया गोडी। ते गा इच्छा॥ १२५॥**

**अर्थ**—तरी मागील अनुभवाची आठवण झाल्यामुळे किंवा कानावर शब्द पडल्यानंतर जी वृत्तीला उत्पन्न करते॥ १२२॥ इंद्रियांशीं विषयांचा संबंध झाल्याबरोबर कामाचा हात धरून जी वृत्ति उत्पन्न होते॥ १२३॥ जी वृत्ति उत्पन्न झाल्याबरोबर मन सारखें बाहेर धांवतें व घालूं नये तेथें इंद्रियें तोंडें घालतात॥ १२४॥ ज्या वृत्तीच्या आवडीमुळे बुद्धि वेडी होते-म्हणजे बुद्धि तिच्या स्वाधीन होते-आणि जिला विषयाची गोडी आहे. अर्जुना! ती इच्छा होय॥ १२५॥

**आणि इच्छिलिया सांगडें। इंद्रियां आमिष न जोडे। ऐसियां जो डाव पडे। तोचि द्वेषु॥ १२६॥**

**अर्थ**—आणि इच्छा झाल्याप्रमाणे इंद्रियांना विषयरूप खाद्य मिळालें नाही, तर जो विरोध किंवा जें वैर मनांत उत्पन्न होतें, त्याला द्वेष म्हणतात.॥ १२६॥

**आतां यावरी सुख। तें एवंविध देख। जेणें एकेंचि अशेष। विसरे जीवु॥ १२७॥**
**मना वाचे काये। जें आपुली आण वाये। देहस्मृतीची त्राये। मोडित ये जें॥ १२८॥**

**अर्थ**—आतां यानंतर सुखाचें लक्षण करायचें ते अशा प्रकारें जाण. जें एक प्राप्त झालें असतां जीव संपूर्ण विसरतो॥ १२७॥ कायावाचामनाला जें आपली शपथ घालतें-म्हणजे त्यांचे व्यापार बंद पाडतें-व जें 'मी देहरूप आहे' या मर्यादित कल्पनेचा विसर पाडीत प्राप्त होतें॥ १२८॥

**गूढार्थदीपिका**—माउलींनी देहादिकांचा विसर पडणें अशी सुखाची व्याख्या करून ज्या आत्मज्ञानांत आत्मैक्याची यथार्थ जाणीव व देह व जगत् यांच्या मिथ्यात्वाची जाणीव राहते, त्या केवळ आत्मज्ञानाने ब्रह्मसुखाची प्राप्ति होत नाही, हें स्पष्ट केलें आहे.

**जयाचेनि जालेपणें। पांगुळा होईजे प्राणें। सात्त्विकासी दुणें। वरीही लाभु॥ १२९॥**

**अर्थ**—जें प्राप्त झालें असतां प्राणाची गति बंद पडते-म्हणजे प्राण स्थिर राहतो, सात्विक पुरुषाला, इतर रजोगुणी तमोगुणी पुरुषांपेक्षा दुप्पट अधिक लाभ होतो॥ १२९॥

**गूढार्थदीपिका—सात्त्विकासी दुणें। वरीही लाभु**—जीव त्रिगुणाने बद्ध असल्यामुळे जोपर्यंत त्याच्यांत रजोगुण व तमोगुण यांचा उत्कर्ष असतो, तोपर्यंत त्याला या सुखाचा अल्पलाभ होतो व सत्वगुणाचा उत्कर्ष झाला असतां त्याला सुखाचा, उत्कर्षानुसार वाढीने अनुभव येतो.

**कां आघवियाचि इंद्रियवृत्ती। हृदयाचां एकांतीं। थापटूनि सुषुप्ती। आणी जें गा॥ १३०॥**

**अर्थ**—किंवा संपूर्ण इंद्रियांच्या वृत्तींना थापटून हृदयाच्या एकान्तांत, अर्जुना! जें सुषुप्ति अवस्थेंत आणतें॥ १३०॥

**गूढार्थदीपिका**—चित्त एकाग्र झाल्याशिवाय सुख होत नाही किंवा चित्त एकाग्र झाले असतांच सुख होतें असा अर्थ.

**किंबहुना सोये। जीव आत्मयाची लाहे। तेथ जें होये। तया नाम सुख॥ १३१॥**

**अर्थ**—फार काय सांगावें! जीव आत्मस्वरूपाचे ठिकाणीं प्राप्त झाला असतां तेथे तो जें होतो, त्याला सुख हें नाव आहे॥ १३१॥

**गूढार्थदीपिका**—मनाला जें अनुकूल वाटतें व प्रसन्न करणारें असतें त्याला सुख म्हणतात. एक आत्माच सुखरूप आहे. त्यावांचून कोठेंच सुख नाही. चित्तवृत्ति एकाग्र झाली असतां ती सात्विक होते व तिच्यांत सुखरूप आत्मा प्रतिबिंबित होतो; म्हणूनच जीवाला जेवढें सुख प्राप्त होतें तेवढें तें एक आत्म-स्वरूपाचेंच असतें, पण अज्ञानाने जीव त्या सुखाचा विषयादिकांवर आरोप करतो. हें सुख ज्ञेय असल्यामुळे क्षेत्रात तें समाविष्ट केलें आहे.

**आणि ऐसी हे अवस्था। न जोडतां पार्था। जीजे तेंचि सर्वथा। दुःख जाण॥ १३२॥**

**अर्थ**—अर्जुना अशी ही सुखाची अवस्था प्राप्त झाली नाही, तर मन जें कल्पना करतें तें सर्वस्वीं दुःख होय॥ १३२॥

**गूढार्थदीपिका**—"**दुःखमल्पसुखं स्मृतम्**" (त्रि. र. अ. २) अल्पसुख म्हणजे क्षणभर सुखप्राप्ति होणें. हेंच दुःख होय असे त्रिपुरारहस्यांत म्हटले आहे जीव सुखरहित स्थितीला दुःख म्हणतो.

**तें मनोरथसंगें नव्हे। एऱ्हवीं सिद्धि गेलेंचि आहे। हे दोनीचि उपाये। सुखदुःखासी॥ १३३॥**

**अर्थ**—सुख हें मनोरथाने प्राप्त होणारें नव्हे. तें आत्म्याचा धर्म असल्यामुळे स्वतःसिद्धच आहे याप्रमाणे सुखदुःखाच्या प्राप्तीचीं दोन कारणें आहेत.॥ १३३॥

**गूढार्थदीपिका**—जीवाला जेथें जेथें सुख होतें तेथें तेथें यांत सुख आहे, अशी त्याची कल्पना असते म्हणून होतें, असे नसून. चित्त एकाग्र होऊन कल्पनारहित झालें असतां त्या एकाग्रवृत्तींत स्वतःसिद्ध सुखरूप आत्माच प्रतिबिंबित होतो व तें सुख अनुभविलें जातें.

कल्पना उठली की या सुखाचा वियोग होतो व जीव सुखाच्या वियोगाचे ठिकाणीं दुःखाची कल्पना करतो.

सारांश, सुख हें सत्य व स्वतःसिद्ध असून दुःख हें काल्पनिक आहे; म्हणूनच येथे कल्पनारहित होणें, हें सुखाचें कारण असून कल्पना करणें हें दुःखाचें कारण आहे; असें माउलींनी सांगितलें आहे.

**आतां असंगा साक्षिभूता। देहीं चैतन्याची जे सत्ता। तिये नाव पांडुसुता। चेतना येथें॥ १३४॥**

**अर्थ**—या देहादि कार्यरूप पदार्थाच्या हालचालीवरून व होत असलेल्या जाणीवेवरून त्याचे ठिकाणीं असंग साक्षिभूत अशा चैतन्याची सत्ता आहे असे कळते, त्या सत्तारूप सामान्यचैतन्याला अर्जुना! चेतना हे नांव आहे.॥ १३४॥

**गूढार्थदीपिका-असंग**—म्हणजे क्षेत्राचा स्पर्श नसलेला. **साक्षिभूत**—म्हणजे केवळ जाणणारा.

सुखाप्रमाणे चैतन्य क्षेत्रज्ञाचा धर्म असल्यामुळे 'चेतना' या शब्दाने क्षेत्रज्ञाचाच येथे उल्लेख केला आहे. याप्रमाणे सुख व चेतना या दोन शब्दांनी क्षेत्रज्ञाचा येथील श्लोकांत उल्लेख आला असून बाकीच्या शब्दाने नुसतें क्षेत्र सांगितलें गेलें आहे.

क्षेत्रज्ञ हा खरोखर चैतन्यरूप असल्यामुळे क्षेत्राहून निराळा, असंग व त्याचा साक्षिभूत आहे, म्हणून त्याचा (चेतनाचा) क्षेत्रांत अंतर्भाव होऊं शकत नसला, तरी जींवाने आपल्या ठिकाणी बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादि क्षेत्राच्या स्वरूपाचा अध्यास करून घेतला आहे व सुख व जाणीव असा ज्ञेयरूपाने क्षेत्रज्ञाचा अनुभवहि क्षेत्रांतच येतो; म्हणून क्षेत्रपदार्थाबरोबर ते सांगितले गेले आहेत. अर्थात् क्षेत्रज्ञहि क्षेत्राबरोबर सांगितला गेला असल्यामुळे क्षेत्राच्या विचाराने क्षेत्रज्ञाचाहि विचार केला जाऊन क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यांत असलेलें अंतर जाणणारें ज्ञान प्राप्त होतें.

**जे नखौनि केशवरी। उभी जागे शरीरीं। जे तिहीं अवस्थांतरीं। पाल्टेना॥ १३५॥**
**मनबुद्ध्यादि आघवीं। जियेचेनि टवटवी। प्रकृतिवनमाधवी। सदाचि जे॥ १३६॥**
**जडाजडीं अंशीं। राहाटे जे सरिसी। ते चेतना गा तुजसीं। ल्टिकें नाहीं॥ १३७॥**
**पैं रावो परिवारु नेणे। आज्ञाचि परचक्र जिणे। कां चंद्राचेनि पूर्णपणें। सिंधू भरती॥ १३८॥**
**ना ना भ्रामकाचें संन्निधान। लोहो करी सचेतन। कां सूर्यसंगु जन। चेष्टवी गा॥ १३९॥**
**अगा मुखमेळेंविण। पिलियाचें पोषण। करी निरीक्षण। कूर्मी जेवीं॥ १४०॥**
**पार्था तयापरी। आत्मसंगती इये शरीरीं। सजीवत्वाचा करी। उपयोग जडा॥ १४१॥**

**अर्थ**—जी पायाच्या नखापासून डोक्याचे केंसापर्यंत या शरीराचें ठिकाणीं अखंड जागृत असते अणि जी जागृत, स्वप्न सुषुप्ति या तिन्ही अवस्थेमध्यें देखील एकसारखीच अविकारी राहते॥ १३५॥ मनबुद्ध्यादि हीं संपूर्ण तत्वें जिच्या योगाने टवटवित दिसतात आणि जी अशा प्रकारच्या कार्यरूप प्रकृतीच्या वनांत वसंत ऋतुप्रमाणे सदा असते॥ १३६॥ जड आणि चैतन्य या दोन्ही ठिकाणीं जी सारखीच राहते, ती चेतना होय; हें मी तुला खोटें सांगत नाही॥ १३७॥ सैनिक राजाला जाणत नसतात, तरी त्यांच्या आज्ञेनेच शत्रूचां पराभव होतो किंवा पौर्णिमेला चंद्र सोळा कलानी पूर्ण झाला की समुद्राला भरती येते॥ १३८॥ अथवा लोहचुंबक जवळ आल्याबरोबर तो लोखंडाला सचेतन करतो म्हणजे हालचाल करायला लावतो-किंवा सूर्यप्रकाशाचा संबंधच लोकांना व्यवहार करायला लावतो॥ १३९॥ पिल्यांच्या मुखाचा संबंध न होऊं देतांच, ज्याप्रमाणे कासवी आपल्या केवळ दृष्टीनेच पिल्यांचें पोषण करते॥ १४०॥ अर्जुना! त्याप्रमाणें या शरीराचे ठिकाणी आत्मसंबंध झाला असल्यामुळे देहादि जड पदार्थांना सजीव करण्यांत त्या आत्मचैतन्याचा उपयोग होतो॥ १४१॥

**मग तियेतें चेतना। म्हणिपे पैं अर्जुना। आतां धृतिविवंचना। भेदु आइक॥ १४२॥**
**तरी तत्त्वां परस्परें। उघड जाति स्वभाववैरें। नोहे पृथ्वीतें नीरें। न नाशिजे॥ १४३॥**
**नीरातें आटी तेज। तेजा वायूसिं झुंझ। आणि गगन तंव सहज। वायूसी भक्षी॥ १४४॥**
**तेविंचि कोणेही वेळे। आपण कायिसयाही न मिळे। आंत रिघोनि वेगळें। आकाश हें॥ १४५॥**
**ऐसीं ही पांचही भूतें। न साहती एकमेकांते। कीं तियेंही ऐक्यातें। देहासी येती॥ १४६॥**
**द्वंद्वाची उखिविखी। सोडूनि वसती एकीं। एकेकातें पोखी। निजगुणें गा॥ १४७॥**
**ऐसें न मिळे तयां साजणें। चळे धैर्यें जेणें। तयां नांव म्हणें। धृती मी गा॥ १४८॥**

**अर्थ**—अर्जुना! तिलाच चेतना म्हणतात. आतां धैर्याचा विचार केला असतां या सर्वांहून तें भिन्न कसें आहे तें सांगतो, ऐक॥ १४२॥ तरी आकाशादि पंचतत्त्वांत जातिस्वभावानुसार एकमेकांशीं परस्पर उघड वैर आहे. पाणी पृथ्वीचा नाश करीत नाही, असें नाही॥ १४३॥ पाण्याला अग्नि नाहीसा करतो. अग्नि व वायु यांच्याशीं झुंज लागलेली आहे आणि आकाश हें वायूला सहज गिळंकृत करतें॥ १४४॥ त्याचप्रमाणे आकाश केव्हाहि कशाशीहि मिळत नाही. सर्वांच्या आंत राहूनहि तें सर्वांहून वेगळें राहतें॥ १४५॥ याप्रमाणे पांचहि भूतें एकमेकांना सहन करीत नाहीत; परंतु असें असूनहि देहाचे ठिकाणीं ती महाभूतें एकोप्याने वागतात॥ १४६॥ विरोधाचा विचार सोडून देऊन तीं एकत्र वस्ती करतात आणि आपआपल्या गुणाने एकमेकांचें पोषण करतात॥ १४७॥ याप्रमाणे ज्या धैर्याच्या योगाने कधी न मिळणाऱ्या स्वभाववैऱ्याशीं देखील मैत्री केली जाते, त्याला, अर्जुना! मी धृति म्हणतो॥ १४८॥

**आणि जीवेंसी पांडवा। या छत्तिसांचा मेळावा। तो हा एथ जाणावा। संघातु पैं गा॥ १४९॥**
**एवं छत्तीसही भेद। सांगितले तुज विशद। यया येतुलेयातें प्रसिद्ध। क्षेत्र म्हणिजे॥ १५०॥**

**अर्थ**—आणि अर्जुना! जीवाशीं जो या छत्तीस तत्त्वांच्या समुदायांचा संबंध झाला आहे, त्या समुदायाला संघात म्हणतात॥ १४९॥ याप्रमाणे छत्तीस प्रकारचीं तत्त्वें तुला स्पष्ट करून सांगितलीं. या इतक्यांना मिळून क्षेत्र हें प्रसिद्ध नांव आहे॥ १५०॥

**रथांगांचा मेळावा। जेवीं रथु म्हणिजे पांडवा। कां अधोर्ध्व अवेवां। नांव देहो॥ १५१॥**
**करीतुरंगसमाजें। सेना नाम निफजे। कां वाक्यें म्हणिजती पुंजे। अक्षरांचे॥ १५२॥**
**कां जळधरांचा मेळा। वाच्य होय आभाळा। नाना लोकां सकळां। नाम जग॥ १५३॥**
**कां स्नेहसूत्रवन्ही। मेळु एके स्थानीं। धरिजे तो जनीं। दीपु होय॥ १५४॥**
**तैसीं छत्तीसही इयें तत्त्वें। मिळती जेणें एकत्वें। तेणें समूहपरत्वें। क्षेत्र म्हणिपे॥ १५५॥**
**आणि वाहतेनि भौतिकें। पाप पुण्य येथें पिके। म्हणोनि आम्ही कौतुकें। क्षेत्र म्हणो॥ १५६॥**
**आणि एकाचेनि मतें। देह म्हणती ययातें। परि असो हें अनंतें। नामें यया॥ १५७॥**
**पैं परतत्त्वाआरौतें। आणि स्थावरां आंतौतें। जें कांहीं होतें जातें। ते क्षेत्रचि हें॥ १५८॥**

**अर्थ**—रथाच्या सर्व भागाच्या समुदायाला, ज्याप्रमाणे, अर्जुना! रथ म्हणतात किंवा खालचे वरचे अवयव घेऊन जसें देह हें नांव असतें॥ १५१॥ हत्ती, घोडे, पायदळ मिळून सेना हें नांव येतें किंवा अक्षरांच्या समूहाला वाक्य म्हटलें जातें॥ १५२॥ मेघांच्या समुदायाला आभाळ म्हणतात किंवा नाना प्रकारच्या संपूर्ण लोकांना जग हे नांव असतें॥ १५३॥ किंवा तेल, वात, अग्नि हे तिन्ही एका ठिकाणीं धरले जातात तोच लोकांत दीप म्हटला जातो॥ १५४॥ त्याप्रमाणें हीं छत्तीस तत्त्वें ज्याच्या एकत्वाने एकत्र मिळतात, त्या समुदायाच्या दृष्टीने त्याला क्षेत्र म्हणतात॥ १५५॥ या भौतिक शरीराचा उदीम केला असतां येथें पाप आणि पुण्य यांचें पीक येतें; म्हणूनहि आम्ही या शरीराला कौतुकाने क्षेत्र म्हणतों॥ १५६॥ आणि कोणी याला देह असेंहि म्हणतात; पण असो. याला अनंत नांवें आहेत॥ १५७॥ परतत्त्व-म्हणजे सर्व तत्त्वांच्या पलीकडे असलेले जें परब्रह्मतत्त्व-त्याच्या अलीकडे स्थावरापर्यंत जेवढें कांही उत्पन्न होतें किंवा नाश पावतें ते सर्व क्षेत्रच होय॥ १५८॥

**परि सुर नर उरगीं। घडत आहे योनिविभागीं। तें गुणकर्मसंगी। पडिलें सातें॥ १५९॥**

**अर्थ**—पण ते गुणकर्माच्या संगांत पडल्यामुळे देव, मनुष्य, सर्प इत्यादि नाना प्रकारच्या योनिविभागाने निर्माण होत असते॥ १५९॥

**गूढार्थदीपिका**—प्रत्येक जातींतील प्राण्यांचे विभाग किंवा भिन्नता कृत्रिम किंवा मनुष्यकृत नसून ती त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या त्यांच्या पूर्वगुणकर्मानुसार होत असते.

**हेंचि गुणविवंचना। पुढां म्हणिपैल अर्जुना। प्रस्तुत आतां ज्ञाना। रूप दावूं॥ १६०॥**
**क्षेत्र तंव सविस्तर। सांगितलें सविकार। म्हणोनि आतां उदार। ज्ञान आइकें॥ १६१॥**

**अर्थ**—हाच गुणविचार, अर्जुना पुढे सांगितला जाईल. प्रस्तुत तुला ज्ञानाचे स्वरूप दाखवितो॥ १६०॥ क्षेत्राचे वर्णन, त्यांतील संपूर्ण कार्यासह, तुला सविस्तर सांगितले; म्हणून आतां मोक्षप्राप्ति करून देऊन जीवाचा उद्धार करणारे असे जे उदार ज्ञान, ते ऐक॥ १६१॥

**जया ज्ञानालागीं। गगन गिळिताती योगी। स्वर्गाची आडवंगी। उमरडोनि॥ १६२॥**

**अर्थ**—ज्या ज्ञानप्राप्तिकरितां योगी लोक स्वर्गाचा आडमार्ग टाकून देऊन आकाशहि गिळतात॥ १६२॥

**गूढार्थदीपिका—स्वर्गाची आडवंगी। उमरडोनी**—परब्रह्माच्या प्राप्तिकरितां इहपर सर्व लोकांतील सुखभोगाची आसक्ती नाहीशी झाली पाहिजे, ती राहिल्यास बुद्धि विषयाकारच राहते, ब्रह्माकार होत नाही. हें "स्वर्गाची आडवंगी। उमरडोनी" या चरणांनी माउलींनी दाखविलें आहे.

**गगन गिळिताति योगी**—म्हणजे ज्ञानी. आकाश गिळिताति—म्हणजे बुद्धींत शून्यरूप अशा आकाशाचें अस्तित्त्व राहूं देत नाहीत.

इहपर विषयांची आसक्ति नाहीशी झाल्यामुळे बुद्धि विषयरहित झाली, तरी ती शून्याकार किंवा गगनाकार होऊन राहते; पण आत्मा आकाशाचेहि पलीकडे असल्यामुळे बुद्धि आत्माकार होण्याकरितां बुद्धींतून शून्याकारता किंवा आकाशाकारता नाहीशी करावी लागते, हें "गगन गिळिताति योगी" या चरणाने सांगितले आहे.

**न करिती सिद्धीची चाड। न धरिती ऋद्धीची भीड। योगाऐसें दुवाड। हेळसिती॥ १६३॥**

**अर्थ**—हे सिद्धीची इच्छा करीत नाहीत व ऋद्धीची प्राप्ति झाली असतांहि ते त्याला वश होत नाहीत. ते योगासारखीं साधनें कष्टदायक म्हणून तुच्छ समजतात॥ १६३॥

**गूढार्थदीपिका**—योगाने ब्रह्मानुभव येत असला, तरी जगत्सत्यात्वबुद्धि तेथेंहि कायम राहत असल्यामुळे ती अद्वैत ब्रह्मानुभवाला प्रतिबंधक होते; म्हणून ज्ञानी पुरुष ज्ञानाच्या दृष्टीने योगाला तुच्छ समजतो. वरील १६२-१६३ या दोन ओव्यांतून ज्ञानप्राप्तीला कोणत्या गोष्टी प्रतिबंधक आहेत, यांचें विवेचन केलें आहे.

**तपोदुर्गें वोलांडित। क्रतुकोटि वोवांडित। उलथूनि सांडित। कर्मवल्ली॥ १६४॥**

**अर्थ**—कित्येक ज्ञानप्राप्तिकरतां तपरूपी किल्ले ओलांडून जातात-म्हणजे घोर तपश्चर्येचे कष्ट सहन करतात. कोट्यावधि यज्ञ त्याच्यावरून (ज्ञानावरून) ओवाळून टाकतात-म्हणजे ज्ञानप्राप्तिकरितां कोट्यावधि यज्ञ करण्याचा प्रसंग आला तरी त्यांना त्याचें कांहीच वाटत नाही. व कर्मकांडरूपी वेली उपटून टाकतात-म्हणजें ज्ञानप्राप्तिकरितां संन्यास घेतात.॥ १६४॥

**नाना भजनमार्गीं। धांवत उघडिया आंगी। एक रिगताति सुरंगीं। सुषुम्नेचिये॥ १६५॥**

**अर्थ—कोणी उघड्या आंगीं**-म्हणजे असंग होऊन किंवा सर्व संसारासक्ति सोडून नाना प्रकारच्या उपासनामार्गाने जातात, तर कोणी सुषुम्नेच्या विवरांत शिरतात॥ १६५॥

**गूढार्थदीपिका—"नाना भजनमार्गीं। धांवत उघडिया आंगीं"** या दोन चरणाने सगुणस्वरूपाच्या उपासनाद्वारा ज्ञानप्राप्ति सांगितली असून "एक रिघताती सुरंगीं। सुषुम्नेचिये" या दोन चरणांनी आत्मस्वरूपाचा प्रत्यक्ष अनुभव घेण्याकरितां षट्चक्रभेदरूपी योगाचा मार्ग सांगितला आहे.

**ऐसी जिये ज्ञानीं। मुनीश्वरांसी उतान्ही। वेदतरुच्या पानोवानीं। हिंडताती॥ १६६॥**
**देईल गुरुसेवा। इया बुद्धि पांडवा। जन्मशतांचा सांडोवा। टाकित जे॥ १६७॥**
**जया ज्ञानाची रिगवणी। अविद्ये उणें आणी। जीवाआत्मया बुझावणी। मांडूनि दे॥ १६८॥**

**अर्थ**—याप्रमाणे ज्या ज्ञानप्राप्तिकरितां थोर थोर मुनींच्या उत्कट इच्छा वेदवचनाच्या ठिकाणीं हिंडतात-म्हणजे वेदोक्त साधनांचा आश्रय करतात॥ १६६॥ प्रेमाने केलेली श्रीगुरुसेवाच मला ज्ञान प्राप्त करून देईल, या दृढ बुद्धीने, अर्जुना! त्या सेवेकरितां शंभर जन्म घेण्याला तयार होतात॥ १६७॥ जें ज्ञान अंत:करणांत शिरलें असतां अविद्या नि:शेष नाश पावते आणि जीव व परमात्मा यांचें ऐक्य करून देतें॥ १६८॥

**गूढार्थदीपिका**—जाणीवरहित किंवा वृत्तिरहित व जाणीवसहित किंवा वृत्तिसहित असे दोन प्रकारचें ज्ञान आहे, हें मागें सांगितलेंच आहे. यालाच अनुक्रमें निर्विकल्प व सविकल्प ज्ञान म्हणतात.

निर्विकल्प ज्ञान सर्वाचे ठिकाणीं आहेच. असे असूनहि, जीवाचे ठिकाणीं अविद्याभ्रांति दिसून येते; म्हणून निर्विकल्प ज्ञान अविद्याभ्रांतीला निवर्तक होत नाही, हें उघड आहे. येथे ज्ञान प्राप्त झाले असतां अविद्या नाश पावते, असे माउलींनी म्हटलें आहे; म्हणून येथील अविद्यानिवर्तकज्ञान निर्विकल्पक नसून सविकल्पक आहे असें म्हणावे लागतें. ते सविकल्पक ज्ञान म्हणजे 'मी ब्रह्म आहे' असे जीवब्रह्मैक्याचें जाणीवरूप वृत्तिज्ञान होय.

**जें इंद्रियांचीं द्वारें आडी। प्रवृत्तीचे पाय मोडी। जें दैन्यचि फेडी। मानसाचें॥ १६९॥**

**अर्थ**—जें ज्ञान इंद्रियांचीं द्वारें बंद करतें-म्हणजे इंद्रियांना विषयांकडे जाऊं देत नाही. विषयसुखाच्या प्राप्तिकरितां होणाऱ्या कर्माच्या प्रवृत्तीचे पायच मोडते-म्हणजे कर्म करण्याची प्रवृत्तिच होत नाही आणि मनांतील सुखाचें दारिद्र्य नाहीसें करतें॥ १६९॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानाने विषय मिथ्या ठरल्यामुळे मनाची विषयांकडील धांव व इंद्रियांची कर्मप्रवृत्ति बंद पडून मन व इंद्रियें अंतर्मुख होतात व तीं सुखरूप आत्म्याचे ठिकाणीं स्थिर होतात.

**द्वैताचा दुकाळु पाहे। साम्याचें सुयाणें होये। जया ज्ञानाची सोये। ऐसें करी॥ १७०॥**

**अर्थ**—ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असतां असे होते की द्वैत कोठेंहि दिसत नाही आणि जिकडे तिकडे समरस अशा अद्वैत ब्रह्माच्या प्रत्ययाचा सुकाळ होतो॥ १७० ॥

**गूढार्थदीपिका**—ब्रह्मज्ञान झालें असतां भिन्न भिन्न पदार्थ आहेत अशी द्वैतदृष्टि नाहीशी होऊन सर्वत्र एकच वस्तु भरलेली असून ती केवळ नामरूपामुळे भिन्नासारखी भासते, अशी एक अद्वैतदृष्टिच राहते.

**मदाचा ठावोचि पुसी। जें महामोहातें ग्रासी। नेदी आपपरु ऐसी। भाष उरों॥ १७१ ॥**
**जें संसारातें उन्मूळी। संकल्पपंकु पाखाळी। अनावरा तें वेंटाळी। ज्ञेयातें जें॥ १७२ ॥**

**अर्थ**—जें ज्ञान अहंकाराचा लेशहि ठेवित नाही, जें अनादिभ्रांतीला गिळून टाकते व आपला व परका असा आपपर भाव जें शिल्लक राहूं देत नाही॥ १७१ ॥ जें संसारवृक्षाला मूळासह उपटून टाकतें व मनांतील संकल्परूपी चिखल स्वच्छ धुवून टाकतें व ज्ञेय होणाऱ्या अमर्याद आत्मवस्तूलाहि जें (ज्ञान) व्यापून टाकतें॥ १७२ ॥

**गूढार्थदीपिका**—वेदान्तांत परब्रह्माचे ठिकाणीं फलव्याप्ति नाही, वृत्तिव्याप्ति आहे, असें जें म्हटलें आहे, तेंच येथें माउलींनी सांगितलें आहे.

**जयाचेनि जालेपणें। पांगुळ होइजे प्राणें। जयाचेनि विंदाणें। जग हें चेष्टे॥ १७३ ॥**

**अर्थ**—जें ज्ञान प्राप्त झालें असतां प्राणहि स्थिर होतो व ज्या ज्ञानाच्या सत्तेने जगांतील व्यापार चालतात॥ १७३ ॥

**गूढार्थदीपिका-जयाचेनि विंदाणें। जग हें चेष्टे**—प्रतिबिंबरूप जीवाचे ठिकाणीं असलेल्या अज्ञानभ्रांतीच्या अपेक्षेने बिंबरूप परमेश्वराचे ठिकाणीं शुद्धसत्त्वात्मक मायेच्या योगाने "अहं ब्रह्मास्मि" असें ज्ञानवृत्तिचें जें स्फुरण होतें त्या विद्यारूप ज्ञानवृत्तीच्या साहाय्यानेच भगवान् जगद्रूप क्रीडा करतो, असा अर्थ.

**जयाचेनि उजाळें। उघडती बुद्धीचे डोळे। जीवु दोंदावरी लोळे। आनंदाचिये॥ १७४॥**

**अर्थ**—ज्याच्या प्रकाशाने बुद्धीची ज्ञानदृष्टि उघडते आणि जीव दु:खरहित होऊन अखंड प्रसन्नचित्त राहतो॥ १७४ ॥

**गूढार्थदीपिका—उघडती बुद्धीचे डोळे**-बुद्धि हें सत्वगुणाचें कार्य असल्यामुळे तींत शुद्ध ब्रह्मज्ञानरूप चैतन्यप्रकाश झाला आहे, हेच त्या बुद्धीचे डोळे होत; पण बुद्धि मनाच्या स्वाधीन होऊन मनाच्या कल्पनेनुसार निश्चय करते; म्हणून बुद्धीचे डोळे झांकले गेले आहेत. आत्मानात्मविचाराने हे डोळे उघडले जातात.

**ऐसें जें ज्ञान। पवित्रैकनिधान। जेथ विटाळलें मन। चोख कीजे॥ १७५ ॥**
**आत्मया जीवबुद्धी। जे लागली होती क्षयव्याधी। ते जयाचिया सन्निधी। निरुजा कीजे॥ १७६ ॥**
**ते अनिरूप्य कीं निरूपिजे। ऐकतां बुद्धी आणिजे। वांचूनि डोळां देखिजे। ऐसें नाहीं॥ १७७॥**

**अर्थ**—असें जें ब्रह्मज्ञान तें सर्व पावित्र्याचें एकच कोठार आहे व अविद्यादि मलाने अशुद्ध झालेल्या मनाला तें शुद्ध करतें॥ १७५ ॥ आत्मस्वरूपाला, मी जीव आहे-म्हणजे मी कर्ता, भोक्ता, अज्ञानी आहे इत्यादि विपरीत बुद्धीचा जो क्षय रोग लागला होता, तो रोग ज्या ब्रह्मज्ञानाच्या सान्निध्याने नाहीसा होऊन, जीव कायमचा व्याधिमुक्त होतो-म्हणजे निरुपाधिक असा ब्रह्मस्वरूप होतो॥ १७६ ॥ तें ज्ञान सांगतां येंत नाही, असें असलें, तरी सांगितलें जातें आणि तें ऐकून केवळ बुद्धीने ग्रहण करायचें असतें. बुद्धीने ग्रहण करण्यावांचून डोळ्यांनी पाहता येण्याजोगें नाही॥ १७७ ॥

**गूढार्थदीपिका—अनिरूप्य कीं निरूपिजे**-परब्रह्म निर्विकल्प असल्यामुळे त्याचें शब्दाने ज्ञान करून देणें शक्य नसलें, तरी त्याच्या स्वरूपाचे निरूपण केल्यावांचून मुमुक्षूला त्याचें ज्ञान होणें शक्य नाही; म्हणून सत्पुरुष, शब्दाच्या साहाय्याने त्याचें निरूपण करीत असतात.

**ऐकतां बुद्धी आणिजे**—सत्पुरुषाच्या मुखांतून निघालेल्या परब्रह्माच्या स्वरूपाचें विवेचन ऐकून मुमुक्षूंनी शब्द सोडून तें अर्थरूपज्ञान शुद्धबुद्धीने ग्रहण करावयाचे असतें.

**वांचूनि डोळां देखिजे। ऐसें नाहीं**-नामरूपाचा व्यतिरेक करून केवळ सच्चिदानंद अशा निर्गुण आत्मस्वरूपाचा ज्ञानानुभव बुद्धिगम्य असतो, डोळ्यांनी दिसण्याजोगा नसतो.

**मग तेंचि इये शरीरीं। जैं आपुला प्रभावो करी। तैं इंद्रियांचां व्यापारीं। डोळांहि दिसे॥ १७८॥**

**अर्थ**—मग तेंच ज्ञान, या शरीराचे ठिकाणीं सर्वत्र व्यापून जेव्हा आपला प्रभाव दाखवितें, तेव्हा इंद्रियांच्या व्यापारांत तें प्रगट होऊन डोळ्यांनाहि दिसूं लागतें॥ १७८॥

**गूढार्थदीपिका—मग तेंचि इये शरीरीं। जैं आपुला प्रभावो करीं**-तें ज्ञान बुद्धींत दृढ होऊन जेव्हा ज्ञान्याच्या शरीरादिकांचे सर्व व्यापार अद्वैतब्रह्मदृष्टीने होऊं लागतात.

**तैं इंद्रियांचिया व्यापारीं। डोळांही दिसे**-तेव्हा इंद्रियांच्या त्या व्यापाराच्या द्वारा ते ज्ञान डोळ्यांनाहि दिसूं लागते.

**पैं वसंताचे रिगवणें। झाडांचेनि साजेपणें। जाणिजे तेवीं करणें। सांगती ज्ञान॥ १७९॥**
**अगा वृक्षासि पाताळीं। जळ सांपडे मुळीं। तें शाखांचिये बाहाळीं। बाहेर दिसे॥ १८०॥**
**कां भूमीचें मार्दव। सांगे कोंभाची लवलव। नाना आचार गौरव। सुकुलीनाचें॥ १८१॥**
**अथवा संभ्रमाचिया आयती। स्नेहो जैसा ये व्यक्ती। कां दर्शनाचिये प्रशस्ती। पुण्यपुरुष॥ १८२॥**
**नातरी केळीं कापूर जाहला। जेवीं परिमळें जाणों आला। कां भिंगारीं दीपु ठेविला। बाहेरि फांकें॥ १८३॥**
**तैसें हृदयींचेनि ज्ञानें। जिये देहीं उमटती चिन्हें। तियें सांगों आतां अवधानें। चांगें आइक॥ १८४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे झाडांच्या टवटवीवरून वसंतऋतूचा आरंभ जाणला जातो, त्याप्रमाणे ज्ञान्याचीं इंद्रिये त्याची ज्ञानस्थिति सांगतात॥ १७९॥ अर्जुना! झाडाला मुळांच्या द्वारा खोल जमिनींत पाणी सांपडत आहे, हे त्याच्या डाहाळांच्या सर्व बाजूंनी होत असलेल्या वाढीवरून बाहेर दिसून येतें॥ १८०॥ किंवा निघालेल्या कोंभाच्या लुसलुशींत कोंवळेपणावरून जमीन मृदु आहे, कडक नाही हे दिसतें. किंवा उत्तम प्रकारच्या आचरणावरून कुलीनपणा दिसून येतो॥ १८१॥ अथवा सत्काराच्या तयारीवरून जसे मनांतील प्रेम दिसून येतें किंवा दर्शनाने झालेल्या चित्ताच्या प्रसन्नतेवरून पुण्यवान पुरुष कळून येतो॥ १८२॥ किंवा केळीमध्ये कापूर तयार झाला, हे जसे त्याच्या सुवासावरून कळून येते किंवा भिंगांत दिवा ठेवला असतां त्याचा प्रकाश बाहेर पडतो॥ १८३॥ त्याप्रमाणे अंत:करणात ज्ञान प्राप्त झाले असतां बाहेर देहाचे ठिकाणीं जीं लक्षणें प्रगट होतात, तीं आतां सांगतों. एकाग्र चित्ताने अवधान देऊन ऐक॥ १८४॥

**गूढार्थदीपिका**—पुढें जीं अमानित्वादि ज्ञानाचीं लक्षणें सांगितली आहेत, तीं ज्ञान दृढ झाल्यावर ज्ञान्याचीं स्वाभाविक लक्षणे होऊन राहतात आणि तत्पूर्वी ज्ञान दृढ व्हावें, म्हणून साधकाला या लक्षणांचा अभ्यास करावा लागतो.

**अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् । आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः॥ ७॥**

**अर्थ**—मानाची इच्छा नसणें, दंभ नसणें, कोण्याहि प्राण्याला दु:ख न देणें, दुसऱ्याने आपला अपराध केला असतां चित्तांत यत्किंचितहि क्रोधाची उर्मी न उठणें, मनमोकळेपणा, श्रीगुरुची प्रेमाने सेवा करणें, शरीर व मन यांची शुद्धि, परमेश्वराचे ठिकाणीं अचल निष्ठा, अंत:करणाचा निग्रह करणें॥ ७॥

**तरी कवणेही विषयींचें। साम्य होणें न रुचे। संभावितपणाचें। ओझें जया॥ १८५॥**

**अर्थ**—ज्याला एका आत्मस्वरूपावांचून देहबुद्धि उत्पन्न करणाऱ्या कोण्याहि वृत्तीशीं तन्मय होणें आवडत नाही व ज्याला सज्जन म्हणवून घेण्याचें ओझें वाटते॥ १८५॥

**गूढार्थदीपिका**—मानित्वादिवृत्ती द्वैतांतच राहत असल्यामुळे त्या अद्वैतब्रह्मदृष्टीला घातक असतात; म्हणून ज्ञान दृढ करूं इच्छिणाऱ्यांनी त्यांचा त्याग करायला पाहिजे.

**आथिलेचि गुण वानितां। मान्यपणें मानितां। योग्यतेचें येतां। आंगा रूप॥ १८६॥**
**तैं गजबजों लागे कैसा। व्याधें रुंधला मृग जैसा। कां बाहीं तरतां वळसां। दाटला जेवीं॥ १८७॥**

**पार्था तेंणें पाडें। सन्मानें जो सांकडे। गरिमेतें आंगाकडे। येवोंचि नेदी॥ १८८॥**
**पूज्यता डोळां न देखावी। स्वकीर्ती कानीं नायकावी। हा अमुका ऐसी नोहावी। सेचि लोकां॥ १८९॥**
**तेथ सत्काराची कें गोठी। कें आदरा देईल भेटी। मरणेंसीं साटी। नमस्कारितां॥ १९०॥**
**वाचस्पतीचेनि पाडें। सर्वज्ञता तरी जोडे। परि वेडीवेमाजीं दडे। महिमे भेणें॥ १९१॥**

**अर्थ—**कोणी असलेल्या गुणांनी त्याची (ज्ञानी पुरुषाची) स्तुति केली असतां व माननीय म्हणून मान दिला असतां लोकांनी आपली स्तुति करावी किंवा मान द्यावा अशी योग्यता आपल्या आंगीं आली, असें पाहून तो असा व्याकुळ होतो की जसा कांही व्याधाने पाशांत धरलेला हरिण किंवा हाताने नदी पोहून जात असतां भोंवऱ्यांत सांपडलेला मनुष्य॥ १८६-१८७॥ अर्जुना! तत्तुल्यच जो मान प्राप्त झाला असतां दु:खी होऊन कष्टी होतो व आपल्या आंगीं मोठेपणा येऊं देत नाही॥ १८८॥ आपली पूज्यता आपल्या डोळ्यांनी पाहूं नये, आपली कीर्ति आपल्या कानीं पडूं नये आणि हा अमका अशी लोकांना आठवणहि होऊं नये, अशी ज्ञानी पुरुष इच्छा करतो॥ १८९॥ अशा स्थितींत सत्काराची गोष्ट किंवा आदराचा स्वीकार दूरच राहिला. त्याला पूज्य म्हणून कोणी नमस्कार केला असतां, त्याला मरणप्राय दु:ख होतें॥ १९०॥ त्याचे ठिकाणीं बृहस्पतिसारखी सर्वज्ञता असते; पण आपली सर्वज्ञता लोकांना कळून आपली महति वाढूं नये, म्हणून तो बाहेर लोकांमध्ये वेड्याप्रमाणे वागतो॥ १९१॥

**गूढार्थदीपिका—वेडिवेमाजीं दडे। महिमे भेणें**-अशा सत्पुरुषांना माझ्या सद्‌गुरु आईंनी अलौकिक व्याख्या-नमालेंतील "ध्यान" या व्याख्यानांत "मिथ्योन्मादग्राही" म्हणजे खोटेंच वेड्याचें सोंग घेऊन राहणारे, असें म्हटले आहे. ज्ञानीपुरुष शास्त्र सोडून यथेष्ट वागतो असा याचा अर्थ नाही. कारण यथेष्टाचरणहि अहंकार, दंभ इत्यादि दोषाला धरूनच होऊं शकतें असें आचार्यांनी "न च नियोगाभावात्सम्यग्दर्शिनो यथेष्टचेष्टाप्रसंग:। सर्वत्राभिमानस्यैव प्रवर्तकत्वादभिमानाभावाच्च सम्यग्दर्शिन:। तस्माद्देहसंबंधादेवानुज्ञापरिहारी" (ब्र. सू. शं. भा. २-३-४८) या पंक्तीने ब्रह्मसूत्रभाष्यांत म्हटलें आहे.

पण ज्ञान्याला आपली ब्रह्मस्थिति दृढ करण्याकरितां देहबुद्धि उत्पन्न करणाऱ्या अहंकारादि दोषांचें उन्मूलन करायचे असल्यामुळे व तें शास्त्रानुसार वागूनच साध्य होत असल्यामुळे तो खरोखर शास्त्रमर्यादेचें उल्लंघन न करतां तें केल्यासारखें भासवितो, हे "वेडिवेमाजीं दडे" या चरणाने माऊलींनी सांगितलें आहे.

"तस्माच्चरेत वै योगी सतां धर्ममदूषयन्। जना यथावमन्येरन् गच्छेयुर्नैव संगतिम्" सज्जनांनी घालून दिलेल्या सदाचरणरूप मार्गाचें उल्लंघन न करतां लोक आपली निंदा करतील व आपल्याला पूज्य समजणार नाहीत, असेच ज्ञानी पुरुषांनी वागावें, अशी स्मृतिहि आहे.

**चातुर्य लपवी। महत्त्व हारवी। पिसेपण मिरवी। आवडोनि॥ १९२॥**
**लौकिकाचा उद्वेग। शास्त्रांवरी उबग। उगेपणीं चांग। आथी भर॥ १९३॥**
**जगें अवज्ञाचि करावी। संबंधीं सोयचि न धरावी। ऐसी ऐसी जीवीं। चाड बहु॥ १९४॥**
**तळवटपण बाणे। आंगीं हिणावो खेवणें। तें तेंचि करणें। बहुत करूनि॥ १९५॥**
**हा जीतु ना नोहे। लोक कल्पी येणें भावें। तैसें जिणें होआवे। ऐसी आशा॥ १९६॥**
**पैं चालतु कां नोहे। कीं वारेनि जातु आहे। जना ऐसा भ्रमु जाये। तैसें होइजे॥ १९७॥**
**माझें असतपण लोपो। नांवरूप हारपो। मज झणें वासिपो। भूतजात॥ १९८॥**

**अर्थ—**आवडीने वेड्यासारखें वागून आपलें व्यावहारिक शहाणपण दिसूं देत नाही व आपलें मोठेपण नाहीसें करतो॥ १९२॥ त्याला व्यावहारिक गोष्टींचा कंटाळा असतो. शास्त्राध्ययनापासूनहि उपराम पावतो व मौन धरून राहण्यावर तो चांगला भर देतो॥ १९३॥ लोकांनी त्याला तुच्छ लेखावें व सोयऱ्याधायऱ्यांनी आपली पर्वा करूं नये अशीच त्याची अंत:करणांतून अत्यंत इच्छा असते॥ १९४॥ जेणेकरून सर्वांहून लहान होऊन राहणें आंगीं बाणेल आणि लोक तिरस्काराचें कोंदण करतील असेच बहुतकरून त्यांचें नेहमीं वागणें असतें॥ १९५॥ हा जीवंत आहे

की मेला आहे अशी लोकांची कल्पना होईल असें आपलें जीवित असावें अशी तो इच्छा बाळगतो॥ १९६॥ हा चालत आहे किंवा चालत नाही किंवा वाऱ्याने ढकलला जात आहे, असा लोकांना संशय उत्पन्न होईल, असें चालणें त्याला आवडतें॥ १९७॥ माझें अस्तित्व कोणाला कळूं नये, माझे नांवरूपहि नाहीसें व्हावें-म्हणजे माझे नांव कधीं कोणाचे तोंडीं येऊं नये व माझें रूप कोणाच्या डोळ्यांपुढे येऊं नये, नाही तर प्राण्यांनी तरी मला भिऊन पळून जावें॥ १९८॥

**गूढार्थदीपिका—मज झणें वासिपो।** भूतजात-कामनिक लोकांना टाळण्याकरितां त्यांना भय उत्पन्न होईल असें ते वर्तन करीत असतात.

**ऐसी जयाचीं नवसियें। जो नित्य एकांता जातु जाये। नांमेंचि जो जिये। विजनाचेनि॥ १९९॥**
**वायू आणि तया पडे। गगनेसीं बोलों आवडे। जीवें प्राणें झाडें। पढियंतीं जया॥ २००॥**
**किंबहुना ऐस ऐसीं। चिन्हें जया देखसी। जाण तया ज्ञानेंसीं। शेज जाहली॥ २०१॥**
**पैं अमानित्व पुरुषीं। तें जाणावें इहीं मिषीं। आतां अदंभाचिया वोळखिसी। सौरस देवों॥ २०२॥**

**अर्थ—**याप्रमाणे जो नवस करीत असतो. जो नित्य एकान्तस्थळीं जात असतो व जनरहित स्थळ ऐकूनच तो जीवंत राहतो॥ १९९॥ ज्याचें वायुशींच जमतें, ज्याला आकाशाशींच बोलणें आवडतें, ज्याला झाडें जीवप्राणाप्रमाणे प्रिय वाटतात॥ २००॥ किंबहुना अशीं अशीं चिन्हें ज्याचे ठिकाणीं तू पाहशील त्याला आत्मज्ञानाचें आंथरूण झालें, असें समज॥ २०१॥ या चिन्हांच्या द्वारा पुरुषाचे ठिकाणीं अमानित्व बाणलें आहे, असें जाणावें. आतां अदंभित्वाची सुलभ रीतीने ओळख करून देतो॥ २०२॥

**तरि अदंभित्व ऐसें। लोभियाचें मन जैसें। जीवु जावो परि नुमसे। ठेविला ठावो॥ २०३॥**
**तयापरी किरीटी। पडिलाही प्राणसंकटीं। परि सुकृत न प्रकटी। आंगें बोलें॥ २०४॥**
**खडाणे आला पान्हा। पळवी जेवीं अर्जुना। कां लपवी पण्यांगना। वडिलपण॥ २०५॥**
**आढ्य आतुडे आडवीं। मग आढ्यता जेवीं हारवी। नातरी कुळवधू लपवी। अवयवांते॥ २०६॥**
**ना ना कृषीवळु आपुलें। पांघुरवी पेरिलें। तैसें झांकी निपजलें। दानपुण्य॥ २०७॥**
**वरिवरी देह न पूजी। लोकांतें न रंजी। स्वधर्मु वाग्ध्वजीं। बांधों नेणे॥ २०८॥**
**परोपकारु न बोले। न मिरवी अभ्यासिलें। न शके विकूं जोडलें। स्फितीसाठीं॥ २०९॥**
**शरीरभोगांकडे। पाहातां कृपण आवडे। एऱ्हवीं धर्मविषयीं थोडें। बहू न म्हणे॥ २१०॥**
**घरीं दिसे सांकड। देहींची आयती रोड। परी दानीं जया होड। सुरतरूसीं॥ २११॥**
**किंबहुना स्वधर्मीं थोरु। अवसरीं उदारु। आत्मचर्चे चतुरु। एऱ्हवीं वेडा॥ २१२॥**
**केळींचें दळवाडें। हळू पोकळ आवडे। परि फळेंनि गाढें। रसाळ जैसें॥ २१३॥**
**कां मेघाचें आंग झील। दिसे वारेनि जैसे जाईल। परि वर्षती नवल। घनवट तें॥ २१४॥**
**तैसा जो पूर्णपणीं। पाहतां धाती आयणी। एऱ्हवीं तरी वाणी। तोचि ठाय॥ २१५॥**
**हें असो या चिन्हांचा। नटनाचु ठायीं जयाच्या। जाण ज्ञान तयाच्या। हाता चढले॥ २१६॥**
**पैं गा अदंभपण। म्हणितलें तें हें जाण। आंता आईक खूण। अहिंसेची॥ २१७॥**

**अर्थ—**आतां अदंभित्व असें आहे. ज्याप्रमाणें लोभी मनुष्याचें मन, प्राण जाण्याचा प्रसंग आला तरी गुप्त ठेवलेलें धन कोठें ठेवलें हें कळूं देत नाही॥ २०३॥ त्याप्रमाणें, अर्जुना! प्राणावर संकट आलें तरी आपलें केलेलें पुण्यकर्म जो शरीर चेष्टेने किंवा वाचेने प्रकट करीत नाही॥ २०४॥ ज्याप्रमाणे, अर्जुना! नाठाळ गाय, आलेला देखील पान्हा सोडत नाही किंवा वेश्या आपलें वाढतें वय लपविण्याचा प्रयत्न करते॥ २०५॥ श्रीमंत मनुष्य अरण्यांत सांपडला असतां, ज्याप्रमाणे आपल्या श्रीमंतीचा डामडौल सोडून देतो किंवा कुलीन स्त्री आपले अवयव झांकून घेते॥ २०६॥ किंवा ज्याप्रमाणे शेतकरी आपलें पेरलेलें धान्य मातीने झांकून टाकतो, त्याप्रमाणे जो आपलें केलेलें

दानादिक पुण्यकर्म कोणाला कळूं देत नाही॥ २०७॥ वरवर देहाची पूजा करण्याची जो इच्छा करीत नाही. लोकांच्या मनासारखें बोलून त्यांना प्रसन्न करण्याचा प्रयत्न करीत नाही व जो आचरलेला धर्म वाणीरूपी ध्वजावर बांधत नाही-म्हणजे आचरलेल्या धर्माचा तोंडानें जो डांगोरा पिटूं इच्छित नाही॥ २०८॥ दुसऱ्यावर केलेला परोपकार जो बोलून दाखवित नाही. केलेल्या शास्त्राभ्यासाचा जो गाजावाजा करीत नाही आणि जोडलेलें पुण्य प्रतिष्ठा मिळविण्याकरितां कधीं खर्च करूं इच्छित नाही॥ २०९॥ शरीराने विषयसुखाचा भोग घेतांना पाहिले असतां तो अत्यंत कृपण दिसतो; पण धर्माचें आचरण करण्यांत मात्र तो थोडें-बहु म्हणत नाही-म्हणजे भोगाविषयीं तो कृपण असतो व धर्माविषयीं उदार असतो॥ २१०॥ घरांत पाहतां अत्यंत दारिद्र्य आणि देहाची तयारी पाहतां अत्यंत क्षीण, पण दान करण्यांत जो कल्पतरूशीं पैज बांधतो॥ २११॥ फार काय सांगावें, स्वधर्माचें आचरण करण्यांत जो अत्यंत निष्ठावंत, प्रसंगविशेषीं उदार आणि आत्मस्वरूपाची चर्चा करण्यांत अत्यंत कुशल असून बाकी व्यवहारकाळीं जो वेड्यासारखा वागतो॥ २१२॥ केळीचें आंग सुकुमार व पोकळ असतें; पण ती जसें घट्ट व रसाळ अशा फलरूपाने फळते॥ २१३॥ मेघाचें आंग इतकें पातळ असतें की वाऱ्याने उडून जाईल असें तें दिसतें, पण त्यांतून होणाऱ्या पाण्याचा वर्षाव मात्र घनदाट असतो॥ २१४॥ त्याप्रमाणे ज्याचें पूर्णपण पाहतां पाहण्याची इच्छा तृप्त होते. येऱ्हवीं वरवर पाहतां तोच सर्व अपूर्णतेचें ठिकाण दिसतो॥ ५१५॥ हें असो. ज्याच्या ठिकाणीं अशीं हीं चिन्हें मूर्तिमंत दिसून येतात, त्यालाच आत्मज्ञान प्राप्त होतें, असें समज॥ २१६॥ अर्जुना! अदंभपण सांगतो म्हणून जें मी म्हटलें, तें हें होय. आतां अहिंसेची खूण ऐक॥ २१७॥

**तरी अहिंसा बहुतीं परी। बोलिली असे अवधारीं। आपुलालिया मतांतरीं। निरूपिली॥ २१८॥**
**परि ते ऐसी देखा। जैशा खांडुनियां शाखा। मग तयाचिया बुडुखा। कुंप कीजे॥ २१९॥**
**कां बाहु तोडोनि पचविजे। मग भुकेची पीडा राखिजे। नाना देऊळ मोडूनि कीजे। पौळी देवा॥ २२०॥**
**तैसी हिंसाचि करूनि अहिंसा। निफजविजे हा ऐसा। पै पूर्वमीमांसा। निर्णय केला॥ २२१॥**
**जे अवृष्टीचेनि उपद्रवें। गादलें विश्व आघवें। म्हणोनि पर्जन्येष्टी करावे। नाना याग॥ २२२॥**
**तंव तिये इष्टीचिया बुडीं। पशुहिंसा तंव रोकडी। मग अहिंसेची थडी। कैंची दिसे॥ २२३॥**
**पेरिजे नुसधी हिंसा। तेथ उगवेल काय अहिंसा। परि नवल बापा धिंवसा। या याज्ञिकांचा॥ २२४॥**

**अर्थ**—निरनिराळ्या लोकांनी आपआपल्या भिन्न भिन्न मताप्रमाणे अहिंसेचें निरूपण केलें असल्यामुळे ती पुष्कळ प्रकारांनी बोलली गेली आहे, ऐक॥ २१८॥ पण त्यांची ती अहिंसा, ज्याप्रमाणे झाडाच्या डाहाळ्या तोडून त्यांचें झाडाच्या बुडाशीं कुंपण करावें, त्याप्रमाणे आहे, पाहा॥ २१९॥ किंवा आपला हात तोडून शिजवावा व त्यायोगाने आपली भुकेची पीडा नाहीशी करावी अथवा देऊळ पाडून त्या सामग्रीचें देवाला आवार करावें॥ २२०॥ त्याप्रमाणे हिंसा करूनच अहिंसा साधली पाहिजे, असा पूर्वमीमांसाशास्त्राने निर्णय केला आहे॥ २२१॥ त्यांचें मत असें की पाऊस न पडल्यामुळे नाना प्रकारचे दुर्भिक्षादि उपद्रव निर्माण होऊन सर्व जग त्रस्त झालें असतां पाऊस पडावा म्हणून पर्जन्य इष्टीसारखे नानाप्रकारचे याग करावेत॥ २२२॥ तर त्या इष्टींतच नेमकी पशुहिंसा केली जात असल्यामुळें मग अहिंसेचें पैलतीर कसें दिसणार?॥ २२३॥ केवळ हिंसेची पेरणी केल्यावर अहिंसारूपाने ती उगवेल काय? पण अर्जुना! याज्ञिकलोक या हिंसामय कर्मालाच अहिंसा म्हणण्याचें धाडस करतात, याचें नवल वाटतें॥ २२४॥

**गूढार्थदीपिका—"या वेदविहिता हिंसा न सा हिंसेति कीर्तिता"** वेदाने यागादिकांत जी पशुहिंसा सांगितली आहे, ती हिंसा होत नाही, अशी स्मृति असून "अशुद्धमिति चेन्न शब्दात्" (ब्र. सू. शं. भा. ३-१-२५) पशुहिंसात्मक यज्ञकर्म अशुद्ध म्हणजे पापरूप आहे, असें म्हणाल, तर शास्त्रांनीच तें सांगितलें असल्यामुळे ते तसें नाही, असें सूत्र असून या सूत्रावर भाष्य करतांना भगवान आचार्य म्हणतात, "ननु 'न हिंस्यात्सर्व भूतानि' इति शास्त्रमेव भूतविषयां हिंसामधर्म इत्यवगमयति। वाढम् उत्सर्गस्तु सः। अपवाद: 'अग्नीष्टोमीयं पशुमालभेत' इति"।

'कोण्याहि प्राण्याची हिंसा करूं नये' या शास्त्रवचनावरून प्राण्याची हिंसा करणें हा अधर्म आहे, असें दिसून येतें, हें खरें; पण तो सामान्य नियम आहे.

'अग्निष्टोम यज्ञामध्यें पशूचें हनन करावें' असा शास्त्राने अपवाद सांगितला आहे.

आणि छांदोग्योपनिषदाच्या पांचव्या अध्यायांतील दशम खंडान्तर्गत "तद्य इत्थं विदुः। ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते" या पहिल्या श्रुतीवर भाष्य करतांना भगवान श्रीशंकराचार्य म्हणतात, "ऊर्ध्वरेतस म्हणजे नैष्ठिक ब्रह्मचारी, श्रद्धा व तप यांच्या ठिकाणीं ब्रह्मभावना करून उपासना करणारे वानप्रस्थ व संन्यासी हे तिघेहि अर्चिरादि मार्गाने ब्रह्मलोकांत जाऊन क्रमाने मुक्त होतात, पण गृहस्थ, नैष्ठिक ब्रह्मचारी व वानप्रस्थ यांच्यापेक्षा नाना प्रकारचे कर्म करण्याचे अधिक कष्ट सोशित असले, तरी ब्रह्मलोकांत जात नाहीत; कारण "अपूता हि ते.......हिंसानृतमायाब्रह्मचर्यादि च बहूवशुद्धिकारणमपरिहार्यं तेषाम्। अतोऽपूताः। अपुतत्वान्नोत्तरेण पथा गमनम्........हिंसानृतमायाब्रह्मचर्यादि परिहाराच्च शुद्धात्मनौ हीतरे.........विरजसः, तेषां युक्त उत्तरः पंथाः" उपासना न करतां आश्रमधर्म पाळणाऱ्या गृहस्थांकडून हिंसा, खोटें बोलणें, कपट, ब्रह्मचर्यादिच्या अशुद्धीला कारण असणारे पुष्कळ दोष घडत असल्यामुळे ते अशुद्ध असतात; म्हणून अर्चिरादि उत्तरमार्गाने ते जाऊं शकत नाहीत; पण नैष्ठिक ब्रह्मचारी, वानप्रस्थ व संन्यासी यांच्याकडून असे दोष घडत नसल्यामुळे ते शुद्ध असतात, म्हणून ते उत्तरमार्गाने जातात.

आचार्यांच्या वरील ब्रह्मसूत्रावरील भाष्याचा व छांदोग्योपनिषदांतील भाष्याचा, मिळून विचार केला असतां आचार्यांचा असा निर्णय दिसून येतो की, पापकर्माने दुःख प्राप्त होत असून पुण्यकर्माने सुख प्राप्त होतें. कोण्याहि प्राण्याची हिंसा करूं नये हा सामान्य नियम असून कामनापूर्तीकरितां हिंसा करावी हा विशेष नियम आहे.

पशुहिंसा ही कामनापूर्तीकरितां कराव्या लागणाऱ्या यज्ञांत सांगितली आहे. तसें पशुहिंसायुक्त यज्ञ करणें पापरूप नाही, म्हणजे त्याच्या योगाने नरक इत्यादि दुःख प्राप्त होत नाही, उलट कामना पूर्ण होऊन सुखच प्राप्त होतें.

स्वर्गसुख हे मोक्षसुखापेक्षा अल्प व अल्पकाळ टिकणारें म्हणून दुःखरूपच असल्यामुळे केवळ स्वर्गप्राप्ति करून देणारे हिंसात्मक यज्ञ, मोक्षप्राप्तीच्या दृष्टीने पापरूपच ठरतात.

श्रीज्ञानेश्वरमाउलींनी मागील नवव्या अध्यायांत "स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजें। पापात्मकें पापें नरका जाइजे। मग मातें जेणें पाविजे। तें शुद्ध पुण्य" (ज्ञा. अ. ९-३१६) या ओवीने स्वर्गप्राप्तीच्या दृष्टीने पुण्यकारक म्हणून गणलें गेलेलें पशुहिंसात्मक यज्ञकर्म देखील मोक्षप्राप्तीच्या दृष्टीने पापरूप म्हणून ठरविलें आहे. पशुहिंसेवांचून स्वर्गप्राप्तिकरितां शास्त्रांतून अनेक अहिंसामय धर्म सांगितलें असून तशा धर्माचरणाने स्वर्गप्राप्ति झाल्याचीं उदाहरणेहि त्यांत दिलीं आहेत. सर्व संतमंडळींनी स्वर्गप्राप्तिकरितां केल्या जाणाऱ्या हिंसात्मक यज्ञाची भगवत्प्राप्तीच्या दृष्टीने व्यर्थ म्हणून निंदाच केली आहे.

येथेहि माउलींनी त्याच दृष्टीने हिंसात्मक यज्ञाची निंदा केली आहे.

**आणि आयुर्वेदही आघवा। याच मोहोरा पांडवा। जे जीवाकारणें करावा। जीवघात॥ २२५॥**
**नाना रोगें आहाळलीं। लोळतीं भूतें देखिलीं। ते हिंसा निवारावया केली। चिकित्सा पैं॥ २२६॥**
**तंव ते चिकित्से पहिलें। एकाचे कंद खणविले। एका उपडविलें। समूळी सपत्रीं॥ २२७॥**
**एकें आड मोडविली। अजंगमाची खाल काढविली। एकें गर्भिणी उकडविली। पुटामाजीं॥ २२८॥**
**अजातशत्रु तरुवरां। सर्वांगीं देवविल्या शिरा। ऐसे जीव घेऊनि धनुर्धरा। कोरडे केले॥ २२९॥**
**आणि जंगमाही हात। लाऊनि काढिलें पित्त। मग राखिले शिणत। आणिक जीव॥ २३०॥**
**अहो वसतीं धवळारें। मोडूनि केलें देव्हारे। नागवूनि वेव्हारें। गवादी घातली॥ २३१॥**
**मस्तक पांघुरविलें। तंव तळवटीं उघडें पडलें। घर मोडोनि केले। मांडव पुढें॥ २३२॥**
**ना ना पांघुरणें। जाळूनि जैसें तापणें। कां जालें आंगधुणें। कुंजराचें॥ २३३॥**
**नातरी बैल विकूनि गोठा। पुंस लावोनि बांधिजे गांठा। इया करणी की चेष्टा। काइ हंसों॥ २३४॥**

**एकीं धर्माचिया वाहणी। गाळूं आदरिलें पाणी। तंव गाळितया आहाळणीं। जीव मेले॥ २३५॥**
**एक न पचवितीचि कण। इयें हिंसेचे भेण। तेथ कदर्थले प्राण। तेही हिंसा॥ २३६॥**
**एवं हिंसाचि अहिंसा। कर्मकांडी हा ऐसा। सिद्धांत सुमनसा। वोळखें तूं॥ २३७॥**

**अर्थ**—आणि अर्जुना! संपूर्ण आयुर्वेद तर एक जींव वांचविण्याकरितां दुसऱ्या जीवाचा घात करावा असें सांगत असल्यामुळे अशा हिसेंचाच पुरस्कार करणारा आहे॥ २२५॥ नाना प्रकारच्या रोगांनी पीडिलेले व दु:खांनी तळमळत असलेले जीव पाहून त्यांची ती पीडा नाहीशी करण्याकरितां औषधोपचार केला जातो॥ २२६॥ पण औषधोपचार करण्यापूर्वी एखाद्या वनस्पतीचे कंद खणून आणविले जातात किंवा एखादी वनस्पति पानमूळासह उपटून आणविली जाते॥ २२७॥ एखादी वनस्पति मधूनच मोडून आणविली जाते. कोण्या निर्जीव अशा वसस्पतीची सालच काढविली जाते. कित्येक फुलफळाला येत असलेल्या वनस्पती घेऊन पुटपाकाच्या योगाने उकडून कढविल्या जातात॥ २२८॥ कोणालाहि शत्रु न समजणाऱ्या झाडांच्या सर्व आंगावर त्यांचा रस काढण्याकरितां घाव दिले जातात. याप्रमाणे अर्जुना! त्यांचे जीव घेऊन त्यांना रसरहित केलें जातें॥ २२९॥ आणि एवढेंच नाही, तर सजीव प्राण्यांसहि हात लावून त्यांचे पित काढलें जातें व इतर दु:खी जीवांचे रक्षण केले जाते.॥ २३०॥ अहो! असें करणें म्हणजे नांदत असलेले मोठमोठे वाडे सोडून देवळें करण्यासारखें किंवा लबाडीच्या व्यवहाराने लोकांना लुबाडून अन्नसत्र घालण्यासारखें होय॥ २३१॥ ढुंगणाचे सोडून मस्तकास गुंडाळले तर खालचें आंग उघडें पाडलें, घर मोडून पुढें मांडव केला॥ २३२॥ घरांतील वस्त्रें जाळून तापत बसावें अथवा हत्तीचें आंग धुवावें॥ २३३॥ किंवा बैल विकून गोठा बांधावा. राघोला सोडून देऊन त्यासाठी पिंजरा बांधावा, हे योग्य करणें म्हणावें की मर्कटचेष्टा म्हणून हंसावें॥ २३४॥ धर्ममार्गाप्रमाणे कोणी पाणी गाळून पिऊं पाहतात, पण त्या गाळण्याच्या त्रासाने जीव मरतात॥ २३५॥ कोणी हिंसा घडेल या भीतीने अन्न शिजवित नाहीत, पण त्यायोगाने प्राण व्याकुळ होतात. ती हिंसाच होय॥ २३६॥ हे निर्मळ अंत:करण असलेल्या अर्जुना! याप्रमाणे सर्व कर्ममार्गामध्ये हिंसाच अहिंसा होय, असा सिद्धान्त आहे, असे जाण॥ २३७॥

**पहिलें अहिंसेचें नांव। आम्हीं केलें जंव। तंव स्फूर्ति बांधली हांव। इये मती॥ २३८॥**
**तरि कैसेनि ययातें गाळावें। म्हणोनि पडिलें बोलावें। तेवींचि तुवांही जाणावें। ऐसा भावो॥ २३९॥**
**बहुतकरूनि किरीटी। हाचि विषयो इये गोष्टी। एऱ्हवीं कां आडवाटीं। धांविजैल॥ २४०॥**
**आणि स्वमताचिया निर्धारा-। लागोनियां धनुर्धरा। प्राप्तां मतांतरां। निर्वेच कीजे॥ २४१॥**
**ऐसी हे अवधारीं। निरूपिती परी। आतां ययावरी। मुख्य जें गा॥ २४२॥**
**तें स्वमत बोलिजेल। अहिंसे रूप कीजैल। जिया उठलिया आंतुल। ज्ञान दिसे॥ २४३॥**
**परि तें अधिष्ठिलेनि आंगें। जाणिजे आचरतेनि बागें। जैसी कसवटी सांगे। वानियातें॥ २४४॥**
**तैसें ज्ञानामनाचिये भेटी। सरिसेंचि अहिंसेचे बिंब उठी। तेंचि ऐसें किरीटी। परिस आतां॥ २४५॥**

**अर्थ**—प्रथम जेव्हा आम्ही लक्षण सांगण्याकरितां अहिंसेचें नांव घेतलें तेव्हा वरील मतांतील अहिंसेचा विचार एकदम मनांत आला आणि तीं सदोष लक्षणें वगळून अहिंसेचे शुद्ध लक्षण कसें करतां येईल, म्हणून इतरांनी केलेलीं अहिंसेचीं लक्षणे सांगावीं लागलीं व तुलाहि तीं समजावीं असा त्या सांगण्याचा अभिप्राय होता॥ २३८-२३९॥ अर्जुना! अहिंसेविषयींचीं इतर मतें सांगतांना विशेषत: हाच उद्देश मनांत होता, नाहीतर आडवाटेने जाण्याचें कारणच काय?॥ २४०॥ आणि अर्जुना! आपलेंच मत योग्य आहे, असा निश्चय होण्याकरितां त्याविषयीं असलेलीं दुसरीं मतेंहि सांगून त्यांतील दोष दाखवावे लागतात॥ २४१॥ याप्रमाणे अशीच विषय निरूपण करण्याची पद्धति आहे, हें लक्षांत ठेव. आतां अहिंसेविषयीं इतर मतें सांगितल्यानंतर ज्यांत स्पष्टपणे आत्मज्ञान दिसून येतें, असें जें मुख्य व आमचे मत आहे त्या मतानुसार अहिंसेचें स्वरूप प्रगट करणार आहे॥ २४२-२४३॥ पण ज्याप्रमाणे सोन्याचा कस कसोटी सांगते, त्याप्रमाणे अहिंसा आंगीं बाणली असतां ती आचरणाच्या द्वारा जाणली जाते॥ २४४॥ त्याप्रमाणे

ज्ञान व मन यांचा संबंध झाल्याबरोबर जें अहिंसेचें स्वरूप प्रगट होतें तें, अर्जुना, असें असते. आतां सांगतों, ऐक॥ २४५॥

**गूढार्थदीपिका**—आत्मस्वरूपाचे ठिकाणीं बुद्धि स्थिर करणें हा समाधि योग साधण्याकरितां योग्याने ''जातिदेशकालासमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम्'' (यो. सू. साधनपाद-३१) विवक्षित जातीची विवक्षित देशांत, विवक्षित कालीं, विवक्षित प्रसंगीं असा अहिंसेचा मर्यादित निर्बंध न वागवितां कोण्याहि जातीच्या प्राण्याची, कोण्याहि जागीं, कोण्याहि कालीं, कसाहि प्रसंग आला तरी, कायावाचामनाने कोण्याहि प्राण्याला दुःख देणार नाही असा निर्बंध वागवून अहिंसा महाव्रताचें पालन करावें, असें पातंजलयोगसूत्रांत सांगितले आहे.

योगशास्त्राच्या मतें जगत्सत्य असल्यामुळे योग्यांना या अहिंसा महाव्रताचें अत्यंत दक्षतेने पालन करावें लागतें; पण अद्वैत आत्मज्ञान व जगन्मिथ्यात्व हीं दोन्ही ज्याच्या ठिकाणीं दृढ झालीं आहेत, त्यांना आपल्याहून निराळा असा आपल्या विरोधि पदार्थच दिसत नसल्यामुळे त्यांच्या ठिकाणीं कोणाला दुःख देण्याची वृत्तिच कधीं उत्पन्न होत नाही; म्हणून त्यांना हे अहिंसात्मक महाव्रत सहज साधते.

कांही महात्म्यांविषयीं त्यांनी लोकांना दंड केल्याच्या पुराणादिकांतून ज्या कथा आढळून येतात, त्यांत त्यांच्या पापरूप प्रारब्धामुळे त्यांच्याकडून माहात्म्यांच्या झालेल्या अवमानरूप भंयकर पापांचें फल त्या पुरुषांना मिळूं नये, म्हणून त्या पुरुषांच्या कल्याणाकरितांच आईबापाप्रमाणे कनवाळु होऊन व अल्प दंडाची योजना करून शेवटीं त्यांना भगवत्प्राप्तीचें सुख दिलें आहे.

ज्ञानी पुरुषाला दुःखच होत नाही व झालें तरी तें आपल्या प्रारब्धकर्मावांचून दुसऱ्या कोणालाहि त्या दुःखाबद्दल जबाबदार धरीत नाहीत; म्हणून त्यांचे ठिकाणीं कोणाला दुःख देण्याची वृत्तिच उठत नाही.

**तरि तरंगु नोलांडितु। ल्हरी पायें न फोडितु। सांचलु न मोडितु। पाणियाचा॥ २४६॥**
**वेगें आणि लेसा। दिठी घालूनि आंविसा। जळीं बकु जैसा। पाऊल सुये॥ २४७॥**
**कां कमळावरी भ्रमर। पाय ठेविती हळुवार। कुचुंबैल केसर। इया शंका॥ २४८॥**
**तैसें परमाणु पा गुंतले। जाणूनि जीव सानुले। कारुण्यामाजीं पाउलें। लपवूनि चाले॥ २४९॥**
**ते वाट कृपेची करितु। ते दिशाचि स्नेहा भरितु। जीवातळीं आंथरितु। आपुला जीवु॥ २५०॥**

**अर्थ**—तरंगाला ओलांडून न जातां व तो पायाने न फोडतां आणि पाण्याचा सांठा न हालूं देतां ज्याप्रमाणे बगळा आपल्या भक्ष्याकडे दृष्टि देऊन वेगाने, पण हळु, पाण्यावर पाय ठेवतो॥ २४६-२४७॥ किंवा कमळावरील परागाचे कोमल तंतु चुरगळले जातील अशी शंका घेऊन ज्याप्रमाणे भ्रमर, कमळावर अत्यंत कोमलपणाने पाय ठेवतो॥ २४८॥ त्याप्रमाणे परमाणु-परमाणूंत सूक्ष्म जीव भरले आहेत; म्हणून जे आपल्या चरणाला करुणेने आच्छादन करून-म्हणजे त्या सूक्ष्म जीवाला देखील यत्किंचित् दुःख होऊं नये अशी अंतःकरणांत दयावृत्ति बाळगून-जमिनीवर पाय ठेऊन चालतात॥ २४९॥ ते चालतांना संपूर्ण चालण्याचा मार्ग कृपेचा करून टाकतात, संपूर्ण दिशा प्रेमाने भरून टाकतात आणि जीवातळीं आपला जीव आंथरतात-म्हणजे ज्ञानी पुरुषाचे अंतःकरणांत दुसऱ्याच्या जीवाविषयीं आपल्या जीवापेक्षांहि अधिक कळवळा असतो॥ २५०॥

**गूढार्थदीपिका**—मनुष्याच्या अंतःकरणांत काम, क्रोध इत्यादि विकार स्वभावतःच आहेत व त्याला धरूनच त्याच्या क्रिया होत असतात. त्याच्या प्रेममूलक क्रियेने दुसऱ्यांना सुख होतें व दुःख देणाऱ्या द्वेषमूलक क्रियेने दुसऱ्यांना दुःख होतें. प्राणिमात्रांविषयीं त्यांच्या अंतःकरणांत एक प्रेमवृत्तिच असते; म्हणून त्यांची कोणतीहि क्रिया कोणत्याहि जीवाला दुःखदायक होत नाही.

**ऐसिया जतना। चालणें जया अर्जुना। हें अनिर्वाच्य परिमाणा। पुरिजेना॥ २५१॥**
**पैं मोहाचेनि सांगडें। लासी पिलें धरी तोंडें। तेथ दांतांचे आगरडे। लागती जैसे॥ २५२॥**
**कां स्नेहाळु माये। तान्हयाची वास पाहे। तिये दिठी आहे। हळुवार जें॥ २५३॥**

**ना ना कमळदळें। डोलविजती ढाळ ढाळें। तो जेणें पाडें बुबुळें। वारा घेपे॥ २५४॥**
**तैसेनि मार्दवें पाय। भूमीवरी न्यसीत जाय। लागती तेथ होय। जनां सुख॥ २५५॥**

**अर्थ**—अर्जुना! अशाप्रमाणे ज्याचें अत्यंत जपून चालणें असतें, तें त्याचें प्रेम अमर्याद असतें म्हणून शब्दाने सांगतां येत नाही॥ २५१ ॥ मांजरी प्रेमाने आपल्या पिलांना तोंडांत धरते तेव्हा तिच्या दांतांचीं टोंकें त्या पिलांना जशीं लागतात॥ २५२ ॥ किंवा प्रेमळ आई आपल्या तान्हुल्याला जेव्हा दृष्टीने पाहते तेव्हा त्या दृष्टींत जें कोमळ प्रेम असतें॥ २५३ ॥ किंवा एक एक पाकळी अशा क्रमाक्रमाने कमळाच्या पाकळ्या हालवून वारा घेतला असतां तो वारा बुबुळांना जितका कोमल व सुखकर वाटतो॥ २५४॥ तितक्याच कोमल अंत:करणाने तो जमिनीवर पाय ठेवित असतो; म्हणून ते पाय जेथें पडतात तेथील जीवांना सुखच होत असतें॥ २५५॥

**गूढार्थदीपिका—लागती तेथ होय। जीवां सुख**—"जात्यन्तर परिणामप्रकृत्यापूरात्" (यो. सू. कैवल्यपाद) तपश्चार्यादिकांनी दुसऱ्या जातीच्या प्रकृतीचा पुरवठा झाल्यामुळे ह्याच जन्मांत शरीराची पूर्वप्रकृति दुसऱ्या जातीच्या प्रकृतींत परिणाम पावते-म्हणजे शरीराचें धर्म बदलून जातात-असें योगसूत्र आहे.

अज्ञानी पुरुषाला 'माझा देह जड आहे' या दृढ विपरीत समजुतीमुळे त्याचा देह जड व भारी झाला असून त्या देहाखालीं सांपडलेल्या जीवाला दु:ख होतें; पण ज्ञानानंतर देहादि पदार्थ वस्तुत: नाहीत, भासमात्र आहेत, या खऱ्या यथार्थ समजुतीमुळे व जीवाविषयीं असलेला अत्यंत कळवळा इत्यादि सात्त्विकवृत्तीमुळे ज्ञान्याच्या पूर्व जड अशा देहाचा जात्यंतर परिणाम होतो—म्हणजे त्याच्या देहाची जड-तम प्रकृति नाहीशी होऊन तिच्या जागीं अत्यंत हलकी व सुकुमार अशा सात्त्विक प्रकृतीचा पुरवठा होतो; म्हणून त्याच्या पायादि अवयवांखालीं सांपडलेल्या जीवांना दु:ख न होतां अत्यंत सुख वाटतें.

**ऐसिया लघिमा चालतां। कृमि कीटक पांडुसुता। देखे तरि माघौता। हळूचि निघे॥ २५६॥**
**म्हणे पावो धडफडील। तरि स्वामीची निद्रा मोडेल। रचलेपणा पडैल। झोती हन॥ २५७॥**
**इया काकुळती। वाहणी घे माघौती। कोणेही व्यक्ती। न वचे वरी॥ २५८॥**
**जीवाचेनि नांवें। तृणातेंहि नोलांडवे। मग न लेखितां जावें। हें कें गोठी॥ २५९॥**
**मुंगिये मेरु नोलांडवे। मशका सिंधु न तरवे। तैसा भेटलियां न करवे। अतिक्रमु॥ २६०॥**
**ऐसी जयाची चाली। कृपा फुलीं फळा आली। देखसी जियाली। दया वाचे॥ २६१॥**

**अर्थ**—अशा रीतीने हलक्या पायाने चालत असतांना, अर्जुना! कृमी, कीटक दृष्टीस पडले तर तो तितक्याच हळुवारपणाने परत फिरतो॥ २५६ ॥ तो म्हणतो, धडपड करीत पाय टाकल्यास त्या आवाजाने माझ्या प्रभूची सुखनिद्रा मोडेल व असलेल्या शरीरस्थितीला कदाचित् धक्का लागेल॥ २५७॥ अशा कोमल वृत्तीनेच पुढें न जातां तो मागें परततो, आणखी कोण्याहि प्राण्यावर पाय पडूं देत नाही॥ २५८ ॥ सर्वत्र जीव भरला आहे, या ज्ञानामुळे त्याच्याच्याने गवताला देखील ओलांडून जाववत नाही, मग प्राणी दृष्टीस पडला असतां त्याला तुच्छ समजून त्याच्याकडे न पाहतां जाण्याची गोष्ट दूरच राहिली॥ २५९ ॥ मुंगीला मेरुपर्वत ओलांडून जाववत नाही, किंवा चिलटाला समुद्र तरून जाववत नाही, त्याप्रमाणे भेटलेल्या प्राण्याला अनादराने उल्लंघन करून ज्याला जाववत नाही॥ २६० ॥ चालण्यांत ज्याची कृपा याप्रमाणे फुलून फळाला आली आणि वाणीचे ठिकाणीं मूर्तिमंत दया जीवंत आहे, असें पाहशील॥ २६१ ॥

**स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार। मुख मोहाचें माहेर। माधुर्या जाहलें अंकुर। दशन तैसे॥ २६२॥**
**पुढां स्नेह पाझरे। मागां चालती अक्षरें। शब्द पाठीं अवतरे। कृपा आधीं॥ २६३॥**
**तंव बोलणेंचि नाहीं। बोलों म्हणे जरी कांहीं। तरि बोल कोणाही। खुपेल कां॥ २६४॥**
**बोलतां अधिकुही निघे। तरि कोण्हाही वर्मी न लगे। आणि कोण्हासि न रिघे। शंका मनीं॥ २६५॥**
**मांडिली गोठी हन मोडैल। वासिपैल कोणी उडैल। आइकोनिचि बोवांडिल। कोण्ही जरी॥ २६६॥**
**तरी दुवाळी कोणा न व्हावी। भंवई कवणाची नुचलावी। ऐसा भावो जीवीं। म्हणोनि उगा॥ २६७॥**

**मग प्रार्थिला विपायें। जरि लोभें बोलों जाये। तरि परिसतया होये। मायबापु॥ २६८॥**
**कां नादब्रह्मचि मुसे आलें। कीं गंगापय असळलें। पतिव्रते आलें। वार्धक्य जैसें॥ २६९॥**
**तैसें साच आणि मवाळ। मितलें आणि रसाळ। शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे॥ २७०॥**

**अर्थ—**त्यावे श्वासोच्छ्वास देखील अत्यंत सुकुमार असतात व मुख केवळ प्रेमाचें माहेर असतें. त्याचे दांत म्हणजे जणुं गोडीला आलेले अंकुर होत॥ २६२॥ प्रथम हृदयांत प्रेमाचा पाझर फुटूनच मग त्याच्या मुखांतून अक्षरें निघत असतात, अगोदर, त्याला कृपा उत्पन्न होऊन मागाहून शब्द निघतात॥ २६३॥ तो सदा मौन धरूनच असतो, कारण तो विचार करतो की आपण बोलावें, तर आपलं बोलणें कोणाला खुपेल काय?॥ २६४॥ बोलतां बोलतां एखादा शब्द अधिक निघाला तर तो कोणाच्या वर्मी तर लागणार नाही व कोणाच्या मनांत शंका तर येणार नाही॥ २६५॥ आपल्या बोलण्याने कोणाच्या प्रतिपादनाचें कदाचित् खंडन होऊन ते भिऊन जातील किंवा कोणी आवेशाने निघून जातील किंवा कोणी ऐकून तें तुच्छ लेखतील॥ २६६॥ असे कोणाला कष्ट होऊं नये व कोणाची भुंवई उचलली जाऊं नये असा भाव त्याच्या मनांत असतो; म्हणून तो उगा राहतो॥ २६७॥ मग कदाचित् कोणी त्याने बोलावें म्हणून प्रार्थना केलीच आणि तो प्रेमाने बोलूं लागला असतां चित्त देऊन ऐकणाऱ्याला प्रत्यक्ष माझे मायबाप माझ्या हिताचा उपदेश करीत आहेत, असें वाटतें॥ २६८॥ किंवा नादब्रह्मच मुखरूपी मुशींत आलें किंवा गंगेचें पाणी अंगावर उसळून आलें किंवा पतिव्रतेला वार्धक्य यावें, त्याप्रमाणे ज्ञानीपुरुषाचे शब्द यथार्थ (हितकर) आणि कोमल, मोजके आणि रसाळ, जणुंकाय अमृताचे कल्लोळच, असे वाटतात॥ २६९-२७०॥

**गूढार्थदीपिका—नादब्रह्मचि मुसें आलें**-पदस्थध्यानाने बाह्याकाश चिदाकाश करून कोटी अजपाजपाने त्या आकाशांत शिवाच्या तांडवाचा किंवा गोपाळकृष्णाच्या वेणूचा जो नाद उठून सर्व नादमय होऊन जातें, तो नाद म्हणजे उघड ब्रह्मदर्शनच असल्यामुळे त्याला नादब्रह्म म्हटलें जातें. यालाच अनाहतनादहि म्हणतात. हा नाद ईश्वरानुग्रहरूप असल्यामुळे अवीट व अत्यंत सुखकारक असतो. या नादापासूनच वेदाची उत्पत्ति आहे, असें भागवतांत म्हटलें आहे.

येथे श्रीमाऊलींनी असें सुचविलें आहे की नादब्रह्म जसें ब्रह्माची अभिव्यक्ति करणारें असतें, तसेंच ज्ञान्याचे शब्द ऐकणाऱ्याला ते ब्रह्मप्रकाशक व आनंददायक होतात.

**गंगापय असळलें**—या गंगाजळाच्या उपमेने असें सूचित केलें की, गंगाजळ जसें थंड व पवित्र असल्यामुळे तें पापताप नाहिसें करणारें असतें, तसेंच ज्ञान्याचे शब्द ऐकणाऱ्याचे पापताप नाहीसे करणारे असतात.

**पतिव्रते आलें। वार्धक्य जैसें**-ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री लोकांच्या आदरास पात्र झालेलीं असते व तिला वार्धक्य आलें असतां ती परमादरास पात्र होते, त्याप्रमाणे ज्ञान्याचे शब्दहि ऐकणाऱ्याला अत्यंत आदरणीय वाटतात.

**विरोध वाद बळु। प्राणितापढाळु। उपहासु छळू। वर्मस्पर्शु॥ २७१॥**
**आटु वेगु विंदाणु। आशा शंका प्रतारणु। हे संन्यसिले अवगुणु। जया वाचा॥ २७२॥**
**आणि तयाचि परी किरीटी। थाउ जयाचिये दिठी। सांडिलिया भ्रुकुटी। मोकळिया॥ २७३॥**
**कां जे भूतीं वस्तु आहे। तिये रूपों शके विपायें। म्हणोनि वास न पाहे। बहुतकरूनि॥ २७४॥**
**ऐसाही कोणे एके वेळे। भीतरले कृपेचेनि बळें। उघडोनियां डोळे। दिठी घाली॥ २७५॥**
**तरि चंद्रबिंबौनि धारा। निघतां नव्हती गोचरा। परि एकसरें चकोरां। निघती दोंदें॥ २७६॥**
**तैसें प्राणियांसि होये। जरी तो काही वास पाहे। तया अवलोकनाची सोये। कूर्मीही नेणे॥ २७७॥**
**किंबहुना ऐसी। दिठी जयाची भूतांसी। करही देखसी। तैसेचि ते॥ २७८॥**

**अर्थ—**कारण त्याच्या वाणींतून निघालेल्या शब्दांत विरोध करणें, वाद उत्पन्न करणें, बळ दाखविणें, प्राण्यांना दुःख देण्याची प्रवृत्ति, उपहास, छळ, वर्मी लागणें, हट्ट, आवेश, कपट, आशा, शंका, फसविणें हे दुर्गुण कधींच नसतात॥ २७१-२७२॥ आणि त्याचप्रमाणे अर्जुना! भृकुटी मोकळ्या सोडल्यामुळे ज्याची दृष्टि बाहेर न निघतां

जेथल्या तेथेच स्थिर झाली आहे॥ २७३॥ असें वाटतें की भूतमात्रांत आत्मवस्तु भरली असल्यामुळे बाहेर दृष्टि टाकली असतां ती कदाचित् त्यांना बोचेल म्हणून तो बहुतकरून बाहेर दृष्टि करीत नाही॥ २७४॥ असें असूनहि एखादे वेळीं अंत:करणांत असलेल्या कृपेमुळे तो डोळे उघडून व बाहेर दृष्टि करून पाहूं लागला॥ २७५॥ तर ज्याप्रमाणे चंद्रबिंबापासून अमृताच्या धारा निघाल्या असतां त्या लोकांच्या दृष्टीस पडत नाहीत, पण चकोर पक्ष्यांचीं मात्र पोटें भरून ते एकसारखे पुष्ट होत राहतात त्याप्रमाणे प्राण्यांना सुख प्राप्त होतें. जर एखाद्या वस्तूकडे त्याने दृष्टि टाकली तर त्याच्या दृष्टींतील प्रेम कूर्मीहि करूं जाणत नाही॥ २७६-२७७॥ फार काय सांगावें! सर्व प्राणीमात्रांकडे ज्याची अशी प्रेमदृष्टि असते तसेच त्याचे हातहि तुला दिसून येतील॥ २७८॥

**तरी होऊनियां कृतार्थ। राहिले सिद्धाचे मनोरथ। तैसे जयाचे हात। निर्व्यापार॥ २७९॥**
**अक्षमें आणि संन्यासिलें। कां निरिंधन आणि विझालें। मुकेनि घेतलें। मौन जैसें॥ २८०॥**
**तयापरी कांहीं। जयां करां करणें नाहीं। जे अकर्तयाच्या ठायीं। बैसों येती॥ २८१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे कृतार्थ झाल्यामुळे सिद्धांना मनोरथ उत्पन्न होत नाहीत, त्याप्रमाणे ज्याचे हात व्यापारच करीत नाहीत॥ २७९॥ ज्याप्रमाणे कर्म करण्यास मुळीं असमर्थ आहे आणि संन्यास घेतला किंवा अग्नींत काष्ठेंच नाहीत आणि विझला किंवा आधींच मुका आणि वर त्याने मौन घेतले॥ २८०॥ त्याप्रमाणे ज्या हातांकडून कांहीच व्यापार होत नाहीत म्हणून जे अकर्ते होऊन बसले आहेत॥ २८१॥

**गूढार्थदीपिका**—आत्माकार अवस्था व व्युत्थान अवस्था, अशा ज्ञानाच्या दोन अवस्था आहेत, सर्वत्र घनदाट एक अस्फुट, अद्वैत, सच्चिदानंद परब्रह्मवस्तुच भरली आहे, असा अनुभव आलेल्या ज्ञान्याच्या ठिकाणीं जेव्हा त्याची वृत्ति आत्माकार राहते, तेव्हा एका परब्रह्मवस्तूवांचून दुसऱ्या कोणत्याहि वस्तुच्या अस्तित्वाची जाणीवच स्फुरत नसल्यामुळे त्याला देह, देहाचे अवयव, त्यांचीं कर्मे व कर्तृत्व यांच्या अस्तित्वाचें आपणहून कधीं ज्ञानच होत नाही व तो आत्माकार अवस्थेंत आपल्या आत्मस्वरूपाप्रमाणेच केवळ निर्व्यापार असतो.

**आसुडैल वारा। नख लागेल अंबरा। इया बुद्धी करां। चळों नेदी॥ २८२॥**
**तेथ आंगावरिलीं उडवावीं। कां डोळां रिगतें झाडावीं। पशुपक्ष्यां दावावी। त्रासमुद्रा॥ २८३॥**
**इया केउतिया गोठी। नावडे दंड काठी। मग शस्त्राचें किरीटी। बोलणें कें॥ २८४॥**
**लीलाकमळें खेळणें। कां पुष्पमाळा झेलणें। न करी म्हणे गोफणें। ऐसें होईल॥ २८५॥**
**हालवतील रोमावळी। यालागीं आंग न कुरवाळी। नखांची गुंडाळी। बोटांवरी॥ २८६॥**
**तंव करणेयाचाचि अभावो। परि ऐसाही पडे प्रस्तावो। तरि हातां हाचि सरावो। जे जोडिजती॥ २८७॥**

**अर्थ**—जो वाऱ्याला झटका बसेल किंवा आकाशाला आपलें नख लागेल अशा बुद्धीने हाताची हालचाल होऊं देत नाही॥ २८२॥ अशा स्थितींत आंगावर बसलेल्या प्राण्यांना हातांनी उडवावें किंवा डोळ्यांत जाणाऱ्या प्राण्यांना झाडावें, पशुपक्ष्यांना भीति वाटेल अशी रागीट मुद्रा दाखवावी॥ २८३॥ ह्या गोष्टी कोठून होणार! जेथें हातीं दंड, काठी घेणें आवडत नाही, तेथें मग अर्जुना! शस्त्राचें नांवच घेणें नको॥ २८४॥ सहज कमल घेऊन खेळूं लागणें किंवा पुष्पमाळा झेलणें, हें देखील गोफण मारण्यासारखें दु:खदायक होईल, असें म्हणून जो कांही करत नाही॥ २८५॥ रोमावळी हालविली जाऊन रोमांत असलेल्या जीवांना दु:ख होईल; म्हणून जो आंगदेखील कुरवाळीत नाही आणि बोटांवर नखांची गुंडाळी होऊं देतो॥ २८६॥ याप्रमाणें कर्म करण्याचाच अभाव असतो; पण असें असतांहि प्रारब्धाने होणाऱ्या व्युत्थान अवस्थेंत हातांकडून कर्म होण्याचा प्रसंग आला असतां त्याच्या हाताला साधकदशेपासून हात जोडण्याचा किंवा नमस्कार करण्याचाच अभ्यास झालेला असतो॥ २८७॥

**गूढार्थदीपिका**—प्रारब्धाने वृत्तीची आत्माकारता नाहीशी होऊन, पण अद्वैतब्रह्मस्थितीची जाणीव राहून जेव्हा देहादिकांचा व त्यांच्या व्यापाराचा मिथ्या भास भासूं लागतो, तेव्हा त्या स्थितीला व्युत्थान अवस्था म्हटली जाते. या अवस्थेंत ज्ञान्याला आपल्या जीवदशेचा व इतर जीवाचा भास होत असल्यामुळे ज्ञानदृष्टीने इतर जीवाशीं वागण्याची त्याची प्रवृत्ति येथें दाखविली आहे.

**कां नाभिकारा उचलिजें। हातु पडिलिया देइजे। नातरि आर्तातें स्पर्शिजे। अळुमाळु॥ २८८॥**
**हेंही उपरोधें करणें। तरी आर्तभय हरणें। नेणती चंद्रकिरणें। जिव्हाळा तो॥ २८९॥**
**पावोनि तो स्पर्शु। मलयानिळु खरपुसु। येणें मानें पशु। कुरवाळणें॥ २९०॥**
**जे सदा रिते मोकळे। जैशीं चंदनांगें शीतळे। न फळतांही निर्फळें। होतीचि ना॥ २९१॥**
**आतां असो हें वाग्जाळ। जाणें तें करतळ। सज्जनाचें शीळ। स्वभाव जैसें॥ २९२॥**

**अर्थ**—किंवा तो अभय देण्याकरितां हात उचलतो किंवा पडलेल्याला हात देतो अथवा अत्यंत दुःखीजनाला आपल्या हातांनी हळुच स्पर्श करतो॥ २८८॥ एवढें करणें देखील, यापेक्षा अधिक कांही करतां येत नाही, म्हणून नाइलाजाने करतो, तरी त्याच्या अंतःकरणांत दुःखितांचे दुःख निवारण करण्याचा जो जिव्हाळा असतो तो चंद्राच्या किरणालाहि माहित नाही॥ २८९॥ हाताचा स्पर्श प्राप्त झाला असतां मलयपर्वतावरील चंदनाने सुगंधित झालेला वायु देखील खरखरित वाटेल, इतक्या कोमल हाताने तो पशुला कुरवाळतो॥ २९०॥ ज्याप्रमाणे चंदनाचें सर्व अंग शीतळ असल्यामुळे फळ येत नाही तरी तें निरुपयोगी होत नाही, त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाचे हातहि सदां रिकामे व मोकळे असले तरी ते निरुपयोगी होत नाहीत. (त्यांनी कृपेने मस्तकावर हात ठेवला असतां त्यांच्या कृपेने सर्व मनोरथ पूर्ण होतात)॥ २९१॥ आतां हें बहु बोलणें पुरें, जसें सज्जनाचें शील व स्वभाव असतो त्याप्रमाणेच त्याचे हातहि असतात, असें समज॥ २९२॥

**आतां मन तयाचें। सांगों म्हणों जरी साचें। तरी सांगितले कोणाचे। विलास हे॥ २९३॥**
**काइ शाखा नव्हे तरु। जळेंवीण असे सागरु। तेज आणि तेजाकारु। आन काई॥ २९४॥**
**अवयव आणि शरीर। हे वेगळाले काय कीर। कीं रसु आणि नीर। सिनानीं आथी॥ २९५॥**
**म्हणोनि हे जे सर्व। सांगितले बाह्यभाव। ते मनचि गा सावयव। ऐसें जाणें॥ २९६॥**
**जें भुई बीज खोंविलें। तेंचि वरी रुख जाहलें। तैसें इंद्रियद्वारा फांकलें। तें अंतरचि॥ २९७॥**
**पैं मानसींचि जरी। अहिंसेची अवसरी। तरी कैंची बाहेरी। वोसंडेल कीं॥ २९८॥**
**आवडे ते वृत्ती किरीटी। आधीं मनौनी चि उठी। मग ते वाचे दिठी। करांसि ये॥ २९९॥**
**वांचूनि मनींचि नाहीं। तें वाचेसि उमटेल काई। बीजेंवीण भुईं। अंकुर असे॥ ३००॥**
**उगमींचि वाळुनि जाये। तें वोघीं कैचें वाहे। जीवु गेलिया आहे। चेष्टा देहीं॥ ३०१॥**
**म्हणोनि मनपन जैं मोडे। तैं इंद्रिया आधींचि उबडें। सूत्रधारेंवीण साइखडें। वावो जैसें॥ ३०२॥**
**तैसें मन हें पांडवा। मूळ यया इंद्रियभावां। हेंचि राहटे आघवां। द्वारीं इहीं॥ ३०३॥**
**परि जिये वेळीं जैसें। जें होऊनि आंतु असे। बाहेरि ये तैसें। व्यापाररूपें॥ ३०४॥**
**यालागीं साचोकारें। मनीं अहिंसा थांवे थोरें। जैसी पिकली द्रुती आदरें। बोभात निघे॥ ३०५॥**
**म्हणोनि इंद्रियें तेचि संपदा। वेचितांही उदावादा। अहिंसेचा धंदा। करितें आहाती॥ ३०६॥**
**समुद्रीं दाटे भरितें। तैं समुद्रचि भरी तरियांतें। तैसें स्वसंपत्ती चित्तें। इंद्रियां केलें॥ ३०७॥**
**हें बहु असो पंडितु। धरूनि बाळकाचा हातु। वोळी लिही सुव्यक्तु। आपणचि॥ ३०८॥**
**तैसें दयाळुत्व आपुलें। मनें हातापायां आणिलें। मग तेथ उपजविलें। अहिंसेतें॥ ३०९॥**
**याकारणें किरीटी। इंद्रियांचिया गोठी। मनाचियेंचि राहाटी। रूप केलें॥ ३१०॥**
**ऐसा मनें देहें वाचा। सर्व संन्यासु दंडाचा। जाहला ठायीं जयाचां। देखशील॥ ३११॥**
**तो जाण वेल्हाळ। ज्ञानाचें वेळाउळ। हें असो निखळ। ज्ञानचि तो॥ ३१२॥**

**अर्थ**—आतां त्याचें मन कसें असतें तें सांगतों, असें जर म्हणूं तर आतापर्यंत ज्या सुंदर वागणुकीचें वर्णन केलें, ती वागणूक कोणाची?॥ २९३॥ फांद्या वृक्ष नव्हेत काय? पाण्याहून समुद्र निराळा असतो काय? प्रकाश आणि दिवा निराळा म्हणतां येतो काय?॥ २९४॥ अवयव आणि शरीर हे खरोखरच वेगवेगळे आहेत काय? किंवा

पाणी आणि त्याचा रसगुण हे निराळे आहेत?॥ २९५॥ म्हणूनच आतापर्यंत हे जे सर्व ज्ञान्याच्या शरीराचे भाव सांगितले ते सर्व अवयवधारी मनच होय, असें समज॥ २९६॥ जमिनींत जें बी पेरले तेंच वर वृक्षरूपाने वाढलें, त्याप्रमाणे आंतील मनच बाहेर इंद्रियांच्या द्वारा व्यापाररूपाने विस्तार पावतें॥ २९७॥ आणि मनांतच जर अहिंसेचा अभाव असेल तर बाहेर ती कोठून प्रगट होणार?॥ २९८॥ अर्जुना! कोणतीहि वृत्ति आधीं मनांतच उठते व मग ती वाणी, दृष्टि, हात यांच्या ठिकाणीं प्रगट होते॥ २९९॥ मनांत असल्यावांचून ती वाणीवर कशी प्रगट होणार? जमिनींत बी नसतां अंकुर येतो काय?॥ ३००॥ म्हणून ज्याप्रमाणे नाचविणाऱ्यावांचून बाहुल्या व्यापारहीन असतात, त्याप्रमाणे मनाचें मनपण नाहीसें झालें असतां इंद्रियें आधींच व्यापारहीन अशीं रिकामीं असतात॥ ३०१॥ उगमाचे ठिकाणींच नदी कोरडी झाली, तर ती पुढें प्रवाहरूपाने कशी वाहणार? जीव निघून गेल्यानंतर देहाचे ठिकाणीं हालचाल असते काय?॥ ३०२॥ त्याप्रमाणे, हे अर्जुना! मन हें सर्व इंद्रियांच्या राहाटीला मूळ कारण आहे तेंच सर्व इंद्रियांच्या द्वारा व्यापार करीत असतें॥ ३०३॥ पण मन आंत ज्यावेळीं जसें होऊन असतें, तसेंच तें बाहेर व्यापाररूपाने प्रगट होतें॥ ३०४॥ म्हणून ज्याप्रमाणे पिकलेल्या फळाचा वास बाहेर प्रगट होतो, त्याप्रमाणे खरोखर चित्तांत स्थिर बाणलेली अहिंसाच बाहेर इंद्रियांच्या व्यापाररूपाने व्यक्त होते॥ ३०५॥ म्हणून इंद्रियें, मनाची तीच अहिंसारूप संपत्ति खर्च करून पूर्णपणें आपल्या अहिंसेचा धंदा करीत असतात॥ ३०६॥ समुद्रांत जोराची भरती आली असतां, ज्याप्रमाणे समुद्राच्या तीरावरील खळग्यांत समुद्रच भरला जातो, त्याप्रमाणे चित्तच आपल्या गुणसंपत्तीने इंद्रियांत भरून राहते॥ ३०७॥ हा विस्तार पुरे. ज्याप्रमाणे पंतोजी मुलाचा हात धरून आपणच सुस्पष्ट अक्षरांच्या ओळी लिहितो॥ ३०८॥ त्याप्रमाणे मनाने आपलें दयालुत्व आपल्या हातापायाच्या ठिकाणीं आणून तेथें अहिंसेला उत्पन्न केलें असतें॥ ३०९॥ म्हणून, अर्जुना! इंद्रियांचा व्यापार सांगून मानसिक अहिंसेचें स्वरूप स्पष्ट केलें॥ ३१०॥ याप्रमाणे कायावाचामनाने कोण्याहि प्राण्याला कशाहि प्रकारचें दु:ख देण्याचें सोडून दिलें, असें ज्याच्या ठिकाणीं तूं पाहशील॥ ३११॥ तो ज्ञानाचें सुंदर मंदीर होय, असें जाण. एवढेंच काय? तो केवळ ज्ञानच होय॥ ३१२॥

**जे अहिंसा कानें ऐकिजे। ग्रंथाधारें निरूपिजे। ते पाहावी हें उपजे। तैं तोचि पाहावा॥ ३१३॥**
**ऐसें म्हणितलें देवें। तें बोलें एकें सांगावें। परि फांकला हें उपसाहावें। तुम्हीं मज॥ ३१४॥**
**म्हणाल हिरवे चारीं गुरुं। विसरे मागील मोहर धरूं। कां वारेलगें पांखिरूं। गगनीं भरे॥ ३१५॥**
**तैसिया प्रेमाचिया स्फूर्ती। फावलिया रसवृत्ती। वाहविला मती। आकळेना॥ ३१६॥**
**तरि तैसें नोहे अवधारा। कारण आहे विस्तारा। एऱ्हवी पद तरी अक्षरां। तिहींचेंचि॥ ३१७॥**

**अर्थ**—जी अहिंसा आपण कानाने ऐकतो किंवा ग्रंथाच्या आधाराने सांगितली जाते, ती प्रत्यक्ष पाहावी, असें जेव्हा मनांत येईल, तेव्हा त्यालाच (ज्ञान्यालाच) पहावें॥ ३१३॥ असें भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला म्हटलें, हें भगवंताचें म्हणणें एका शब्दाने सांगायचें, पण विस्तार झाला, त्याबद्दल तुम्ही मला क्षमा करावी॥ ३१४॥ कदाचित् म्हणाल की, जनावर हिरव्या चाऱ्यावर चरत असतांना तें मागें परत जाणें विसरतें किंवा वाऱ्याच्या वेगांत सांपडलेला पक्षी आकाशांतच भराऱ्या मारतो॥ ३१५॥ त्याप्रमाणे प्रेमाच्या वेगाने रसोत्पत्ति होऊन माझी वाहावलेली बुद्धि आवरली गेली नाही॥ ३१६॥ तर ऐका, तसें नव्हे. विस्तार होण्याला कारण आहे. एरव्ही पाहतां अहिंसा हे पद तीन अक्षरांचेंच आहे॥ ३१७॥

**अहिंसा म्हणतां थोडी। परि तेचि हे होय उघडी। जैं लोटिजती कोडी। मतांचिया॥ ३१८॥**
**एऱ्हवीं प्राप्तें मतांतरें। थातंबूनि आंगभरें। बोलिजैल तें न सरे। तुम्हांपाशीं॥ ३१९॥**
**रत्नपारखियांचां गांवीं। जाईल गंडकी तरि सोडावी। काश्मीरीं न करावी। मिडगण जे॥ ३२०॥**
**काइसा वासु कापुरा। मंद जेथ अवधारा। पिठाचा विकरा। तिये सातें॥ ३२१॥**
**म्हणोनि इये सभे। बोलकेपणाचेनि क्षोभें। लागसर न लभे। बोला प्रभु॥ ३२२॥**

**सामान्या आणि विशेषा। सकळे कीजेल देखा। तरि कानाचेया मुखा-। कडे न्याल ना तुम्ही॥ ३२३॥**
**शंकेचेनि गदळे। जैं शुद्ध प्रमेय मैळे। तैं मागुतियां पाउलीं पळे। अवधान येतें॥ ३२४॥**
**कां करूनि बाबुळियेची बुंथी। जळें जियें ठाती। तयांची वास पाहाती। हंस काई॥ ३२५॥**
**कां अभ्रापैलीकडे। जैं येत चांदिणें कोडें। तैं चकोरें चांचुवडें। उचलिती ना॥ ३२६॥**
**तैसें तुम्ही वास न पाहाल। ग्रंथु नेघा वरि कोपाल। जरी निर्विवाद नव्हैल। निरूपण॥ ३२७॥**
**न बुझावितां मतें। न फिटे आक्षेपाचें लागते। तें व्याख्यान जी तुमतें। जोडूनि नेदी॥ ३२८॥**
**आणि माझें तंव आघवें। ग्रंथन येणेंचि भावें। जे तुम्हीं संतीं होआवें। सन्मुख सदा॥ ३२९॥**

**अर्थ**—आणि अहिंसा म्हणतांना तीन अक्षरांचा एक छोटासा शब्द दिसतो, पण इतर अनेक मतांच्या चळथीचें परीक्षण करून खंडण. केल्यासच तिचा अर्थ किंवा रूप स्पष्ट होणें शक्य आहे॥ ३१८॥ नाही तर, इतर मतें प्राप्त असतां, तीं तशीच ठेऊन अहिंसेचे पुष्कळ वर्णन केलें, तर तसें करणें तुमच्याजवळ चालणार नाही॥ ३१९॥ रत्नाची परीक्षा करणाऱ्यांच्या गांवात गंडकी नदींतील शीळा खपेल तर ती विकायला मांडावी; पण तेथें संगमरवरी दगड विकण्याची लुडबुड करूं नये॥ ३२०॥ हे पहा! या कापराला काय वास आहे—म्हणजे कांहीच वास नाही-असें म्हणून जेथें कापराची विक्रीच मंद होते, तेथें त्याच्या मिश्रणाने पिठाची, कापूर म्हणून, विक्री होईल काय?॥ ३२१॥ म्हणून या तुमच्या सज्जन श्रोत्यांच्या समोर केवळ बोलकेपणाचाच आदेश दाखविल्यास माझ्या बोलण्याला तुमची जवळीक लाभणार नाही. (म्हणजे माझ्या बोलण्याकडे आपण लक्षच देणार नाही)॥ ३२२॥ बोलण्यांत सामान्य आणि विशेष असा भेद न दाखवितां दोहोंची भेसळ झाल्यास माझें बोलणें तुम्ही कानाच्या द्वारापाशीं देखील येऊं देणार नाही॥ ३२३॥ जेव्हा शुद्ध सिद्धान्त नाना शंकांनी युक्त होऊन गढूळ होतो, तेव्हा श्रोत्यांचें अवधान तेथें राहूं शकत नाही, तें मागल्या पायींच परत फिरतें॥ ३२४॥ किंवा ज्या पाण्यांत शेवाळाच्या गुंडाळ्या (दाट शेवाळें) झाल्या आहेत त्या पाण्याकडे हंस कधीं दृष्टि देतात काय?॥ ३२५॥ किंवा जेव्हां चंद्राचा प्रकाश अभ्राच्या पलीकडे राहतो, तेव्हा चकोर पक्षी आपली चोंच उघडित नाही॥ ३२६॥ त्याप्रमाणे निरूपण निर्दोष झालें नाही तर, तुम्ही तिकडे लक्ष देणार नाही, ग्रंथ हातीं धरणार नाही, शिवाय रागवाल॥ ३२७॥ इतर मतांचा विचार केला नाही, तर येणाऱ्या आक्षेपांचें निरसन होणार नाही आणि असें केलेलें व्याख्यान तुमची प्राप्ति करून देणार नाही॥ ३२८॥ आणि तुम्ही सज्जन श्रोत्यांनी सदासर्वदा माझ्या सन्मुख होऊन श्रवण करावें, या एका उद्देशानेच मी ग्रंथाची रचना करीत आहे॥ ३२९॥

**एऱ्हवीं तरी साचोकारें। तुम्ही गीतार्थाचे सोइरे। जाणोनि गीता जीवसरे। धरिली मियां॥ ३३०॥**
**जें आपुलें सर्वस्व द्याल। मग इयेतें सोडवूनि न्याल। म्हणोनि ग्रंथु नव्हे बोल। साचचि हे॥ ३३१॥**
**कां सर्वस्वाचा लोभु धरा। बोलीचा अव्हेरु करा। तरि गीते मज अवधारा। एकचि गती॥ ३३२॥**
**किंबहुना मज। तुमचिया कृपा काज। तियेलागीं व्याज। ग्रंथाचें केलें॥ ३३३॥**
**तरि तुम्हां रसिकांजोगें। व्याख्यान शोधावें लागे। म्हणूनि मतांगें। बोलों गेलों॥ ३३४॥**
**तंव कथेसि पसरू जाहला। श्लोकार्थ दूरि गेला। कीजो क्षमा यया बोला। अपत्या मज॥ ३३५॥**
**आणि घांसाआंतिल हरळु। फेडितां लागे वेळु। तें दूषण नव्हे खडळु। सांडावा कीं॥ ३३६॥**
**कां संवचोरां चुकवितां। दिवस लागलिया माता। कोपावें कीं जीविता। जिताणें कीजे॥ ३३७॥**
**परि यावरील हें नव्हे। तुम्हीं उपसाहिलें तेंचि बरवें। आतां अवधारिजो देवें। बोलिलें ऐसें॥ ३३८॥**

**अर्थ**—नाही तरी तुम्ही खरोखर गीतार्थाचे जिव्हाळ्याचे सोयरे आहांत, हें जाणून मी गीता एकसारखी हृदयाशीं धरली आहे॥ ३३०॥ कारण, आपण आपलें मला सर्वस्व देऊन गीतेला सोडवून न्याल, असें मला वाटतें; म्हणूनच गीता केवळ ग्रंथ नसून तुमच्या कृपेचें खरोखर तारणच आहे॥ ३३१॥ किंवा इतक्यावरहि सर्वस्वाचा लोभ धरून तारण सोडवून न नेतां त्याचा अव्हेर कराल तर गीतेची व माझी एकच गति होणार, हे लक्षांत असूं द्या—म्हणजे

आपल्याकडून माझ्याबरोबर गीतेचाहि त्याग होईल॥ ३३२॥ काय सांगूं! माझ्यावर तुमची कृपा व्हावी, हेंच माझें साध्यकार्य आहे व त्याकरितांच मी ग्रंथरचनेचें निमित्त केलें॥ ३३३॥ म्हणून तुम्हां रसिकांना मान्य होईल असें निरूपण कसें होईल, याचा शोध करूं लागलों व म्हणून इतर मताचें निरूपण करीत गेलों; तेव्हा साहजिकच निरूपणाचा विस्तार झाला व श्लोकाचा अर्थ बाजूला राहिला. आपण मला लेंकराला या शब्दविस्ताराबद्दल क्षमा करावी॥ ३३४-३३५॥ आणि जेवतांना घासांत खडा लागला व तो काढतांना वेळ लागला, म्हणून दोष देतां येत नाही, कारण खडा काढलाच पाहिजे॥ ३३६॥ किंवा बरोबर प्रवास करीत असलेल्या चोरांना चुकविण्याकरितां दिवस लागले, म्हणून आईंनी रागवावे की (बाळ) जिवंत आला म्हणून त्याच्यावरून निंबलोण उतरावें॥ ३३७॥ पण माझ्या निरूपणाचा विस्तार वरप्रमाणे नव्हे; म्हणून तुम्ही क्षमा केलीं तर तेंच बरें होईल. आतां भगवान जें बोललें ते ऐका॥ ३३८॥

**म्हणे उन्मेषसुलोचना। सावध होईं अर्जुना। करूं तुज ज्ञाना। वोळखी आतां॥ ३३९॥**
**तरि ज्ञान गा तें एथें। वोळख तूं निरुतें। आक्रोशेंवीण जेथें। क्षमा असे॥ ३४०॥**
**अगाध सरोवरीं। कमळिणी जियापरी। कां सदैवाचिया घरीं। संपत्ति जैसी॥ ३४१॥**
**पार्था तेणें पाडें। क्षमा जयातें वाढे। तेही लक्षे तें फुडें। लक्षण सांगों॥ ३४२॥**

**अर्थ—**श्रीकृष्ण म्हणतात, आत्मज्ञानरूप उत्तम डोळे ज्याला आहेत अशा अर्जुना! सावध हो. तुला आतां ज्ञानाची ओळख करून देतो॥ ३३९॥ बा अर्जुना! ज्याच्या ठिकाणीं यत्किंचितहि संताप उत्पन्न न होतां अपराधाची क्षमा केलेली दिसून येते, तेथें खरोखर ज्ञान आहे, हें तूं जाण॥ ३४०॥ अथांग पाणी असलेल्या तलावांत ज्याप्रमाणे कमळाचीं झाडें राहतात किंवा भाग्यवानाचे घरीं संपत्ति राहते॥ ३४१॥ अर्जुना! त्याप्रमाणेच ज्याच्या आंगीं क्षमा वाढली आहे, असें ज्या लक्षणांवरून स्पष्ट दिसून येतें, तीं लक्षणें सांगतों, ऐक॥ ३४२॥

**तरि पढियंतें लेणें। आंगीं भावें जेणें। धरिजे तेवीं साहणें। सर्वचि जया॥ ३४३॥**
**त्रिविध मुख्य आघवे। उपद्रवांचे मेळावे। वरि पडिलिया नव्हे। वांकडा जो॥ ३४४॥**
**अपेक्षित पावे। तें जेणें तोषें मानावे। अनपेक्षिताही करवे। मानत्तोचि॥ ३४५॥**
**जो मानापमानातें साहे। सुखदु:ख जेथ सामाये। निंदास्तुती नोहे। दुखंडु जो॥ ३४६॥**
**उन्हाळेनि जो न तापे। हिमवंतीं न कांपे। कायसेनिही न वासिपे। पातलेया॥ ३४७॥**
**स्वशिखरांचा भारु। नेणे जैसा मेरु। कीं धरा यज्ञसूकरु। वोझें न म्हणे॥ ३४८॥**
**नाना चराचरीं भूतीं। दाटणी नव्हे क्षिती। तैसा नाना द्वंद्वीं प्राप्तीं। घामेजेना॥ ३४९॥**
**घेउनी जळाचे लोट। आलिया नदीनदांचे संघाट। करी वाड पोट। समुद्र जेवीं॥ ३५०॥**
**तैसें जयाचिया ठायीं। न साहणें काहींचि नाहीं। आणि साहतसे ऐसेंही। स्मरण नुरे॥ ३५१॥**
**आंगा जें पातलें। तें करूनि घाली आपुलें। येथ साहतेनि नवलें। घेपिजेना॥ ३५२॥**
**हे अनाक्रोश क्षमा। जयापाशीं प्रियोत्तमा। जाण तेणें महिमा। ज्ञानासि गा॥ ३५३॥**
**तो पुरुषु पांडवा। ज्ञानाचा वोलावा। आतां परिस आर्जवा। रूप करूं॥ ३५४॥**

**अर्थ—**आवडता अलंकार जितक्या हौसेने आपण आंगावर घालतो, तितक्याच हौसेने जो सर्व दु:ख सहन करतो॥ ३४३॥ सर्व दु:खात आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक असे तीन प्रकारचीं दु:खें मुख्य आहेत. त्या दु:खांचे समुदाय शरीरादिकांचे ठिकाणीं प्राप्त झाले असतां ज्याला ते यत्किंचितहि मनाच्या विरुद्ध वाटत नाहीत॥ ३४४॥ इच्छिलेलें प्राप्त झालें असतां जितका आनंद होतो तितक्याच आनंदाने इच्छा नसलेल्या वस्तूचा जो स्वीकार करतो॥ ३४५॥ जो मानाप्रमाणेच अपमानहि आनंदाने सहन करतो. ज्याच्या ठिकाणीं सुख-दु:ख सारखेच सामावतात आणि ज्याचें चित्त निंदा-स्तुति ऐकून दु:खी व आनंदी असे दोन प्रकारचे होत नाही॥ ३४६॥ ज्याप्रमाणे मेरुपर्वत अत्यंत उन्हाने तापत नाही किंवा अत्यंत थंडीने कांपत नाही व कांही प्राप्त झालें तरी तो भीत नाही॥ ३४७॥

स्वत:च्या शिखराचें त्याला जसें ओझें होत नाही. किंवा वराहावतारीं भगवंताला पृथ्वीचा भार वाटत नाही॥ ३४८॥ किंवा नाना प्रकारच्या स्थावर-जंगम प्राण्यांची दाटी झाली तरी पृथ्वीला त्यांचा भार वाटत नाही, त्याप्रमाणे सुख-दु:खादि द्वंद्वें प्राप्त झालीं असतां ज्याला यत्किंचित् घाम सुटत नाही म्हणजे घाबरा होत नाही॥ ३४९॥ ज्याप्रमाणे पाण्याचे लोट घेऊन नदीनदांचे समूह मिळण्यास आले तरी समुद्र आपलें पोट विस्तीर्ण करतो॥ ३५०॥ त्याप्रमाणे जो सर्वच सहन करीत असल्यामुळे ज्याचे ठिकाणीं सहन करीत नाही असें कांहीच नसतें आणि मी सर्व सहन करतो अशी अहंकाराची जाणीव देखील ज्याच्या चित्तांत कधीं उठत नाही॥ ३५१॥ जें जें शरीराच्या ठिकाणीं प्राप्त होतें, तें तें माझ्या शरीराचे ठिकाणीं स्वाभाविक आहे, अशी बुद्धि धारण केल्यामुळे सर्व साहण्याचें त्याला नवल देखील वाटत नाही॥ ३५२॥ अत्यंत प्रिय अर्जुना! संतापावांचून ज्याच्या ठिकाणीं इतकी क्षमावृत्ति आहे त्या पुरुषाच्या योगानेच ज्ञानाला महति प्राप्त झाली आहे, असें समज॥ ३५३॥ अर्जुना! तो पुरुष म्हणजे प्रत्यक्ष ज्ञानाचें जीवनच होय. आतां आर्जवाचें स्वरूप सांगतों, ऐक॥ ३५४॥

**गूढार्थदीपिका**—अशा लक्षणांच्या पुरुषाच्या ठिकाणींच ज्ञानाची वृद्धि होऊन त्याची पूर्णता होत असते, असा भाव.

**तरि आर्जव तें ऐसें। प्राणाचें सौजन्य जैसें। आवडे तयाही दोषें। एकचि पैं गा॥ ३५५॥**
**कां तोंड पाहूनि प्रकाशु। न करी जेवीं चंडांशु। जगा एकुचि अवकाशु। आकाश जैसें॥ ३५६॥**
**तैसें जयाचें मन। माणुसाप्रती आन आन। नोहे आणि वर्तन। ऐसें पैं तें॥ ३५७॥**
**जे जगचि सनोळख। जगेंसीं जुनाट सोयरिक। आप पर हे भाख। जाणणें नाहीं॥ ३५८॥**
**भलतेणेंसींहि मेळु। पाणिया ऐसा ढाळु। कवणेविखीं आडळु। नेघे चित्त॥ ३५९॥**
**वारियाची धांव। तैसे सरळ भाव। शंका आणि हांव। नाहीं जया॥ ३६०॥**
**मायेपुढें बाळका। रिगतां न पडे आशंका। तैसें मन देतां लोकां। नालोची जो॥ ३६१॥**
**फांकलिया इंदीवरा। परिवर नाहीं धनुर्धरा। तैसा कोनकोंपरा। नेणेचि जो॥ ३६२॥**
**चोखाळपण रत्नाचें। रत्नावरी कीर नाचे। तैसें पुढां मन जयाचें। करणें पाठीं॥ ३६३॥**
**आलोचूं जो नेणे। अनुभवचि जोगावणें। धरी मोकली अंत:करणें। नव्हेचि जया॥ ३६४॥**
**दिठी नोहे मिणधी। बोलणें नाहीं संदिग्धी। कवणेंसीं हीनबुद्धी। राहाटों नेणे॥ ३६५॥**
**दहाही इंद्रियें प्रांजळें। निष्प्रपंचें निर्मळें। पांचही पालव मोकळे। आठही पाहर॥ ३६६॥**
**अमृताची धार। तैंसें उजू अंतर। किंबहुना जो माहेर। या चिन्हांचे॥ ३६७॥**
**तो पुरुष सुभटा। आर्जवाचा आंगवटा। जाण तेथेंचि घरटा। ज्ञानें केला॥ ३६८॥**

**अर्थ**—आतां आर्जव तें असें आहे. प्राणाचें बऱ्यावाईट सर्व प्राण्यांशीं एक सौजन्यानेच वागणें असते॥ ३५५॥ किंवा सूर्य ज्याप्रमाणे तोंड पाहून प्रकाश करीत नाही किंवा जसें आकाश सर्व जगाला अवकाश देतें॥ ३५६॥ त्याप्रमाणे ज्याचें मन प्रत्येक प्राण्याशीं निरनिराळें होत नाही व वागणूकहि याप्रमाणे असते॥ ३५७॥ जणुं काय सर्व जगच ओळखीचे आहे किंवा सर्व जगाशीं फार जुना संबंध आहे, अशी वागणूक असते. आप-पर हे शब्दच तो जाणत नसतो॥ ३५८॥ कोणाशींहि मिळणें, अशी त्याची पाण्यासारखी वागणूक असते. कोणाविषयीं त्याचें चित्त विकल्प घेत नाही॥ ३५९॥ वाऱ्याच्या वाहण्याप्रमाणे ज्याचा मनोभाव सरळ असतो. ज्याच्या मनांत शंका किंवा हांव उत्पन्न होत नाही॥ ३६०॥ ज्याप्रमाणे मुलाला आपल्या आईच्या ओसंगांत जातांना कांही शंका वाटत नाही, त्याप्रमाणे लोकांपुढे आपलें मनोगत प्रगट करतांना जो मागील-पुढील विचार करीत नाही॥ ३६१॥ कमळाचें फूल संपूर्ण उमललें असतां, अर्जुना! ज्याप्रमाणे आंतील व बाहेरील भाग, असा भेद राहत नाही, त्याप्रमाणे जो मनाला कानाकोंपरा ठेवित नाही-म्हणजे कांही विचार गुप्त ठेवायचे व कांही विचार प्रगट करायचे, असें करीत नाही॥ ३६२॥ किंवा ज्याप्रमाणे रत्नाचें चोखाळपण म्हणजे तेज रत्नावरच नाचते म्हणजे रत्नावरच असतें, म्हणजे आधी त्याचें तेज दृष्टीस पडतें व नंतर

रत्नांचें ज्ञान होतें, त्याप्रमाणे ज्याचें मन प्रथम कळलें जाऊन त्यामागून त्याची क्रिया प्रगट होते॥ ३६३॥ जो इतर विचार करीत बसत नाहीं. अंत:करणात आत्मानुभवच दृढ करतो. मन आवरणें किंवा मन मोकळें सोडणें असें ज्याच्याकडून कधीं होत नाही॥ ३६४॥ त्याचें बोलणें कधीं साशंक नसतें किंवा तो कधींहि कोणाशीं हीनबुद्धीने वागूं इच्छित नाही; म्हणून त्याची दृष्टि कोणापुढेहि मिंधी होत नाही॥ ३६५॥ दुसऱ्याशीं त्याच्या दहाहि इंद्रियांची वागणूक मोकळी, पंक्तिप्रपंचरहित अशी निर्दोष असते. त्याचे पांचहि प्राण आपल्याप्रमाणे दुसऱ्याकरितां देखील सदासर्वदा सादर असतात॥ ३६६॥ अमृताच्या धारेप्रमाणे त्याचें अंत:करण कपटरहित सरळ असतें. एवढेंच नाही, तर जो या चिन्हांचें माहेरघर-म्हणजे राहण्याचें ठिकाणच-होऊन राहिला आहे॥ ३६७॥ हे उत्तम योद्ध्या अर्जुना! तो पुरुष म्हणजे सरळ वागणुकीची मूर्तिच असून ज्ञानाने तेथेंच घर केलें आहे, असें जाण॥ ३६८॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानीपुरुष सर्वत्र चराचरांत एक आपल्यालाच पाहत असल्यामुळे तो आपल्याशीं जसा निष्कपट असतो, तसाच सर्व प्राणिमात्रांशीं निष्कपट असतो.

**आतां ययावरी। गुरुभक्तीची परी। सांगों गा अवधारीं। चतुरनाथा॥ ३६९॥**
**आघवियांचि दैवां। जन्मभूमि हे सेवा। जे ब्रह्म करी जीवा। शोच्यातेंही॥ ३७०॥**

**अर्थ**—हे सर्व चतुर पुरुषांमध्ये श्रेष्ठ अशा अर्जुना! आतां यानंतर गुरुभक्तीचा प्रकार सांगतों, ऐक॥ ३६९॥ ही श्रीगुरुसेवा म्हणजे संपूर्ण सद्भाग्याला जन्म देणारी माता आहे. कारण ती त्रिविध दु:खाने पीडलेल्या जीवाला अविनाशी सुखस्वरूप असें ब्रह्म करून सोडते॥ ३७०॥

**गूढार्थदीपिका—आघवियांचि दैवां। जन्मभूमी हे सेवा**—सुखाच्या प्राप्तीला भाग्य म्हणतात आणि सर्व प्रकारच्या सुखांचा एका ब्रह्मसुखांतच अंतर्भाव होत असल्यामुळे तें ब्रह्मसुख संपूर्ण सद्भाभाग्यांची सांठवण आहे. हें ब्रह्मसुख ज्या सद्‌गुरुसेवेने प्राप्त होतें त्या सद्‌गुरुसेवेला सर्व भाग्यांची जन्मभूमि म्हटलें आहे. हें ब्रह्मसुख सद्गुरुच्या कृपेवांचून स्वत:च्या बुद्धीच्या साहाय्याने किंवा कोणत्या कर्माने प्राप्त होऊं शकत नाही.

"ब्रह्मैव गुरुरूपेणावतिष्ठते" जीवाचा उद्धार करण्याकरितां परब्रह्मच गुरुरूप धारण करून अवतीर्ण होतें, अशी स्मृति आहे; म्हणून परब्रह्म आणि श्रीगुरु यांत किंचित्‌हि भेद नाही व श्रीगुरुचें रूप म्हणजे जीवाचें शुद्धलक्षांशस्वरूपच होय. अर्थात् श्रीगुरुची सेवा ही साक्षात् परब्रह्माचीच सेवा होय. या सेवेनेच परब्रह्मप्राप्तिकरितां लागणारी चित्ताची अत्यंत निरहंकारस्थिति प्राप्त होते व श्रीगुरुपरब्रह्माशीं ऐक्य होऊन जीव पूर्ण ब्रह्मस्वरूप होतो.

**ब्रह्म करी जीवा। शोच्यातेंही**—ज्या श्रीगुरुला शरण जावयाचे तो श्रीगुरु श्रोत्रिय म्हणजे विरोधि वचनामुळे उत्पन्न होणाऱ्या शंकांचें समाधान करणारा व ब्रह्मानुभवांत पारंगत असला पाहिजे, असे "स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणि श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्" या श्रुतींत सांगितलें आहे. अर्थात् 'गुरु' ही संज्ञा श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ पुरुषाशिवाय दुसऱ्याला नाही. "जो शब्दज्ञाने पारंगतु। ब्रह्मानंदें सदा डुल्लतु" "जेणें स्वयें चाखिली नाहीं चवी। तो दुजियातें गोडी कैसी लावी" (ए. भा. अ. ३) इत्यादि ओव्यांनी नाथांनीहि अनुभवी पुरुषासच गुरु संज्ञा आहे, असें स्पष्ट सांगितलें आहे. माउलींनी येथें ज्या श्रीगुरुची अनन्यभावाने केलेली सेवा संपूर्ण भाग्याची जन्मभूमी होय, असें म्हटलें आहे, ते सद्‌गुरु म्हणजे श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ असेच माउलींना अभिप्रेत आहे, हें "ब्रह्म करी जीवा। शोच्यातेही" या चरणांवरून स्पष्ट आहे.

**ते आचार्योपास्ती। प्रकटिजैल तुजप्रती। बैसों दे एकपांती। अवधानाची॥ ३७१॥**

**अर्थ**—ती सद्‌गुरुची सेवा कशी करायची हे तुला आतां सविस्तर सांगतों. तेथें तुझें संपूर्ण लक्ष एकाग्र होऊन वसूं दे.॥ ३७१॥

**गूढार्थदीपिका**—या आचार्योपास्तीचा विचार माझ्या सद्‌गुरु आईनी आपल्या 'प्रेमनिकुंज' या ग्रंथांत केलेला आहे. त्याचें अवलोकन केलें असतां माउलींनी केलेल्या आचार्योपास्तीच्या निरूपणाचा चांगला उलगडा होतो.

माझी सद्‌गुरु आई म्हणते—

"सेवेमाजीं तत्व तीन। आधीं तयाचें व्हावें ज्ञान। तरीच सेवेचें विंदान। पूर्ण सेवककरीं चढें॥५॥"

श्रीगुरुसेवा करतांना तीन तत्वें पाळिलीं पाहिजेत. तीं तत्वें पाळण्याकरितां आधीं त्यांचें ज्ञान व्हायला पाहिजे. तीं तत्वें कळलीं असताच श्रीगुरुच्या सेवेची संपूर्ण रीति हातीं येते. तीं तत्वें अशीं—

"प्रथम तत्व अद्वैतीं द्वैत। जें जीवन्मुक्ती व्युत्थानीं उचंबळत। द्वितीय तत्त्व विख्यात। वियोगोपलालन संयोगीं॥६॥ तृतीय तत्त्व गुणद्वेषरहित। गुणवैतृष्ण्य गुणार्पणयुक्त। एवं तरीच सेवा अखंडित। फोफावत निष्काम॥७॥" (प्रे. नि. ४ वल्ली)

पहिलें तत्त्व अद्वैतांत द्वैत पाहणें हें होय. हें जीवन्मुक्तस्थितींत व्युत्थानकालीं भासत असतें. दुसरें तत्त्व प्रख्यात असून तें म्हणजे संयोगांत वियोग करणें होय. तिसरें तत्त्व म्हणजे श्रीगुरुला संपूर्ण गुण समर्पण करून गुणद्वेषरहित होणें होय.

या तीन तत्त्वाला धरून सेवा केली असतां ती निष्काम अखंडित अशी होते.

येथें आचार्योपास्तीला ज्ञानी पुरुषाचें लक्षण करून आचार्योपास्ती जशी ही ज्ञानाच्या पूर्वी करावी लागते तशीच ती ज्ञानाच्या नंतरहि स्वाभाविकपणे प्रेमाने होत राहते, असें सुचविलें आहे. वर सांगितलेलीं आचार्योपास्तींतील तीन तत्त्वें ज्ञानानंतरच्या आचार्योपास्तींतच राहतात, हें उघड आहे.

ज्ञानाच्या पूर्वी केलेल्या आचार्योपास्तीने जीव ब्रह्मस्वरूप होतो म्हणजे जीव व ब्रह्म ह्या दोन वस्तु नसून एक अस्फुट ब्रह्मवस्तुच आहे, असा त्यांच्या ऐक्याचा अंत:करणांत अपरोक्ष अनुभव येतो. हा अनुभव ज्यांना आला, त्यांना ज्ञानी म्हणतात. आणि हा अनुभव ज्यांच्या ठिकाणीं दृढ झाला त्यांना जीवन्मुक्त म्हणतात.

जीवन्मुक्तपुरुष प्रारब्धाने व्युत्थान पावले असतां त्यांना अशा ब्रह्मैक्यस्थितीचा विसर न पडतां द्वैताचा भास होतो-म्हणजे अज्ञानदशेंत जसें द्वैत सत्य वाटतें तसें तें सत्य न वाटतां-जसें एक पाणीच तरंगरूपाने दोनपणाला येतें, त्याप्रमाणे एक सच्चिदानंद परब्रह्मच अधिष्ठान व वृत्ति असें दोनपणाला आलें आहे, असें ते जाणत असतात-यालाच अद्वैतांतील द्वैत म्हणतात व या दोनपणाला धरूनच सेवा होत असते. अद्वैतांत द्वैत पाहणें या दृष्टीचा असा उपयोग होतो की "शिष्य आणि गुरुनाथु। या दोहों शब्दाचा अर्थु। श्रीगुरुचि परी होतु। दोहीं ठायी" (अमृ. प्र. २). ज्ञानाने माझा आत्मा व श्रीगुरु यांचे अद्वैत किंवा ऐक्य आहे अशी समजूत दृढ झाली असता व्युत्थानकालीं श्रीगुरुवर आत्मवतच परमप्रेम होऊं लागतें आणि त्या प्रेमालाच भक्ति म्हटली जाते.

भगवंताच्या भक्तीच्या ठिकाणींहि हेंच तत्त्व लागूं आहे. "पावावया उपासना। ब्रह्मस्थानीं प्रस्थान" (तु. गा.) ज्याप्रमाणे प्रवासास जायचें असतां निघण्याचा दिवस बरा नसल्यास अगोदर चांगला दिवस पाहून प्रस्थान ठेवित असतात, त्याप्रमाणे "उपासना"-म्हणजे अशी परमप्रेमरूपभक्ति-प्राप्त होण्याकरितांच ब्रह्माचे ठिकाणीं प्रस्थान ठेवायचें असतें-म्हणजे ब्रह्माचें ज्ञान करून घेऊन जीवपरमात्म्याचें ऐक्य जाणून घ्यायचें असतें, असें श्रीतुकाराम महाराजांनीहि सांगून ठेवलें आहे.

**तरि सकळ जळसमृद्धी। घेऊनि गंगा निघाली उदधी। कीं श्रुति हे महापदीं। पैठी जाहाली॥ ३७२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गंगा संपूर्ण पाण्याचे ओघ घेऊन समुद्राला मिळाली तरी पुन: मिळतच राहते किंवा संपूर्ण श्रुती ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं प्रविष्ट होतच राहतात॥ ३७२॥

**गूढार्थदीपिका**—सेवेचेंदुसरें तत्त्व म्हणजे "संयोगेऽपि वियोगोपलालन" हें होय. हे तत्त्व या ओवींत माउलींनी सांगितलें आहे. अन्नमयादि पंचकोशाच्या आंत असलेल्या आत्मस्वरूप श्रीगुरुशीं ऐक्य होऊन बाहेरील सगुणस्वरूप हेंहि पूर्ण ब्रह्मस्वरूपच आहे. असें कळून आल्यावर, त्या सगुणस्वरूपाचा क्षणभरहि वियोग नसावा असें वाटणें, याला "संयोगेऽपि वियोगोपलालन" म्हणतात.

हे संयोगांतील वियोगोपलालन अनेक प्रकारांनी होत असतें. यांत भक्त भगवंताच्या वियोगाची इच्छा करीत नसतो. भगवंताचा अखंड संयोग असावा हीच त्याची इच्छा असते आणि भगवंताची ज्या ज्या गुणवृत्तीने क्षणभर

देखील विस्मृति होण्याचा संभव असेल त्या त्या वृत्ती किंवा ते ते गुण उत्पन्न होऊं नये व भगवंताचा विसर पडूं नये, अशी त्याच्या अंत:करणात अखंड तळमळ राहते. ज्याप्रमाणे संपूर्ण जलप्रवाह घेऊन समुद्राला मिळण्याकडेच गंगेचें लक्षण असतें, किंवा श्रुती भगवत्पदीं मिळून पुन: लक्षणावृत्तीने जीवाला ब्रह्मैक्यबोध करून त्यांच्यासह मिळतच राहते, त्याप्रमाणे भक्ताची प्रेमवृत्ति भगवंताचे ठिकाणीं लागली असली तरी प्रारब्धाने स्फुरणाऱ्या सर्व भावांसह ती पुन: लागतच राहते, असें या ओवीने सूचित केलें आहे.

**सकळ जळसमृद्धि। घेऊनि गंगा निघाली उदधी**—गंगेप्रमाणेच इतरहि कांही नद्या जलसमृद्धि घेऊन समुद्राला मिळत असतांना, येथें संपूर्ण जलसमृद्धि घेऊन ज्याप्रमाणे गंगा समुद्रास मिळते, असें माउलींनी कां म्हटलें? यांचे कारण, माझी सद्गुरु माउली म्हणते, असें आहे की ''कलीमाजीं अवघी तीर्थें। गंगेंत निक्षेपती स्वसामर्थ्यें। या पुराणोक्त जलसमृद्धि पदातें। वदलें तात॥ १५१॥'' (प्रेम निकुंज ४. व.) कलियुगामध्यें पृथ्वीवरील संपूर्ण तीर्थांनी आपआपलें सामर्थ्य गंगेच्या ठिकाणीं ठेवलें आहे, असें पुराणवचन आहे; ही पुराणोक्ति प्रमाण मानूनच माउलींनी ''सकळ जळसमृद्धि। घेऊनि गंगा निघाली उदधी'' असें म्हटलें आहे.

**नाना वेंटाळूनि जीवितें। गुणागुण उखितें। प्राणनाथा उचितें। दिधलें प्रिया॥ ३७३॥**

**अर्थ**—किंवा पतिव्रता स्त्री ज्याप्रमाणे आपल्या जीविताला धरून असलेले संपूर्ण गुणागुण योग्य रीतीने पतीलाच समर्पण करते॥ ३७३॥

**गूढार्थदीपिका**—असलेल्या गुणागुणांचा केवल एका पतीच्या सुखाकरितां उपयोग करणें याला गुणागुणांचें समर्पण म्हणतात. भगवान परमात्मा त्रिगुणातीत आहे. अशा त्रिगुणातीत परमेश्वराशीं जीवाचें समरस ऐक्य होण्याकरितां त्यालाहि (जीवालाहि) त्रिगुणातीत व्हायला पाहिजे. अज्ञानदशेंत जीवाच्या ठिकाणीं विषयसुखाच्या आवडीमुळे रजोगुणाची व निद्रा आलस्यादि गुणामुळे तमोगुणाची आसक्ति असते. पूर्वपुण्याने परमेश्वरप्राप्तीची किंवा परमार्थाची आवड उत्पन्न होऊन वैराग्य, आत्मानात्मविवेक, शमदमादि साधनसंपत्ति इत्यादि भगवत्प्राप्तीच्या साधनांचा पुरुष अभ्यास करूं लागला असतां द्वेष उत्पन्न होऊन रजस्तमोगुणांची आसक्ति नाहीशी होते व त्याची सत्वगुणाच्या प्राप्तीचे ठिकाणीं आसक्ति जडते. अशा रीतीने वाढलेल्या सत्वगुणाच्या आसक्तिरूप बंधनांतून सुटून त्रिगुणातीत होण्याकरितां सर्व गुणागुण भगवंताला किंवा श्रीगुरूला अर्पण करणें हाच एक मार्ग आहे, दुसरा मार्ग नाही. हे गुणागुणाचें अर्पण माउलींनी पतिव्रतेचा दृष्टान्त देऊन या व पुढील ओवींत सांगितलें आहे. हेंच सेवेंतील तिसरें तत्त्व होय.

**तैसें सबाह्य आपुलें। जेणें गुरुकुळीं वोपिलें। आपणपें केलें। भक्तीचें घर॥ ३७४॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे ज्यानें आपलें अंतर्बाह्य गुरुकुलाला समर्पण केलें आणि आपण श्रीगुरुच्या प्रेमरूपभक्तीचें घर होऊन राहिला॥ ३७४॥

**गुरुगृह जिये देशीं। तो देशचि वसे मानसीं। विरहिणी कां जैसी। वल्लभातें॥ ३७५॥**
**तियेकडोनि येतसे वारा। देखोनि धांवे सामोरा। आड पडे म्हणे घरा। बीजें कीजो॥ ३७६॥**
**साचा प्रेमाचिया भुली। तया दिशेसीचि आवडे बोली। जीवु थानापती करूनि घाली। गुरुगृहीं जो॥ ३७७॥**
**परि गुरुआज्ञा धरिलें। देह गांवीं असे एकलें। वांसरुवा लाविलें। दावें जैसें॥ ३७८॥**
**म्हणे कैं हें बिरडें फिटेल। कैं तो स्वामी भेटेल। युगाहूनि वडिल। निमिष मानी॥ ३७९॥**
**ऐसेया गुरुग्रामींचें आलें। कां स्वयें गुरुनीं धाडिलें। तरी गतायुष्या जोडलें। आयुष्य जैसें॥ ३८०॥**
**कां सुकतया अंकुरा-। वरि पडिलिया पीयूषधारा। ना ना अल्पोदकींचा सागरा। आला मासा॥ ३८१॥**
**ना तरीं रंके निधान देखिलें। कां आंधळिया डोळे उघडले। भणंगाचिया आंगा आलें। इंद्रपद॥ ३८२॥**
**तैसें गरुकुळींचेनि नांवे। महासुखें अति थोरावे। जे कोडेंही हन पोटाळवें। आकाश कां॥ ३८३॥**
**पैं गुरुकुळीं ऐसी। आवडी जया देखसी। जाण ज्ञान तयापासीं। पाइकी करी॥ ३८४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री पतीचा विरह असतांना मनांत अखंड पतीचेंच चिंतन करते, त्याप्रमाणे गुरुभक्ताचे अंत:करणांत ज्या देशांत श्रीगुरुच्या राहण्याचें घर असेल त्या देशाचेंच सारखें चिंतन असतें॥ ३७५ ॥ त्या देशाकडून वारा आला असतां त्याला पाहून तो सामोरा धांवतो व त्या वाऱ्याला लोटांगण घालून ''माझ्या घरीं आगमन करावें'' अशी प्रार्थना करतो॥ ३७६ ॥ निर्व्याज प्रेमाने वेडा होऊन त्या दिशेशींच त्याला बोलावेसें वाटतें व तो आपला जीव गुरुगृहाचे ठिकाणीं ठाणेदार करून ठेवतो॥ ३७७॥ पण दाव्याने बांधलेल्या वांसराप्रमाणे श्रीगुरुच्या आज्ञारूप दाव्याने तो देहरूपी गांवों 'एकलें' म्हणजे कोठेंहि मन गुंतूं न देतां एकटा बांधला असतो. म्हणजे केवळ श्रीगुरुच्या आज्ञेमुळेंच देह चालवितो॥ ३७८ ॥ आणि केव्हा हें दावें सुटेल व केव्हा ते श्रीगुरुस्वामी भेटतील असा विरह करीत असतांना एक क्षण देखील त्याला युगाहून मोठा वाटतो॥ ३७९ ॥ अशा स्थितींत श्रीगुरुच्या राहत्या गांवाहून कोणी आल्यास किंवा श्रीगुरुनीच त्याच्या समाचाराकरितां कोणास पाठविल्यास आयुष्य संपलेल्याला आयुष्य प्राप्त झाल्यासारखें त्याला वाटतें॥ ३८० ॥ किंवा सुकत असलेल्या अंकुरावर अमृतवर्षाव व्हावा अथवा थोड्याच काळांत पाणी आटून मरणाची पाळी येईल अशा डबक्यांतील माश्यांनी समुद्रांत यावें॥ ३८१ ॥ किंवा दरिद्री मनुष्याने धनाचा हांडा पाहावा किंवा आंधळ्याला डोळे प्राप्त व्हावे किंवा भिकाऱ्याला इंद्रपद प्राप्त व्हावें॥ ३८२ ॥ त्याप्रमाणे श्रीगुरुच्या कुळाचें नांव ऐकतांच त्याला अत्यंत सुख होऊन तो इतका मोठा होतो की तो आकाश देखील सहज कौतुकाने पोटाशीं धरील॥ ३८३ ॥ याप्रमाणे गुरुकुळादिकांचे ठिकाणीं ज्याची अशी तळमळ तुला दिसून येईल त्याच्यापाशीं ज्ञान हें त्याची सेवा करीत आहे, असें समज॥ ३८४॥

**गुढार्थदीपिका—ज्ञान तयापासीं। पाइकी करी**-अशा श्रीगुरुभक्ताचे ठिकाणीं, साधनचतुष्टयसंपत्तीचा अभ्यास न करतांच, आत्मज्ञान दृढ होतें, असे माउलींनी ''ज्ञान तयापासीं। पाइकी करी'' या चरणांनी सुचविलें आहे.

**अवतरणिका—येथून आतां श्रीज्ञानेश्वरमाउली श्रीगुरुच्या अंतरसेवेचें वर्णन करते.**

**आणि अभ्यंतरिलियेकडे। प्रेमाचेनि पवाडें। श्रीगुरुचें रूपडें। उपासी ध्यानीं॥ ३८५॥**
**हृदयशुद्धीचियां आवारीं। आराध्यु तो निश्चळ धुरू करी। मग सर्व भावेंसी परिवारी। आपण होय॥ ३८६॥**

**अर्थ**—श्रीगुरुविषयीं अंत:करणांत असलेल्या नितांत प्रेमाच्या योगाने तो श्रीगुरुचें रूप ध्यानांत आणून उपासना करतो॥ ३८५ ॥ शुद्ध अशा हृदयाचा आवार किंवा तट उभारून आराध्य अशा श्रीगुरुच्या रूपाला तो ध्रुवाप्रमाणे अंत:करणांत अचल स्थान करून मग सर्व मनोभाव व सेवासाहित्य यांच्या रूपाने आपणच आहों, अशी बुद्धि धारण करतो॥ ३८६ ॥

**गूढार्थदीपिका**—कामकर्मासक्ति व चंचलता इत्यादि रजोगुणाचे व निद्रा, आलस्य इत्यादि तमोवृत्तीचे दोष नाहीसे होऊन सत्वगुणाने तदेकपरायण झालेलें हृदय, शुद्ध म्हटलें जातें.

किंवा ज्याप्रमाणे ओल्या झालेल्या मातींतून खडे आपोआप बाहेर पडतात, त्याप्रमाणे सगुणाच्या प्रेमाने आर्द्र झालेल्या हृदयांतून सर्व दोष निघून जात असल्यामुळे प्रेमळ हृदयालाहि 'शुद्ध हृदय' म्हणतात.

**कां चैतन्याचिये पोवळी। माजीं आनंदाचियां राउळीं। श्रीगुरुलिंगा ढाळी। ध्यानामृत॥ ३८७॥**

**अर्थ**—किंवा चैतन्याचा आवार करून त्यामध्ये ब्रह्मानंदाचे देऊळ उभारतो व त्या देवळांत श्रीगुरुरूप लिंग स्थापन करून त्यावर ध्यानरूपी अमृताचा अभिषेक करतो॥ ३८७॥

**गूढार्थदीपिका**—चित्त रजस्तमोगुणरहित होऊन सात्विक झालें असतां त्या चित्ताचा जडभाव नाहीसा होऊन तें चेतन होतें आणि जडभावाविषयीं भासणारा प्रतिकूलपणा नाहीसा होऊन चेतनभावामुळे अनुकूलपणा उत्पन्न होऊन आनंद प्रगट होतो व त्या आनंदात ध्यानाने श्रीगुरुचें स्वरूप स्थापन केलें जातें.

अर्थात् अनुभवास आलेल्या चिदानंदालाच श्रीगुरुचें स्वरूप देण्यांत येत असल्यामुळे या श्रीगुरुच्या स्वरूपाचा केवळ चिदानंदात्मक अनुभव असतो-जडविनाशी नसतो; म्हणून तें त्रिगुणरहित निर्गुण, असें सगुणस्वरूप असतें.

**उदयिजतां बोधार्का। बुद्धीची डाल सात्त्विका। भरोनि त्र्यंबका। लाखोली वाहे॥ ३८८॥**

**अर्थ**—ध्यानाने ध्याता व ध्येय यांच्या ऐक्यज्ञानरूपी सूर्याचा उदय होतो व तो (गुरुभक्त) आपल्या बुद्धीची परडी अष्टसात्विकभावरूपी कमळांच्या फुलांनी भरून श्रीगुरुरूप त्र्यंबकाला त्याची लाखोली वाहतो॥ ३८८ ॥

**गूढार्थदीपिका**—ध्यानाने ज्ञान होऊन अष्टसात्विकभाव दाटून येतात, असा अर्थ.

**काळशुद्धी त्रिकाळीं। जीवदशाधूप जाळी। ज्ञानदीपें वोवाळी। निरंतर॥ ३८९ ॥**

**अर्थ**—प्रात:काळ, माध्यान्हकाळ व सायंकाळ असे जे शिवपूजेकरितां तीन शुद्ध काळ सांगितले आहेत, त्या तिन्हीं काळीं तो जीवदशेचा धूप जाळीत असतो आणि ज्ञानदीपाने श्रीगुरुला अखंड ओवाळतो॥ ३८९ ॥

**गूढार्थदीपिका**—ध्यानाने ऐक्यज्ञान उत्पन्न होऊन अष्टसात्विकभाव दाटून आले असतां जीवदशा नाहीशी होते व ऐक्यज्ञानाचा कधीं विसर पडत नाही.

**सामरस्याची रससोय। अखंड अर्पित जाय। आपण भराडा होय। गुरु तो लिंग॥ ३९० ॥**

**अर्थ**—श्रीगुरुच्या ऐक्याने प्राप्त झालेल्या समरसस्थितीचा नैवेद्य तो अखंड करीत असतो व याप्रमाणे श्रीगुरुला शिवलिंग करून आपण पुजारी होतो॥ ३९० ॥

**नातरी जीवाचिये सेजे। गुरु कांतु करूनि भुंजे। ऐसीं प्रेमाची भोजें। बुद्धी वाहे॥ ३९१ ॥**

**अर्थ**—एखादे वेळीं जीवाच्या शेजेवरच श्रीगुरुला पति करून त्याचा भोग घेतो. अशी नानाप्रकारें प्रेमाच्या उल्हासाने बुद्धि स्फुरत असते॥ ३९१ ॥

**गूढार्थदीपिका**—**जीवाचिये सेजे**-या चरणाने श्रीगुरुभक्त आपल्या श्रीगुरुला आपल्याहून निराळे न समजतां ज्या अधिष्ठानरूप शुद्धब्रह्मचैतन्यावर मी विवर्तरूपाने स्फुरतों, तें अधिष्ठानरूप शुद्धब्रह्मचैतन्यच माझ्या प्रेमाने अनध्यस्तविवर्त असे श्रीगुरुरूप झालें आहे, असें तो समजतो.

**गुरु कांत करूनि भुंजे**—जीवाचें मूळचें शुद्धस्वरूप जे अधिष्ठानरूप ब्रह्मचैतन्य, तेंच शुद्धस्थितीत राहून गुरुरूप सगुणसाकार झाले आहे, असें त्याला ज्ञान असल्यामुळे श्रीगुरुचे ठिकाणीं साहजिकच जें त्याचें प्रेम बसतें, तें परम प्रेमच त्याचा श्रीगुरुचे ठिकाणचा कांतभाव होय.

**कोणे एके अवसरीं। अनुरागु भरे अंतरीं। कीं तया नाम करी। क्षीराब्धी॥ ३९२ ॥**
**तेथ ध्येयध्यान बहु सुख। तेचि शेषतुळिका निर्दोख। वरि जळशयन देख। भावी गुरु॥ ३९३ ॥**
**मग वोळगती पाय। ते लक्ष्मी आपण होय। गरुड होऊनि उभा राहे। आपणचि॥ ३९४ ॥**
**नाभीं आपणचि जन्मे। ऐसें गुरुमूर्ति प्रेमें। अनुभवी मनोधर्मैं। ध्यानसुख॥ ३९५ ॥**
**एकाधिये वेळें। गुरुमाय करी भावबळें। मग स्तन्यसुखें लोळें। अंकावरी॥ ३९६ ॥**
**नातरी गा किरीटी। चैतन्यतरुतळवटीं। गुरु धेनु आपण पोटीं। वत्स होय॥ ३९७ ॥**
**गुरुकृपास्नेहसलिलीं। आपण होय मासोळी। कोणे एके वेळीं। हेंचि भावी॥ ३९८ ॥**
**गुरुकृपामृताचें वडप। आपण सेवावृत्तीचें होय रोप। ऐसेसे संकल्प। विये मन॥ ३९९ ॥**

**अर्थ**—एखादे वेळीं अंत:करणांत प्रेम दाटून आलें असतां त्या प्रेमाला क्षीराब्धि समजतो॥ ३९२ ॥ तेथे ध्येय, ध्यान, अपार सुख ही त्रिपुटीच निर्दोष अशी शेषरूप गादी आहे व त्यावर जलशयन करणारे भगवान विष्णु श्रीगुरु आहेत, अशी भावना करतो॥ ३९३ ॥ मग त्या श्रीगुरुरूपी विष्णूची सेवा करणारी लक्ष्मी आपण होतो आणि आपणच गरुडहि होऊन होत जोडून सन्मुख उभा राहतो॥ ३९४॥ नाभीपासून जन्मलेला ब्रह्मदेव मीच होय, अशी भावना करतो. याप्रमाणे श्रीगुरुमूर्तीच्या प्रेमाने आपल्या ठिकाणीं नानाप्रकारच्या सेवकाच्या भावना करून ध्यानाचें सुख भोगतो॥ ३९५ ॥ एखादे वेळीं श्रीगुरुला प्रेमाच्या बळावर आपली जन्मदात्री समजून मी तिचें स्तनपान करीत आनंदाने तिच्या मांडीवर लोळत आहे, अशी भावना करतो॥ ३९६ ॥ किंवा हे अर्जुना! श्रीगुरुचे ठिकाणी चैतन्यरूपवृक्षाचे खाली बसणाऱ्या गायीची भावना करून आपण तिच्या पोटाशी बसत असलेलें वासरूं होतो॥ ३९७॥ एखादे वेळीं श्रीगुरुच्या कृपाप्रेमरूप पाण्यातील मी मासोळी आहे, अशीच भावना करतो॥ ३९८ ॥ माझें श्रीगुरु कृपारूप अमृताची

दृष्टी असून त्याखालीं मी म्हणजे सेवावृत्तिरूप रोप आहे; याप्रमाणे मन अनेक प्रकारचे संकल्प करीत असतें॥ ३९९ ॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुच्या सेवेचीच अंत:करणांत एक अत्यंत आवडी असावी व श्रीगुरुच्या कृपेचा आपल्यावर अखंड वर्षाव होत असावा, अशी इच्छा श्रीगुरुभक्त करीत असतो, असा भाव.

**चक्षुपक्षेंवीण। पिलूं होय आपण। कैसें पैं अपारपण। आवडीचें॥ ४०० ॥**
**गुरुतें पक्षिणी करी। चारा घे चांचूवरी। गुरु तारू धरी। आपण कास॥ ४०१ ॥**
**ऐसें प्रेमाचेनि थावें। ध्यानचि ध्यानातें प्रसवे। पूर्णसिंधू हेलावे। फुटती जैसे॥ ४०२ ॥**
**किंबहुना यापरी। श्रीगुरुमूर्ती अंतरीं। भोगी आतां अवधारीं। बाह्यसेवा॥ ४०३ ॥**

**अर्थ**—कसें त्याचें अमर्याद प्रेम आहे, पहा! एखादेवेळीं आपण डोळे न उघडलेलें व पंख न फुटलेलें पिलूं होऊन श्रीगुरुला पक्षिणी करतो व तिच्या चोंचींतील चारा घेतो, श्रीगुरु भवसमुद्रांतून तारणारे आहेत व आपण त्यांची कांस धरली आहे, अशी भावना करतो॥ ४००-४०१ ॥ नेहमीं पूर्ण भरलेल्या समुद्रावर जसें लाटांपाठीं लाटा उठत असतात, त्याप्रमाणे श्रीगुरुभक्ताच्या अंत:करणांत श्रीगुरुविषयीं असलेल्या अथांग प्रेमामुळे नानाप्रकारच्या भावनांनी ध्यानापाठीं ध्यान होत जातें॥ ४०२ ॥ फार काय सांगावें! याप्रमाणे श्रीगुरुभक्त आपल्या अंत:करणांत श्रीगुरुसेवेचें सुख भोगित असतो. आतां श्रीगुरुची बाह्यसेवा ऐक॥ ४०३ ॥

**तरि जीवीं ऐसें आवांके। म्हणे दास्य करीन निकें। जैसेनि गुरु कौतुकें। माग म्हणती॥ ४०४ ॥**

**अर्थ**—अंत:करणांत प्रेमाने असे मनोरथ उठतात की, ज्या रीतीने श्रीगुरु माझ्या सेवेचें कौतुक करून प्रसन्न होतील व इच्छित वर माग म्हणतील अशी मी त्यांची सेवा करीन॥ ४०४ ॥

**गूढार्थदीपिका**—गुरुसेवेंत कितीहि शारीरिक किंवा मानसिक कष्ट पडले तरी ते आनंदाने सोसण्याचें धैर्य गुरुसेवकाचे आंगीं असायला पाहिजे, असें येथें सुचविलें आहे.

**तैसिया साचा उपास्ती। गोसावी सुप्रसन्न होती। तेथ मी विनंती। ऐसी करीन॥ ४०५ ॥**
**म्हणेन तुमचा देवा। परिवारु जो आघवा। तेतुलें रूपें होआवा। मीचि एकु॥ ४०६ ॥**
**आणि उपकरतीं आपुलीं। उपकरणें आथि जेतुलीं। माझीं रूपें तेतुलीं। होआवीं जी॥ ४०७ ॥**
**ऐसा मागेन वरु। तेथ हो म्हणती श्रीगुरु। मग तो परिवारु। मीचि होईन॥ ४०८ ॥**

**अर्थ**—तशा त्या मनोभावाने केलेल्या निष्कपट सेवेने श्रीगुरुस्वामी प्रसन्न झाले असतां मी त्यांची अशी प्रार्थना करीन॥ ४०५ ॥ व म्हणेन की, हे श्रीगुरुदेवा! तुमच्या सेवेला जेवढा कांही सेवक वर्ग लागतो, तो संपूर्ण एक मीच व्हावें॥ ४०६ ॥ आणि आपल्या सेवेला साहाय्यभूत होणारी जेवढी कांही उपकरणरूपसामग्री आहे, ती सर्व माझींच रूपें व्हावींत॥ ४०७॥ असा वर मी मागेन व श्रीगुरु प्रसन्न होऊन 'हो' म्हणतील मग त्यांचा सर्व परिवार व उपचारसामग्री मीच होईन॥ ४०८ ॥

**गूढार्थदीपिका**—जेव्हा भक्ताचे ठिकाणीं प्रेम कमी असून त्याचें क्रियेकडे विशेष लक्ष असतें, तेव्हा त्याच्या त्या सेवेला उपासना म्हणतात आणि जेव्हा सेवेंत प्रेमाचेच अत्यंत प्राधान्य असतें, तेव्हा त्या सेवेला भक्ति म्हणतात. असा हा उपासना व भक्ति यांत भेद आहे.

सेवक जोपर्यंत उपासना करणार आहे, तोपर्यंत ''परिवारु मीचि होईन'' म्हणजे मीच सर्व परिवार झालों आहे, अशी तो भावनादृष्टि करीत असतो आणि अत्यंत प्रेम वाढून त्याची उपासना भक्तिसंज्ञेस प्राप्त झाली असतां श्रीगुरुचा सर्व परिवार तोच होतो.

**उपकरणजात सकळिक। तें मीचि होईन एकैक। तेव्हां उपास्तीचें कवतिक । देखिजेल॥ ४०९ ॥**
**गुरु बहुतांची माये। परि एकलौति होऊनि ठाये। तैसें करूनि आण वाये। कृपे तिये॥ ४१० ॥**
**तया अनुरागा वेधु लावीं। एकपत्नीव्रतचि घेववी। क्षेत्रसंन्यासु करवीं। लोभाकरवीं॥ ४११ ॥**
**चतुर्दिक्षु वारा। न लाहे निघोंन बाहिरा। तैसा गुरुकृपे पांजिरा। मीचि होईन॥ ४१२ ॥**

**आपुलिया गुणांचीं लेणीं। करीन गुरुसेवे स्वामिणी। हें असो होईन गंवसणी। गुरुभक्तीसी॥ ४१३ ॥**
**गुरुस्नेहाचिये वृष्टी। मी पृथ्वी होईन तळवटीं। ऐसिया मनोरथांचिया सृष्टी। अनंता रची॥ ४१४॥**

**अर्थ**—श्रीगुरुच्या सेवेमध्यें जेवढीं उपकरणें लागतात, त्यापैकीं प्रत्येक वस्तु जेव्हा मीच होईन तेव्हाच मला सेवेचें सुख प्राप्त होईल॥ ४०९ ॥ श्रीगुरु ही पुष्कळांची माउली असणार, पण ती एकुलती—म्हणजे मलाच आपला एकुलता एक मुलगा समजून राहील, तशी सेवा करून तिच्या कृपेला शपथ घालीन॥ ४१० ॥ श्रीगुरुच्या प्रेमाला वेध लावील, त्याच्याकडून एकपत्नीव्रत घेववीन व श्रीगुरुच्या लोभाकडून क्षेत्रसंन्यास करवीन॥ ४११ ॥ ज्याप्रमाणे चार दिशेच्या आंतच वारा वाहतो, तो त्या बाहेर निघूं शकत नाही, त्याप्रमाणे श्रीगुरुच्या कृपेला मीच पिंजरा होऊन राहीन॥ ४१२ ॥ माझी स्वामिणी जी गुरुसेवा तिला मी आपल्या सद्गुणांचे अलंकार घालीन. हें असो मी श्रीगुरुच्या भक्तीला गंवसणी होईन॥ ४१३ ॥ श्रीगुरुच्या प्रेमाच्या वर्षावाखालीं राहून तो सर्व वर्षाव घेणारी पृथ्वी मी होईन. अशा अनंत प्रकारच्या मनोरथांच्या सृष्टीची रचना तो करतो॥ ४१४॥

**गूढार्थदीपिका**—या ओव्यांतील वर्णन भक्ताच्या भक्त्यहंकारचें नसून त्याच्या अंत:करणांत असलेल्या गुरुसेवेच्या आवडीचें आहे. श्रीगुरुसेवेच्या प्रेमाने सेवकाचें अंत:करणांत अनेक प्रेमभावना कशा उचंबळत असतात, याचें येथें वर्णन केलें आहे.

**म्हणे श्रीगुरुचें भुवन। आपण मी होईन। आणि दास होऊनि करीन। दास्य तेथिंचें॥ ४१५॥**
**निर्गमागमीं दातारें। जे वोलांडिजती उंबरे। ते मी होईन आणि द्वारें। द्वारपाळु॥ ४१६॥**
**पाउवा मी होईन। तियां मीचि लेववीन। छत्र मी आणि करीन। बारीपण॥ ४१७॥**
**मी तळ उपरु जाणविता। चंवरधरु हात देता। स्वामीपुढें खोलता। होईन मी॥ ४१८॥**
**मीचि होईन सागळा। करूं सुईन गुरुळां। सांडिती तो नेपाळा। पडिघा मीचि॥ ४१९॥**
**हडप मी वोळगेन। मीचि उगाळु घेईन। उळिग मी करीन। आंघोळीचें॥ ४२०॥**
**होईन गुरुचें आसन। अळंकार परिधान। चंदनादि होईन। उपचार ते॥ ४२१॥**
**मीचि होईन सुआरु। वोगरीन उपहारु। आपणपेंनि श्रीगुरु। वोंवाळीन॥ ४२२॥**
**जे वेळीं देवो आरोगिती। तेव्हां पांतीकरु मीचि पांतीं। मीचि होईन पुढती। देईन विडा॥ ४२३॥**
**ताट मी काढीन। सेज मी झाडीन। चरणसंवाहन। करीन मीचि॥ ४२४॥**
**सिंहासन होईन आपण। वरि श्रीगुरु करिती आरोहण। होईन पुरेपण। वोळगेचें॥ ४२५॥**
**श्रीगुरुचें मन। जया देईल अवधान। ते मी पुढां होईन। चमत्कारु॥ ४२६॥**
**तया श्रवणाचे आंगणीं। होईन शब्दांचिया अक्षौहिणी। स्पर्श होईन घसणी। आंगाचिया॥ ४२७॥**
**श्रीगुरुचे डोळे। अवलोकनें स्नेहाळें। पाहाती तियें सकळें। होईन रूपें॥ ४२८॥**
**तिये रसने जो जो रुचेल। तो तो रसु म्यां होईजेल। गंधरूपें कीजेल। घ्राणसेवा॥ ४२९॥**
**एवं बाह्य मनोगत। श्रीगुरुसेवा समस्त। वेंटाळीन वस्तुजात। होऊनियां॥ ४३०॥**

**अर्थ**—तो म्हणतो, श्रीगुरुचें राहण्याचें घर मीच होईन आणि त्यांच्या चरणाचा दास होऊन तेथील दास्य-म्हणजे सेवकांनी करावयाचीं सर्व कामें-मी करीन॥ ४१५ ॥ येतां जातां श्रीगुरु ज्या उंबरठ्याला ओलांडतात तें उंबरठें, द्वारें व द्वारपाळ मी होईन॥ ४१६ ॥ मी पादुका होऊन मीच त्या श्रीगुरुचरणाचे ठिकाणीं घालीन आणि त्यांच्यावरील छत्र मी होऊन छत्री धरण्याचें कामहि मीच करीन॥ ४१७ ॥ श्रीगुरु चालत असतां उंचवटा व खोलगट यांची जाणीव करून देणारा, चवरी धरणारा, हाताला आश्रय देणारा व त्यांच्यापुढें दिवटी धरून वाट दाखविणारहि मीच होईन॥ ४१८ ॥ पाण्याची झारी मी होईन, गुळण्या करण्याकरितां पाणी मी घालीन आणि चूळ ज्यांत सांडली जाईल ती पीकदाणी मीच होईन॥ ४१९ ॥ त्यांचा पानपुडा मीच वागवीन व त्यांचा थुंकलेला विडा मीच घेईन व स्नानाचें सर्व कार्य मी करीन॥ ४२० ॥ श्रीगुरुचें आसन, अलंकार, वस्त्र, चंदनादि उपचार मीच होईन॥ ४२१ ॥ श्रीगुरुचा

स्वयंपाक करणारा मी होईन, श्रीगुरुना जेवावयास मी वाढीन व मी स्वत: श्रीगुरुला निरांजन करीन अथवा आपल्याला श्रीगुरुवरून ओवाळून टाकीन॥ ४२२॥ ज्यावेळीं श्रीगुरु जेवावयास बसतील त्यावेळीं मीच त्यांच्या पंक्तीला बसून मीच पंक्तीकर होईन. मीच त्यांच्या समोर होईन व त्यांना विडा देईन॥ ४२३॥ जेवल्यानंतर त्यांचें उष्टें ताट मी काढीन, मीच त्यांचें आंथरूण झाडून घालीन व मीच त्यांचे पाय दाबीन॥ ४२४॥ मीच त्यांचें सिंहासन होईन व त्यावर श्रीगुरु बसतील. याप्रमाणे सेवेची पूर्णताहि मीच होईन॥ ४२५॥ श्रीगुरुचें मन ज्याचे ठिकाणीं एकाग्र होईल असा तो त्यांच्या दृष्टीपुढील चमत्कार मीच होईन॥ ४२६॥ श्रीगुरुच्या श्रवणेंद्रियाच्या आंगणांतील शब्दाचा फार मोठा समुदाय मीच होईन. श्रीगुरुच्या अंगाला लागणारा स्पर्श मी होईन॥ ४२७॥ श्रीगुरुचे प्रेमाने अवलोकन करणारे डोळे ज्या रूपाला पाहतील ती सर्व रूपें मी होईन॥ ४२८॥ श्रीगुरुच्या जिव्हेला जो जो रस आवडेल तो तो रस मी होईन आणि त्यांच्या घ्राणेंद्रियाला आवडणारा सुवास मी होऊन त्या रूपाने त्यांच्या घ्राणेंद्रियाची सेवा करीन॥ ४२९॥ याप्रमाणे बाह्य व मनोगत सेवेला उपयोगी पडणाऱ्या सर्व वस्तु मी होऊन श्रीगुरुच्या संपूर्ण सेवेला मी व्यापून घेईन॥ ४३०॥

**गूढार्थदीपिका**—भक्ति म्हणजे भगवंताचें परम प्रेम करणें होय. हें भगवंताचें परम प्रेम कसें करावे, हे माउलींनी येथे सांगितलें आहे. जेव्हा जीव विषय भोगतो तेव्हा तो स्वत: भोक्ता होतो व संपूर्ण विषयाला भोग्य करतो. "**आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति**" या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे आपल्या सुखाकरितांच तो भोग्य विषयाचें प्रेम करून आपलें आपल्यावरील परम प्रेम व्यक्त करतो. अर्थात् आत्मा भोक्ता झाला असतां जसें त्याचें स्वत:चें परम प्रेम व्यक्त होतें, तसेंच एका भगवंताला भोक्ता करून भक्त सर्व भावाने त्याचें भोग्य झाला असतां त्याचें भगवंतावर परम प्रेम जडतें; म्हणून भगवंताला सर्व समर्पण करून सर्वस्वीं भगवंताला भोक्ता करणें, हेंच बाह्यभक्तीचें लक्षण होय, असें सिद्ध होतें.

**जंव देह हें असेल। तंव वोळगी ऐसीं कीजेल। मग देहांतीं नवल। बुद्धि आहे॥ ४३१॥**
**इये शरीरींची माती। मेळवीन तिये क्षिती। जेथ श्रीचरण उभे ठाती। श्रीगुरुचे॥ ४३२॥**
**माझा स्वामी कवतिकें। स्पर्शत जियें उदकें। तेथ लया नेईन निकें। आपीं आप॥ ४३३॥**
**श्रीगुरु वोंवाळिजती। कां भुवनीं जे उजळिती। तयां दीपांचिया दीप्ती। ठेवीन तेज॥ ४३४॥**
**चंवरी हन विंजणा। तेथ लयो करीन प्राणा। मग आंगाचा वोळगणा। होईन मी॥ ४३५॥**
**जिये जिये अवकाशीं। श्रीगुरु असती परिवारेंसीं। आकाश लया आकाशीं। नेईन तिये॥ ४३६॥**
**परि जीत मेला न संडीं। निमेष लोकां न धाडी। ऐसेनि गणाविया कोडी। कल्पांचिया॥ ४३७॥**

**अर्थ**—जोपर्यंत देह आहे तोपर्यंत अशी सेवा केली जाते आणि देहपात झाल्यावरहि भक्ताची सेवेविषयीं बुद्धि कायम असते, हें आश्चर्य आहे॥ ४३१॥ पृथ्वीच्या ज्या भागावर श्रीगुरुचे चरण उभे राहतील त्या मातींत मी शरीरांतील मातीचा अंश मिळवीन, असे तो म्हणतो॥ ४३२॥ माझे श्रीगुरुस्वामी ज्या पाण्याला कौतुकाने स्पर्श करतात, त्या पाण्यामध्ये मी आपल्या शरीरांतील जलाच्या अंशाचा लय करीन॥ ४३३॥ ज्या दिव्याने श्रीगुरुला ओवाळलें जाईल किंवा जे दिवे श्रीगुरुचे घरीं उजळले जातील, त्या दिव्यांच्या तेजांत मी आपल्या शरीरांतील तेजाचा अंश मिळवीन॥ ४३४॥ श्रीगुरुला वारा घालण्याकरितां असलेली जी चवरी किंवा पंखा त्यांत मी आपल्या प्राणवायुचा लय करिन, तरच मी श्रीगुरुच्या आंगाला वारा घालणारा सेवक होईन॥ ४३५॥ ज्या ज्या पोकळींत आपल्या परिवारासह श्रीगुरु असतील, त्या त्या पोकळींत मी आपल्या शरीरांतील पोकळीचा लय करीन॥ ४३६॥ पण जिवंतपणीं व मेल्यावरहि श्रीगुरुची सेवा सोडणार नाही. एक क्षण देखील लोकांकरितां खर्च करणार नाही. अशा प्रकारें सेवा करीतच कल्पाच्या कोटी मोजतो॥ ४३७॥

**गूढार्थदीपिका**—वरील ओव्यांतून श्रीगुरुसेवेच्या अपार आवडीचें वर्णन केलें आहे.

**येतुलेवरी धिंवसा। जयाचिया मानसा। आणि करूनिहि तैसा। अपार जो॥ ४३८॥**

**रात्र दिवस नेणे। थोडें बहु न म्हणे। म्हणियाचेनि दाटपणें। साजा होय॥ ४३९॥**
**तो व्यापारु येणें नांवे। गगनाहूनि थोरावे। एकला करी आघवें। एके काळीं॥ ४४०॥**
**हृदयवृत्ती पुढां। आंगचि घे दवडा। काज करी होडा। मानसेंसी॥ ४४१॥**

**अर्थ**—इतकें ज्याच्या मनांत अपार धैर्य असतें आणि प्रत्यक्ष तशी अपार सेवा करूनहि॥ ४३८॥ आतां दिवस उगवला, आतां रात्र झाली, इकडे ज्याचें लक्ष नसतें किंवा ज्याच्या मनांत ही सेवा थोडी झाली, ही बहु झाली, असें येत नाही; उलट श्रीगुरुची आज्ञा वारंवार होत असतां ज्याला सेवेचा अधिक हुरूप येतो॥ ४३९॥ श्रीगुरुच्या मुखांतून ''कर'' असे नांव निघाल्याबरोबर तो आनंदाने आकाशापेक्षा मोठा होतो आणि एकटाच संपूर्ण सेवा एकाकाळींच करूं लागतो॥ ४४०॥ त्याचें शरीर अंत:करणवृत्तीच्या पुढें धांव घेतें व शरीराचा व्यापार मनाशीं पैज मारतो॥ ४४१॥

**गूढार्थदीपिका**—४३८ ते ४४१ पर्यंतच्या ओव्यांतून श्रीगुरुसेवकाचे ठिकाणीं, श्रीगुरुसेवेविषयी असलेल्या उल्हासाचें वर्णन केलें आहे. किंवा श्रीगुरुसेवेचें प्रेम कमी झालें, हें ज्या लक्षणांवरून दिसून येतें तीं लक्षणें येथें माऊलींनी सांगितलीं आहेत, असेंहि म्हणतां येते.

**एखादिया वेळां। श्रीगुरुचिया खेळा। लोण करी सकळा। जीविताचें॥ ४४२॥**

**अर्थ**—एखादे वेळीं श्रीगुरुच्या खेळावरून आपल्या संपूर्ण जीविताचें निंबलोण करतो॥ ४४२॥

**गूढार्थदीपिका**—ही श्रीगुरुचीं लौकिकक्रीडा देखील त्याला परम प्रिय वाटते.

**जो गुरुदास्यें कृशु। जो गुरुप्रेमें सपोषु। जो गुरुआज्ञे निवासु। आपणचि॥ ४४३॥**
**जो गुरुकुळें सुकुलीनु। जो गुरुबंधुसौजन्यें सुजनु। जो गुरुसेवाव्यसनें सव्यसनु। निरंतर॥ ४४४॥**
**गुरुसंप्रदायधर्म। तेचि जयाचे वर्णाश्रम। गुरुपरिचर्या नित्यकर्म। जयाचें गा॥ ४४५॥**
**गुरु क्षेत्र गुरु देवता। गुरु माता गुरु पिता। जो गुरुसेवेपरौता। मार्गु नेणे॥ ४४६॥**
**श्रीगुरुचें द्वार। तें जयाचें सर्वस्व सार। गुरुसेवकां सहोदर-। प्रेमें भजे॥ ४४७॥**
**जयाचें वक्त्र। वाहे गुरुनामाचे मंत्र। गुरुवाक्यावांचूनि शास्त्र। हातीं न शिवे॥ ४४८॥**

**अर्थ**—श्रीगुरुची सेवा करतां करतां जो कृश होतो; पण श्रीगुरुच्या प्रेमाने पुष्ट असतो. जो आपण स्वत: श्रीगुरुच्या आज्ञेलाच केवळ आश्रयस्थान झाला आहे॥ ४४३॥ आपल्या कुलाच्या कुलीनपणामुळे आपल्याला कुलीन न समजतां केवळ श्रीगुरुच्या कुलीनपणामुळे जो आपल्याला कुलीन समजतो. आपल्या बांधवांच्या सौजन्यामुळे आपण सज्जन आहों, असें न समजतां श्रीगुरुबंधूच्या सौजन्याने आपण सज्जन आहों, असें समजतो व श्रीगुरुसेवेच्या व्यसनानेच जो अखंड व्यसनी झाला आहे॥ ४४४॥ श्रीगुरुच्या संप्रदायांत विहित केलेले धर्म, तेच आपले वर्णाश्रमधर्म आहेत, श्रीगुरुची सेवा हेंच ज्याचें नित्य कर्म आहे, श्रीगुरु हेंच ज्याचें पुण्यक्षेत्र असून श्रीगुरु हीच ज्याची उपास्य देवता आहे. ज्याचे माता, पिता श्रीगुरुच आहेत. ज्याला श्रीगुरुसेवेवांचून दुसरा परमार्थमार्गच माहित नाही॥ ४४५-४४६॥ श्रीगुरुचें द्वार हेंच ज्याचें प्राप्तव्य आहे आणि जो श्रीगुरुच्या, आपल्याप्रमाणे असलेल्या, सेवकावर आपल्या साक्षात् भावाप्रमाणे प्रेम करतो॥ ४४७॥ ज्याचे मुखांत गुरुनामाचा मंत्रच सारखा जपला जातो आणि श्रीगुरुच्या वचनावांचून ज्याला दुसरें शास्त्रच माहित नाही॥ ४४८॥

**गूढार्थदीपिका-जयाचें वक्त्र। वाहे गुरुनामाचें मंत्र—**

आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्य च। श्रेयस्कामो न गृण्हीयात् ज्येष्ठपुत्रकलत्रयो:॥

आपलें कल्याण व्हावें, अशी इच्छा करणाऱ्या मनुष्याने स्वत:चें नांव, गुरुचें नांव, अतिकृपणाचें नांव, सर्वांत वडिल असलेल्या मुलाचें नांव व पत्नीचें नांव वारंवार घेऊं नये. श्रीगुरुंनी आपल्या स्वत:च्या नामाचा जप करण्यास सांगितल्यावांचून आपल्या मनाने श्रीगुरुचें नांव घेतां येत नाही, असें शास्त्र सांगतें, साक्षात्कारीं पुरुष निरहंकारी असल्यामुळे ते आपल्या स्वत:च्या नांवाचा मंत्र कधीं देत नसतात. एखाद्याला भाग्याने तो दिला गेला, तर त्याने

सर्व मंत्रापेक्षा तो श्रेष्ठ समजून जपावा, असा या चरणाचा अर्थ किंवा श्रीगुरुने सांगितलेल्या भगवंताचा नाममंत्रच जपत राहावें असा अर्थ.

**गुरुवाक्यावांचून शास्त्र। हातीं न शिवे-**

**''वेदस्येश्वरप्रोक्तत्वात् यथार्थत्वे न संशयः। मुक्तस्येश्वररूपत्वात् तद्वागपि तादृशी॥''**

सर्वज्ञ भ्रमरहित अशा परमेश्वरानेच वेद उत्पन्न केलें असल्यामुळे जशी वेदाच्या प्रामाण्याविषयीं यत्किंचितहि शंका नाही, त्याप्रमाणेच ज्ञानभक्तीने परमेश्वरस्वरूप मुक्त पुरुषांचेहि वचन वेदाप्रमाणेच प्रमाण असतें, असें आचार्य म्हणतात म्हणजे ज्ञानभक्तिसंपन्न सत्पुरुषांचें वचन केव्हाहि वेदविरुद्ध नसल्यामुळे त्या पुरुषाचें वचन प्रमाण मानून वागणारे पुरुष कृतार्थ होतात, असा भाव.

**शिवतलें गुरुचरणीं। भलतें जें पाणी। तया तीर्थयात्रे आणी। तीर्थें त्रैलोक्यींची॥ ४४९॥**
**श्रीगुरुचें उशिटें। लाहे जैं अवचटें। तैं तेणें लाभें विटे। समाधीसी॥ ४५०॥**
**कैवल्यसुखासाठीं। परमाणु घे किरीटीं। उधळती पायांपाठीं। चालतां जे॥ ४५१॥**
**हें असो सांगों किती। नाहीं पारु गुरुभक्ती। परी गा उत्क्रांतमती। कारण हें॥ ४५२॥**

**अर्थ—**पाणी कसेही असो, त्याला श्रीगुरुच्या चरणाचा स्पर्श झाला हें पाहून त्यांत ब्रह्मांडाची तीर्थें साठविली आहेत, असे श्रीगुरुभक्त समजतो॥ ४४९॥ श्रीगुरुच्या उच्छिष्ट प्रसाद अकस्मात् प्राप्त झाला असता त्या लाभापुढे त्याला समाधि नकोशी वाटते॥ ४५०॥ अर्जुना! श्रीगुरु चालत असतां त्यांच्या पायामागून जे धुळीचे रज:कण उडतात ते तो कैवल्यसुखाच्या मोबदल्यांत घेतो-म्हणजे श्रीगुरुच्या पायाच्या रज:कणाच्या प्राप्तीत त्याला कैवल्याचे सुख वाटते॥ ४५१॥ अर्जुना! हे असो. श्रीगुरुसेवेचे किती वर्णन करणार! गुरुभक्तीला मर्यादाच नाही; पण माझी श्रीगुरुसेवेविषयी प्रेमाने युक्त झालेली बुद्धि पराकाष्ठेच्या या विस्ताराला कारण झाली आहे॥ ४५२॥

**जया इये भक्तीची चाड। जया इये विषयींचें कोड। जो हे सेवेवांचून गोड। न मनी कांहीं॥ ४५३॥**
**तो तत्त्वज्ञानाचा ठावो। ज्ञाना तेणेंचि आवो। हें असो तो देवो। ज्ञान भक्त॥ ४५४॥**
**हें जाण पां साचोकारें। तेथ ज्ञान उघडेनि द्वारें। नांदत असे गा पुरे। इया रीती॥ ४५५॥**
**जिये गुरुसेवेविखीं। माझा जीव अभिलाखी। म्हणोनि सोयचुकी। बोली केली॥ ४५६॥**
**एऱ्हवीं असतां हातीं खुळा। भजनावधानीं आंधळा। परिचर्येलागीं पांगुळा-। पासूनि मंदु॥ ४५७॥**
**गुरुवर्णनीं मुका। आळशी पोशिजे फुका। परि मनीं आथी निका। सानुरागु॥ ४५८॥**
**तेणेंचि पैं कारणें। हें स्थूळ पोसणें। पडलें मज म्हणे। ज्ञानदेवो॥ ४५९॥**
**परि तो बोलु उपसाहावा। आणि वोळगे अवसरु देयावा। आतां म्हणेन जी बरवा। ग्रंथार्थचि॥ ४६०॥**
**परिसा परिसा श्रीकृष्णु। जो भूतभारसहिष्णु। तो बोलतसे विष्णु। पार्थु ऐके॥ ४६१॥**

**अर्थ—**ज्याला अशा श्रीगुरुभक्तीची इच्छा आहे, ज्याला या सेवेचेच कौतुक वाटते व त्या सेवेवाचून ज्याला दुसरे कांहीच गोड वाटत नाही॥ ४५३॥ तो म्हणजे तत्त्वज्ञानाचे राहण्याचे ठिकाण होय. त्याच्या योगाने ज्ञानाला शोभा आहे. फार काय सांगायचे! ज्ञान, भक्त असून तो देव आहे-म्हणजे ज्याप्रमाणे भक्त देवाला क्षणभर सोडत नाही, त्याप्रमाणे ज्ञानहि त्याला क्षणभर सोडून राहत नाही॥ ४५४॥ अर्जुना! वर सांगितलेल्या रीतीनुसार त्याचे ठिकाणी पूर्णपणे उघड ज्ञान नांदत असते, हे खचित जाण॥ ४५५॥ या गुरुसेवेविषयीं माझे अंत:करण नेहमी आतुर असते; म्हणून मी ग्रंथार्थाला सोडून अवांतर बोलत सुटलो॥ ४५६॥ वास्तविक पाहता हात असून मी खुळा आहे, डोळे असून गुरुभजनाकडे लक्ष नसल्यामुळे आंधळा आहे आणि पाय असूनहि गुरुसेवा होत नाही, म्हणून पांगळ्याहून पांगळा आहे॥ ४५७॥ तोंड असून गुरुची स्तुति होत नाही, म्हणून मुका आहे. असा मी आळशी व फुकट पोसला जाणारा आहे. परंतु माझ्या मनांत मात्र गुरुसेवेविषयीं खरोखर प्रेम आहे॥ ४५८॥ श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, या एका कारणामुळेच मला या स्थूल देहांचे पोषण करणे भाग पडले आहे॥ ४५९॥ परंतु

आता माझ्या बोलण्याची क्षमा करून आपण मला आपली सेवा करण्यास अवसर द्यावा. आता नीट ग्रंथार्थच सांगतो॥ ४६०॥ संतसज्जनहो! ऐका ऐका. सर्व भूतांचा भार सहन करणारा प्रत्यक्ष विष्णु असा तो श्रीकृष्ण बोलत असून अर्जुन ऐकत आहे॥ ४६१॥

**म्हणे शुचित्व गा ऐसें। जयापाशीं दिसे। आंग मन जैसें। कापुराचें॥ ४६२॥**
**कां रत्नाचें दळवाडें। जैसें सबाह्य चोखडें। आंत बाहेरि एकें पाडें। सूर्यु जैसा॥ ४६३॥**
**बाहेरीं कर्में क्षाळला। भीतरीं ज्ञानें उजळला। इहीं दोहीं परी आला। पाखाळा एका॥ ४६४॥**
**मृत्तिका आणि जळें। बाह्य येणें मेळें। निर्मळु होय बोलें। वेदाचेनि॥ ४६५॥**
**भलतेथ बुद्धी बळी। रजें आरिसा उजळी। सौदणी फेडी थिगळी। वस्त्रांचिया॥ ४६६॥**
**किंबहुना इयापरी। बाह्य चोख अवधारीं। आणि ज्ञानदीप अंतरीं। म्हणौनि शुद्ध॥ ४६७॥**
**एऱ्हवीं तरी पांडुसुता। आंत शुद्ध नसतां। बाहेरी कर्म तो तत्त्वतां। विटंबु गा॥ ४६८॥**
**मृत जैसा शृंगारिला। गाढव तीर्थीं न्हाणिला। कडुदुधिया माखिला। गुळें जैसा॥ ४६९॥**
**वोस गृहीं तोरण बांधिलें। कां उपवासी अन्नें लिंपिलें। कुंकुमसेंदुर केलें। कांतहीनेने॥ ४७०॥**
**कळस ढिमाचे पोकळ। जळो वरील ते झळाळ। काय करूं चित्रींव फळ। आंतु शेण॥ ४७१॥**
**तैसें कर्मी वरिचिले कडां। न सरे थोर मोलें कुडा। नव्हे मदिरेचा घडा। पवित्र गंगे॥ ४७२॥**
**म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें। मग बाह्य लाभेल स्वभावें। वरी ज्ञानकर्में संभवे। ऐसें कें जोडे॥ ४७३॥**
**यालागीं बाह्य भागु। कर्में धुतला चांगु। ज्ञानें फेडिला वंगु। अंतरींचा॥ ४७४॥**
**तेथ अंतरबाह्य गेलें। निर्मलत्व एक जाहलें। किंबहुना उरले। शुचित्वचि॥ ४७५॥**
**म्हणोनि सद्भाव जीवगत। बाहेरी दिसती फांकत। ते स्फटिकगृहींचे डोलत। दीप जैसे॥ ४७६॥**
**विकल्प जेणे जेणें उपजे। नाथिली विकृति निपजे। अप्रवृत्तीचीं बीजें। अंकुर घेतीं॥ ४७७॥**
**तें आइके देखे अथवा भेटे। परि मनीं कांहींचि नुमटे। मेघरंगें न कांटे। व्योम जैसें॥ ४७८॥**
**एऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें। विषयांवरी तरी लोळे। परि विकाराचेनि विटाळें। लिंपिजेना॥ ४७९॥**
**भेटलेया वाटेवरी। चोखी आणि माहारी। तेथ नातळे तियापरी। राहाटों जाणे॥ ४८०॥**
**कां पतिपुत्रांते आलिंगी। एकचि ते तरुणांगी। तेथ पुत्रभावाचां आंगीं। न रिगे कामु॥ ४८१॥**
**तैसें हृदय चोख। संकल्पविकल्पीं सनोळख। कृत्याकृत्य विशेख। फुडें जाणे॥ ४८२॥**
**पाणिये हिरा न भिजे। आधणीं हरळ न शिजे। तैसी विकल्पजातें न लिंपिजे। मनोवृत्ती॥ ४८३॥**
**तया नांव शुचिपण। पार्था गा संपूर्ण। हे देखसी तेथ जाण। ज्ञान आहे॥ ४८४॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! ज्याचे बाह्य शरीर व अंतर्मन दोन्ही एकसारखे कापराप्रमाणे निर्मळ असतात, तें शुचित्व होय॥ ४६२॥ किंवा रत्नाचा संपूर्ण भाग ज्याप्रमाणे आंत-बाहेर चकचकित असतो किंवा ज्याप्रमाणे सूर्य आंत-बाहेर एकसारखा प्रकाशरूप असतो॥ ४६३॥ त्याप्रमाणे शास्त्राप्रमाणे कर्म करून ज्याने बाहेरचे शरीर शुद्ध केले व आंत आत्मज्ञानाने मन निर्मळ केले, असा जो अंतर्बाह्य एक निर्मळच झाला॥ ४६४॥ वेदाने सांगितल्याप्रमाणे पाणी व माती यांच्या योगाने शरीराला शुद्ध म्हणजे मळरहित करणे, हे बाह्य निर्मळ होणे होय॥ ४६५॥ कोठेहि, मन नाहीसे करून शुद्धि करण्यांत ज्ञानच सर्वात बलवान आहे. बाह्यत: धुळीने जसा आरसा स्वच्छ होतो किंवा वस्त्रावरील डाग परीटाचे सतेलें नाहीसे करते॥ ४६६॥ याप्रमाणेच, फार काय सांगायचे, तो बाहेर शुद्ध होतो, असे जाण आणि आंत अंत:करणांत आत्मज्ञानरूप दिवा असतो, म्हणून तो अंत:शुद्ध होतो॥ ४६७॥ वास्तविक पाहता, अर्जुना! ज्ञानाने अंत:करण शुद्ध करून न घेता केवळ बाहेर शरीराचे ठिकाणी कर्माने शुद्धि करणे ही शुद्धीची विटंबनाच होय॥ ४६८॥ ज्याप्रमाणे मेलेल्याला शृंगार करावा, गाढवाला तीर्थात स्नान घालावे, कडु दुध्याला गुळाच्या पाकाचा लेप द्यावा॥ ४६९॥ ज्याप्रमाणे ओसाड अशा घराला तोरण बांधणे जसे व्यर्थ किंवा

उपवासी मनुष्याच्या पोटांत अन्न न घालता वरून पोटाला अन्नाचा लेप लावणे जसे व्यर्थ किंवा पति जीवंत नसलेल्या स्त्रियेने कपाळी कुंकु व भांगात शेंदूर घालणे जसे व्यर्थ होय॥ ४७०॥ जळो ती मुलाम्याच्या पोकळ कळसाची वरील चकाकी! शेणाचे केलेले फळाचे चित्र काय उपयोगाचे?॥ ४७१॥ त्याप्रमाणे वरवर केवळ शरीराचे ठिकाणीच शुद्धिकर्म केल्याने खरी शुद्धि होत नाही. श्रीमंतीमुळे किंवा अधिकारामुळे ज्याचे मोल किंवा किमत वाढली आहे, असा क्षुद्रवृत्तीचा मनुष्य थोर होत नाही किंवा मानला जात नाही किंवा आंत मद्य भरलेला घडा गंगेत ठेवला तरी पवित्र होत नाही॥ ४७२॥ म्हणून अंत:करणांत ज्ञान प्राप्त झाले असतां-म्हणजे आत्मज्ञानाने अंत:करण अविद्यादिदोषरहित असे शुद्ध झाले की, मग स्वभावत:च बाह्य देहाचीहि शुद्धि होते. आणखी कर्माने ज्ञान प्राप्त होते, असे कोठे झाले आहे काय?॥ ४७३॥ याकरिताच बाह्य शरीर शुद्धिकर्माने चांगले निर्मळ करून ज्ञानाने ज्यांनी अंत:करणाचे अविद्यादि मळ नाहीसे केले॥ ४७४॥ त्याचे ठिकाणी निर्मळपणाच होऊन जातो. फार काय सांगावें! एक शुद्धिच उरते॥ ४७५॥ म्हणून ज्याप्रमाणे स्फटिकाच्या घरात असलेल्या दिव्याचा प्रकाश बाहेर पडतो, त्याप्रमाणे अंत:करणांत प्राप्त झालेली शुद्धि किंवा निर्मलत्व बाहेर प्रगट होते॥ ४७६॥ ज्याच्या योगाने संशय प्राप्त होतो, नसतेच विकार उठतात व कुकर्माच्या बीजरूपी वासना अंकुरित होतात असे कांही ऐकले, पाहिले किंवा भेटले तरी ज्याच्या मनांत, मेघाच्या रंगाने आकाश लिप्त होत नाही त्याप्रमाणे, कांहीच कल्पना उठत नाहीत॥ ४७७-४७८॥ साधारणत: तो सर्व इंद्रियांच्या साहाय्याने निरनिराळ्या विषयांचा भोग घेतांना दिसतो; पण त्याच्या मनाला विकारांच्या विटाळाचा स्पर्श होत नाही॥ ४७९॥ ज्याप्रमाणे ब्राह्मणादि स्पृश्य वर्णाचा पुरुष व महारादि अस्पृश्य वर्णाचा पुरुष हे दोघे रस्त्यावर भेटले तरी ते परस्परांना कधी शिवत नाहीत, त्याप्रमाणे चित्ताला विकाराचा स्पर्श न होऊ देता वागायचे, हेच एक ज्याला माहित असते॥ ४८०॥ किंवा ज्याप्रमाणे एकच तरुण स्त्री आपल्या पतीला व पुत्राला आलिंगन देते; पण पुत्राला आलिंगन देतेवेळीं अंत:करणात पुत्रभाव असल्यामुळे कामवासना उठत नाही॥ ४८१॥ त्याप्रमाणे निर्मळ अंत:करण चांगल्या—वाईट कल्पनांना ओळखत असते व करण्यास योग्य काय व अयोग्य काय हा विशेषभेदहि ते स्पष्ट जाणत असते॥ ४८२॥ पाण्याने हिरा भिजत नाही किंवा उकळत्या पाण्यांत वाळूचा खडा शिजत नाही. त्याप्रमाणे शुद्ध झालेली मनोवृत्ति कोणत्याही विकल्पाने लिंपित होत नाही॥ ४८३॥ हे अर्जुना! हे संपूर्ण बाह्य व आंतर शुचित्व जेथे तुला दिसेल, तेथे ज्ञान आहे, असे जाण॥ ४८४॥

**गूढार्थदीपिका**—जीव मूळात ब्रह्मस्वरूपच असल्यामुळे अत्यंत शुद्ध, निर्मळ आहे; पण विपरीत कल्पनेमुळे तो अशुद्ध अशा जीवदशेला आला आहे, आपली शुद्ध ब्रह्मदशा ओळखून त्याने विपरीत कल्पनारूप जीवदशा नाहीशी केली असतां तो आपल्या मूळच्या शुद्धस्वरूपाला प्राप्त होतो; म्हणून जेथे मनाची शुद्धि आहे तेथे ज्ञान आहे. असे माउलीनी म्हटले आहे. ''ब्रह्मज्ञानाची गुरुकिल्ली। सांगेन एक्याची बोली। ज्यांची कल्पना निमाली। ते जाण गा प्राप्त पुरुष। (एकनाथ) या ओवीत नाथांनीहि असे म्हटले आहे.

**आणि स्थिरता साचें। घर रिगाली जयाचें। तो पुरुष ज्ञानाचें। आयुष्य गा॥ ४८५॥**
**देह तरी वरिलीकडे। आपुलिया परी हिंडे। परि बैसका न मोडे। मानसींची॥ ४८६॥**
**वत्सावरूनि धेनूचें। स्नेह राना न वचे। नव्हती भोग सतियेचे। प्रेमभोग॥ ४८७॥**
**कां लोभिया दूर जाये। परि जीव ठेवाचि ठाये। तैसा देहो चाळितां नव्हे। चळु चित्ता॥ ४८८॥**
**जातया अभ्रासवें। जैसें आकाश न धांवे। भ्रमणचक्रीं न भंवे। ध्रुव जैसा॥ ४८९॥**
**पांथिकाचिया येरझारा। सवें पंथु न वचे धनुर्धरा। कां नाहीं जेवीं तरुवरां। येणें जाणें॥ ४९०॥**
**तैसा चळणवळणात्मकीं। असोनि ये पांचभौतिकीं। भूतोर्मी एकी। चळिजेना॥ ४९१॥**
**वाहुटोळीचेनि बळें। पृथ्वी जैसी न ढळे। तैसा उपद्रव उमाळें। न लोटे जो॥ ४९२॥**
**दैन्यदु:खीं न तपे। भयशोकीं न कंपे। देहमृत्यु न वासिपे। पातलेनि॥ ४९३॥**
**आर्तिआशापडिभरें। वयव्याधीगजरें। उजू असतां पाठिमोरें। नव्हे चित्त॥ ४९४॥**

**निंदा निस्तेज दंडी। कामलोभा वरपडी। परी रोमा नव्हे वांकुडी। मानसाची॥ ४९५॥**
**आकाश हे वोसरो। पृथ्वी वरि विरो। परी नेणे मोहरों। चित्तवृत्ती॥ ४९६॥**
**हाती हाला फुलीं। पासवणा जेवीं न घाली। तैसा न लोटी दुर्वाक्यशेलीं। सेलिला सांता॥ ४९७॥**
**क्षीरार्णवाचियां कल्लोळीं। कंपु नाहीं मंदराचळी। आकाश न जळे जाळीं। वणवियाच्या॥ ४९८॥**
**तैशा आल्या गेल्या ऊर्मी। नव्हे गजबज मनोधर्मी। किंबहुना धैर्य क्षमी। कल्पांतींही॥ ४९९॥**
**पैं स्थैर्य ऐसी भाष। बोलिजे जे सविशेष। ते हे दशा गा देख। देखणेया॥ ५००॥**
**हें स्थैर्य निधडें। जेथ आंगें जीवें जोडे। तें ज्ञानाचें उघडें। निधान साचें॥ ५०१॥**

**अर्थ**—आणि चित्ताची स्थिरता ज्याला प्राप्त झाली तो पुरुष ज्ञानाचे आयुष्य होय॥ ४८५॥ त्याचा देह बाहेर इच्छेप्रमाणे फिरत असला तरी त्याच्या मनाची, आत्मस्वरूपाचे ठिकाणी झालेली बैठक मोडत नाही॥ ४८६॥ ज्याप्रमाणे गाय चरायला रानांत गेली तरी तिचे प्रेम, घरी असलेल्या वासराचे ठिकाणीच असते. सती जातेवेळी घातलेले अलंकारादि भोग सुखभोग नव्हेत किंवा कृपण मनुष्य दूर गेला तरी त्याचा सर्व जीव पुरलेल्या धनापाशी असतो, त्याप्रमाणे देहाच्या नाना प्रकारच्या हालचाली होत असल्या तरी ज्याच्या चित्ताची स्वरूपापासून यत्किंचित् हालचाल होत नाही॥ ४८७-४८८॥ धावणाऱ्या मेघाबरोबर जसे आकाश धावत नाही किंवा फिरणाऱ्या नक्षत्रमंडळाबरोबर जसा ध्रुवाचा तारा फिरत नाही॥ ४८९॥ येरझारा करणाऱ्या वाटसरुबरोबर जसा मार्ग चालत नाही किंवा वृक्षाला जसे येणे जाणे नसते॥ ४९०॥ त्याप्रमाणे हालचाल करणाऱ्या या पांचभौतिक देहाचे ठिकाणी जो असून देखील ज्याचे चित्त एकाहि भौतिक अशा विकाराच्या उर्मीने चंचल होत नाही॥ ४९१॥ ज्याप्रमाणे वावटळ सुटली असता पृथ्वी जाग्यावरून ढळत नाही, त्याप्रमाणे दु:खाचे प्रसंगामागून प्रसंग येत राहिले तरी जो त्याबरोबर वाहवला जात नाही॥ ४९२॥ हीन परिस्थिति किंवा दु:ख प्राप्त झाले असता तो संतापत नाही. भय किंवा शोक प्राप्त झाला असतां तो डगमगत नाही व देहाला मृत्यु आला असतां तो भीत नाही॥ ४९३॥ इच्छा-आशा यांचा चित्तांत जोर झाला असता, वय-रोग यांची वाढ झाली असता ज्यांचे आत्मसन्मुख झालेले चित्त मागे फिरत नाही॥ ४९४॥ कोणी निंदा केली असता, कोणी अपमान केला असता, कोणी मारले असता, काम, क्रोध इत्यादि विकारांनी झडप घातली असता, ज्याच्या आत्मस्थित मनाचा केसही वांकडा होत नाही॥ ४९५॥ आकाश तुटून पडो, आणखी पृथ्वी विरून जावो; पण ज्याची आत्म्याचे ठिकाणी स्थिर झालेली चित्तवृत्ति मागे फिरत नाही॥ ४९६॥ ज्याप्रमाणे हत्तीला फुलाने मारले असता तो मुरड घेत नाही, त्याप्रमाणे मर्मभेदक शब्दांनी छळला गेला असताहि ज्याचे चित्त आत्मस्वरूपापासून मागे फिरत नाही॥ ४९७॥ ज्याप्रमाणे क्षीरसमुद्राच्या लाटांनी मंदार पर्वत डळमळत नाही किंवा आकाश वणव्याचे जाळाने जळत नाही॥ ४९८॥ त्याप्रमाणे अंत:करणांत उठणाऱ्या व नाहीशा होणाऱ्या विकारांनी त्याच्या मनाच्या स्थिररूपी धर्मात गोंधळ होत नाही. एवढेच नाही तर कल्पान्तसमयीहि त्याचे धैर्य व सहनशीलता कायमच राहते॥ ४९९॥ हे डोळस अर्जुना! जे धैर्य या नांवाने विशेषपणे बोलले जाते, ती ही दशा होय पहा॥ ५००॥ ज्याचे अंत:करण व शरीर यांचे ठिकाणी असे कधीहि न डगमगणारे स्थैर्य आहे, तो ज्ञानाचे खरोखर उघड कोठार होय॥ ५०१॥

**गूढार्थदीपिका**—देहादिक पदार्थ जोपर्यंत सत्य वाटतात, तोपर्यंतच चित्त आत्मस्वरूपापासून ढळण्याचा धोका असतो; पण दृढ आत्मज्ञानाने, मन, देह इत्यादि सर्व मिथ्या आहेत, असा अनुभव आल्यामुळे आत्मस्वरूपाशी ऐक्य पावून साक्षीस्वरूप होऊन राहिलेली ज्ञान्याची बुद्धिवृत्ति, प्रारब्धानुसार राजस, तामस, सात्विक या गुणांपैकी कोणत्याहि गुणांच्या उर्मी उठल्या तरी आत्मस्वरूपापासून ढळून ती त्या उर्मीशी ऐक्य पावत नाही, इतकी ती आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर झालेली असते, असा भाव.

**आणि इसाळु जैसा घरा। कां द्वंद्विया हतियेरा। न विसंबे भांडारा। लुब्धक जैसा॥ ५०२॥**
**एकलौतिया बाळका-। वरि पडौनि ठाके अंबिका। मधुविषीं मधुमक्षिका। लोभिणी जैसी॥ ५०३॥**

**अर्जुना जो यापरी। अंत:करण जतन करी। नेदी उभें ठाको द्वारीं। इंद्रियांच्या॥ ५०४॥**
**म्हणे काम बागुल ऐकेल। हे आशा सियारी देखैल। तरी जीवा टेंकैल। म्हणोनि बिहे॥ ५०५॥**

**अर्थ**—आणि भूत जसे झाडाला सोडत नाही किंवा धनावर असलेला सर्प जसे घर सोडत नाही, योद्धा जसे आपले हत्यार विसरत नाही, कृपण आपला ठेवा जसा विसरत नाही॥ ५०२॥ किंवा एकुलत्या मुलाच्या आईचे लक्ष ज्याप्रमाणे त्या मुलाकडेच लागलेले असते किंवा मधमाधी जशी मधाचे ठिकाणी लुब्ध असते॥ ५०३॥ अर्जुना! त्याप्रमाणे जो अंत:करणाला आवरून ठेऊन इंद्रियांच्या द्वारात त्याला उभे राहू देत नाही-म्हणजे कधीहि इंद्रियांच्या स्वाधीन होऊ देत नाही॥ ५०४॥ तो विचार करतो की माझे अंत:करणरूपी बाळ इंद्रियांच्या द्वारी आल्याचे कामरूपी बागुलाने ऐकले किंवा आशा डाकिणीने पाहिले तर त्याच्या जीवाला त्याची बाधा होईल अशी भीति वाटते॥ ५०५॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे अज्ञान बालकालाच बागुलाची किंवा डाकिणीची भीति असते; म्हणून लहान मुलाचे त्यांच्यापासून संरक्षण करावे लागते, त्याप्रमाणे जीवरूप अज्ञानदशा आहे तोपर्यंत काम, आशा इत्यादि विकारांच्या तडाक्यांत मनुष्य सापडला जातो; म्हणून आत्मज्ञान दृढ होत नाही तोपर्यंत मनाला इंद्रियांच्या स्वाधीन न होऊ देता त्याचा दृढ निग्रहच केला पाहिजे, असा भाव.

"तैसे प्राप्तेहि पुरुषे। इंद्रिये लाळिली जरी कौतुके। तरि आक्रमिला जाय दु:खे। सांसारिकें॥ ३५०॥ (ज्ञा. अ. २)" असे माउलीनी मागे सांगितलेहि आहे.

**बाहेरी धीट जैसी। दाटुगा पति कळासी। करी टेहणी तैसी। प्रवृत्तीसीं॥ ५०६॥**
**सचेतनीं वाणेपणें। देहासकट आटणें। संयमावरी करणें। बुझूनि घाली॥ ५०७॥**
**मनाचां महाद्वारीं। प्रत्याहाराचिया ठाणांतरीं। जो यमदम शरीरीं। जागवी उभे॥ ५०८॥**
**आधारीं नाभीं कंठीं। बंधत्रयाचीं घरटीं। चंद्रसूर्यसंपुटीं। सूये चित्त॥ ५०९॥**
**समाधीचे शेजेपासीं। बांधोनि घाली ध्यानासीं। चित्तचैतन्यसमरसीं। आतुर ते॥ ५१०॥**

**अर्थ**—दांडगा पुरुष आपल्या बाहेरख्याली स्त्रियेला जसा बांधून ठेवतो, त्याप्रमाणे आपल्या अंत:करणाच्या बाह्य प्रवृत्तीवर जो कडक नजर ठेवतो॥ ५०६॥ जो चेतन प्राण्यांना जणुकाय आपल्या देहाचे वायन दिल्याप्रमाणे किंवा त्यांच्या सुखाकरिता आपण अर्पण केल्याप्रमाणे आपल्या देहाला झिजवितो व इंद्रियांची द्वारे बंद करून जो त्याला संयम-म्हणजे ध्यान, धारणा, समाधि-यांच्याकडे लावतो॥ ५०७॥ मनाच्या महाद्वारामध्ये प्रत्याहाररूपी जागेत शरीराचे ठिकाणी यम-दम असे पहारेकरी उभे करतो-म्हणजे यमयुक्त मनाने इंद्रियांना विषयांपासून आवरून जो दम साधतो॥ ५०८॥ आधार, नाभी व कंठ यांचे ठिकाणी अनुक्रमे मूळ, ओढियाणा व जालंधर असे तीन बंधाचे घर करून चंद्रसूर्याच्या संपुटीत असलेल्या सुषुम्ना नाडीत चित्ताचा प्रवेश करतो॥ ५०९॥ ज्याचे चित्त समाधीचे शेजेपाशी-म्हणजे समाधिस्थितीच्या जवळ असलेल्या खालच्या ध्यानरूपी भूमीशी-बांधून ठेवले असून-म्हणजे स्थिर केले असून-ते तो चैतन्याशी समरस होण्यास आतुर करून ठेवतो॥ ५१०॥

**गूढार्थदीपिका**—शास्त्रीय सत्प्रवृत्तीने वैकारिक स्वैर प्रवृत्तीचा व यमदमाने मन, इंद्रिये यांचा निग्रह करून ध्यानाने आत्मस्वरूपाशी ऐक्य पावण्याकरिता आत्मस्वरूपाच्या प्रत्ययाची एकतानता ठेवणे हेच येथे "अंत:करणनिग्रह" या शब्दाने सांगितले आहे.

**अगा अंत:करणनिग्रहो जो। तो हा हें जाणिजो। हा आथी तेथ विजयो। ज्ञानाचा पैं॥ ५११॥**

**अर्थ**—अंत:करणनिग्रह जो म्हणतात; तो हा होय. हा जेथे आहे तेथेच ज्ञानाचा विजय आहे॥ ५११॥

**गूढार्थदीपिका—हा आथि तेथ विजयो। ज्ञानाचा पैं—**

याप्रमाणे ज्याने आपले अंत:करण ज्ञानाने आत्मस्वरूपाचे ठिकाणी ध्यानस्थ केले, त्याच्या ठिकाणीच ज्ञान विजयी होते-म्हणजे त्याचेच ज्ञान जगद्रूपकार्यासह त्याच्या अज्ञानाची निवृत्ति करण्यास समर्थ असते असा अर्थ.

**जयाची आज्ञा आपण। शिरीं वाहे अंत:करण। मनुष्याकारें जाण। ज्ञानचि तो॥ ५१२॥**

**अर्थ**—ज्याची आज्ञा, अंत:करण शिरसा वंद्य मानते-म्हणजे जो अंत:करणाच्या स्वाधीन नसून ज्याने अंत:करण आपल्या अत्यंत स्वाधीन ठेवले आहे तो ''मनुष्याकारें जाण। ज्ञानचि तो'' प्रत्यक्ष ज्ञानच मनुष्याच्या आकाराने आहे, असे जाण॥ ५१२ ॥

**गूढार्थदीपिका**—देहादिक जगताची जड भौतिकता वास्तविक नसून अज्ञानभ्रमजन्य असल्यामुळे ज्ञानाने ज्याच्या अज्ञानाची कार्यासह निवृत्ति झाली आहे, अशा दृढ ज्ञानाच्या भूमिकेवर आलेल्या ज्ञानी पुरुषाच्या वृत्तीला मग देहादिकांची भौतिकता भासूं शकत नाही.

आचार्य म्हणतात, ''यथा तरंगकल्लोलैर्जलमेव स्फुरत्यलम्। पात्ररूपेण ताम्रं हि ब्रह्माण्डौघैस्तथाऽऽत्मता''॥ ६३ ॥ (अपरोक्षानुभूति) ज्याप्रमाणे नाना तरंगाच्या रूपाने पाण्याचाच अनुभव येतो किंवा ताम्रपात्रांत तांब्याचाच अनुभव येतो, त्याप्रमाणे दृढ ज्ञान्याला अनंत ब्रह्माण्डाचा प्रवाह चिदात्मस्वरूपानेच अनुभवाला येतो.

**इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहङ्कार एव च । जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

**अर्थ**—इंद्रियांच्या विषयरूप अर्थाचे ठिकाणी वैराग्य, तसेच अहंकाररहितता, जन्म, मृत्यु, जरा, व्याधि या प्रत्येकांत असलेल्या दु:खरूप दोषांचे चिंतन करणे॥ ८ ॥

**आणि विषयांविखीं। वैराग्याची निकी। पुरवणी मानसीं कीं। जिती आथी॥ ५१३ ॥**

**अर्थ**—मनामध्ये विषयांविषयी वैराग्याचा चांगला जिवंत पुरवठा असतो॥ ५१३ ॥

**गूढार्थदीपिका**—माउलींनी या ओवीचा अर्थ मागे नवव्या अध्यायांतील ओवी १८८ च्या ''जया निजल्याते उपासी। वैराग्य गा'' या चरणांतून सांगितला आहे.

**वमिलिया अन्ना। लाळ न घोंटी जेवीं रसना। कां आंग न सूये आलिंगना। प्रेताचिया॥ ५१४ ॥**
**विष खाणें नागवे। जळत घरीं न रिगवे। व्याघ्रविवरां न वचवे। वस्ती जेवीं॥ ५१५ ॥**
**धडाडीत लोहरसीं। उडी न घालवे जैसी। न करवे उशी। अजगराची॥ ५१६ ॥**
**अर्जुना तेणें पाडें। जयासी विषयवार्ता नावडे। नेदी इंद्रियांचेनि तोंडें। कांहींच जावों॥ ५१७ ॥**
**जयाचे मनी आलस्य। देहीं अतिकार्श्य। यमदमीं सामरस्य। जयासि गा॥ ५१८ ॥**
**तपोव्रतांचा मेळावा। जयाचे ठायीं पांडवा। युगांत जया गांवा-। आंतु येतां॥ ५१९ ॥**
**बहु योगाभ्यासीं हांव। विजनाकडे धांव। न साहे जो नांव। संघाताचें॥ ५२० ॥**
**नाराचांचीं आंथुरणें। पूयपंकीं लोळणें। तैसें लेखी भोगणें। ऐहिकींचें॥ ५२१ ॥**
**आणि स्वर्गातें मानसें। ऐकोनि मानीं ऐसें। कुहिलें पिशित जैसें। श्वानाचें कां॥ ५२२ ॥**
**तें हें विषयवैराग्य। जें आत्मलाभाचें भाग्य। येणें ब्रह्मानंदा योग्य। जीव होती॥ ५२३ ॥**

**अर्थ**—ओकलेले अन्न खाण्याकरितां जसे जिभेला पाणी सुटत नाही. किंवा प्रेताला आलिंगन देण्याकरितां कोणी आपले आंग पुढे करीत नाही॥ ५१४ ॥ हलाहलासारखे विष पचनी पाडता येत नाही, जळत्या घरात जाववत नाही, वाघाच्या खोप्यात ज्याप्रमाणे वस्ति करवत नाही॥ ५१५ ॥ ज्याप्रमाणे सळसळणाऱ्या लोखंडाचे रसात उडी घालवत नाही किंवा अजगराची उशी करवत नाही॥ ५१६ ॥ अर्जुना! त्याप्रमाणे ज्याला विषयाची गोष्ट आवडत नाही आणि जो इंद्रियांच्या तोंडात काहीच जाऊ देत नाही॥ ५१७ ॥ ज्याच्या मनांत विषयसेवनाविषयी आळस असतो, मनसोक्त विषयसेवन नसल्यामुळे ज्याच्या देहाचे ठिकाणी कृशता असते आणि मनाच्या व इंद्रियांच्या निग्रहाचे ठिकाणी ज्याला गोडी वाटते॥ ५१८ ॥ अर्जुना! जो सारखी नाना प्रकारची तपव्रतें करीत असतो, ज्याला गांवांत आले असता प्रलयासारखे दु:ख होते॥ ५१९ ॥ योगाभ्यासाकडे व अरण्यात जाऊन बसण्याकडेच ज्याच्या मनाची फार प्रवृत्ति असते व जो लोकसमुदायाचे नावही कधी घेत नाही॥ ५२० ॥ इहलोकीचे विषयसुख भोगणे म्हणजे त्याला बाणांच्या शय्येवर निजण्यासारखे दु:खदायक किंवा पुवाच्या चिखलात लोळण्यासारखे किळसवाणे वाटते॥ ५२१ ॥ आणि स्वर्गसुखाचे वर्णन ऐकून मनांत तो ते कुत्र्याच्या कुजलेल्या मासाप्रमाणे मानतो॥ ५२२ ॥ अर्जुना! जे

विषयवैराग्य आत्मस्वरूपाचा लाभ करून देणारे सद्भाग्य म्हटले जाते, ते हे होय. यांच्या योगाने जीव निर्गुण आत्मस्वरूपाचे ठिकाणी समाधि साधून ब्रह्मानंद भोगण्याला योग्य होतो॥ ५२३॥

**गूढार्थदीपिका—आत्मलाभाचे भाग्य**—विषयासक्तीने अखंड विषयाकार होत असलेले मन आत्माकार होऊं शकत नाही. वैराग्याने विषयाचा कंटाळा येऊन अंत:करणाचे विषयाकार होणे बंद पडले की अंत:करण नामरूपात्मक विशेषभावरहित होते व तेच त्याचे आत्माकार होणे होय. हे मागे दहाव्या अध्यायातील १७९ ओवीवरील गूढार्थदीपिकेत श्रीमद्भागवताचे टीकाकार श्रीधराचार्य यांचे वचन उदाहृत करून सांगितलेच आहे.

परब्रह्माचे ठिकाणी फलव्याप्ति नाही, पण वृत्तिप्राप्ति आहे असे जे विद्यारण्यस्वामींनी पंचदशीत म्हटले आहे, त्याचा अर्थ असा—

"वृत्तिप्रतिबिंबित चिदाभास: फलम्" (पं. द. तृप्तिदीप श्लो. ९० वरील रामकृष्णटीका) वृत्तीत प्रतिबिंबित झालेल्या चिदाभासाला फल म्हणतात. अर्थात्च वृत्ति व चिदाभास मिळून फल होते. व्यवहारातील पदार्थ जाणतांना वृत्ति व चिदाभास या दोघांची आवश्यकता असते. ते दोन्हीहि त्या जाणल्या जाणाऱ्या पदार्थांना व्यापतात. "अर्थाकारी भवेद्वृत्ति: फलेनार्थ: प्रकाशते। अर्थज्ञानं विजानाति स एव अर्थ प्रकाशते॥ ३०॥" (श्रीशंकराचार्यकृत-सदाचारानुसंधान) वृत्ति पदार्थाकार होते व आपल्याहून भिन्नपणाने पदार्थाचा विशेषपणा व मर्यादितपणा फळाने कळतो. असा आचार्यांच्या वरील श्लोकाचा भावहि आहे.

पण ज्याप्रमाणे अंधारात बसलेल्या मनुष्याला सूर्य दिसत नाही; पण अंधाराबाहेर आल्याबरोबर स्वयंप्रकाशरूप सूर्य त्याला आपोआप दिसू लागतो, तो पाहण्याकरिता त्याला पणतीच्या दिव्याची गरज लागत नाही; त्याप्रमाणे सत्वगुण हा निर्मळ असून चैतन्याचे सान्निध्याने प्रकाशक असल्यामुळे, सात्विकवृत्ति ही ब्रह्माकार होऊन जीवाचे ठिकाणी असलेले, "ब्रह्म नाही" "मी ब्रह्म जाणत नाही" असे परब्रह्माविषयीचे अज्ञानावरण नष्ट करते व मग स्वयंप्रकाशरूप ब्रह्म ऐक्याने अनुभवाला येते.

पुन: व्यवहारांतील, आपल्याहून भिन्न व मर्यादित असा जो जो पदार्थ वृत्तिप्रतिबिंबित चिदाभासाच्या योगाने जाणला जातो, तो 'मी जाणला' असे वाटून ज्ञात झाला असतां त्या पदार्थाचे ठिकाणी ज्याप्रमाणे ज्ञातताधर्म येतो, त्याप्रमाणे परब्रह्माचे ठिकाणी ज्ञातताधर्म येत नाही; कारण जाणणारा चिदाभास परब्रह्माहून अलग न राहता परब्रह्माशी ऐक्य पावलेलाच असतो.

सारांश इतर पदार्थांप्रमाणे "मी ब्रह्म जाणतो" असा आपल्याहून परब्रह्माच्या निराळेपणाचा अनुभव येत नसून "मी परब्रह्म आहे" असा ऐक्यानुभवच येतो.

याप्रमाणे अंत:करण विषयाकारावाचून आत्माकार झाले तरच जीवाला निर्गुण ब्रह्मानंद प्राप्त होतो.

**ऐसा उभयभोगीं त्रासु। देखसी जेथ बहुवसु। जाण तेथ रहिवासु। ज्ञानाचा तूं॥ ५२४॥**
**आणि सचाडाचिये परी। इष्टापूर्ते करी। परी केलेपण शरीरीं। वसों नेदी॥ ५२५॥**
**वर्णाश्रमपोषकें। कर्मे नित्यनैमित्तिकें। तयांमाजीं कांहीं न ठके। आचरतां॥ २२६॥**
**परि हें मियां केलें। की हें माझेनि सिद्धी गेले। ऐसें नाहीं ठेविलें। वासनेमाजीं॥ ५२७॥**
**जैसें अवचितपणें। वायूसि सर्वत्र विचरणें। कीं निरभिमान उदैजणें। सूर्याचें जैसें॥ ५२८॥**
**कां श्रुति स्वभावता बोले। गंगा काजेविण चाले। तैसें अवष्टंभहीन भलें। वर्तणें जयाचे॥ ५२९॥**

**अर्थ**—याप्रमाणे इहलोकांतील व परलोकांतील विषयभोगाविषयी ज्याचे ठिकाणी अत्यंत कंटाळा तुला दिसून येईल, तेथेच आत्मज्ञान राहते असे तू जाण॥ ५२४॥ आणि यज्ञादि इष्टकर्मे व तलावादि पूतकर्मे यांचे सकाम पुरुषाप्रमाणे अत्यंत आस्थापूर्वक जो आचरण करतो, पण बाहेर शरीराचे ठिकाणी "मी केले" असा कर्तृत्वाभिमान उठू देत नाही॥ ५२५॥ वर्णाश्रमाला पोषक अशी जी नित्यनैमित्तिक कर्मे त्यापैकी कशाचेही आचरण केल्यावाचून राहत नाही॥ ५२६॥ पण "हे मी केले" किंवा "माझ्या योगाने हे सिद्धीस गेले" असा अभिमान वागविण्याचे

तिळमात्र देखील ज्याच्या मनात येत नाही ॥ ५२७ ॥ ज्याप्रमाणे सहजगत्या वायूच सर्वत्र वाहतो किंवा ज्याप्रमाणे सूर्य, उगविण्याचा अभिमान न धरता सहज उगवतो ॥ ५२८ ॥ अथवा ज्याप्रमाणे वेद हे परमेश्वराचे स्वाभाविक शब्द आहेत किंवा लोकोद्धाराच्या प्रयोजनावाचून स्वभावत:च गंगा वाहते, त्याप्रमाणेच ज्याचे शास्त्रानुसार निरभिमान वागणे असते ॥ ५२९ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञान्याच्या ठिकाणी विद्याभिमान नसतो व त्याचे कर्माचरण निरभिमानाने चालू असते. किंवा मी ज्ञानी आहे, मला कर्म कशाला करायला पाहिजे, असे समजून कर्मत्याग करण्यात भगवत्प्रेम उणे होत असल्यामुळे तो कर्म सोडू शकत नाही. चित्तशुद्धीचे साधन म्हणून साधनदशेत अभ्यासिलेले भागवतधर्माचे आचरण, भगवदाज्ञा समजून निष्कामचित्ताने ज्ञानीपुरुष ज्ञानदशेतही करीत राहतात.

ज्ञानानंतर वर्णाश्रमधर्माचे आचरण न करणे हे अहंकाराला पोषक होते व आचरण करीत राहणे हे निरहंकाराला पोषक होते.

**ऋतुकाळीं तरी फळती। परी फळलों हें नेणती। तयां वृक्षांचिये ऐसी वृत्ती। कर्मी सदा ॥ ५३० ॥**
**एवं मनीं कर्मी बोलीं। जेथ अहंकारा उखी जाहली। एकावळीची काढिली। दोरी जैसी ॥ ५३१ ॥**
**संबधेंवीण जैसीं। अभ्रें असती आकाशीं। देहीं कर्मे तैसीं। जयासि गा ॥ ५३२ ॥**
**मद्यपा आंगींचें वस्त्र। कां लेपाहातींचें शस्त्र। बैलावरी शास्त्र। बांधलें आहे ॥ ५३३ ॥**
**तया पाडें देहीं। जया मी आहे हे सेचि नाहीं। निरहंकारता पाहीं। तया नांव ॥ ५३४ ॥**

**अर्थ**—ज्या ज्या ऋतुत वृक्षांना फळे यायची, त्या त्या ऋतूत वृक्षांना फळे येतात, पण आम्हाला फळे आली, हे ते वृक्ष जाणत नाहीत. त्या वृक्षाप्रमाणेच सर्व प्रकारच्या कर्माचे आचरण करतेवेळी ज्ञानीपुरुषांची वृत्ती असते ॥ ५३० ॥ ज्याप्रमाणे एकपदरी हाराची दोरी काढावी त्याप्रमाणे ज्याच्या मनांतून, कर्मातून व बोलण्यांतून अहंकार नि:शेष नाहीसा झाला ॥ ५३१ ॥ आकाशाशी संबंध न होता, जसे आकाशात अभ्रे राहतात, त्याप्रमाणे कर्तृत्व अहंकाराच्या द्वारा स्वत:शी संबंध न होताच ज्या ज्ञान्याच्या शरीराचे ठिकाणी कर्मे राहतात ॥ ५३२ ॥ मद्य प्यालेल्या मनुष्याच्या आंगावरील वस्त्राप्रमाणे किंवा चित्राच्या हातांतील शस्त्राप्रमाणे किंवा बैलाच्या पाठीवर लादलेल्या शास्त्रसंभाराप्रमाणे ज्या ज्ञान्याला मी देह धारण करणारा आहे अशी आठवणच नाही अशा स्थितीला निरहंकारता म्हणतात. पाहा ॥ ५३३-५३४ ॥

**गूढार्थदीपिका**—वृत्त्यारूढ किंवा वृत्तीचा अभिमान धारण करून वृत्तिपुरतीच आपली मर्यादित कल्पना करणाऱ्या चैतन्याला जीव म्हणतात. हा जीव असा अभिमान धारण करीत देहापर्यंत येतो-म्हणजे देहाचा अभिमान धारण करतो; पण दृढ आत्मज्ञानाने वृत्ति आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर झाली असता, त्याचा व अहंकाराचा संबंध नि:शेष सुटतो व तो अहंकाराचा साक्षी होऊन राहतो, प्रारब्धानुसार व्यवहार करतांना इतरांना देहाचे ठिकाणी त्याचे मी पण आहे, असे दिसत असले तरी त्याची त्याला आठवण नसते. अशी स्थिति झाली असता, तिला निरहंकारता म्हणतात.

**हें संपूर्ण जेथें दिसे। तेथेंचि ज्ञान असे। इयेंविषीं अनारिसें। बोलों नये ॥ ५३५ ॥**
**जन्ममृत्युदु:खें। व्याधिवार्धक्यकलुषें। इयें अंगा न येतां देखे। दुरूनि जो ॥ ५३६ ॥**
**साधकु विवसिया। कां उपसर्गु योगिया। पावे उणेयापुरेया। वोथंबा जेवीं ॥ ५३७ ॥**
**वैर जन्मांतरींचें। सर्पा मनौनि न वचे। तेवी अतीता जन्माचें। उणें जो वाहे ॥ ५३८ ॥**
**डोळां हरळ न विरे। घायीं कोत न जिरे। तैसें काळींचें न विसरे। जन्मदु:ख ॥ ५३९ ॥**

**अर्थ**—ही निरहंकारता पूर्णपणे जेथे दिसून येते, तेथेच आत्मज्ञान आहे. हे खोटे आहे. असे म्हणू नये ॥ ५३५ ॥ आणि जन्म, मृत्यु, जरा यांचे दु:ख, रोग, म्हातारपण आणि पापे शरीराचे ठिकाणी प्राप्त होण्यापूर्वी ही पुढे प्राप्त होतील अशी कल्पना करून जो सावध होतो ॥ ५३६ ॥ जमिनीतील पुरलेले धन काढू पाहणारा साधक, जसा त्यावरील पिशाच्चाविषयी सावध असतो, किंवा योगी योगांत प्राप्त होणाऱ्या विघ्नाविषयी सावध असतो, अथवा

गवंडी भिंत वाकडी होऊ नये म्हणून सावधपणे वोळंबा बाळगतो॥ ५३७॥ सर्पाच्या मनातून ज्याप्रमाणे जन्मांतरीचे वैर जात नाही, त्याप्रमाणे आत्मस्वरूप विसरल्यामुळे मागील अनंत जन्मामध्ये भोगलेल्या दुःखाची जो सारखी आठवण ठेवतो॥ ५३८॥ ज्याप्रमाणे डोळ्यांत गेलेला खडा विरत नाही किंवा जखमेंत शस्त्र जिरत नाही, त्याप्रमाणे मागील अनेक जन्मामुळे निरनिराळ्या काळी झालेले दुःख जो विसरत नाही॥ ५३९॥

**गूढार्थदीपिका**—संसाराचा विचार केला असतां "सुख पाहता जवापाडे। दुःख पर्वताएवढे" ही संतवाणी अत्यंत सत्य असल्याचेच कोणालाही अनुभवाला येते; पण जीव सुखाकडे लक्ष देऊन झालेले दुःख विसरत जातो; म्हणूनच त्याची विषयासक्ति कायम राहूत तो परमेश्वरपराङ्मुख असतो. अर्थात् संसारात येणाऱ्या दुःखाची जितकी आठवण राहील तितकी ती परमार्थाला साधक होते, असा भाव.

**म्हणे पूयगर्तें रिगाला। अहा मूत्ररंध्रें निघाला। कटा मियां चाटिला। कुचस्वेदु॥ ५४०॥**
**ऐसिऐसियापरी। जन्माचा कांटाळा धरी। म्हणे आतां तें मी न करीं। जेणें ऐसें होय॥ ५४१॥**
**हारी उमचावया। जुंवारी जैसा ये डाया। कीं वैरा बापाचेया। पुत्र जचे॥ ५४२॥**
**मारिलियाचेनि रागें। पाठीचा जेवीं सूड मागे। तेणें आक्षेपें लागे। जन्मापाठीं॥ ५४३॥**
**परि जन्मती ते लाज। न सांडी जयाचें निज। संभाविता निस्तेज। न जिरे जेवीं॥ ५४४॥**
**आणि मृत्यु पुढा आहे। तोचि कल्पांतीं कां पाहे। परि आजीचि होये। सावधु जो॥ ५४५॥**
**माजीं अथांव म्हणता। थडियेची पांडुसुता। पोहणार आइता। कासेसि जेवीं॥ ५४६॥**
**कां न पवतां रणाचा ठावो। सांभाळिजे जैसा आवो। ओडण सुइजे घावो। न लागतांचि॥ ५४७॥**
**पाहेचा पेणा वाटवधा। तंव आजीचि होइजे सावधा। जीव न वचतां औषधा। धांविजे जेवीं॥ ५४८॥**
**येरवी ऐसें घडे। जो जळत घरीं सांपडे। तो मग न पवाडे। कुहा खणों॥ ५४९॥**
**चोंढिये पाथरू गेला। तैसेनि जो बुडाला। तो बोंबेहिसकट निमाला। कोण सांगें॥ ५५०॥**
**म्हणोनि समर्थेसि वैर। जया पडिलें हाडखाइर। तो जैसा आठही पाहर। परजूनि असे॥ ५५१॥**
**नातरी केळवली नोवरी। कां संन्यासी जयापरी। तैसा न मरतां जो करी। मृत्युसूचना॥ ५५२॥**
**पैं गा जो ययापरी। जन्मेंची जन्म निवारी। मरणें मृत्यु मारी। आपण उरे॥ ५५३॥**

**अर्थ**—तो विचार करतो की, अरेरे! मी पुवाच्या खड्ड्यात शिरलो व मूत्रद्वाराने बाहेर निघालो, हायरे! देवा! स्तनपान करतांना आईचे स्तनाचे ठिकाणी असलेला घामहि मी चाटला॥ ५४०॥ असा नाना प्रकारच्या दुःखाचा विचार करून जन्माचा तो कंटाळा करतो आणि म्हणतो, आता मी जेणेकरून जन्मास येईन असे करणार नाही॥ ५४१॥ जसा जुवा खेळणारा, हरविलेले धन मिळविण्याकरिताच पुनः खेळायला येतो किंवा जसा मुलगा, पित्याचे वैर करणाऱ्याचा सूड घेण्याचा उद्योग करतो॥ ५४२॥ आपल्या वडील भावाला मारले असे पाहून त्याचा पाठचा भाऊ मारणाऱ्याचा राग येऊन त्याचा ज्याप्रमाणे सूड उगवू पाहतो, तितक्याच त्वेषाने जो जन्म नाहीसे करण्याच्या पाठीमागे लागतो॥ ५४३॥ जसे संभावित पुरुष, झालेला अपमान विसरत नाही, त्याप्रमाणे आपण जन्मरहित सच्चिदानंदरूप असतांना, जन्म व जन्माचे दुःख अनुभवितो, याची लाज वाटून ती, ज्याच्या मनांतून जात नाही॥ ५४४॥ आणि पुढे असलेला मृत्यु कल्पांती कां होईना, पण जो त्याविषयी आजच सावध होतो॥ ५४५॥ मध्ये पाणी अथांग आहे, असे कोणी सांगितल्यास, जसा, अर्जुना! थडीवर उभा असलेला पोहणारा बळकट कांस बांधतो॥ ५४६॥ किंवा ज्याप्रमाणे युद्धस्थानाचे ठिकाणी प्राप्त होण्याचे पूर्वीच आपले अवसान सांभाळले पाहिजे किंवा घाव लागण्यापूर्वीच ढाल पुढे केली पाहिजे॥ ५४७॥ उद्याच्या मुक्कामावर वाटमारा आहे असे कळल्यावर जसे आजच सावध व्हायला पाहिजे, प्राण जाण्याचे पूर्वीच औषधाकरिता वैद्याकडे धावून गेले पाहिजे॥ ५४८॥ नाहीतर, ज्याप्रमाणे जळत्या घरात सापडलेला मनुष्य विहीर खणून पाण्याने आग विझवू शकत नाही, त्याप्रमाणे होईल॥ ५४९॥ ज्याप्रमाणे अथांग डोहांत दगड पडला असता, तो झालेल्या आवाजासह तळाशी जातो, त्याप्रमाणे

जो संसारात बुडाला तोहि आपल्या ओरडण्यासह नाहीसा होतो. त्याची वार्ता सांगणारेहि कोणी राहत नाही॥ ५५०॥ म्हणून, ज्याचे समर्थ पुरुषाशी हाडवैर पडते तो, ज्याप्रमाणे आठहि प्रहर शस्त्र घेऊन सज्ज असतो॥ ५५१॥ किंवा जिचे लग्न ठरले अशी मुलगी लग्न होण्यापूर्वीच माहेरचे प्रेम सोडून पतीच्या घरचे प्रेम लावून घेते किंवा संन्यासी संन्यास घेण्यापूर्वीच संसाराची आशा सोडून राहतो, त्याप्रमाणे मरणापूर्वीच जो आपल्या मनाला मृत्यूची-म्हणजे देहाच्या वियोगाची-सूचना बाळगून असतो॥ ५५२॥ जो याप्रमाणे या जन्मानेच पुढील जन्माची वारी संपवितो आणि या मरणानेच पुढील मृत्यु नाहीसा करून आपण जन्ममरणरहित अशा सच्चिदानंद आत्मरूपाने उरतो॥ ५५३॥

**गूढार्थदीपिका**—मी सर्व देहादिकांहून निराळा केवळ सच्चिदानंदस्वरूप आहे, मला जन्म नाही, मृत्यु नाही, असा जेव्हा मनाचा नि:संदिग्ध निश्चय होतो, तेव्हा त्या निश्चयाला आत्मानुभव किंवा ज्ञान म्हणतात. आचार्यांनीहि ''तस्मात्सर्वदु:खविनिर्मुक्तैक चैतन्यात्मकोऽहमित्येष आत्मानुभव:'' (ब्र. सू. शां. भा. ४-१-३) या पंक्तीने असेच सांगितले आहे.

हे ज्ञान झाले असता मी देह आहे, देह जन्मतो म्हणजे मी जन्मतो, देह पडला म्हणजे मी मरतो इत्यादि कुकल्पना नाहीशा होऊन आपण सर्व दु:खरहित आहो, असा अनुभव येतो.

**तया घरीं ज्ञानाचें। सांकडें नाहीं साचें। जया जन्ममृत्यूचें। निमाले शल्य॥ ५५४॥**
**आणि तयाचि परी जरा। न टेंकता शरीरा। तारुण्याचिया भरा-। माजीं देखे॥ ५५५॥**
**म्हणे आजिच्या अवसरीं। पुष्टि जे शरीरीं। ते होईल काचरी। वाळली जैसी॥ ५५६॥**
**निदैवाचें व्यवसाय। तैसे ठाकती हातपाय। अमंत्रि राज्याची परी होय। बळा यया॥ ५५७॥**
**फुलांचिया भोगा-। लागीं प्रेम टांगा। ते करेयाचा गुडघा। तैसें होईल॥ ५५८॥**

**अर्थ**—जन्ममृत्युचे भीतिरूपी शल्य ज्याचे मनांतून नाहीसे झाले, त्याचे ठिकाणी आत्मज्ञानाची खरोखर उणीवच नाही॥ ५५४॥ आणि त्याप्रमाणेच जरा प्राप्त होण्यापूर्वी-म्हणजे शरीर बलिपलित होण्यापूर्वी-ऐन तारुण्याच्या भरांतच जो तिला (जरेला) पाहत असतो॥ ५५५॥ आणि म्हणतो की आज या क्षणी माझ्या शरीराचे ठिकाणी जी पुष्टि आहे तो जाऊन, ते (शरीर) वाळलेल्या काचरीप्रमाणे होईल॥ ५५६॥ माझे हातपाय भाग्यहीनाच्या उद्योगाप्रमाणे क्रियाहीन होऊन राहतील आणि मंत्री नसलेल्या राजाप्रमाणे माझ्या शरीरसामर्थ्याची स्थिति होईल॥ ५५७॥ (फूल-पुष्प-म्हणजे ऋतु.) स्वस्त्रियेला प्राप्त होणाऱ्या ऋतूचा भोग होण्याचे कामी उपयोगी म्हणून ज्या मांड्यावर प्रेम केले जाते त्या उंटाच्या गुडघ्याप्रमाणे ओबडधोबड, बेडौल होतील॥ ५५८॥

**गूढार्थदीपिका**—कोकणांत डोक्यांत फुले खोवतात व डोक्याला ''टांगे'' हा शब्द लावतात; या रूढीला धरून कित्येक विद्वानांनी ''फुलाच्या भोगाकरिता ज्या मस्तकावर प्रेम केले जाते, ते मस्तक उंटाच्या गुडघ्या सारखे होईल'' असा या ओवीचा अर्थ केला आहे. पण पुढे ''मस्तक आदरी शिरो-। भागी कंप'' या ओवींत म्हातारपणाच्या डोक्याचे वर्णन केले गेले आहे व ''टांगे'' याचे ''टांगा'' हें रूप कसे होऊ शकते, याची उपपत्ति लावता येत नाही.

पुन: सर्व लोक फुलांचा उपभोग घेण्याकरिता डोक्याचाच उपयोग करतात, असे नाही, तर निरनिराळ्या अवयवांचाहि उपयोग करतात. पण ''फुल'' म्हणजे ''ऋतु'' याचा मात्र उपयोग ''टांगा'' म्हणजे ''मांड्या'' याच्याच साहाय्याने घेता येतो हा सर्वांचा एकच अनुभव आहे. म्हणून या ओवीत माऊलींनी म्हातारपणांतील मांडीच्या दुर्दशेचे वर्णन केले आहे, असे आम्हाला वाटते.

कोणी फुलांचा संबंध नाकाशी असतो, मस्तकाशी असण्याचे कारण नाही, या कल्पनेने ''टांगा'' हे क्रियापद घेऊन अनुमानाने ''नाक हे उंटाच्या गुडघ्याप्रमाणे ओबडधोवड होईल'' असा अर्थ केला आहे. परंतु नाकाचे वर्णन पुढे ५६३ ओवीत आले असल्यामुळे द्विरुक्तिदोष येण्याचा संभव आहे. दुसरे वृद्धपणी नाकाचा आकार कितीहि विद्रूप झाला तरी त्यास उंटाच्या गुडघ्याची उपमा देता येणार नाही.

पुनरुक्तीचा दोष टाळावयाचा असल्यास ''टांगां'' या शब्दाचा ''मांडी'' हाच अर्थ करावा लागतो व वरच्या ओवीत आलेल्या करचरणाच्या उल्लेखावरून पुढे ''मांडी'' या अवयवाचा उल्लेख येणेहि सुसंगतच होते, येथे उंटाच्या गुडघ्याची मांडीला उपमा देऊन म्हातारपणांतील ''मांडी'' या अयवयाचा बेढौलपणा दाखविला आहे.

**वोढाळाचां खुरीं। आषाढ वातें बुरी। ते दशा मा या शिरीं। पावेल गा॥ ५५९॥**
**पद्मदळेंसी इसाळे। भांडताति जे हे डोळे। ते होती पडवळें। पिकलीं जैसीं॥ ५६०॥**
**भंवईचीं पडळें। वोमथती सिनसाळें। उरु कुहिजेल जळें। आंसुवांचेनि॥ ५६१॥**
**जैसें बाभुळीचें खोड। गिरबडूनी जाती सरड। तैसें पिचडीं तोंड। सरकटिजेल॥ ५६२॥**
**रांधवणी चुलीपुढें। पऱ्हे उम्हताती खातवडे। तैसींचि यें नाकाडें। बिडबिडती॥ ५६३॥**
**तांबूलें ओंठ रांऊ। हांसतां दांत दाऊं। सनागर मिरऊं। बोल जेणें॥ ५६४॥**
**तयाचि पाहे या तोंडा। येईल जलवंठाचा लोंढा। इया उमळती दाढा। दातांसी हिं॥ ५६५॥**
**कुळवाडी रिणें दाटलीं। कां वांकडिया ढोरें बैसलीं। तैसी नुठी कांही केली। जीभचि हे॥ ५६६॥**
**कुसळें कोरडीं। वारेनि जाती बरडीं। तैसी आपत्ति तोंडी। दाढियेसी॥ ५६७॥**
**आषाढीचेनि जळें। जैसीं झिरपती शैलाचीं मौळें। तैसें खाडीहूनि लाळे। पडती पूर॥ ५६८॥**
**वाचेसि अपवाडु। कानीं अनुघडु। पिंड गरुवा माकडु। होईल हा॥ ५६९॥**
**तृणाचें बुजवणें। आंदोळे वारेनुगुणें। तैसें येईल कांपणें। सर्वांगासी॥ ५७०॥**
**पायां पडती वेंगडी। हात वळती मुरकुंडी। बरवेपणा बागडी। नाचविजैल॥ ५७१॥**
**मळमूत्रद्वारें। होऊनि ठाकती खोंकरें। नवसियें होती इतरें। माझां निधनीं॥ ५७२॥**

अर्थ—आषाढ महिन्यांतील वाऱ्याच्या योगाने मोकाट फिरणाऱ्या गुराच्या ठिकाणी बुरशी येऊन जसा पायाचा खुरी रोग होतो, तशी दशा माझ्या डोक्याची होईल॥ ५५९॥ कमळाच्या दळाशी स्पर्धेने भांडणारे हे डोळे पिकलेल्या पडवळाप्रमाणे होतील॥ ५६०॥ डोळ्यांवरील भुवयांचे पटल जुनाट सालीप्रमाणे लोंबू लागतील आणि डोळ्यांतील येणाऱ्या पाण्याच्या योगाने वक्षःस्थल कुजू लागेल॥ ५६१॥ ज्याप्रमाणे सरडे बाभळीच्या खोडाला, चालतांना त्याच्याच चिकाने बरबटून टाकतात, त्याप्रमाणे तोंड थुंकेने बरबटले जाईल॥ ५६२॥ ज्याप्रमाणे स्वयंपाकाच्या चुलीपुढील मोरींत टाकलेल्या घाणेरड्या पाण्याचे बुडबुडे उठतात, त्याप्रमाणे हें नाक शेंबडाने भरून जाईल॥ ५६३॥ ज्या तोंडाचे ओठ विड्याने तांबडे रंगवितो, हासतांना दांत दाखवितो व ज्याच्या योगाने सुंदर बोल बोलतो॥ ५६४॥ त्या या तोंडातून लाळेचा लोंढा येईल आणि दांतासहित दाढा पडतील॥ ५६५॥ शेतीवर अत्यंत कर्ज झाले असतां ती जशी उठविता येत नाही किंवा पावसाच्या झडीत कंबर लागलेली गुरे उठत नाहीत, त्याप्रमाणे जिभेंतून कांही केले तरी शब्द निघत नाहीत, अशी ती जड होईल॥ ५६६॥ वाळलेल्या गवताची कुसळें ज्याप्रमाणे उडून वरडावर जातात, तशीच आपत्ति तोंड व दाढी यांचे ठिकाणी येईल॥ ५६७॥ आषाढ महिन्यांतील पडलेल्या पावसाने, ज्याप्रमाणे पर्वताची शिखरे झिरपूं लागतात, त्याप्रमाणे तोंडाच्या खळगीतून लाळेचे पूर वाहूं लागतात॥ ५६८॥ वाणीला शब्द उच्चारण्याचें सामर्थ्य राहणार नाही, कानाला ऐकूं येणार नाही, असा हा शरीराचा पिंड वृद्ध माकडासारखा होईल॥ ५६९॥ पक्षी उडविण्याकरिता केलेले गवतांचे बुजगावणे जसे वाऱ्याने हालते, त्याप्रमाणे सर्वांगाला कंप सुरू होईल॥ ५७०॥ पाय वांकडेतिकडे पडतील, हाताच्या मुठी वळतील, याप्रमाणे सर्व सौंदर्याचे ऐवजी सोंगच नाचविले जाईल॥ ५७१॥ मळमूत्रांची द्वारे फुटक्या भांड्याप्रमाणे होऊन राहतील. इतर लोक मी मरावे म्हणून नवस करतील॥ ५७२॥

**देखोनि थुंकील जगु। मरणाचा पडैल पांगु। सोयरियां उबगु। येईल माझा॥ ५७३॥**
**स्त्रियां म्हणती विवसी। बाळें जाती मूर्च्छेसी। किंबहुना चिळसी। पात्र होईन॥ ५७४॥**
**उभळीचा उजगरा। सेजारिया सोइलिया घरा। शिणवील म्हणती म्हातारा। बहुतांते हा॥ ५७५॥**

**ऐसी वार्धक्याची सूचणी। आपणिया तरुणपणीं। देखे मग मनीं। विटे जो गा॥ ५७६॥**
**म्हणे पाहे हें येईल। आणि आतांचें भोगितां जाईल। मग काय उरेल। हितालागीं॥ ५७७॥**
**म्हणोनि नाइकणें पावे। तंव आइकोनि घाली आघवें। पंगु न होतां जावें। तेथ जाय॥ ५७८॥**
**दृष्टी जंव आहे। तंव पाहावे तेतुलें पाहे। मूकत्वा आधीं वाचा वाहे। सुभाषितें॥ ५७९॥**
**हात होती खुळे। हें पुढील मोटकें कळे। आणि करूनि घाली सकळें। दानादिकें॥ ५८०॥**
**ऐसी दशा येईल पुढें। तैं मन होईल वेडें। तंव चिंतूनि ठेवी चोखडें। आत्मज्ञान॥ ५८१॥**
**जैसे चोर पाहे झोंबती। तंव आजीचि रुसिजे संपत्ती। कां झांकाझांकी वाती। न वचतां कीजे॥ ५८२॥**
**तैसें वार्धक्य यावें। मग जें वाया जावें। तें आतांचि आघवें। सवतें करी॥ ५८३॥**
**आतां मोडूनि ठेलीं दुर्गे। कां वळित धरिलें खगें। तेथ उपेक्षूनि जो रिगे। तो नागवला कीं॥ ५८४॥**
**तैसें वृद्धाप्य होये। आलेपण वायां जाये। जे तो शतवृद्ध आहे। नेणों कैंचा॥ ५८५॥**
**झाडिलींचि कोळें झाडी। तया न फळे जेवीं बोंडीं। जाहला अग्नि तरी राखोंडी। जाळील काई॥ ५८६॥**
**म्हणोनि वार्धक्याचेनि आठवें। वार्धक्या जो नागवे। तयाचां ठायीं जाणावें। ज्ञान आहे॥ ५८७॥**

**अर्थ**—अशा स्थितीत मला पाहून लोक माझा धिक्कार करतील, मृत्यूची ददात पडेल-म्हणजे मृत्यु लवकर येणार नाही व सोयरेसंबंधी माझा कंटाळा करतील॥ ५७३॥ बायका मला पिशाच्च म्हणतील, मला पाहून मुलांना मूर्च्छा येईल, फार काय सांगायचे! सर्व प्रकारे लोकांच्या किळसेला मी पात्र होईन॥ ५७४॥ खोकल्याच्या उबळीमुळे शेजारच्या घरांतील निजलेल्या माणसांची झोपमोड झाली असता, हा म्हातारा पुष्कळांना त्रास देईल असे ते म्हणतील॥ ५७५॥ अशी ही म्हातारपणाची सूचना आपल्या तरुणपणातच जो मनात आणून त्याचा कंटाळा करतो॥ ५७६॥ आणि म्हणतो, भोग भोगतां आतांचे तारुण्य नाहीसे होऊन पुढे अशी म्हातारपणची स्थिति येईल; मग आपले आत्महित साधण्याकरिता आपल्या ठिकाणी काय सामर्थ्य राहील?॥ ५७७॥ म्हणून न ऐकण्याची स्थिति येण्यापूर्वीच ऐकण्याजोगे असे भगवंताचे गुणादिक ऐकून घेतो. पाय पंगू होत नाहीत तोच जाण्यायोग्य अशा तीर्थादिकांचे ठिकाणी जातो॥ ५७८॥ जोपर्यंत दृष्टि आहे तोपर्यंत पाहण्या जोगी अशी तीर्थक्षेत्रे व संत-भगवंताच्या मूर्ती पाहून घेतो व बोलणे बंद होण्यापूर्वी वाणीने भगवन्नाम स्तुतिस्तोत्रादि मंगल शब्दांचा अखंड उच्चार करीत राहतो॥ ५७९॥ पुढे हात खुळे होतील हे थोडेसे कळण्यापूर्वीच संपूर्ण दानादिक करून टाकतो॥ ५८०॥ पुढे अशी दशा येईल तेव्हा मनाची विचारशक्ति क्षीण होईल; म्हणून त्यापूर्वीच शुद्ध आत्मज्ञानाचा विचार करून ठेवतो॥ ५८१॥ ज्याप्रमाणे उद्या आपल्याला चोर झोंबतील तर आजच संपत्तीचा विनियोग करून टाकावा किंवा दिवा विझण्यापूर्वीच झाकापाकी करावी, त्याप्रमाणे म्हातारपण यावे आणि जे प्राप्त करून घ्यायाचे ते घेता येऊ नये, यापेक्षा आताच-म्हणजे म्हातारपण येण्यापूर्वीच-जो आपल्या ठिकाणी ते प्राप्त करून घेतो॥ ५८२-५८३॥ सोसाट्याच्या वाऱ्यामुळे जंगलातील रस्ते मोडले गेले किंवा पक्षीहि सरळ उडता येत नाही म्हणून परत येत आहेत, हे पाहत असता त्याची उपेक्षा करून जो बाहेर पडतो तो हिताला नागविणारच!॥ ५८४॥ त्याप्रमाणे म्हातारपण आले असता काही करता येत नाही म्हणून जन्मास आल्याचे सार्थक होत नाही, हे न जाणणारा शंभर वर्षाचा वयोवृद्ध कसा झाला, हे समजत नाही॥ ५८५॥ झाडलेल्या तिळाच्या झाडाच्या कोथळ्या झाडत्या असता ज्याप्रमाणे त्यांच्या बोंडातून कांहीहि तीळ पडत नाहीत किंवा अग्नि जाळणारा झाला तरी तो राखोंडी जाळील काय?॥ ५८६॥ म्हणून म्हातारपण येणार, याची आठवण ठेऊन म्हातारपणाने जो नागवला जात नाही किंवा वार्धक्याला जो नागवितो—म्हणजे त्याचा परिणाम होऊ देत नाही-त्याच्या ठिकाणी ज्ञान आहे, असे जाणावे॥ ५८७॥

**तैसेचि नाना रोग। पडिघाती पुढां आंग। आरोग्याचे उपेग। करूनि घाली॥ ५८८॥**
**सापाचां तोंडीं। पडिली जे उंडी। ते लाऊनि सांडी। प्रबुद्ध जैसा॥ ५८९॥**
**तैसा वियोग जेणें दुःखें। विपत्ति शोक पोखे। तें स्नेह सांडूनि सुखें। उदास होय॥ ५९०॥**

**आणि जेणें जेणें कडे। दोष सूतील तोंडें। तयां कर्मरंध्रां गुंडे। नियमाचे दाटी॥ ५९१॥**
**ऐसऐसिया आइती। जयाची परी असती। तोचि तो ज्ञानसंपत्ती-। गोसावी गा॥ ५९२॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे शरीराचे ठिकाणी पुढे येणारे नाना प्रकारचे रोग उद्भवले नाहीत, तोच आपल्या शरीराचे ठिकाणी असणाऱ्या आरोग्याचा परमार्थहित साधण्याकरिता उपयोग करून घेतो॥ ५८८॥ ज्याप्रमाणे शहाणा पुरुष सापाच्या तोंडात पडलेला पिठाचा गोळा त्यालाच खाऊ घालून त्याची आशा सोडतो॥ ५८९॥ त्याप्रमाणे ज्या प्रेमामुळे वियोग झाला असता दुःख, विपत्ति, शोक हे वाढतात ते प्रेम टाकून देऊन जो आनंदाने उदास होऊन राहतो॥ ५९०॥ आणि कर्माचरण करतांना ज्या ज्या व्यंगतारूपी छिद्रांच्या द्वारात दोष शिरत असतात, त्या त्या कर्माच्या व्यंगतारूपी छिद्रांत नियमाचे दगड जो भरीत असतो॥ ५९१॥ अर्जुना! अशा युक्तीने ज्याची वागणूक असते, तोच सर्व ज्ञानसंपत्तीचा स्वामी होऊन राहतो॥ ५९२॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुच्या कृपेने प्राप्त झालेले दृढ आत्मज्ञान, मनोनाश व वासनाक्षय या तीन गोष्टी ज्या अवस्थेत समुच्चयाने राहतात, ती जीवन्मुक्तस्थिति प्राप्त होईपर्यंत ज्ञानीपुरुषाने शरीराचा किंवा मनाचा विश्वास बाळगून अभ्यासात शिथिलता येऊं देऊ नये असा या वरील सर्व ओव्यांचा भाव आहे.

हाच भाव माउलीनी मागे "**तैसी प्राप्तेही पुरूषे। इंद्रिये लाळिली जरी कौतुके। तरी आक्रमिला जाण दुःखे। सांसारिके॥**" (ज्ञा. अ. २-३५०) या ओवीने व्यक्त केला आहे.

जीवन्मुक्त अवस्था दृढ झाल्यानंतर प्रारब्धानुसार विषयात रमण्यास हरकत नाही, असेहि पुनः माउलीनी मागे दुसऱ्या अध्यायातील "पार्था आणीकही एक। जरी नाशले हे रागद्वेष। तरी इंद्रिया विषयी बाधक। रमता नाही॥ ३३२॥" या ओवीने सांगितले आहे.

**आतां आणीकही एक। लक्षण अलौकिक। सांगेन आइक। धनंजया॥ ५९३॥**

**अर्थ**—त्याच प्रमाणे अर्जुना! ज्ञान्याचे आणखी एक असाधारण लक्षण सांगतो, ऐक॥ ५१३॥

**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु। नित्यं च समचित्तत्त्वमिष्टानिष्टोपपत्तिषु॥ ९॥**

**अर्थ**—ज्याच्या ठिकाणी सामान्यतः विषयाचे प्रेम नाही व पुत्र, स्त्री घर इत्यादिकांविषयी विशेष प्रेम नाही जो प्रिय वस्तूची प्राप्ति झाली असता हर्ष न वाटू देता किंवा अप्रिय वस्तूची प्राप्ति झाली असता खिन्न न होता, सदासर्वदा हर्षामर्षरहित चित्त ठेवतो॥ ९॥

**तरि जो या देहावरी। उदासु ऐसिया परी। उखिता जैसा बिढारीं। बैसविला आहे॥ ५९४॥**
**कां झाडाचि साउली। वाटे जातां मिनली। घरावरी तेतुली। आस्था नाहीं॥ ५९५॥**
**साउली सरिसीच असे। परी असे हें नेणिजे जैसें। स्त्रियेचें तैसें। लोलुप्य नाहीं॥ ५९६॥**
**आणि प्रजा जे जाली। तियें वस्ती करे आलीं। गोरुवे बैसलीं। रुखातळीं॥ ५९७॥**
**जो संपत्तीमाजी असतां। ऐसा गमे पांडुसुता। जैसा कां वाटे जातां। साक्षी ठेविला॥ ५९८॥**
**किंबहुना पुंसा। पांजरियामाजीं जैसा। वेदाज्ञेसी तैसा। बिहूनि असे॥ ५९९॥**
**एऱ्हवीं दारागृहपुत्रीं। नाहीं जया मैत्री। तो जाण पां धात्री। ज्ञानासि गा॥ ६००॥**
**महासिंधू जैसे। ग्रीष्मवर्षी सरिसे। इष्टानिष्ट तैसें। जयाच्या ठायीं॥ ६०१॥**
**कां तीन्ही काळ होतां। त्रिधा नव्हे सविता। तैसा सुखदुःखीं चित्ता। भेदु नाहीं॥ ६०२॥**
**जेथ नभाचेनि पाडें। समत्वा न्यून न पडे। तेथ ज्ञान रोकडें। वोळख तूं॥ ६०३॥**

**अर्थ**—धर्मशाळा इत्यादि वस्तिस्थानात जसा वाटसरु असतो, त्याप्रमाणे जो या देहाचे ठिकाणी उदासीनाप्रमाणे असतो॥ ५९४॥ किंवा रस्त्याने जातांना अनायासे मिळणाऱ्या झाडाच्या सावलीची जशी कोणी आस्था बाळगित नाही, त्याप्रमाणे जो घराच्या ठिकाणी आस्था बाळगित नाही॥ ५९५॥ मनुष्याची सावली सारखी त्याच्या बरोबर राहते, पण हे त्याच्या लक्षातहि नसते, त्याप्रमाणे ज्याच्या मनात स्त्रियेविषयी आसक्ति नसते॥ ५९६॥ आणि आपल्या

झालेल्या संततीला जो धर्मशाळेत थोडावेळ थांबण्याकरिता आलेले वाटसरु किंवा झाडाखाली सावलीत बसणारी गुरे समजतो॥ ५९७॥ जो संपत्तीमध्ये असतांना, हा मार्गाने जाणारा वाटसरु असून त्याला घटकाभर संपत्तीकडे पाहण्याकरिता साक्षी ठेविला आहे, असा वाटतो॥ ५९८॥ फार काय सांगावे! पिंजऱ्यामध्ये राघू जसा राहतो, त्याप्रमाणे जो वेदाज्ञेला भिऊन वागतो-म्हणजे वेदाज्ञेच्या परतंत्र वागतो॥ ५९९॥ सारांश, स्त्री, घर, पुत्र यांच्याविषयी ज्याच्या मनात आसक्ति नाही, तो पुरुष ज्ञानाची जन्मदात्री आई होय-म्हणजे ज्ञान त्याच्याच ठिकाणी जन्म घेते-असे समज॥ ६००॥ महासमुद्र जसे ग्रीष्मऋतूत व वर्षाऋतूत सारखेच असतात, त्याप्रमाणे ज्याच्या मनाचे ठिकाणी प्रिय व अप्रिय सारखेच वाटतात॥ ६०१॥ किंवा ज्या प्रमाणे सूर्य, सकाळ-दुपार-संध्याकाळ या तिन्ही काळी एकसारखाच असतो, तीन प्रकारचा होत नाही, त्याप्रमाणे सुखदु:खाच्या वेळी ज्याच्या चित्तात हे अनुकूल, हे प्रतिकूल असा विषमभाव उत्पन्न होत नाही॥ ६०२॥ आकाशाच्या समतेशी तुलना केली असता ज्याच्या चित्ताची समता कधी कमी भासत नाही किंवा आकाशाच्या बरोबरीने ज्याच्या चित्ताची समता अखंड असते, त्याच्या ठिकाणीच निर्भेळ ज्ञान आहे, असे तू समज॥ ६०३॥

**मयि चाऽनन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी। विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १०॥**

**अर्थ**—माझ्यावाचून चित्ताला दुसरे काहीच गोड लागणार नाही, अशाप्रमाणे एका माझ्या सगुणस्वरूपाचे ठिकाणीच निष्काम-म्हणजे स्वाभाविक-प्रेम करणे, पवित्र व निर्मळ अशा एकान्त देशात राहणे आणि जनसमुदायाचा कंटाळा करणे॥ १०॥

**आणि मीवांचूनी कांहीं। आणीक गोमटें नाहीं। ऐसा निश्चयोचि तिहीं। जयाचां केला॥ ६०४॥**
**शरीर वाचा मानस। पियालीं कृतनिश्चयाचा कोश। एक मीवांचूनि वास। न पाहती आन॥ ६०५॥**
**किंबहुना निकट निज। जयाचें जाहलें मज। तेणें आपणयां आम्हां सेज। एकी केली॥ ६०६॥**
**रिगतां वल्लभापुढें। नाहीं आंगीं जीवीं सांकडें। तिये कांतेचेनि पाडें। एकसरला जो॥ ६०७॥**
**मिळोनि मिळतचि असे। समुद्रीं गंगाजळ जैसें। मी होऊनि मज तैसें। सर्वस्वें भजती॥ ६०८॥**

**अर्थ**—एका माझ्या सगुणस्वरूपावाचून दुसरे कोठेच सुख नाही, असा कायावाचामनाने माझ्या सगुणस्वरूपाविषयी ज्याने निश्चय केला॥ ६०४॥ माझ्या सगुणरूपावाचून दृष्टीने दुसरी वस्तुच पाहणार नाही, असा दृढ निश्चय करण्याची ज्याच्या शरीर, वाणी, मन ह्यांनी शपथ घेतली॥ ६०५॥ फार काय सांगायचे! ज्याचे आपलेपण माझ्या अत्यंत जवळ झाले, त्याने माझी व आपली एकच शय्या केली (असा भक्त माझ्यापासून क्षणभरहि वेगळा नसतो, असा अर्थ)॥ ६०६॥ पतिसमागमांत मिळतांना ज्याप्रमाणे स्त्रियेच्या मनात किंवा शरीराचे ठिकाणी यत्किंचितहि संकोच उत्पन्न होत नाही, त्या स्त्रियेच्या तितक्याच प्रेमाने जो माझ्याशी समरस झाला॥ ६०७॥ ज्याप्रमाणे गंगेचे पाणी समुद्रास मिळाल्यानंतरहि अखंड पुन: मिळतच राहते, त्याप्रमाणे जे मद्रूप होऊन सर्व भावाने माझे प्रेम करीतच राहतात॥ ६०८॥

**गूढार्थदीपिका**—माउलीनी येथे ज्ञानोत्तर म्हणजे आत्मज्ञानाने जीवब्रह्म ऐक्य झाल्यावरहि काही एका निमित्तावाचून देखील ज्ञान्याचे सगुण भगवंताचे ठिकाणी स्वाभाविक प्रेम असते, हे दाखविले आहे.

"शिवो भूत्वा शिवं यजेत्" शिव होऊन शिवाचे भजन करावे. असे श्रुतीनीहि ज्ञान्याचे स्वाभाविक भजन सांगितले आहे. "जेवि आपुले सभाग्यपण। आपणा सन्मुख होये जाण। तरी काय होय भाग्यहीन। की दुणावे सुख॥ ५७३॥ एवं नम्य आणि नमन। भज्य आणि भजन। हा भेद काही नसून। प्रवाह न खंडे॥ ५७४॥ उपरोधे प्रवाह खंडिता। भेदुचि दुणावे पुरता। तेथे अनुभवाची वार्ता। बोलोचि नये॥ ५७५॥" (शिवकल्याणकृत-अमृतानुभव विवरण-प्र. १)

आरशात मुख पाहून आपले सौभाग्य आपल्याला दृग्गोचर झाले असता स्त्रियेला मी भाग्यहीन आहे, असे वाटून दु:ख होते की तिच्या सौभाग्यसुखात भर पडते? त्याप्रमाणेच अद्वैतज्ञानानंतर होणाऱ्या भक्तीत नम्य व नमन,

भज्य व भजन, असा काही भेद न भासता भगवंताचे ठिकाणी अखंड प्रेमप्रवाह वाहत असतो. हट्टाने हा प्रेमप्रवाह बंद केला असता, नाहीसा झालेला भेद दुप्पट वाढतो; म्हणून जेथे सगुणाची प्रेमभक्ति न करण्याचा हट्ट दिसून येतो, तेथे आत्मानुभव नाही, हे पक्के जाणावे; असे अमृतानुभवावरील प्रथम अध्यायातील "अहो ऐक्याचे मुदल न ढळे" (ओ. ५९) या ओवीवर टीका करताना शिवकल्याणस्वामीनी म्हटले आहे.

**मी होऊनि मज तैसे। सर्वस्वे भजती-**

निर्गुण स्वरूपाशी ऐक्य पावून सगुणस्वरूपाचे भजन करणे व पुढे सगुणस्वरूपाच्या ध्यानाने चित्त भगवत्स्वरूप झाल्यावरहि बाहेर शरीर, मन, वाणीद्वारा सर्व भावाने भगवंताचे प्रेम होत राहणे, असे दोन्ही प्रकार येथे माउलीनी "मी होऊनि मज तैसे। सर्वस्वे भजती" या चरणांनी सूचित केले आहे.

**सूर्याच्या होण्या होईजे। कां सूर्यासवेंचि जाईजे। हें विकलेपण साजे। प्रभेसी जेवीं॥ ६०९॥**

**अर्थ**—सूर्याच्या उदयाबरोबर सूर्याची प्रभा फाकते व सूर्य अस्तास गेला असता ती नाहीशी होते, असे सर्वस्वी सूर्याच्या स्वाधीन होऊन राहणे जसे प्रभेला शोभते॥ ६०९॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानीभक्त असे सूर्याच्या प्रभेप्रमाणेच सर्वस्वी भगवद् अधीन होऊन राहतात.

**पैं पाणियाचिये भूमिके। पाणी तळपे कौतुकें। ते लहरी म्हणती लौकिकें। येऱ्हवीं तें पाणी॥ ६१०॥**
**जो अनन्य यापरी। मी जाहलाहि मातें वरी। तोचि तो मूर्तधारी। ज्ञान पैं गा॥ ६११॥**

**अर्थ**—पाण्यावरच पाणी कौतुकाने खेळू लागले असता त्याला अज्ञानी लोक लहरी म्हणतात, पण ते खरोखर पाणीच असते॥ ६१०॥ याप्रमाणे अनन्य म्हणजे इतर देवतांचा आश्रय सोडून व एक माझाच आश्रय करून जो मद्रूप झाला व माझे भजन करतो, अर्जुना! तो म्हणजे केवळ ज्ञानच मूर्तरूपाने प्रगट झाले, असे समज॥ ६११॥

**गूढार्थदीपिका—जो अनन्य यापरी। मी जाहलाही माते वरी-**

भक्तिरहित ज्ञान्याचा देह पांचभौतिक राहतो; पण ज्ञानीभक्त साकार सच्चिदानंद विग्रहधारी असतात. "ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी" भक्तीनेच देह सच्चिदानंदस्वरूप होतो, असे तुकाराम महाराजांनी म्हटले असून "पावावया उपासना। ब्रह्मस्थानी प्रस्थान" खरी भक्ति किंवा निष्काम प्रेमरूप भक्ति प्राप्त होण्याकरिता ब्रह्मज्ञान करून घ्यावयाचे असते. "भक्तिभाग्य प्रेमापुरुषार्थ। हाचि ब्रह्मीचा मुख्य अर्थ" ब्रह्मज्ञानप्राप्तीचा मुख्य अर्थ भक्तिच आहे, इत्यादि वचनांनी त्यांनी ब्रह्मज्ञानाचा शेवट भक्तीतच केला आहे.

**आणि तीर्थें धौतें तटें। तपोवनें चोखटें। आवडती कपाटें। वसवूं जया॥ ६१२॥**
**शैलकक्षांचीं कुहरें। जलाशयपरिसरें। अधिष्ठी जो आदरें। नगरा न ये॥ ६१३॥**
**बहु एकांतावरी प्रीति। जया जनपदाची खंती। जाण मनुष्याकारें मूर्ती। ज्ञानाची तो॥ ६१४॥**
**आणिकहि पुढती। चिन्हें गा सुमती। ज्ञानाचिये निरुती-। लागीं सांगों॥ ६१५॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे पवित्र नद्यांचे काठी किंवा तीर्थात किंवा उत्तम तपोवनात किंवा एकान्तात ज्यांना राहणे आवडते॥ ६१२॥ दोन पर्वतामधील दऱ्या किंवा जलाशयाच्या आसपासचा प्रदेश यांचा ज्याला आदर वाटतो व जो तेथे राहतो, जो नगरात येत नाही॥ ६१३॥ एकान्तावर ज्याचे अत्यंत प्रेम असून ज्याला लोकवस्तीची खंती वाटते, त्याचा मनुष्याकार म्हणजे ज्ञानाची मूर्ति होय, असे समज॥ ६१४॥ हे शुद्धबुद्धि अर्जुना! ज्ञानाचे स्वरूप स्पष्ट होण्याकरिता पुन: आणखी काही लक्षणे सांगतो, ऐक॥ ६१५॥

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम्। एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा॥ ११॥**

**अर्थ**—आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचे नित्यत्व म्हणजे अविनाशित्व जाणणे व झालेल्या आत्मज्ञानाने परमात्मसाक्षात्कार होणे, हे सर्व ज्ञान म्हटले जात असून याहून जे विपरीत ते अज्ञान होय॥ ११॥

**तरी परमात्मा ऐसें। जें एक वस्तु असे। तें जया दिसे। ज्ञानास्तव॥ ६१६॥**
**तें एकवांचूनि आनें। जिये भवस्वर्गादि ज्ञानें। तें अज्ञान ऐसा मनें। निश्चय केला॥ ६१७॥**

**स्वर्गा जाणें हें सांडी। भवविषयीं कान झाडी। दे अध्यात्मज्ञानीं बुडी। सद्भावाची॥ ६१८॥**
**भंगलिये वाटे। शोधूनियां अव्हांटे। निघिजे जेवीं नीटें। राजपंथें॥ ६१९॥**
**तैसें ज्ञानजाता करी। आघवेंचि एकीकडे सारी। मग मन बुद्धि मोहरी। अध्यात्मज्ञानीं॥ ६२०॥**
**म्हणें एक हेंचि आथी। येर जाणणें ते भ्रांती। ऐसी निकरेंसी मती। मेरु होय॥ ६२१॥**
**एवं निश्चय जयाचा। द्वारीं अध्यात्मज्ञानाचां। ध्रुव देवो गगनींचा। तैसा राहिला॥ ६२२॥**
**तयाचिया ठायीं ज्ञान। या बोला नाही आन। जे ज्ञानीं बैसलें मन। तेव्हांचि तें तो॥ ६२३॥**
**तरि बैसलेपणें जें होये। तें बैसतांचि बोलें न होये। तरि ज्ञाना तया आहे। सरिसा पाड॥ ६२४॥**

**अर्थ**—परमात्मा म्हणून जी एक वस्तु शास्त्राने सांगितली आहे, ती वस्तु, ज्या ज्ञानामुळे अनुभवाला येते॥ ६१६॥ त्या एका ज्ञानावाचून इतर संसार—स्वर्ग इत्यादिविषयक जी अनेक प्रकारची ज्ञाने आहेत, ते सर्व अज्ञान होय, असा ज्याच्या मनाने दृढ निश्चय केला॥ ६१७॥ आणि म्हणून जो स्वर्गप्राप्तीचा काम्यकर्मरूप प्रयत्न सोडून देतो व हे संसारविषयक ज्ञान ऐकणे पुरे झाले, असे म्हणतो. हे अध्यात्मज्ञानच खरे व सर्व दु:खातून पार करणारे ज्ञान होय, अशी अध्यात्मज्ञानाचे ठिकाणी दृढ श्रद्धा ठेवतो॥ ६१८॥ निरनिराळे रस्ते फुटलेल्या वाटेवर, आडमार्ग शोधून ज्याप्रमाणे सरळ अशा राजमार्गाने जायचे असते॥ ६१९॥ त्याप्रमाणे जो ज्ञानाचे ठिकाणीहि करतो. इतर सर्व ज्ञाने बाजूला सारून एका आत्मज्ञानाकडे मन-बुद्धि लावतो॥ ६२०॥ आत्मज्ञान हेच खरे ज्ञान असून त्यावाचून इतर सर्व ज्ञान भ्रमज्ञान आहे, अशी ज्याची शेवटी मेरुप्रमाणे दृढ अचल बुद्धि होऊन राहते॥ ६२१॥ याप्रमाणे अध्यात्मज्ञानाच्या सामर्थ्याचे ठिकाणी आकाशातील ध्रुवदेवाप्रमाणे ज्याचा दृढ़ निश्चय झाला॥ ६२२॥ त्याच्या ठिकाणीच ज्ञान आहे, हे म्हणणे अन्यथा नाही; कारण जेव्हा त्याचे मन ज्ञानांचे ठिकाणी स्थिर झाले, तेव्हाच तो ज्ञानस्वरूप झाला॥ ६२३॥ ज्ञान होणे, हे ज्ञानलक्षणाचे ठिकाणी मनाचे स्थिर होण्यावर अवलंबून आहे; म्हणून ज्ञानलक्षणाचे ठिकाणी मन स्थिर झाले असताच ज्ञान होते, नुसत्या शब्दाने होत नाही. म्हणूनच ज्ञान आणि ज्ञानी हे दोघेहि एका योग्यतेचेच आहेत॥ ६२४॥

**गूढार्थदीपिका**—"तत्त्वमसि" इत्यादि महावाक्यांच्या उपदेशाने आत्मज्ञान होऊन पुरुष मुक्त होतो, अशी श्रुति असून "दृश्यते त्वग्रया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभि:" अत्यंत शुद्ध झालेल्या चित्ताने आत्मसाक्षात्कार होतो, असेहि श्रुतीने सांगितले आहे.

या दोन श्रुतींचा विचार केला असता असे स्पष्ट दिसते की, ब्रह्मज्ञान होण्याकरिता शब्द व शुद्धबुद्धि या दोघांच्याहि सहकार्याची आवश्यकता आहे.

शब्दाने ज्ञान होत असले तरी ते परोक्ष राहते. त्याने संसारनिवृत्ति होत नाही. संसारनिवृत्ति अपरोक्ष आत्मसाक्षात्काराने होते आणि अपरोक्ष साक्षात्काराकरिता शुद्ध झालेल्या बुद्धिवृत्तीने आत्मा ग्रहण करण्याची आवश्यकता असते. बुद्धि शुद्ध होणे हे तिच्या ज्ञानलक्षणाचे ठिकाणी अचल स्थिर होण्यावर अवलंबून आहे. याप्रमाणे ब्रह्मज्ञान संपादन करण्याचे कार्य नुसत्या 'तत्त्वमसि' महावाक्यादि शब्दाने होत नसून अद्वैतज्ञानाची जी लक्षणे सांगितली आहेत ती चित्तात बाणली पाहिजेत किंवा त्या लक्षणाचे ठिकाणी चित्त दृढ बसले पाहिजे, असे येथे माउलींनी सांगितले आहे.

**आणि तत्त्वज्ञान निर्मळ। फळे जें एक फळ। तें ज्ञेयहीवरी सरळ। दिठी हे जया॥ ६२५॥**

**अर्थ**—आणि असे हे शुद्ध तत्त्वज्ञान, ज्या एका ब्रह्मरूप फळांनी, फलद्रूप होते, त्या ज्ञेय परब्रह्मापर्यंत सरळजाणारी दृष्टि ज्याला प्राप्त झाली आहे॥ ६२५॥

**गूढार्थदीपिका**—येथे परब्रह्माचे ठिकाणी बुद्धिवृत्तिची व्याप्ति सांगितली आहे.

**एऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें। जरी ज्ञेय न दिसेचि मनें। तरी ज्ञानलाभही न मनें। जाहला सांता॥ ६२६॥**
**आंधळेनि हातीं दिवा। घेऊनि काय करावा। तैसा ज्ञाननिश्चयो आघवा। वायांचि जाय॥ ६२७॥**

**जरि ज्ञानाचेनि प्रकाशें। परतत्त्वीं दिठी न पैसे। ते स्फूर्तीचि असे। अंध होउनी॥ ६२८॥**

**अर्थ**—नाहीतर समजलेल्या ज्ञानाने जर ज्ञेय परब्रह्माचा, मनोवृत्तिद्वारा साक्षात्कार होणार नाही, तर तसा झालेला ज्ञानलाभ संतांना संमत नाही किंवा अविद्येची निवृत्ति करण्यास समर्थ होत नाही॥ ६२६॥ आंधळ्याने हाती दिवा घेतला असता त्याला त्याचा काय उपयोग? त्याप्रमाणे ब्रह्माचा वृत्तीने अनुभव आल्यावाचून 'मी ब्रह्मरूप आहे' हा नुसता ज्ञाननिश्चय अज्ञान निवृत्त करण्याला निरुपयोगी असतो॥ ६२७॥ झालेल्या ज्ञानप्रकाशाने संपन्न होऊन जर वृत्तिरूपदृष्टि प्रकृतीच्या पलीकडे असलेल्या परब्रह्मतत्त्वापर्यंत पोहोचू शकली नाही, तर ती झालेली ज्ञानस्फूर्ति आंधळी आहे असे म्हटले पाहिजे॥ ६२८॥

**गूढार्थदीपिका**—अपरोक्ष साक्षात्कारावाचून केवळ शब्दज्ञान व्यर्थ आहे हे येथे माउलीनी दाखविले आहे.

**म्हणोनि ज्ञान जेतुलें दावी। तेतुली ही वस्तुचि आघवी। ते देखे ऐसी व्हावी। बुद्धि चोख॥ ६२९॥**

**अर्थ**—म्हणून आत्मविचाराने जे जे कळते ते ते ब्रह्मरूपच राहत असल्यामुळे परब्रह्माचाच अनुभव येईल अशी बुद्धिवृत्ति शुद्ध असायला पाहिजे॥ ६२९॥

**गूढार्थदीपिका**—बुद्धि रजस्तमोगुणापासून नि:शेष मुक्त होऊन व शुद्ध सात्विक होऊन राहिल्यावांचून आत्मसाक्षात्कार होत नाही, हे येथे माऊलींनी दाखविले आहे.

**यालागीं ज्ञानें निर्दोखें। दाविलें ज्ञेय देखे। तैसेनि उन्मेखें। आथिला जो॥ ६३०॥**
**जेवढी ज्ञानाची वृद्धी। तेवढीच जयाची बुद्धी। तो ज्ञान हे शब्दीं। करणें न लगे॥ ६३१॥**
**पै ज्ञानाचिये प्रभेसवें। जयाची मती ज्ञेयीं पावे। तो हातधरणिया शिवे। परतत्त्वातें॥ ६३२॥**

**अर्थ**—म्हणून शुद्ध ज्ञानाने दाखविलेले ज्ञेयरूप परब्रह्म पाहता येईल, अशा ज्ञानदृष्टीने जो संपन्न झाला आहे॥ ६३०॥ जेवढ़ी ज्ञानाची अमर्याद वाढ झालेली असते, तेवढीच ज्याची बुद्धिहि अमर्याद वाढली तो ज्ञानरूपच झाला, हे शब्दाने सांगणे नको॥ ६३१॥ ज्ञानाच्या प्रकाशाबरोबरच ज्याची बुद्धि ज्ञेय अशा परब्रह्माचे ठिकाणी प्राप्त होते, तो हातधरणी मापाऱ्याप्रमाणे परतत्त्वाला स्पर्श करतो॥ ६३२॥

**गूढार्थदीपिका**—मापात धान्य भरताना मापारी, मापाच्या वरच्या बाजूला तोंडापाशी डावा हात धरून मापापेक्षा सहजच थोडेसे जास्त धान्य घेत असतो, त्याचप्रमाणे ज्याची बुद्धि ज्ञानाच्या प्रकाशाबरोबर ज्ञेयापर्यंत पोहोचली तो सहजच त्याबरोबर आपल्या बुद्धीने परतत्त्वाला ग्रहण करतो, असा अर्थ.

**तोचि ज्ञान हें बोलतां। विस्मयो कवण पांडुसुता। काय सवितयातें सविता। म्हणावें असे॥ ६३३॥**
**तंव श्रोते म्हणितले असो। न सांगे तयाचा अतिसो। ग्रंथोक्ती तेथ आडसो। घालिसी कां हा॥ ६३४॥**
**तुझा हाचि आम्हां थोरु। वक्तृत्वाचा पाहुणेरु। जे ज्ञानविषो फारु। निरोपिला॥ ६३५॥**
**रसु होआवा अतिमात्रु। हा घेतासि कविमंत्रु। तरि अवंतूनि शत्रु। करितोसि कां गा॥ ६३६॥**
**ठायीं बैसतिये वेळे। जे रससोय घेऊनि पळे। तियेचा येरु वोडव मिळे। कोणा अर्था॥ ६३७॥**
**आघवांचि विषयीं भादी। परि सांजवणी टेंकों नेदी। ते खुरतोडी नुसधी। पोषी कवण॥ ६३८॥**
**तैसी ज्ञानीं मती न फांके। येर जल्पती नेणों केतुकें। परि तें असो निकें। केलें तुवां॥ ६३९॥**
**जया ज्ञानलेशोद्देशें। किजती योगादि सायासें। ते धणीचें आणि तुझिया ऐसें। निरूपण॥ ६४०॥**
**अमृताची सांतवांकुडी। लागो कां अनुघडी। सुखाचा दिसी कोडी। गणिजतु कां॥ ६४१॥**
**पूर्णचंद्रेसीं राती। युग एक असो न पाहती। तरि काय पाहत आहाती। चकोरें ते॥ ६४२॥**
**तैसें ज्ञानाचें बोलणें। आणि येणें रसाळपणें। आतां पुरे कोण म्हणे। आकर्णितां॥ ६४३॥**
**आणि सभाग्यु पाहुणा ये। सुभगाचि वाढती होये। तैं सरों नेणें रससोये। ऐसें आथी॥ ६४४॥**
**तैसा जाहला प्रसंगु। जे ज्ञानीं आम्हांसि लागु। आणि तुजही अनुरागु। आथि येथ॥ ६४५॥**
**म्हणोनि यया व्याख्याना-। पासीं से आली चौगुणा। ना म्हणो नये देखणा। होसी ज्ञानी॥ ६४६॥**

**तरि आतां ययावरी। प्रज्ञेचा माजु धरीं। पदें साच करीं। निरूपणीं॥ ६४७॥**

**अर्थ**—अशा रीतीने ज्ञानाने परब्रह्माचे आकलन करणारा, ज्ञानस्वरूपच होय, असे कोणी म्हटल्यास, हे अर्जुना! त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काय आहे? हा केवळ सूर्यच आहे, असे सूर्याला म्हणावे लागते?॥ ६३३॥ तेव्हा श्रोते म्हणाले, हे असू दे. ज्ञानीपुरुषाचेच वर्णन करीत बसू नकोस. ग्रंथातील वचनांचा अर्थ सांगत असतांना त्याला खोळंबा का करतोस?॥ ६३४॥ आपण ज्ञानाच्या स्वरूपाचे सविस्तर वर्णन केले, हा आपल्या वक्तृत्वाचा आम्हाला फार मोठा पाहुणचार झाला॥ ६३५॥ निरूपणात रसाचे खूप पोषण करावे, हा काव्य करणाऱ्यांचा मंत्रोपदेश ग्रहण करून व त्याचे सेवन करण्याकरिता आम्हाला आमंत्रण देऊन आता आमच्याशी शत्रुसारखे का (वर्तन) करतोस?॥ ६३६॥ आणि पात्रावर भोजन करण्यास बसण्याचे वेळीच जी बाई शिजवलेले अन्न घेऊन पळते, तिचा अवांतर आदरसत्कार काय कामाचा?॥ ६३७॥ इतर सर्व बाबतीत चांगली आहे; पण दोहावयास बसले असता जिला लाथा झाडण्याची खोड आहे अशी लाथाळ गाय नुसती कोण पोसणार?॥ ६३८॥ त्याप्रमाणे ज्ञानाचे ठिकाणी बुद्धीचा प्रवेश न होता कित्येक अवांतर इतके बोलतात की, सांगता येत नाही; पण ते असो. तू मात्र फार उत्तम केलेस॥ ६३९॥ ज्या आत्मज्ञानाचा अंश तरी प्राप्त व्हावा, म्हणून साधक योगादिकांचे कष्ट सहन करतात, त्या ज्ञानाचे निरूपण तृप्त करून सोडणारे व तुलाच करता येईल असे (गोड) झाले आहे॥ ६४०॥ अमृतवर्षावाची सात दिवस सतत झड लागो किंवा सुखाच्या दिवसांची कोटीवरी गणना होवो, तरी कोणाला कंटाळा येईल?॥ ६४१॥ पाहाट न होता पूर्णचंद्रासह असलेली पोर्णिमेची रात्र एक युगपर्यंत सारखी टिकली, तरी ते चकोर कंटाळून तिला पाहणार नाहीत काय?॥ ६४२॥ त्याप्रमाणे हे आत्मज्ञानाचे सविस्तर निरूपण आणि तेहि अशा रसाळ भाषेत होत असलेले ऐकत असता "आता पुरे" असे कोण म्हणेल?॥ ६४३॥ आणि घरी भाग्यवंत पाहुणा यावा व त्याला जेवायला वाढणारी स्त्रीहि सौंदर्यादि सौभाग्याने युक्त अशी असावी व केलेला स्वयंपाक न संपणारा असा भरपूर असावा, त्याप्रमाणेच हा प्रसंग झाला आहे; कारण ज्ञानाचे ठिकाणी आमचे मन जडले असून तुझेहि तेथेच अत्यंत प्रेम आहे॥ ६४४-६४५॥ म्हणून या तुझ्या व्याख्यानामुळे आमची ज्ञानस्मृति चौपट दृढ झाली आहे. तुला पूर्ण आत्मज्ञान प्राप्त झाले नाही असे तुझ्याविषयी कोणालाहि म्हणता येणार नाही. तू पूर्ण ज्ञानी आहेस॥ ६४६॥ आता पुढे, आपल्या शुद्धबुद्धीच्या स्फूर्तीचा आश्रय करून निरूपणाचे द्वारा भगवंताच्या वचनातील पदांचा खरा अर्थ सांग॥ ६४७॥

**गूढार्थदीपिका**—सृष्टीतील सर्व कार्यरूप पदार्थ त्रिगुणात्मक असल्यामुळे मनुष्याची बुद्धिहि त्रिगुणात्मकच आहे. त्या बुद्धीच्या द्वाराच मनुष्याला ज्ञान होते व तो दुसऱ्याला ते ज्ञान सांगतो; पण रजोगुणी बुद्धीचा मनुष्य आपल्या बुद्धीचा अभिमान बाळगत असल्यामुळे त्याच्या बुद्धीला यथार्थ काय व अयथार्थ काय याचा विवेक होत नाही आणि तमोगुणी बुद्धि अविवेकयुक्तच असल्यामुळे तिला खोटेच खरे वाटते. रजस्तमोगुणरहित अशा शुद्ध सात्विक बुद्धीला मात्र खरे समजते, असे भगवंतानी पुढे अठराव्या अध्यायात सांगितले आहे.

ज्ञानीभक्त अशा सत्पुरुषाची बुद्धि अखंड शुद्ध सात्विकच असते व ती एका परमेश्वरालाच विषय करीत असल्यामुळे ती अत्यंत स्वच्छ व निर्मळ असते. "यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्था: प्रकाशन्ते महात्मन:॥" (श्वे. उ.) ज्याची भगवंताचे ठिकाणी व श्रीगुरुचे ठिकाणी परम प्रेमरूप भक्ति आहे त्याच्याच बुद्धीत श्रौतपदातील अर्थ प्रकाशित होतात, असा श्रौतसिद्धान्त या श्रुतीत सांगितला आहे. या सिद्धान्ताला धरूनच श्रीगुरुनिवृत्तिनाथादि संत-श्रोत्यांनी माउलीला "आता ययावरी। प्रज्ञेचा माज धरी। पदे साच करी। निरूपणी" असे म्हटले आहे.

**या संतवाक्यासरिसें। म्हणितलें निवृत्तिदासें। माझेंही जी ऐसें। मनोगत॥ ६४८॥**
**यावरी आतां तुम्हीं। आज्ञापिला स्वामी। वायां वाग्जाळ मी। वाढों नेदी॥ ६४९॥**
**एवं इये अवधारा। ज्ञानलक्षणें अठरा। श्रीकृष्णें धनुर्धरा। निरूपिलीं॥ ६५०॥**
**मग म्हणे या नांवें। ज्ञान एथ जाणावें। हें स्वमत आणि आघवें। ज्ञानियेही म्हणती॥ ६५१॥**

**करतळावरी वाटोळा। डोलतु देखिजे आंवळा। तैसें ज्ञान आम्हीं डोळां। दाविलें तुज॥ ६५२॥**
**आतां धनंजया महामती। अज्ञान ऐसी वदती। तेही सांगों व्यक्ती। लक्षणेंसीं॥ ६५३॥**
**एऱ्हवीं ज्ञान फुडें जालिया। अज्ञान जाणवे धनंजया। जें ज्ञान नव्हे तें अपैसया। अज्ञानची॥ ६५४॥**
**पाहें पां दिवसु आघवा सरे। मग रात्रीची बारी उरे। वांचूनि कांहीं तिसरें। नाहीं जेवीं॥ ६५५॥**
**तैसें ज्ञान जेथ नाहीं। तेंचि अज्ञान पाहीं। तरि सांगों कांहीं कांहीं। चिन्हें तियें॥ ६५६॥**

**अर्थ**—असे संतश्रोत्याचे भाषण ऐकून श्रीनिवृत्तीनाथाचे दास श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. महाराज! माझ्याहि मनात असेच आहे॥ ६४८॥ महाराज तुम्ही आज्ञा केली असल्यामुळे आता यानंतर मी निरूपणात व्यर्थ पाल्हाळ होऊ देणार नाही॥ ६४९॥ याप्रमाणे ही अठरा ज्ञानाची लक्षणे श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितली आहेत, पहा॥ ६५०॥ मग भगवान म्हणतात, अर्जुना! येथे सांगितलेल्या या अठरा लक्षणावरून ज्ञान ओळखता येते, असे माझे मत असून सर्व ज्ञानी असेच म्हणतात॥ ६५१॥ ज्याप्रमाणे तळहातावरील वाटोळा डोलत असलेला आवळा पाहावा, त्याप्रमाणे अर्जुना मी तुला ज्ञान हे डोळ्यानी दिसेल असे स्पष्ट दाखविले॥ ६५२॥ हे थोर बुद्धिमान अर्जुना! आता यापुढे ज्याला लोकात अज्ञान म्हणतात, तेहि त्याच्या लक्षणासह स्पष्ट सांगतो॥ ६५३॥ नाहीतरी, अर्जुना! ज्ञान स्पष्ट झाल्यावर अज्ञान जाणले जाते; कारण ज्ञान नव्हे ते आपोआपच अज्ञान ठरते॥ ६५४॥ हे पहा, अर्जुना! संपूर्ण दिवस संपला की त्यानंतर रात्रीचीच पाळी असते. या दोहोवाचून तिसरे जसे काहीच नसते॥ ६५५॥ त्याप्रमाणे ज्याला ज्ञान म्हणता येत नाही, तेच अज्ञान होय; तरी या अज्ञानाची काही काही लक्षणे सांगतो॥ ६५६॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञानाचे आवरण व विक्षेप असे दोन प्रकारचे कार्य होते. आवरण म्हणजे आत्मविस्मृति किंवा आत्म्याचे ज्ञान नसणे आणि विक्षेप म्हणजे आत्मस्वरूप सोडून भलतेच भासणे व ते सत्य आहे असे वाटणे. प्रत्येक अज्ञानलक्षणाच्या मुळाशी आत्मविस्मृति असते किंवा आत्म्याचे ज्ञान नसते, हे ''तैसे ज्ञान जेथ नाही। ते अज्ञानची पाही'' या दोन चरणांनी सांगितले आहे. आणि इतर जी अज्ञानाची लक्षणे सांगितली आहेत त्या सर्व चिन्हांनी अज्ञानाच्या विक्षेपाचे वर्णन केले आहे.

**तरि संभावने जिये। जो मानाची वाट पाहे। सत्कारें होये। तोषु जया॥ ६५७॥**
**गर्वे पर्वताचीं शिखरें। तैसा महत्त्वावरूनि नुतरे। तयाचां ठायीं पुरें। अज्ञान आहे॥ ६५८॥**

**अर्थ**—जो मोठेपणाकरिताच जगतो, जो मान मिळविण्याची वाट पाहत राहतो आणि सत्कार झाला असता ज्याला संतोष होतो॥ ६५७॥ ज्याप्रमाणे पर्वताची शिखरे खाली येत नाहीत, त्याप्रमाणे जो गर्वाने मोठेपणाच्या पदावरून खाली उतरू इच्छित नाही, त्याचे ठिकाणी पूर्ण अज्ञान आहे, असे समज॥ ६५८॥

**गूढार्थदीपिका**—कोणीहि स्वत: स्वत:पासून प्रतिष्ठा-मान-सत्कार मिळविण्याची इच्छा करीत नाही. दुसऱ्यापासूनच ते मिळविण्याची इच्छा होते. सर्वव्यापक व अद्वैत आत्मस्वरूपाहून दुसरे काहीच नसल्यामुळे ज्ञान्याला सत्कार, मान, प्रतिष्ठा मिळविण्याची इच्छा होणेच शक्य नाही. आपल्या आत्मस्वरूपाला विसरून स्थूलदेहाचा अभिमान धरणारा व आपल्याहून निराळ्या देहधारी पुरुषाची कल्पना करणारा पुरुषच दुसऱ्यापासून मान, सत्कार, प्रतिष्ठा मिळविण्याची इच्छा करीत असतो; म्हणूनच ज्याचे ठिकाणी सत्कार, मान, प्रतिष्ठा मिळविण्याची इच्छा असते. त्याचे ठिकाणी अज्ञान आहे, असे येथे म्हटले आहे.

ज्ञानाने अद्वैत परब्रह्माशी ऐक्य होत जाऊन देहाशी झाले असलेले ऐक्य नाहीसे होते, तर अज्ञान लक्षणाने आत्मविस्मृति दृढ होत जाऊन जड पांचभौतिक देहाशी झाले असलेले ऐक्य दृढ होत जाते व मनुष्याची कृमिकीटकादि योनिपर्यंत अधोगति होते.

पुढील सर्व लक्षणेहि अज्ञानाचे ठिकाणी राहत असतात, हेच माऊलीनी दाखविले आहे.

**आणि स्वधर्माची मांगळी। बांधे वाचेच्या पिंपळीं। उभिला जैसा देउळीं। जाणोनि कुंचा॥ ६५९॥**
**घाली विद्येचा पसारा। सुये सुकृताचा डांगोरा। करी तेतुलें मोहरा। स्फीतीचिया॥ ६६०॥**

**आंग वरिवरी चर्ची। जनातें अभ्यर्चितां वंची। तो जाण पां अज्ञानाची। खाणी एथ॥ ६६१॥**

**अर्थ**—जसा काही देवळात कोणालाहि दिसेल अशा रीतीने कुंचा उभा करून ठेवतात किंवा पिपळाची मुंज झाली असता मुंजीचे चिन्ह म्हणून कोणालाहि दिसेल, अशा रीतीने त्याला मेखला बांधतात, त्याप्रमाणे लोकांना कळावे, म्हणून आपण आचरण केलेल्या धर्माचा, आपल्या वाचेनेच जो डांगोरा पिटतो॥ ६५९॥ आपण अध्ययन केलेल्या विद्येचा जो पसारा मांडतो, केलेल्या पुण्यकर्माचा जो गाजाबाजा करतो, सारांश जेवढे काही तो करतो, त्यात आपल्या कीर्तीचाच उद्देश ठेवतो॥ ६६०॥ मन विकाराने अत्यंत मलीन असते, पण आपण धर्मपरायण आहो, हे दाखविण्याकरिता बाह्यात्कारी शरीराला भस्म, गंध इत्यादिकांच्या लेपनाने जो अलंकृत करतो, दुसऱ्या पुरुषाचे अर्चन करण्याचा प्रसंग आला असता जो ते करीत नाही व ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगून त्यांना फसवितो, तो अज्ञानाची खाणीच होय असे समज॥ ६६१॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वराच्या शास्त्ररूप आज्ञेवर श्रद्धा ठेवून आपल्या कल्याणाकरिता धर्माचे आचरण न करता, ज्या लोकांचा धर्मावर विश्वास आहे, त्यांना आपणहि श्रद्धापूर्वक आचरण करतो, असे वाटावे, म्हणूनच केवळ दाखविण्याकरिता जो धर्माचरण करीत असतो, त्याचे ठिकाणी अज्ञानाशिवाय काही सापडत नाही, असा अर्थ.

**आणि वन्ही वनीं विचरे। तेथ जळती जैसी जंगमें स्थावरें। तैसें जयाचेनि आचारें। जगा दुःख॥ ६६२॥**
**कौतुकें जें जें जल्पे। तें सबळाहुनि तीख रुपे। विषाहूनि संकल्पें। मारकु जो॥ ६६३॥**
**तयातें बहु अज्ञान। तो अज्ञानाचें निधान। हिंसेंसि आयतन। जयाचें जिणें॥ ६६४॥**

**अर्थ**—अरण्यात अग्नि लागला असतां, ज्याप्रमाणे त्यात सजीव मृगादि व वृक्षादि प्राणी जळून मरतात, त्याप्रमाणे ज्याच्या आचरणाने जगाला दुःखच होते॥ ६६२। जे जे तो बडबडतो ते ते देखील भाल्यापेक्षाहि तीक्ष्ण असे बोचते आणि त्यातील त्याच्या गर्भित हेतुकडे पाहता, ते विषापेक्षाहि मारक वाटते॥ ६६३॥ अशा रीतीने ज्याचे जीवन हिंसेला-म्हणजे दुसऱ्याच्या दुःखाला-अधिष्ठान असते, त्याचे ठिकाणी प्रबल अज्ञान असून तो अज्ञानाचे भांडारच आहे॥ ६६४॥

**गूढार्थदीपिका**—अत्यंत अज्ञानी पुरुष आपल्या देहाच्या सुखाशिवाय दुसरे काही जाणत नसतो आणि देहाचे सुख दुसऱ्यावरच अवलंबून असल्यामुळे तो आपल्या देहसुखाकरिता कायावाचामनाने दुसऱ्यांना अखंड दुःख देतो, असा भाव.

**आणि फुंकें भाता फुगे। रेचिलिया सवेंचि उफगे। तैसा संयोगवियोगें। चढे वोहटे॥ ६६५॥**
**पडली वारयाचियां वळसां। धुळी चढे आकाशा। हरिखा वळघे तैसा। स्तुती वेळे॥ ६६६॥**
**निंदा मोटकी आइके। आणि कपाळ धरूनि ठाके। थेंबें विरे वारेनि शोखे। चिखलु जैसा॥ ६६७॥**
**तैसा मानापमानीं होये। जो कोण्हीही उर्मी न साहे। तयाचां ठायीं आहे। अज्ञान पुरें॥ ६६८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भाता फुंकला असता फुगतो व सोडला असता लगेच रिकामा होतो, त्याप्रमाणे आवडती वस्तु प्राप्त झाली असता जो हर्षाने फुगून जातो व तिचा वियोग झाला असता जो खिन्न होतो॥ ६६५॥ ज्याप्रमाणे वाहटुळीच्या वळशात पडलेली धूळ वर आकाशात उडते, त्याप्रमाणे लोकांनी स्तुति केली असता जो हर्षानेफुगून जातो॥ ६६६॥ थोडकीशी देखील निंदा ऐकल्याबरोबर जो दुःखाने कपाळ धरून बसतो. ज्याप्रमाणे चिखल थेंबभर पाण्याने ओला होतो व थोड्याशा वाऱ्याने सुकू लागतो॥ ६६७॥ त्याप्रमाणे मान-अपमान प्राप्त झाला असता ज्याला होते याप्रमाणे जो कोणतीच उर्मी सहन करू शकत नाही, त्याचे ठिकाणी पूर्ण अज्ञान आहे, असे समज॥ ६६८॥

**आणि जयांचियां मनीं गांठी। वरिवरी मोकळी वाचा दिठी। आंगे मिळे जीवें पाठी। भलतया दे॥ ६६९॥**
**व्याधाचें चारा घालणें। तैसे प्रांजळ जोगावणें। चांगाचीं अंतःकरणें। विरु करी॥ ६७०॥**
**गार शेवाळें गुंडाळलीं। का निंबोळी जैसी पिकली। तैसी जयाची भली। बाह्य क्रिया॥ ६७१॥**
**अज्ञान तयाचिया ठायीं। ठेविलें असे पाहीं। या बोला आन नाहीं। सत्य मानीं॥ ६७२॥**

**अर्थ**—वर वर पाहिले असता जो बोलण्यात व पाहण्यात मोकळा दिसतो. पण मनांत मात्र अढी असते आणि कोणाशीहि शरीराने मिसळलेला दिसला तरी अंत:करणाने तो पाठमोराच असतो॥ ६६९ ॥ जसे मृगांना पारध्याचे चारा घालणे दिखाऊ असते, त्याप्रमाणे जो दुसऱ्याला प्रांजलपणाने वागण्यासारखे दाखवून सज्जनाचे अंत:करण देखील विरुद्ध करून घेतो॥ ६७० ॥ शेवाळानी गुंडाळलेली गारगोटी जशी बाहेरून पाचूसारखी दिसते व पिकलेली निंबोळी बाहेरून खिरणीच्या गोड फळासारखी दिसते, त्याप्रमाणे ज्याची क्रिया बाहेरून पाहता लोकांच्या हिताची वाटते॥ ६७१ ॥ त्याच्याच ठिकाणी अज्ञान ठेवले आहे, हे म्हणणे अन्यथा नाही, सत्य आहे असे समज॥ ६७२ ॥

**आणि गुरुकुळीं लाजे। जो गुरुभक्ती उभजे। विद्या घेऊनि माजे। गुरुसींचि जो॥ ६७३ ॥**
**तयाचें नाव घेणें। हे वाचे शूद्रान्न होणें। परि घडलें लक्षणें। बोलता इयें॥ ६७४ ॥**
**आतां गुरुभक्तांचें नांव घेवों। तेणें वाचे प्रायश्चित्त देवों। गुरुभक्ताचे नांव पाहा हो। सूर्य जैसा॥ ६७५ ॥**
**येतुलेनि पांगु पापाचा। निस्तरेल हे वाचा। जो गुरुतल्पगाचा। नामीं जाला॥ ६७६ ॥**
**हा ठायवरी। तया नामाचें भय हरी। मग म्हणें अवधारीं। आणिक चिन्हें॥ ६७७ ॥**

**अर्थ**—आणि गुरुकुळाचा, संबंध वागविण्याची ज्याला लाज वाटते, गुरुसेवेचा ज्याला कंटाळा वाटतो. गुरुपासून विद्या प्राप्त झाल्यावर जो विद्येच्या अभिमानाने गुरुला तुच्छ लेखू लागतो॥ ६७३ ॥ त्याचे नाव तोंडात येणे म्हणजे शूद्रान्न भक्षण केल्याचे पाप करणे होय; पण अज्ञानाची लक्षणे सांगताना त्याचे नाव घेणे भाग पडते॥ ६७४ ॥ आता गुरुभक्ताचे नाव उच्चारून त्याच्या योगाने वाणीला प्रायश्चित्त देऊ. जसा सूर्य तसे गुरुभक्ताचे नाव आहे, पहा—म्हणजे सूर्य जसा अंध:काराचा नाश करतो तसे गुरुभक्ताचे नाव सर्व पापाचे निरसन करते, असे आम्ही समजतो॥ ६७५ ॥ गुरुमातागमन करणाऱ्या या अभक्ताचे नाव घेतल्याने माझ्या वाणीशी जो पापाचा संबंध झाला त्या पापसंबंधापासून माझी वाणी केवळ गुरुभक्तांचे नाव घेतल्यानेच मुक्त होईल॥ ६७६ ॥ अभक्ताच्या नामोच्चारणाच्या पापाने होणाऱ्या दु:खाचे भय नाहीसे करते, एथवर श्रीगुरुभक्ताच्या नामोच्चारात सामर्थ्य आहे. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मग देव म्हणाले, अज्ञानाची आणखी चिन्हे ऐक॥ ६७७ ॥

**तरी आंगें कर्में ढिला। जो मनें विकल्पें भरला। अडवींचा अवगळला। कुहा जैसा॥ ६७८ ॥**
**तया तोंडी कांटिवडें। आंतु नुसतीं हाडें। अशुचि तेणें पाडें। सबाह्य जो॥ ६७९ ॥**
**जैसें पोटालागीं सुणें। उघडें झांकलें न म्हणे। तैसें आपलें परावें नेणे। द्रव्यालागीं॥ ६८० ॥**
**इया ग्रामसिंहाचिया ठायीं। जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं। तैसा स्त्रीविषयीं कांहीं। विचारीना॥ ६८१ ॥**
**कर्माचा वेळु चुके। कां नित्य नैमित्तिक ठाके। तें जया न दुखे। जीवामाजीं॥ ६८२ ॥**
**पापी जो निसुगु। पुण्याविषयीं अति निलागु। जयाचां मनीं वेगु। विकल्पाचा॥ ६८३ ॥**
**तो जाण निखळा। अज्ञानाचा पुतळा। जो बांधोनि असे डोळां। वित्ताशेतें॥ ६८४ ॥**

**अर्थ**—आडरानातील अवगळलेली विहीर जशी असते, त्याप्रमाणे जो शरीराने शास्त्रानुसार कर्म करण्यास आळस करून व नाना प्रकारच्या विकल्पाने मन भरलेले ठेऊन अखंड अवगळलेला असतो॥ ६७८ ॥ ज्याप्रमाणे त्या विहीरीच्या तोंडाशी काटे असून आत नुसती हाडे भरली असतात, त्याप्रमाणे जो अंतर्बाह्य अशुद्ध असतो॥ ६७९ ॥ ज्याप्रमाणे कुत्रे पोट भरताना अन्न उघडे आहे की झाकले आहे, याचा विचार करीत नाहीत, त्याप्रमाणे जो धनाविषयी हे आपले की परक्याचे हा विचार करीत नाही॥ ६८० ॥ जसे श्वान समागमाकरिता ठिकाणाचा योग्य, अयोग्य विचार करीत नाही, त्याप्रमाणेच स्त्रीसमागमाविषयी जो काही विचार करीत नाही॥ ६८१ ॥ स्नानसंध्यादि कर्माची वेळ चुकली किंवा नित्यनैमित्तिक कर्मे राहिली तर त्याचे ज्याच्या अंत:-करणात काही दु:ख वाटत नाही॥ ६८२ ॥ याप्रमाणे पाप करण्यात जो निर्लज्ज असतो आणि पुण्यकर्माचा आपल्याशी कधी संबंध होऊ देत नाही. ज्याच्या मनात नेहमी विकल्प उठत राहतात॥ ६८३ ॥ तो केवळ अज्ञानाचा पुतळाच होय. जो अखंड आपल्या दृष्टिसमोर धनाचीच आशा ठेवतो॥ ६८४ ॥

**आणि स्वार्थे अळुमाळें। जो धैर्यापासोनि चळे। जैसें तृणबीज ढळे। मुंगियेचेनि॥ ६८५॥**
**पावो सूदलियासवें। जैसें थिल्लर कालवे। तैसा भयाचेनि नांवें। गजबजे जो॥ ६८६॥**
**वायुचेनि सावायें। धूई दिगंतरा जाये। दु:खवार्ता होये। तैसें जया॥ ६८७॥**
**मनोरथांचिया धारसा। वाहणें जयाचिया मानसा। पूरीं पडिला जैसा। दुधिया पाहीं॥ ६८८॥**
**वाउधणाचिया परी। आश्रय कहींचि न धरी। क्षेत्रीं तीर्थीं पुरीं। थारों नेणें॥ ६८९॥**
**कां मातलिया सरडा। पुढती बुडु पुढती शेंडा। हिंडण वारा कोरडा। तैसा जया॥ ६९०॥**
**जैसा रोंविल्याविणें। रांजणु थारों नेणे। तैसा पडे तैं राहणें। एऱ्हवीं हिंडे॥ ६९१॥**
**तयाचा ठायीं उदंड। अज्ञान असे वितंड। जो चांचल्यें भावंड। मर्कटाचें॥ ६९२॥**

**अर्थ**—आणि ज्याप्रमाणे मुंगीने तृणाचे बीज ओढले जाते, त्याप्रमाणे जो थोड्याशा स्वार्थाकरिता देखील धैर्यापासून ढळतो॥ ६८५॥ ज्याप्रमाणे पाय ठेवल्याबरोबर डबके कालवले जाऊन गढूळ होते, त्याप्रमाणे नुसते भीतीचे नाव ऐकल्याबरोबर जो घाबरतो॥ ६८६॥ पुरात पडून वाहत जाणाऱ्या दुध्याप्रमाणे ज्याचे मन अखंड मनोरथांच्या धारेत सापडून वाहत असते॥ ६८७॥ वायूच्या साहाय्याने ज्याप्रमाणे धूळ एक दिशेहून दुसऱ्या दिशेस जाते, त्याप्रमाणे दु:खाची वार्ता ऐकल्याबरोबर ज्याचे चित्त अस्वस्थ होते॥ ६८८॥ ज्याप्रमाणे वावटळ कोठेहि स्थिर होत नाही त्याप्रमाणे ज्याला तीर्थात, क्षेत्रात किंवा नगरात कोठेहि स्थिर राहणे ठाऊक नाही॥ ६८९॥ किंवा सरडा माजला असता वारंवार बुडावरून शेंड्याला व शेंड्यावरून बुडाला, अशा व्यर्थच खेपा करीत हिंडतो, त्याप्रमाणे जो निरर्थक रिकामा हिंडतो॥ ६९०॥ ज्याप्रमाणे रोवल्यावाचून रांजण स्थिर राहू शकत नाही, त्याप्रमाणे जो निजला असताच एका ठिकाणी राहतो, नाहीतर हिंडतच असतो॥ ६९१॥ अशाप्रमाणे चांचल्यामुळे जो मर्कटाचे भावंड झाला आहे, त्याचे ठिकाणी भयंकर अज्ञान आहे, असे समज॥ ६९२॥

**आणि पैं गा धनुर्धरा। जयाचिया अंतरा। नाहीं वोढावारा। संयमाचा॥ ६९३॥**
**लेंडिये आला लोंढा। न मनी वाळुवेचा वरवंडा। तैसा निषेधाचिया तोंडा। बिहेना जो॥ ६९४॥**
**व्रतातें आड मोडी। स्वधर्मु पायें वोलांडी। नियमाची आस तोडी। जयाची क्रिया॥ ६९५॥**
**नाहीं पापाचा कंटाळा। नेदी पुण्यासी जिव्हाळा। लाजेचा पेंडवळा। खाणोनि घाली॥ ६९६॥**
**कुळेंसीं जो पाठमोरा। वेदाज्ञेसी दुऱ्हा। कृत्याकृत्यव्यापारा। निवाडु नेणे॥ ६९७॥**
**वसू जैसा मोकाटु। वारा जैसा अफाटु। फुटला जैसा पाटु। निरंजनीं॥ ६९८॥**
**आंधळें हातिरूं मातलें। कां डोंगरीं जैसें पेटलें। तैसें विषयीं सुटलें। चित्त जयाचें॥ ६९९॥**
**पैं उकरडा काइ न पडे। मोकाटु कोणां नातुडे। ग्रामद्वारींचें आडें। नोलांडी कोण॥ ७००॥**
**जैसें सत्रीं अन्न जालें। कीं सामान्या बीक आलें। वाणसियेचें उभलें। कोण न रिगे॥ ७०१॥**
**तैसें जयाचें अंत:करण। तयाचा ठायीं संपूर्ण। अज्ञानाची जाण। ऋद्धि आहे॥ ७०२॥**

**अर्थ**—आणि याप्रमाणे अर्जुना! ज्याच्या अंत:करणाला संयमाचा म्हणजे निग्रह करण्याचा मुळीच धरबंध नाही॥ ६९३॥ ओढ्याला पूर आला असता तो जसा वाळूच्या बांधाला जुमानित नाही, त्याप्रमाणे जो शास्त्राच्या निषेध-आज्ञेला जुमानित नाही॥ ६९४॥ ज्याचे आचरण, व्रताला मध्येच खंड पाडणारे, स्वधर्माला पायाने ओलांडणारे म्हणजे तुच्छ लेखणारे व नियमाने वागण्याची आशा तोडणारे असते॥ ६९५॥ ज्याला पापाचरणाचा कंटाळा वाटत नाही, पुण्याची कळकळ नाही आणि जो मनातून संपूर्ण लाजेचा भेंडोळा खणून काढतो म्हणजे जो पूर्ण निर्लज्ज बनतो॥ ६९६॥ जो आपल्या कुलाचाराकडे पाहत नाही, वेदाची आज्ञा मानित नाही, कोणते करणीय, कोणते अकरणीय हा निवाडा जाणत नाही॥ ६९७॥ देवाला वाहिलेला सांड जसा मोकाट फिरतो, वारा जसा मर्यादारहित वाहतो किंवा बांधलेल्या पाण्याचा फुटलेला पाट अरण्यात अमर्याद वाहतो॥ ६९८॥ आंधळा हत्ती जसा मस्त व्हावा किंवा डोंगर जसा पेटावा, त्याप्रमाणेच ज्याचे चित्त विषयाचे ठिकाणी स्वैर सुटले आहे॥ ६९९॥ उकरड्यावर काय

पडत नाही? मोकाट ढोर कोणाच्या हाती लागत नाही? गावाच्या द्वाराचा उंबरठा कोण ओलांडित नाही?॥ ७००॥ ज्याप्रमाणे सत्रात शिजविलेले अन्न कोणीहि खातो. सामान्य माणसाला अधिकार प्राप्त झाला असता तो काहीहि करतो व वाण्याचे दुकान उघडे असता त्यात कोणीहि शिरतो किंवा सौंदर्य प्राप्त झाले तर तिचा कोणीहि भोग घेतो॥ ७०१॥ त्याप्रमाणे जो स्वैर वर्तन करतो, त्याच्या ठिकाणी संपूर्ण अज्ञानाची समृद्धि आहे, असे जाण॥ ७०२॥

**आणि विषयांची गोडी। जो जीत मेला न सांडी। स्वर्गीही खावया गोडी। एथुनीची॥ ७०३॥**
**जो अखंड भोगा जचे। जया व्यसन काम्यक्रियेचें। मुख देखोनि विरक्ताचें। सचैल करी॥ ७०४॥**
**विषो शिणोनि या राहे। परि न शिणे सावधु नोहे। कुहिला हातीं खाये। कोढी जैसा॥ ७०५॥**
**खरी टेंको नेदी उडे। लातौनि फोडी नाकाडें। तऱ्ही जेवीं न काढे। माघौता खर॥ ७०६॥**
**तैसा जो विषयांलागीं। उडी घाली जळतिये आगीं। व्यसनाची आंगीं। लेणीं मिरवी॥ ७०७॥**
**फुटोनि पडे तंव। मृग वाढवी हांव। परि न म्हणे ते माव। रोहिणीची॥ ७०८॥**
**तैसा जन्मोनि मृत्यूवरी। विषयीं त्रासितां बहुतीं परी। तऱ्ही त्रासु नेघे धरी। अधिक प्रेम॥ ७०९॥**
**पहिलिये बाळदशे। आई बा हेंचि पिसें। तें सरे मग स्त्रीमांसें। भुलोनि ठाके॥ ७१०॥**
**मग स्त्री भोगितां थावो। वृद्धाप्य लागे येवों। तेव्हां तोचि प्रेमभावो। बाळकासि आणी॥ ७११॥**
**आंधळें व्यालें जैसें। तैसा बाळें परिवसे। परी मरे तो न त्रासे। विषयांसि जो॥ ७१२॥**
**जाण तयाचां ठायीं। अज्ञानासि पार नाहीं। आतां आणीकें कांहीं। चिन्हें सांगों॥ ७१३॥**

**अर्थ**—जिवंतपणी व मेल्यावरहि ज्याच्या अंत:करणातून विषयाची आसक्ति जात नाही आणि मेल्यावर स्वर्गात विषयसुख भोगता यावे, म्हणून जीवंत असता या लोकातच यज्ञादिद्वारा ते प्राप्त करून ठेवतो॥ ७०३॥ जो अखंड विषयभोगाकरिता श्रमतो, ज्याला काम्यकर्म करण्याचा छंद लागला व वैराग्यशील पुरुषाचे तोंड पाहताच जो आंगावरील कपड्यासहित स्नान करतो-म्हणजे ज्याला विषयवैराग्याचा अत्यंत तिटकारा वाटतो॥ ७०४॥ विषय भोगता भोगता विषय शिणून नाहीशी होतात; पण जसा कुष्ठरोगी आपल्या कुष्ठभरित हातानेच जेवतो-कंटाळा करीत नाही-तसा विषय भोगणारा शिणत नाही व तो सावधही होत नाही॥ ७०५॥ ज्याप्रमाणे गाढवी लाथा झाडून, लाथेने नाक फोडून गाढवाला समागम करू देत नाही, पण इतके करूनहि तो गाढव जसा माघारा फिरत नाही॥ ७०६॥ त्याप्रमाणे जो विषयसुख भोगण्याकरिता जळत्या आगीत म्हणजे दु:खाच्या खाईत उडी घालतो आणि अलंकाराप्रमाणे नाना प्रकारचे विषयभोगरूप छंद आंगावर मिरवितो॥ ७०७॥ पाणी आहे, असे समजून ते पिण्याची हाव धरून हरिण छाती फुटून पडे तोपर्यंत धावतो, पण जळाचा भ्रम आहे, हे तो जाणत नाही॥ ७०८॥ त्याप्रमाणे जन्मल्यापासून मरेपर्यंत विषयांपासून नाना प्रकारचे दु:ख अनुभविले असताहि विषयभोगाचा ज्याला कंटाळा येत नाही उलट त्याचे अधिक प्रेम करतो॥ ७०९॥ प्रथम बाळपणात आईबाप याचेच वेड लागून राहते. पुढे ते नाहीसे होऊन तो स्त्रियेच्या शरीराचे ठिकाणी भूलून राहतो॥ ७१०॥ मग स्त्री भोगत असता त्यालाहि मर्यादा येते व म्हातारपण येऊ लागते, तेव्हा तीच प्रेमासक्ती मुलांचे ठिकाणी आणून ठेवतो॥ ७११॥ ज्याप्रमाणे आंधळे मूल जन्मले असता त्याला आई प्रेमाने गोंजारते, त्याप्रमाणे जो म्हातारपणी मुलाबाळांना आपल्या हातानी गोंजारतो, पण मरेपर्यंत ज्याला विषयाचा कंटाळा येत नाही॥ ७१२॥ अर्जुना! त्याच्या ठिकाणी असलेल्या अज्ञानाला मर्यादाच नाही, असे जाण. आता आणखी काही अज्ञानाची लक्षण सांगतो॥ ७१३॥

**तरि देह हेचि आत्मा। ऐसेया जो मनोधर्मा। वळघोनियां कर्मा। आरंभु करी॥ ७१४॥**
**आणि उणें कां पुरें। जें जें कांहीं आचरे। तयाचेनि आविष्कारें। कुंथों लागे॥ ७१५॥**
**डोईये ठेविलेनि भोजें। देवलविसें जेवीं फुंजे। तैसा विद्यावयसा माजे। उताणा चाले॥ ७१६॥**
**म्हणे मीचि एकु आथी। माझ्याचि घरीं संपत्ती। माझी आचरती रिती। कोणा आहे॥ ७१७॥**
**नाहीं माझेनि पाडें वाडु। मी सर्वज्ञु एकुचि रूढु। ऐसा गर्वतुष्टीगंडु। घेऊनि ठाके॥ ७१८॥**

**व्याधि लागलिया माणुसा। नयेची भोग दाऊं जैसा। निकें न साहे जो तैसा। पुढिलांचें॥ ७१९॥**
**पैं गुणु तेतुला खाय। स्नेह कीं जाळितु जाय। जेथ ठेविजे तेथ होय। मसीऐसें॥ ७२०॥**
**जीवनें शिंपिला तिडपिडी। वीजिला प्राण सांडी। लागला तरी काडी। उरों नेदी॥ ७२१॥**
**अळुमाळ प्रकाशु करी। तेतुलेनीचि उबारा धरी। तैसिया दीपाचिया परी। सुविद्यु जो॥ ७२२॥**

**अर्थ**—देह हाच मी आत्मा होय, अशी दृढ बुद्धि बाळगून जो कर्मे करीत असतो॥ ७१४॥ आणि उणे किंवा पुरे जे काही कर्म त्याच्याकडून होते, ते प्रगट करून पूर्ण झालेल्या कर्माबद्दल प्रयत्नाची बढाई मारतो व अपूर्ण झालेल्या कर्माबद्दल खेद करतो॥ ७१५॥ डोक्यावर ठेवलेल्या देवाच्या प्रतिमेमुळे भगत जसा गर्वाने देवता-संचार झाल्यासारखे दाखवितो, त्या प्रमाणे विद्येने व वयाने हा उन्मत्त मत्त होऊन छाती काढून चालतो॥ ७१६॥ तो म्हणतो मीच एक कोणी आहे, माझ्याच घरी सर्व संपत्ति आहे, माझी जशी वागण्याची रीति आहे, तशी दुसऱ्या कोणाची आहे, सांगा!॥ ७१७॥ माझ्या बरोबरीचा दुसरा कोणी नाही. मीच एक सर्वज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे. याप्रमाणे सर्व प्रकारच्या मोठेपणाची फुशारकी मारत राहतो॥ ७१८॥ ज्याप्रमाणे व्याधिग्रस्त पुरुषापुढे आपले विषयभोग मुळीच दाखवू नये, कारण त्याला ते बरे वाटत नाहीत, त्याप्रमाणे ज्याच्याने दुसऱ्याचे सुख पाहून बरे वाटत नाही॥ ७१९॥ ज्याप्रमाणे दिवा जळताना जेवढी वात असते तेवढी संपवितो, तेल असेल तितके नाहीसे करीत जातो, जेथे ठेवावा तेथे काजळ करतो, पाण्याने शिपडला गेला असता तिडतिड करतो, वारां घालत असता प्राण सोडतो-म्हणजे विझतो, कशास लागला असता काडी देखील उरू देत नाही-म्हणजे भस्म करतो. थोडासा प्रकाश करतो तेवढ्यानेच तो उष्णता ठेवतो, अशा दिव्याप्रमाणे जो शहाणपणा मिरविणारा असतो॥ ७२०-७२२॥

**गूढार्थदीपिका**—जो गुण म्हणजे सद्गुण मातीत मिळवितो, स्नेह-म्हणजे प्रेम उरू देत नाही. "जेथ ठेविजे तेथ होय। मसी ऐसे"-म्हणजे ज्या कुटुंबात तो असतो, त्या कुटुंबाला आपल्यासारखे अविवेकी बनवितो. "जीवने शिंपीला तिडपिडी"-म्हणजे उत्तम जीवनाचा उपदेश केला असता जो रागावतो. "बीजिला प्राण सांडी"-म्हणजे कोणी फार विरोध केल्यास प्राण देतो, "लागला तरी काड़ी। उरो नेदी"-म्हणजे ज्याच्याशी त्याचा संबंध होतो त्याचा सर्व नाश करतो "अळुमाळ प्रकाश करी। तेतुलेनिच उबारा धरी"-म्हणजे जे थोडेसे त्याच्यापाशी ज्ञान असते तेवढ्यानेच तो गर्विष्ट होतो. असा दिव्याप्रमाणे जो शहाणपण मिरविणारा असतो.

**औषधाचेनि नांवें अमृतें। जैसा नवज्वरु आंबुथे। कां विषचि होऊनि परतें। सर्पा दूध॥ ७२३॥**
**तैसा सद्गुणीं मत्सरु। व्युत्पत्ती अहंकारु। तपोज्ञानें अपारु। ताठा चढे॥ ७२४॥**
**अंत्यु राणिवे बैसविला। आरें धारणु गिळिला। तैसा गर्वे फुगला। देखसी जो॥ ७२५॥**
**जो लाटणें ऐसा न लवे। पाथरु तेवीं न द्रवे। गुणियासि नागवे। फोडसें जैसें॥ ७२६॥**
**किंबहुना तयापासीं। अज्ञान आहे वाढीसी। हें निकरें गा तुजसीं। बोलत असों॥ ७२७॥**

**अर्थ**—गाईचे दूध औषध म्हणूनहि दिले तरी त्या योगाने जसा नवज्वराचा प्रकोप होतो किंवा सर्पाला दिलेले दूध विषरूपाने परिणाम पावते॥ ७२३॥ त्याप्रमाणे ज्याला सद्गुणाचा मत्सर वाटतो, शास्त्रीय व्युत्पत्तीने अहंकार चढ़तो, संपादन केलेल्या तपाने व ज्ञानाने अमर्याद ताठा चढतो॥ ७२४॥ अंत्यज राज्यावर बसविला असता जसा तो गर्वाने फुगून जातो किंवा अजगराने खांब गिळला असता तो अजगर वाकत नाही, त्याप्रमाणे जो गर्वाने फुगला आहे, असे दिसेल॥ ७२५॥ लाटण्याप्रमाणे जो कोणास नमत नाही. पाषाणाप्रमाणे ज्याचे चित्त द्रवत नाही व फोडसे नावाच्या सर्पाची विषबाधा ज्याप्रमाणे मांत्रिकाला काढता येत नाही, त्याप्रमाणे जो कोणाच्या आटोक्यात येत नाही॥ ७२६॥ फार काय सांगावे, अर्जुना! त्याच्यापाशी पूर्ण वाढ झालेले अज्ञान आहे, हे मी तुला अगदी निक्षून सांगत आहे॥ ७२७॥

**आणीक पाही धनंजया। जो गृहदेह सामग्रिया। न देखे कालचेया। जन्मातें गा॥ ७२८॥**
**कृतघ्ना उपकार केला। कां चोरा व्यवहार दिधला। निसुग स्तविला। विसरे जैसा॥ ७२९॥**

वोढाळितां लाविलें। तें तैसेंच कान पूंस वोलें। कीं पुढती वोढाळूं आलें। सुणें जैसें॥ ७३०॥
बेडूक सापाचियां तोंडीं। जातसे सबुडबुडीं। तो मक्षिकांचिया कोडीं। स्मरेना कांहीं॥ ७३१॥
तैसीं नवही द्वारें स्त्रवती। आंगीं देहाची लुती जिती। जेणें जाली तें चित्तीं। सलेना जया॥ ७३२॥
मातेच्या उदरकुहरीं। सूनि विष्ठेच्या दाथरीं। जठरीं नवमासवरी। उकडला जैं॥ ७३३॥
ते गर्भींची जे व्यथा। कां जें जालें उपजतां। तें कांहींचि सर्वथा। नाठवी जो॥ ७३४॥
मलमूत्रपंकीं। जे लोळतें बाळ अंकीं। तें देखोनि जो न थुंकी। त्रासु नेघे॥ ७३५॥
कालचि ना जन्म गेलें। पाहेच पुढती आलें। ऐसें हें कांहीं वाटलें। नाहीं जया॥ ७३६॥

**अर्थ**—अर्जुना! आणखी जो घर, देह आणि संसारसामुग्री यांच्या मोहामुळे कालच म्हणजे मागील झालेल्या जन्माकडे लक्ष देत नाही॥ ७२८॥ कृतघ्न, केलेला उपकार, चोर, व्यवहाराकरिता दिलेला पैसा व निर्लज्ज पुरुष, केलेली स्तुति, ज्याप्रमाणे विसरतो॥ ७२९॥ भटकणाऱ्या कुत्र्याचे कान व शेपूट कापून हाकून लाविले तरी ते जसे ओल्या आंगानेच पुन: घरात शिरण्याकरिता येते॥ ७३०॥ बेडुक सापाच्या तोंडात सगळा जात असताहि माश्यांचा समुदाय पाहून आपण मरतो, याची त्याला काहीहि आठवण होत नाही॥ ७३१॥ त्याप्रमाणे नवहि द्वारे स्त्रवू लागतात, देहाचे ठिकाणी होणारा त्वचा रोग सर्व अवयवावर प्रत्यक्ष दिसू लागतो, पण तो ज्यामुळे झाला त्या जन्माचे ज्याला मनात दु:ख वाटत नाही॥ ७३२॥ विष्ठेचा संचय असलेल्या आईच्या उदररूपी गुहेत घालून घेऊन जो जठराग्नीने नवमासपर्यंत उकडला गेला॥ ७३३॥ गर्भात असतांना किंवा जन्मताना जे दु:ख झाले ते जो मुळीच आठवत नाही॥ ७३४॥ जे मूल मलमूत्राच्या पंकात लोळते, तेच अंकावर पाहून ज्याला किळस वाटून जो थुंकत नाही व ज्याला त्याचा त्रास वाटत नाही॥ ७३५॥ कालच एक जन्म गेलां, पुन: उद्या जन्म येणार ना! असे काही ज्याला वाटत नाही॥ ७३६॥

आणि पैं तयाची परी। जीविताची फरारी। देखोनि जो न करी। मृत्युचिंता॥ ७३७॥
जिणेयाचेनि विश्वासें। मृत्यु एक एथ असे। हें जयाचेनि मानसें। मानिजेना॥ ७३८॥
अल्पोदकींचा मासा। हें नाटे ऐसिया आशा। न वचेचि कां जैसा। अगाध डोहा॥ ७३९॥
कां गोरीचिया भुली। मृग व्याधा दिठी न घाली। गळु न पाहाता गिळिली। उंडी मीनें॥ ७४०॥
दीपाचिया झगमगा। जाळील हें पतंगा। नेणवेचि पैं गा। जयापरी॥ ७४१॥
गंवार निद्रासुखें। घर जळत असे तें न देखे। नेणतां जेवीं विखें। रांधिलें अन्न॥ ७४२॥
तैसा जीविताचेनि मिषें। हा मृत्यूचि आला असे। हें नेणेचि राजसें। सुखें जो गा॥ ७४३॥
शरीरींची वाढी। अहोरात्रांची जोडी। विषयसुखप्रौढी। साचचि मानी॥ ७४४॥
परि बापुडा ऐसें नेणे। जें वेश्येचें सर्वस्व देणें। तेंचि तें नागवणें। रूप एथ॥ ७४५॥
संवचोरार्चे साजणें। तेंचि तें प्राण घेणें। लेपा स्नपन करणें। तोचिनाश॥ ७४६॥
पांडुरोगें आंग सुटलें। तें तयाचि नांवें खुंटलें। तैसें नेणे भुललें। आहारनिद्रा॥ ७४७॥
सन्मुख शूला। धांवतया पायें चपळा। प्रतिपदीं ये जवळा। मृत्यु जेवीं॥ ७४८॥
तेवीं देहा जंव जंव वाढु। जंव जंव दिवसांचा पवाडु। जंव जंव सुरवाडु। भोगांचा हा॥ ७४९॥
तंव तंव अधिकाधिकें। मरण आयुष्यातें जिंके। मीठ जेवीं उदकें। घांसिजत असे॥ ७५०॥
तैसें जीवित जाये। तयास्तव काळाते पाहे। हें हातोहातींचें न होये। ठाउकें जया॥ ७५१॥
किंबहुना पांडवा। हा आंगींचा मृत्यु नित्य नवा। न देखे जो मावा। विषयांचिया॥ ७५२॥
तो अज्ञानदेशींचा रावो। या बोला महाबाहो। न पडे गा ठावो। आणिकांचा॥ ७५३॥

**अर्थ**—आणि त्याचप्रमाणे जीवन भरभर संपत चाललेले पाहून ज्याला मृत्यूची चिंता वाटत नाही॥ ७३७॥ आपण जसे जिवंतच राहणार या विश्वासामुळे, जगात एक मृत्यु आहे, असे ज्याच्या मनाला वाटतच नाही॥ ७३८॥

डबक्यात असलेला मासा, हे आटणार नाही, असा आशेने जसा अथांग डोहात जात नाही॥ ७३९॥ व्याधाच्या गाण्याने लुब्ध झालेला हरिण जसा व्याधाकडे दृष्टि देत नाही किंवा मासा, गळ न पाहताच त्याला लावलेला कणिकेचा गोळा गिळतो॥ ७४०॥ किंवा अर्जुना! ज्याप्रमाणे दिव्याच्या झगमग प्रकाशाला भाळलेला पतंगकिडा, हा मला जाळील, असे जाणत नाही॥ ७४१॥ मूर्ख मनुष्य, झोपेच्या सुखापुढे ज्या घरात 'मी निजलो आहे' ते घर जळत आहे, त्याच्या विचार करीत नाही, किंवा ठाऊक नसल्यामुळे विषमिश्रित शिजविलेले अन्न मनुष्य खातो॥ ७४२॥ त्याप्रमाणे जन्माच्या निमित्ताने हा आपल्याला मृत्युच आला आहे, असे राजस विषयसुखाला भुलुन जो जाणत नाही॥ ७४३॥ शरीराच्या ठिकाणची वाढ, दिवस आणि रात्र यांची जोडी आणि विषमसुखाची महती, हे सर्व जो खरे मानतो॥ ७४४॥ पण बापडा, हे जाणत नाही की वेश्येचे, तनमनधनाने पुरुषाच्या स्वाधीन होणे जे आहे, तेच पुरुषाला सर्वस्वी लुबाडल्या गेल्याचे स्वरूप होय॥ ७४५॥ बरोबर प्रवासास निघालेल्या चोराची मैत्री म्हणजे ते प्राण घेणेच होय. भिंतीवर काढलेल्या चित्राला स्नान घालणे म्हणजे त्याचा नाशच होय॥ ७४६॥ पांडुरोगामुळे जे शरीर पुष्ट होते त्याचेच नाव ते खुंटले असे आहे. त्याप्रमाणे आहार व निद्रा यात भुलून आयुष्य संपत आहे, हे जो जाणत नाही॥ ७४७॥ शूळी जाण्याची शिक्षा झालेला पुरुष जसजसा धावत्या पायाने लवकर जातो, तसतसा त्याला पावलोंपावली मृत्यु जवळ येतो॥ ७४८॥ त्याप्रमाणे जसजसा देह वाढतो, दिवसापाठी दिवस सुखात निघून जातात आणि विषयसुखाचा उत्कर्ष होतो॥ ७४९॥ तसतसे मनुष्याचे आयुष्य अधिकाधिक मृत्युचे स्वाधीन होत जाते. मीठ जसे पाण्याने विरत जाते॥ ७५०॥ त्याप्रमाणे जसजसे आयुष्य सरत जाते तसतसा मृत्यु जवळ येतो. असा हा चटकन् होणारा प्रकार ज्याच्या लक्षात येत नाही॥ ७५१॥ फार काय सांगावे, अर्जुना! हा शरीराचे ठिकाणी क्षणोक्षणी येणारा मृत्यु, विषयाच्या मोहामुळे जो जाणत नाही॥ ७५२॥ हे महाबाहो अर्जुना! तो संपूर्ण अज्ञानदेशाचा राजा होय; याहून दुसरे बोलणे संभवत नाही॥ ७५३॥

**पैं जीविताचेनि तोषें। जैसा कां मृत्यु न देखे। तैसाचि तारुण्ये तोषे। जरा न गणी॥ ७५४॥**
**कडाडीं लोटला गाडा। कां शिखरौनि सुटला धोंडा। तैसा न देखे जो पुढां। वार्धक्य आहे॥ ७५५॥**
**कां आडवोहळा पाणी आलें। कां जैसे म्हैसयाचें झुंज मातलें। तैसें तारुण्याचें चढलें। भुरें जया॥ ७५६॥**
**पुष्टि लागे विघरों। कांति पाहे निसरों। माथा आदरी शिरों-। भागींकंप॥ ७५७॥**
**दाढी साउळ धरी। मान हालौनि वारी। तरी जो करी। मायेचा पैसु॥ ७५८॥**
**पुढील उरीं आदळे। तंव न देखे जेवीं आंधळें। कां डोळ्यावरलें निगळें। आळशी तोषे॥ ७५९॥**
**तैसें तारुण्य आजिचें। भोगितां वृद्धाप्य पाहेचें। न देखे तोचि साचें। अज्ञानु गा॥ ७६०॥**

**अर्थ—**समृद्ध जीविताच्या संतोषांत मग्न असल्यामुळे जसा तो पुढील येणाऱ्या मृत्युकडे पाहत नाही, तसेच तरुणपणाच्या पुष्टीमुळे पुढे येणाऱ्या म्हातारपणाची काळजी करीत नाही॥ ७५४॥ अत्यंत वेगाने लोटल्या गेलेल्या गाड्याला किंवा पर्वताच्या शिखरावरून सुटलेल्या पाषाणाला पुढे आपले तुकडे तुकडे होणार हे जसे कळत नाही, त्याप्रमाणे तारुण्याच्या मदाने पुढे म्हातारपण येणार, हे जो जाणत नाही॥ ७५५॥ आडरानांत ओढ्याला भरमसाट पाणी यावे किंवा माजलेल्या रेड्यांची झुंज लागावी, त्याप्रमाणे ज्याच्या आंगी तारुण्याची धुंदी चढली असते॥ ७५६॥ आंगची पुष्टि कमी होऊ लागते, आंगचे तेज नाहीसे होऊ पाहते आणि शरीराचे वरभागी असलेले मस्तक कंपाचा स्वीकार करते॥ ७५७॥ दाढी पांढरी होते, मान हालू लागून "नाही नाही" म्हणते; अशी स्थिति प्राप्त झाली असताहि जो मायेचा पसारा करीतच असतो॥ ७५८॥ पुढे असलेला पदार्थ उरावर येऊन आदळेपर्यंत जसा आंधळा मनुष्य जाणत नाही किंवा सर्वत्र गळत असले तरी डोळ्यावर गळत नाही याच्यातच आळशी मनुष्य संतोष मानतो; पण सर्वत्र गळत आहे, ते पुढे डोक्यावरहि गळेल हे तो जाणत नाही॥ ७५९॥ त्याप्रमाणे आजची तरुणदशा भोगता भोगता उद्या म्हातारपण येईल हे जो जाणत नाही तोच खरा अज्ञानाची मूर्ति होय॥ ७६०॥

**देखे अक्षमें कुब्जें। कीं विटावूं लागे फुंजें। परि न म्हणे पाहे माझें। ऐसेचि होईल॥ ७६१॥**

**आणि आंगीं वृध्दतेचि। संज्ञा ये मरणाची। परि जया तारुण्याची। भुली न फिटे॥ ७६२॥**
**तो अज्ञानाचें घर। हें साचचि घे उत्तर। तेवींचि परियेसीं थोर। चिन्हें आणिक॥ ७६३॥**

**अर्थ**—लुळा, पांगळा अशा सर्वथा असमर्थ किंवा कुबड्या माणसाला पाहून जो तारुण्याच्या गर्वाने त्यांना वेडावू लागतो पण माझेहि उद्या असेच होईल, असे जो लक्षात घेत नाही॥ ७६१॥ आणि ज्याला मरण हेच नाव आहे, ते म्हातारपण शरीराचे ठिकाणी आले, तरी ज्याच्या ठिकाणची तारुण्याची भ्रांति नाहीशी होत नाही॥ ७६२॥ तो अज्ञानाचे घरच होय, असे त्याच्याविषयी माझे खरोखर उत्तर आहे. तसेच आणखीहि अज्ञानाची महत्वाची लक्षणे ऐक॥ ७६३॥

**तरि वाघाचिये अडवे। एक वेळ आला चरोनि दैवें। तेणें विश्वासे पुढती धांवे। वसू जैसा॥ ७६४॥**
**तैसेचि अवचटें हें। एकदोनी वेळांचि लाहे। एथ उरग एक आहे। हें मानीना जो॥ ७६५॥**
**कां सर्पघराआंतु। अवचटें ठेवा आणिला स्वस्थु। येतुलियासाठीं निश्चित। नास्तिक होय॥ ७६६॥**
**वैरिया नीद आली। आतां द्वंद्वे माझीं सरलीं। हें मानी तो सपिलीं। मुकला जेवीं॥ ७६७॥**
**तैसी आहारनिद्रेची उजरी। रोग निवांत जोंवरी। तंव जो न करी। व्याधीचिंता॥ ७६८॥**
**आणि स्त्रीपुत्रादिमेळें। संपत्ति जंव जंव फळे। तेणें रजें डोळे। जाती जयाचे॥ ७६९॥**
**सवळेचि वियोगु पडैल। विळौनि विपत्ति येईल। हें दुःख पुढील। देखेना जो॥ ७७०॥**
**तो अज्ञान गा पांडवा। आणि तोही तोचि जाणावा। जो इंद्रियें अव्हासवा। चारी एथ॥ ७७१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गावाच्या दरीत एकदा दैवाने सुरक्षितपणे चरून आला म्हणून, प्राणास काही धोका नाही, या विश्वासाने जसा सांड पुनः तेथेच चरायला जातो॥ ७६४॥ त्याप्रमाणेच एकदोन वेळा अकस्मात् शरीर धोक्यात सापडूनही काही झाले नाही; म्हणून या धनावर सर्प आहे, यावर तो विश्वास ठेवित नाही॥ ७६५॥ किंवा पुरून ठेवलेल्या संपत्तीवर सर्प असलेल्या घरातून काही अपाय न होता धन आणता आले, एवढ्यासाठी ज्याचा शास्त्रावरील विश्वास नाहीसा होतो॥ ७६६॥ माझ्या शत्रूला झोप लागली आहे, तेव्हा आता माझी सर्व संकटे नाहीशी झाली असे समजून जो पक्षी स्वस्थ राहतो, तो ज्याप्रमाणे पिलासह प्राणाला मुकतो॥ ७६७॥ त्याप्रमाणे जोपर्यंत आहार व निद्रा उत्तम रीतीने चालू आहेत आणि शरीराचे ठिकाणी रोग उद्भवला नाही, तोपर्यंत जो पुढे शरीराला रोग होईल याची काळजीच करीत नाही॥ ७६८॥ स्त्रीपुत्रादिकाच्या मेळाव्याने जसजशी भोगसंपत्ती वाढत जाते तसतसे वाढत्या रजोगुणाने धुंद होऊन त्याचे डोळे जातात-म्हणजे अविवेक वाढून त्याला पुढील परिणाम कळत नाही॥ ७६९॥ लगेच याचा वियोग होईल आणि वियोग झाला असता दारिद्र्य प्राप्त होईल, असे हे पुढील दुःख ज्याला दिसत नाही॥ ७७०॥ अर्जुना! तोहि मूर्तिमंत अज्ञान आहे, असे समज. आणि जो इंद्रियाच्या द्वारा स्वैर विषयसेवन करतो तोहि अज्ञानाची मूर्ति समजावी॥ ७७१॥

**वयसेचेनि उवायें। संपत्तीचेनि सावायें। सेव्यासेव्य जाये। सरकटितु॥ ७७२॥**
**न करावें तें करी। असंभाव्य मनीं धरी। चिंतूं नये तें विचारी। जयाची मती॥ ७७३॥**
**रिघे जेथ न रिघावें। मागे जें न घ्यावें। स्पर्शे जेथ न लागावें। आंग मन॥ ७७४॥**
**न जावे तेथ जाये। न पाहावें तें जो पाहे। न खावें तें खाये। तेवींचि तोषे॥ ७७५॥**
**न धरावा तो संगु। न लगावें तेथ लागु। नाचरावा तो मार्गु। आचरे जो॥ ७७६॥**
**नायकावें तें आइके। न बोलावें तें बके। परि दोष होईल हें न देखे। प्रवर्ततां॥ ७७७॥**
**अंगा मनासि रुचावे। येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे। जो करणेयाचेनि नांवें। भलतेंचि करी॥ ७७८॥**
**परि पाप मज होईल। कां नरकयातना येईल। हें कांहींचि पुढील। देखेना जो॥ ७७९॥**
**तयाचेनि आंगलगें। अज्ञान जगीं दाटुगें। जें सज्ञानाही संगें। झोंबों सके॥ ७८०॥**
**असो हें आइक। अज्ञानचिन्हें आणिक। जेणें तुज सम्यक्। जाणवे तें॥ ७८१॥**

**अर्थ**—तारुण्याच्या उत्कर्षाने व संपत्तीच्या साहाय्याने, शास्त्राने विहित व शास्त्रनिषिद्ध असे दोन्ही प्रकारचे विषय, काही विचार न करता सरसकट भोगित जातो॥ ७७२ ॥ शास्त्र व संत यांनी करू नये म्हणून जे सांगितले, ते करतो. शक्य नसलेल्या गोष्टी मनात आणतो, ज्याचा विचार करू नये त्याचाच ज्याची बुद्धि विचार करते॥ ७७३ ॥ जेथे शिरू नये तेथे शिरतो, जे घेऊ नये ते मागतो आणि ज्याला शरीर व मन लागू नये, त्यालाच जो स्पर्श करतो॥ ७७४॥ जाऊ नये तेथे जातो, पाहु नये ते पाहतो, खाऊ नये ते खातो, असे करण्यातच त्याला आनंद वाटतो॥ ७७५ ॥ ज्याचा संग नको त्याचाच संग धरतो, जेथे लागू नये तेथेच लागतो आणि ज्याचे आचरण करू नये अशा मार्गाचे आचरण करतो॥ ७७६ ॥ ऐकू नये ते ऐकतो, बोलू नये ते बोलतो; पण असे करीत असताना आपल्याला दोष होतील हे तो जाणत नाही॥ ७७७ ॥ शरीराला व मनाला आवडते एवढ्यानेच काय करावे, काय करू नये, हा विचारच ज्याला येत नाही आणि जो करायचे म्हणून भलतेच करतो॥ ७७८ ॥ पण मला पाप होईल व पुढे नरकयातना प्राप्त होईल, हे पुढील काही तो लक्षात आणीत नाही॥ ७७९ ॥ अर्जुना! त्याच्याच आश्रयाने जगामध्ये अज्ञान इतके बलवान झाले आहे की त्याचा संग झाला असता ज्ञानी पुरुषालाहि ते झोंबू शकते॥ ७८० ॥ परंतु ते असो. ज्या लक्षणाने अज्ञान बरोबर जाणता येईल अशी आणखी लक्षणे ऐक॥ ७८१ ॥

**तरी जयाची प्रीति पुरी। गुंतली देखसी घरीं। नवगंधकेसरीं। भ्रमरी जैशी॥ ७८२॥**
**साकरेचिया राशी। बैसली नुठे माशी। तैसेनि स्त्रीचित्त आवेशी। जयाचें मन॥ ७८३॥**
**ठेला बेडूक कुंडीं। मशक गुंतला शेंबुडीं। ढोरु सबुडबुडीं। रुतला पंकीं॥ ७८४॥**
**तैसें घरींहूनि निघणें। नाहीं जीवें मनें प्राणें। जया साप होऊनि असणें। भाटीं तिये॥ ७८५॥**
**प्रियोत्तमाचियां कंठीं। प्रमादा घे आटी। तैशी जीवेंसी कोंपटी। धरूनि ठाके॥ ७८६॥**
**मधुरसोद्देशें। मधुकरी जचे जैसें। गृहसंगोपन तैसें। करी जो गा॥ ७८७॥**
**म्हातारपणीं जालें। आणिक एक विपायिलें। तयाचें कां जेतुलें। मातापितरां॥ ७८८॥**
**तेतुलेनि पाडें पार्था। घरीं जया प्रेमआस्था। आणि स्त्रीवांचूनि सर्वथा। जाणेना जो॥ ७८९॥**

**अर्थ**—नव्यासुगंधाने युक्त अशा कमळाच्या केसराचे ठिकाणी जशी भ्रमरी सुवासाने लुब्ध होऊन त्यांत गुंतून पडते त्याप्रमाणे ज्याचे प्रेम घरावर पूर्णपणे गुंतलेले दिसून पडेल॥ ७८२ ॥ साखरेच्या राशीवर बसलेली माशी, जशी साखरेवरून उठत नाही, त्याप्रमाणे ज्याचे मन स्त्रीचित्ताचे ठिकाणी आसक्त होऊन राहते॥ ७८३ ॥ ज्याप्रमाणे बेडूक कुंडातच राहतो, बाहेर निघत नाही. शेंबडात मच्छर गुंतले, तर त्यातून ते निघत नाहीत, किंवा बुडबुडे येत असलेल्या अशा फसफसलेल्या किंवा डेरें पडलेल्या जमिनीत (टीप-फसफसलेल्या जमिनीला वऱ्हाडात डेरे पडलेली जमीन म्हणतात. या जमिनीत रुतलेला मनुष्य निघण्याचा जितका प्रयत्न करतो तितका आणखी फसला जातो) रुतलेले ढोर त्यातून निघू शकत नाही॥ ७८४॥ त्याप्रमाणे जिवंत आहे तोपर्यंत ज्याचे जीव, मन व प्राण घरातून निघत नाहीत व म्हणूनच मेल्यानंतर जो त्या ओसाड घरात साप होऊन राहतो॥ ७८५ ॥ स्त्री आपल्या प्रिय पतीच्या गळ्याला जशी मिठी मारते, त्याप्रमाणे जो आपला जीव खोपटीच्या ठिकाणी धरून राहतो॥ ७८६ ॥ मधुर रस प्राप्त करून घेण्याकरिता मधमाशा जसे कष्ट करतात, त्याप्रमाणे कष्ट करून जो घराचे संगोपन करतो॥ ७८७॥ सुदैवाने म्हातारपणी झालेल्या आणि एकुलत्या एक पुत्ररत्नाचे आईबापांना जितके प्रेम वाटते॥ ७८८॥ त्याच्या तोडीने, अर्जुना! ज्याचे घराचे ठिकाणी प्रेम व आस्था गुंतली असते आणि जो स्त्रियेवाचून दुसरे काहीच जाणत नाही॥ ७८९ ॥

**महापुरुषाचें चित्त। जालिया वस्तुगत। ठाके व्यवहारजात। जयापरी॥ ७९०॥**
**तैसा स्त्रीदेहीं जो जीवें। पडोनियां सर्वभावें। कोण मी काय करावें। कांही नेणे॥ ७९१॥**
**हानि लज्जा न देखे। परापवादु नाइके। जयाचीं इंद्रियें एकमुखें। स्त्रिया केलीं॥ ७९२॥**
**चित्त आराधी स्त्रियेचें। आणि तियेचेनि छंदें नाचे। माकड गारुडियाचें। जैसें होय॥ ७९३॥**
**आपणपेंही शिणवी। इष्टमित्र दुखवी। मग कवडाचि वाढवी। लोभी जैसा॥ ७९४॥**

**तैसा दानपुण्यें खांची। गोत्रकुटुंबा वंची। परी बाइणी स्त्रियेची। उणी हों नेदी॥ ७९५॥**
**पूजितीं दैवतें जोगावी। गुरुतें बोलें झकवी। मायबापां दावी। निदारपण॥ ७९६॥**
**स्त्रियेच्या तरी विखीं। भोगसंपत्ति अनेकीं। आणी वस्तु निकी। जे जे देखे॥ ७९७॥**
**प्रेमाथिलेनि भक्तें। जैसेनि भजिजे कुळदैवतें। तैसा एकाग्रचित्तें। स्त्री जो उपासी॥ ७९८॥**
**साच आणि चोख। तें स्त्रियेसीचि अशेख। येरांविषयीं जोगावणूक। तेही नाहीं॥ ७९९॥**
**इयेतें हन कोणी देखेल। इयेसी वेखासें जाईल। तरि युगचि बुडेल। ऐसें जया॥ ८००॥**
**नायटेयां भेण। न मोडिजे नागांची आण। तैसी पाळी उणखुण। स्त्रियेची जो॥ ८०१॥**
**किंबहुना धनंजया। स्त्रीचि सर्वस्व जया। आणि तियेचिया जालियां-। लागीं प्रेम॥ ८०२॥**
**आणिकही जें समस्त। तेथिंचें संपत्तिजात। तें जीवाहूनि आप्त। मानी जो कां॥ ८०३॥**
**तो अज्ञानासी मूळ। अज्ञाना तेणे बळ। हें असो केवळ। तो तेंचि रूप॥ ८०४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाचे चित्त आत्माकार झाले असता त्याचा व्यवहार बंद पडतो, त्याचप्रमाणे स्त्रियेच्या देहाचे ठिकाणी अंत:करणातून जो सर्व भावाने आसक्त राहून मी कोण व मी काय केले पाहिजे, हे काही जाणत नाही॥ ७९०-७९१ ॥ ज्याची सर्व इंद्रिये स्त्रियेने आपल्याकडे एकतंत्र केली, तो हानि, लज्जा पाहत नाही व लोक काय म्हणतात इकडे लक्ष देत नाही॥ ७९२ ॥ गारुड्याचे, माकड जसे गारोड्याच्या तंत्राने वागते, त्याप्रमाणे तो स्त्रियेच्या चित्ताची आराधना करतो व तिच्या तंत्राप्रमाणे नाचतो॥ ७९३ ॥ ज्याप्रमाणे लोभी मनुष्य स्वत: अन्नवस्त्रादिकाचे दारिद्र्य सहन करून इष्टमित्रांना दुखवून केवळ धनच वाढवितो॥ ७९४॥ त्याप्रमाणे दानादि पुण्यकर्माला फाटा देतो, गोत्रजाना व कुटुंबातील माणसांना थापा देतो, पण स्त्रियेचा तगादा मात्र पूर्ण करतो, उणे पडू देत नाही॥ ७९५ ॥ पूजावयाच्या दैवताचे कसे तरी पूजन करतो, श्रीगुरुपाशी थापा मारतो, मायाबापांनी पैसा मागितला असता पैसाच नाही म्हणून सांगतो॥ ७९६ ॥ स्त्रियेकरिता मात्र अनेक प्रकारचे भोगऐश्वर्य संपादन करून जी जी चांगली वस्तु दिसेल, ती ती विकत आणतो॥ ७९७ ॥ ज्याप्रमाणे प्रेमळ भक्ताने आपल्या कुलदेवतेची उपासना करावी, त्याप्रमाणे जो आपल्या स्त्रियेची एकाग्र चित्ताने उपासना करतो॥ ७९८ ॥ खरे व उत्तम ते संपूर्ण एका स्त्रियेकरिता असते व इतरांना कसेबसे निर्वाहापुरते अन्नवस्त्र तेहि देत नाही॥ ७९९ ॥ ह्या स्त्रियेकडे कोणी पाहिल्यास किंवा तिच्या विरुद्ध कोणी गेल्यास ज्याला कल्पान्त झाल्याचे दु:ख होते॥ ८०० ॥ नायटे होतील या भीतीने ज्याप्रमाणे नागाकरिता केलेला नवस मोडू नये, त्याप्रमाणे जो स्त्रियेच्या मनातील अल्प देखील इच्छा पुरवितो॥ ८०१ ॥ फार काय सांगावे, अर्जुना! ज्याला स्त्रीच एक सर्वस्व वाटते आणि तिचे जे होऊन राहिले त्याचे ज्याला प्रेम वाटते॥ ८०२ ॥ आणखीहि तिची संपूर्ण भोगसंपत्ति आपल्या जीवापेक्षाहि जो प्रिय समजतो॥ ८०३ ॥ तो अज्ञानाला जन्म देणारे कारण-असून त्याच्याच योगाने अज्ञानाला बळ प्राप्त झाले आहे. हे असो. तो केवळ अज्ञानाचेच रूप होय॥ ८०४॥

**आणि मातलिया सागरीं। मोकळिलिया तरी। लाटांचां येरझारीं। आंदोळे जेवीं॥ ८०५॥**
**तेवीं प्रिय वस्तु पावे। आणि सुखें जो उंचावे। तैसाचि अप्रियासवें। तळवट घे॥ ८०६॥**
**ऐसेनि जयाचे चित्तीं। वैषम्यसाम्याची वाखती। वाहे तो महामती। अज्ञान गा॥ ८०७॥**

**अर्थ**—खळवळलेल्या समुद्रात नाव मोकळी सोडत असता ती जशी लाटाच्या येण्याजाण्याने हेलकावे खाते॥ ८०५ ॥ त्याप्रमाणे आवडती वस्तु प्राप्त झाली असता जो सुखाने आपल्याला थोर भाग्यवान समझतो व त्याचप्रमाणे अप्रिय वस्तु प्राप्त झाली असता जो आपल्याला अत्यंत भाग्यहीन समजून दु:ख करतो॥ ८०६ ॥ याप्रमाणे जो आपल्या चित्तात विषमपणाचा खळगा वागवितो, हे महामति अर्जुना! तो अज्ञान होय॥ ८०७॥

**आणि माझां ठायीं भक्ती। फळालागीं जया आर्ती। धनोद्देशें विरक्ती। नटणें जेवीं॥ ८०८॥**
**ना तरी कांताच्या मानसीं। रिगोनि स्वैरिणी जैसी। राहाटे जारेंसीं। जावयालागीं॥ ८०९॥**

**तैसा मातें किरीटी। भजती गा पाउटी। करूनि जो दिठी। विषो सूये॥८१०॥**
**आणि भजिन्नलियासवें। तो विषो जरी न पावे। तरी सांडी म्हणे आघवें। टवाळ हें॥८११॥**
**कुणबट कुळवाडी। तैसा आन आन देव मांडी। आदिलाची परवडी। करी तया॥८१२॥**
**तया गुरुमार्गा टेंके। जयाचा सुगरवा देखे। तरी तयाचा मंत्र शिके। येरु नेघे॥८१३॥**
**प्राणिजातेंसीं निष्ठुरु। स्थावरी बहु भरु। तेवींचि नाहीं एकसरु। निर्वार जया॥८१४॥**
**माझी मूर्ति निफजवी। ते घराचां कोनीं बैसवी। आपण देवो देवी। यात्रे जाय॥८१५॥**
**नित्य आराधन माझें। काजीं कुळदेवता भजे। पर्वविशेषें कीजे। पूजा आना॥८१६॥**
**माझें अधिष्ठान घरीं। आणि वोवसे आनाचे करी। पितृकार्यावसरीं। पितरांचा होय॥८१७॥**
**एकादशींचां दिवसीं। जेतुला पाडु आम्हांसी। तेतुलाचि नागांसी। पंचमीच्या दिवशीं॥८१८॥**
**चौथ मोटकी पाहे। आणि गणेशाचाचि होये। चउदसी म्हणे माये। तुझाच वो दुर्गे॥८१९॥**
**नित्यनैमित्तिकें कर्मे सांडी। मग बैंसे नवचंडी। आदित्यवारीं वाढी। भैरवां पात्रीं॥८२०॥**
**पाठी सोमवार पावे। आणि बेलेंसी लिंगा धांवे। ऐसा एकलाचि आघवे। जोगावी जो॥८२१॥**
**ऐसा अखंड भजन करी। उगा नोहे क्षणभरी। आघवेनि गांवद्वारीं। अहेव जैसी॥८२२॥**
**ऐसेनि जो भक्तु। देखसी सैरा धांवतु। जाण अज्ञानाचा मूर्तु। अवतार तो॥८२३॥**

**अर्थ**—आणि द्रव्य मिळविण्याकरिता ज्याप्रमाणे वैराग्याचे सोंग दाखवावे, त्याप्रमाणे जो माझ्या ठिकाणी भक्ति दाखवितो; पण चित्तात विषयसुखाची उत्कट इच्छा असते॥ ८०८ ॥ किंवा ज्याप्रमाणे जाराकडे जाता यावे म्हणून व्यभिचारिणी स्त्री, पतीच्या मनाप्रमाणे वागल्यासारखे दाखविते॥ ८०९ ॥ त्याप्रमाणे, अर्जुना जो माझे भजन करतो व माझ्या भजनाची पायरी (निमित्त) करून विषयप्राप्तिकडे दृष्टि ठेवितो॥ ८१० ॥ आणि भजन केल्या बरोबर इच्छित विषय प्राप्त झाला नाही तर, हे खोटे आहे, असे म्हणून तो भजन टाकून देतो॥ ८११ ॥ ज्याप्रमाणे कुणबी नवी नवी शेती करतो, त्याप्रमाणे जो निरनिराळे देव मांडून पहिल्याला केलेला पूजादि प्रकार त्या नव्यालाहि करतो॥ ८१२ ॥ ज्याचा विशेष थाटमाट दिसेल त्या गुरुच्या मार्गाचा आश्रय करतो व त्याच्यापासूनच मंत्र घेतो, ज्याचा थाटमाट दिसत नाही, अशा गुरुचा मंत्र घेऊ इच्छित नाही॥ ८१३ ॥ सचेतन प्राण्याशी जो तिरसटपणाने वागतो, पण अचलमूर्तीचे ठिकाणी मात्र मोठा आदर ठेवतो, त्याप्रमाणे ज्याच्याने कोठेहि एकनिष्ठ राहणे होत नाही॥ ८१४॥ माझी मूर्ति तयार करवून त्याची घराच्या कोपऱ्यात प्रतिष्ठा करतो व आपण देव देवी यांच्या यात्रेला जातो॥ ८१५ ॥ नित्य माझी उपासना करतो, पण लग्न इत्यादि प्रसंगविशेषी माझे पूजन सोडून तशाच भावाने कुलदेवतेचेच पूजन करतो; तसेच एखादा पर्वकाळ आल्यास त्या पर्वकाळी ज्या देवतेचे विशेष माहात्म्य सांगितले असेल, त्याचीच पूजा करतो॥ ८१६ ॥ किंवा मी प्रत्यक्ष घरात असताना मला सोडून दुसऱ्याचे नवस करतो. पितराचे श्राद्धादिकार्य करणे प्राप्त झाले असता सर्वस्वी पितरांचा भक्त बनतो॥ ८१७॥ एकादशीच्या दिवशी आमच्या ठिकाणी जितका आदर दाखवितो तितकाच आदर नागपंचमीच्या दिवशी सर्पदंशाच्या भीतीने नागाचे ठिकाणी दाखवितो॥ ८१८॥ चतुर्थी आली रे आली की, तो गणेशाचा भक्त होतो आणि महामारीच्या भीतीने "माते दुर्गे! मी सर्वस्वी तुझे लेकरू आहे" असे म्हणून चतुर्दशीच्या दिवशी देवीला शरण जातो॥ ८१९ ॥ दररोज करायचे ते नित्य व श्राद्धादि निमित्ताने करायचे ते नैमित्तिक, अशी ही दोन्ही कर्मे सोडून देऊन शत्रूचा घात करण्याकरिता नवचंडीचे अनुष्ठान करायला बसतो. रविवार आला असता पात्रात खिचडी वाढून कालभैरवाला नैवेद्य दाखवितो॥ ८२० ॥ नंतर सोमवार आला की बेल घेवून शिवलिंगाच्या पूजेला धावतो. याप्रमाणे एकटा सर्व देवाचा भक्त आहे, असे दाखवितो॥ ८२१ ॥ ज्याप्रमाणे बहुतेक गावातील सर्व द्वारात फिरणाऱ्या वेश्येचे गावातील पुरुष पति असल्यामुळे ती अखंड सौभाग्यवती असते, त्याप्रमाणे जो क्षणभर उगा न राहता सर्व देवांचे अखंड भजन करणारा असतो॥ ८२२ ॥ अशा रीतीने जो भक्त तुला चोहोकडे धावत असलेला दिसेल तो अज्ञानाचा मूर्त अवतार आहे, असे समज॥ ८२३ ॥

**आणि एकांतें चोखटें। तपोवनें तीर्थें तटें। देखोनि जो गा विटे। तोहि तोचि॥ ८२४॥**
**जया जनपदीं सुख। गजबजेचें कवतिक। वानूं आवडे लौकिक। तोही तोचि॥ ८२५॥**
**आणि आत्मा गोचरु होये। ऐसी जे विद्या आहे। ते आइकोनि डौर वाहे। विद्वांसू जो॥ ८२६॥**
**उपनिषदांकडे न वचे। योगशास्त्र न रुचे। अध्यात्मज्ञानीं जयाचें। मनचि नाहीं॥ ८२७॥**
**आत्मचर्चा एकी आथी। ऐसियें बुद्धीची भिंती। पाडूनि जयाची मती। वोढाळ जाहली॥ ८२८॥**
**कर्मकांड तरी जाणे। मुखोद्गत पुराणें। ज्योतिषीं तो म्हणे। तैसेंचि होय॥ ८२९॥**
**शिल्पीं अति निपुण। सूपकर्मीही प्रवीण। विधि आथर्वण। हातीं आथी॥ ८३०॥**
**कोकीं नाहीं ठेलें। भारत कीर म्हणितलें। आगम आपाविले। मूर्त होती॥ ८३१॥**
**नीतिजात सुझे। वैद्यकही बुझे। काव्यनाटकीं दुजें। चतुर नाहीं॥ ८३२॥**
**स्मृतींची चर्चा। दंशु जाणे गारुडिचा। निघंट प्रज्ञेचा। पाइकी करी॥ ८३३॥**
**पैं व्याकरणीं चोखडा। तर्कीं अतिगाढा। परि एक अध्यात्मज्ञानीं फुडा। जात्यंध जो॥ ८३४॥**
**तें एकवांचूनि आघवां शास्त्रीं। सिद्धांतनिर्माणधात्री। परि जळो तें मूळनक्षत्रीं। न पाहें गा॥ ८३५॥**

**अर्थ**—आणखी तपोवन, तीर्थ, नद्यांचे तीर इत्यादि एकांतातील उत्तम स्थाने पाहून ज्याला वीट येतो, तोहि अज्ञानत्वाचा मूर्त अवतार आहे॥ ८२४॥ ज्याला लोकात राहण्यानेच सुख होते, गोंगाट-गर्दी याचे कौतुक वाटते आणि लौकिक गोष्टीचीच स्तुति करावीशी वाटते, तोहि अज्ञानाचा मूर्त अवतार होय॥ ८२५॥ आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून देणारी अशी जी ब्रह्मविद्या ती ऐकल्याबरोबर जो शहाणा पुरुष हातात डमरू वाजवून तिचा उपहास करतो॥ ८२६॥ जो उपनिषदाकडे कधी वळत नाही, योगशास्त्र ज्याला आवडत नाही व अध्यात्मज्ञानाचे ठिकाणी ज्याचे मन घेत नाही॥ ८२७॥ आत्मचर्चा म्हणून एक अशी आवश्यक बाब आहे की शाहाणे पुरुष आपल्या परम कल्याणाकरिता ती करीत असतात, अशा बुद्धीची भिंत पाडून ज्याची बुद्धी वाटेल तेथे भटकणारी झाली आहे॥ ८२८॥ संपूर्ण कर्मकांड जाणतो, पुराणे मुखोद्गत आहेत, जसे म्हणतो तसेच होते, असा फलज्योतिष्यात जो पारंगत आहे॥ ८२९॥ शिल्पशास्त्रात निपुण असून पाककर्मातहि प्रवीण आहे, अथर्व वेदातील अभिचारिक विधि सर्व अवगत आहेत॥ ८३०॥ कामशास्त्रात काही जाणावयाचे राहिले नाही, संपूर्ण भारत म्हटले गेले, शास्त्रे इतकी स्वाधीन केली की ती मूर्त होऊन समोर उभी राहतात॥ ८३१॥ सर्व प्रकारच्या नीती चांगल्या समजतात वैद्यशास्त्रहि जणतो, काव्य-नाटक इत्यादि साहित्यात त्याच्यासारखा दुसरा चतुर नाही॥ ८३२॥ स्मृतीची चर्चा करणे, तसेच गारुडीविद्येचे मर्म तो जाणतो, वैदिकशब्दाचा कोश तर त्याच्या बुद्धीच्या आकलनशक्तीची चाकरीच करतो॥ ८३३॥ व्याकरणशास्त्रात त्याचा उत्तम हातखंडा असून तर्कशास्त्रात अत्यंत गाढा विद्वान आहे; पण अध्यात्मशास्त्रातील आत्मज्ञानविषयी मात्र जो खरोखर जन्मांध आहे॥ ८३४॥ एका अध्यात्म ज्ञानावाचून इतर सर्व शास्त्रामध्ये सिद्धान्ताला प्रसवणारी ती जननीच आहे; पण आग लागो अशा ज्ञानाला! मूळनक्षत्रावर जन्मलेले मूल जसे पाहू नये, त्याप्रमाणे त्याच्याकडे ढुंकून देखील पाहू नकोस॥ ८३५॥

**मोरांचा आंगीं अशेषें। पिसें असती डोळसें। परी एकली दिठी नसे। तैसें तें गा॥ ८३६॥**
**जरी परमाणूएवढें। संजीवनीमूळ जोडे। तरी बहु काय गाडे। भरणें येरें॥ ८३७॥**
**आयुष्यावीण लक्षणें। सिसेंवीण अळंकरणें। वोहरेंवीण वाधावणें। तो विटंबु गा॥ ८३८॥**
**तैसें शास्त्रजात जाण। आघवेंचि अप्रमाण। अध्यात्मज्ञानेंविण। एकलेनी॥ ८३९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे मोराच्या आंगावर सर्वच डोळे असलेली पिसे असतात; पण त्या पिसाच्या डोळ्यामध्ये एक दृष्टि मात्र नसते; म्हणून त्या डोळ्यांचा काही उपयोग नाही; त्याप्रमाणे अध्यात्मज्ञानावाचून इतर शास्त्राचे पुष्कळहि ज्ञान असले, तरी ते व्यर्थ होय॥ ८३६॥ मेलेल्या मनुष्यासहि जिवंत करणारी संजीवनी मुळी परमाणुएवढी जरी जवळ असेल तर बाकीच्या गाडाभर इतर पुष्कळ औषधि कशाला बाळगायच्या?॥ ८३७॥ आयुष्य सरलेल्याची

सामुद्रिक लक्षणे सांगणे, शीर नाही त्याला अलंकार घालणे, वधुवराशिवाय वर्धावा धाडणे, ही विटंबनाच होय॥ ८३८॥ त्याप्रमाणे अर्जुना! एका अध्यात्मज्ञानावाचून इतर नाना-प्रकारच्या शास्त्राचे ज्ञान अविद्याविषयक म्हणून अप्रमाण आहे, असे जाण॥ ८३९॥

**गूढार्थदीपिका-आघवेचि अप्रमाण—**

''द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च॥ ४॥ तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेद: सामवेदोऽथर्ववेद: शिक्षा कल्पो व्याकरण निरुक्तं छंदो ज्योतिषामिति। अथ परा यया तदक्षरमधिगम्यते॥ ५॥'' (मुं० उ० १-१-४-५)

विद्या, परा व अपरा, अशी दोन प्रकारची आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, ज्योतिष इत्यादि सर्व अपरा विद्या असून ज्या विद्येने परमात्म्याला जाणता येते, तिला परा विद्या म्हणतात, असे मुंडकोपनिषदातील श्रुतीत सांगितले आहे. ''अपरा हि विद्या अविद्या सा'' संपूर्ण अपरा विद्या अविद्याजन्य किंवा भ्रांतिजन्य म्हणजे संसारविषयक आहे, असे आचार्यांनी त्यावरील भाष्यात म्हटले असल्यामुळे अर्थातच ती प्रमाणभूत होऊ शकत नाही. माउलींनी हेच येथे ''आघवेचि अप्रमाण'' या चरणाने सांगून परा विद्या ही जीवाला त्याच्या अविनाशी सुखरूप अशा आत्मस्थितीची प्राप्ति करून देणारी आहे असे सूचित केले आहे.

सारांश, अपराविद्या संसारदायक असल्यामुळे जीवाची दु:खातून कायमची सुटका करून देऊन अविनाशी सुखस्थिति प्राप्त करून देणारी नाही; म्हणून प्रमाण नाही.

**यालागीं अर्जुना पाहीं। अध्यात्मज्ञानाच्या ठायीं। जया नित्यबोधु नाहीं। शास्त्रमूढा॥ ८४०॥**
**तया शरीर जें जालें। तें अज्ञानाचें बीं विरूढलें। तयाचें व्युत्पन्नत्व गेलें। अज्ञानवेलीं॥ ८४१॥**
**तो जें जें बोले। तें अज्ञानचि फुललें। तयाचें पुण्य जें फळलें। तें अज्ञानचि गा॥ ८४२॥**
**आणि अध्यात्मज्ञान कहीं। जेणें मानिलेंचि नाहीं। तो ज्ञानार्थु न देखे काई। हें बोलावें असे॥ ८४३॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! हे लक्षात ठेव की, शास्त्र पढूनहि ज्या मूर्खाला अध्यात्मशास्त्राचे महत्व न कळल्यामुळे अध्यात्म ज्ञान हेच एक नित्य ज्ञान असून बाकीची ज्ञाने व्यर्थ आहेत असा बोध झाला नाही॥ ८४०॥ त्याच्या ठिकाणी जे शरीर प्राप्त झाले, ते अज्ञानाचे बीज उगवले होय. त्याचे शास्त्रनैपुण्य म्हणजे वाढत गेलेली अज्ञानवेली होय॥ ८४१॥ तो जे जे बोलतो ते ते अज्ञानच फुलले, असे समज आणि त्याचे जे पुण्य फलद्रूप झाले तेहि अज्ञानच होय॥ ८४२॥ आणि अध्यात्मज्ञान म्हणून काही आहे, हे जो मानितच नाही, त्याला 'ज्ञान' या शब्दाचा अर्थ समजत नाही, हे सांगितले पाहिजे काय?॥ ८४३॥

**गूढार्थदीपिका—तो ज्ञानार्थ न देखे काई। हे बोलावे असे**

सत्य व मिथ्या दोन वस्तु आहेत. सत्य म्हणजे अविनाशी, सदासर्वदा असणारी. मिथ्या म्हणजे अस्तित्वात नसताना 'आहे' अशी वाटणारी. परब्रह्म जी अध्यात्मवस्तु ती सदासर्वदा अविनाशी असल्यामुळे तिच्या ज्ञानाला खरोखर ज्ञान शब्द लावता येईल. अस्तित्वात नसलेल्या, पण आहे अशी कल्पना झालेल्या वस्तूचे ज्ञान, हे काल्पनिकच असल्यामुळे ते प्रमाणभूत म्हणता येत नाही. म्हणून मिथ्या अशा सांसारिक वस्तूच्या काल्पनिक ज्ञानाला खरे समजणाऱ्या पुरुषाला, ज्ञान कशाला म्हणतात किंवा ज्ञानाचा खरा अर्थ काय, हे समजत नसते, हे उघड आहे.

**ऐलीचि थडी न पवतां। पळे जो माघौता। तया पैलद्वीपींची वार्ता। काय होय॥ ८४४॥**
**कां दारवंठांचि जयाचें। शीर रोंविलें खांचे। तो केवीं परिवरींचें। ठेविलें देखे॥ ८४५॥**
**तेवीं अध्यात्मज्ञानीं जया। अनोळख धनंजया। तया ज्ञानार्थु देखावया। विषो काई॥ ८४६॥**
**म्हणोनि आतां विशेषें। तो ज्ञानाचें तत्त्व न देखे। हें सांगावें आखेंलेखें। न लगे तुज॥ ८४७॥**
**जेव्हां सगर्भे वाढिलें। तेव्हांचि पोटींचें धालें। तैसें मागिलें पदें बोलिलें। हेचि होय॥ ८४८॥**
**वांचूनियां वेगळें। रूप करणें हें न मिळे। जेवीं अवंतिलें आंधळें। तें दुजेनसीं ये॥ ८४९॥**

**एवं इये उपरतीं। ज्ञानचिन्हें मागुती। अमानित्वादि प्रभृति। वाखाणिलीं॥ ८५०॥**
**जे ज्ञानपदें अठरा। केलियां येरी मोहरां। अज्ञान या आकारा। सहजें येती॥ ८५१॥**
**मागां श्लोकाचेनि अर्धार्धें। ऐसें सांगितलें श्रीमुकुंदें। ना उफराटीं इये ज्ञानपदें। तेंचि अज्ञान॥ ८५२॥**
**म्हणोनि इया वाहणी। केली म्यां उपलवणी। वांचूनि दुधा मेळऊनि पाणी। फार कीजे काई॥ ८५३॥**
**तैसें जी न बडबडी। पदाची कोर न सांडीं। मूळध्वनींचिये वाढी। निमित्त जाहालो॥ ८५४॥**

**अर्थ**—अलीकडील तीरावर न पोहोचताच जो परत माघारा पळतो त्याला पलीकडच्या तीरावरील वार्ता कशी कळणार?॥ ८४४॥ किंवा दारवट्यांत खळगा खणून ज्याने त्यात अपले शीर रोवून घेतले म्हणजे शरीरासह जो खळग्यात सामावला गेला तो घरात ठेवलेले कसे पाहणार?॥ ८४५॥ त्याप्रमाणे हे अर्जुना! अध्यात्मज्ञानाची ज्याला यत्किंचित् ओळख नाही, त्याला खऱ्या ज्ञानाचा अर्थ जे ब्रह्म ते जाणण्याकरिता विषय राहतो काय? किंवा त्याला ज्ञानाचा अर्थ जाणण्याकरिता ज्ञानाचा विषयच कोठे राहतो?॥ ८४६॥ म्हणून असा पुरुष, खऱ्या ज्ञानाने कळणारी तात्त्विक परब्रह्मवस्तु जाणत नाही, हे तुला आणखी विशेष रीतीने स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता नाही॥ ८४७॥ जेव्हा गर्भवती स्त्रीयेला पान वाढून जेवायला बसवावे तेव्हा तिच्याबरोबर तिच्या पोटातील गर्भहि तृप्त होतो किंवा आंधळ्याला आमंत्रण द्यावे म्हणजे तो दुसऱ्याला घेऊन येतो, त्या प्रमाणे ज्ञानाच्या जे विरुद्ध ते अज्ञानच होत असल्यामुळे मागील ज्ञानाच्या लक्षणाचा बोध करणाऱ्या पदानी अज्ञानहि बोलले गेले आहे. त्यावाचून अज्ञानाचे वेगळे लक्षण करणे संभवत नाही॥ ८४८-८४९॥ याप्रमाणे ज्ञानलक्षणाच्या उलट अज्ञान चिन्हे सांगून अमानित्वादिप्रभृति ज्ञानलक्षणाचीच पुन: स्तुति केली आहे॥ ८५०॥ कारण, ज्ञानाची ही अठरा लक्षणे सांगणारी पदे दुसऱ्या बाजूने केली असता, म्हणजे उलट केली असता सहजच ती अज्ञान या आकाराला येतात॥ ८५१॥ मागील अर्ध्या श्लोकाने ही ज्ञानपदे उफराटी केली असता तेच अज्ञान होय, असे भगवंतानीच सांगितले आहे॥ ८५२॥ म्हणून (भगवंताच्या म्हणण्यानुसार) अशा प्रकारे मी अज्ञानलक्षणाचे विस्ताराने वर्णन केले. तसे न करता दुधात पाणी मिळवून ते वाढवावे, त्याप्रमाणे, महाराज! मी बडबड न करता व शब्दार्थाला यत्किंचित् न सोडता भगवंताच्या शब्दात जो ध्वनि असेल, तो स्पष्ट करण्यास निमित्त झालो आहे॥ ८५३-८५४॥

**तंव श्रोते म्हणती राहें। कें परिहारा ठावो आहे। बिहिसी कां वाये। कविपोषका॥ ८५५॥**
**तूतें श्रीमुरारीं। म्हणितलें प्रगट करीं। जे अभिप्राय गव्हरीं। झांकिले आम्हीं॥ ८५६॥**
**तें देवाचें मनोगत। दावित आहासी तूं मूर्त। हेंहीं म्हणतां चित्त। दाटेल तुझें॥ ८५७॥**
**म्हणोनि असो हें न बोलों। परि साविया गा तोषलों। जे ज्ञानतरिये मेळविलों। श्रवणसुखाचे॥ ८५८॥**
**आतां इयावरी। जे तो श्रीहरी। बोलिला तें करीं। कथन वेगां॥ ८५९॥**
**इया संतवाक्यासरिसें। म्हणितलें निवृत्तिदासें। जी अवधारा तरी ऐसें। बोलिलें देवें॥ ८६०॥**
**म्हणती तुवां पांडवा। हा चिन्हसमुच्चयो आघवा। आयकिला तो जाणावा। अज्ञानभाग॥ ८६१॥**
**इया अज्ञानभागा। पाठी देऊनि पैं गा। ज्ञानविखीं चांगा। दृढा होइजे॥ ८६२॥**
**मग निर्वाळिलेनि ज्ञानें। ज्ञेय भेटेल मनें। तें जाणावया अर्जुनें। आस केली॥ ८६३॥**

**अर्थ**—तेव्हा श्रोते म्हणतात, हे कवींना रसपुष्टि देणाऱ्या ज्ञानदेवा! थांब! तुझ्या निरूपणात खुलासा करण्याचे कारणच नाही. व्यर्थ कां भीतोस?॥ ८५५॥ "आम्ही जे अभिप्राय गीतेतील शब्दरूपी गुहेत गुप्त झाकून ठेवले आहेत, ते तू प्रगट कर" असे तुला भगवंतानीच सांगितले आहे॥ ८५६॥ ते तू भगवंताचे हृद्गतच स्पष्ट व्यक्त करून दाखवित आहेस, असे म्हणतानाहि तुझे चित्त प्रेमाने गहिवरून येईल॥ ८५७॥ म्हणून असो. असेहि आम्ही म्हणत नाही. पण केवळ श्रवणानेच सुख होईल अशा ज्ञाननौकेवर आम्हाला बसविलेस; म्हणून खरोखर आम्हाला फार संतोष झाला आहे॥ ८५८॥ आता यानंतर तो श्रीहरी जे काही बोलिला ते आम्हाला लवकर कथन कर॥ ८५९॥ असे संतांचे वाक्य ऐकल्याबरोबर श्रीनिवृत्तिनाथ महाराजाचे दास श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अहो जी महाराज!

देव असे बोलले, ते ऐका॥ ८६०॥ देव म्हणतात, अर्जुना! तू हा जो संपूर्ण लक्षणसमुदाय ऐकलास, तो अज्ञानाचा भाग आहे, असे समज॥ ८६१॥ या अज्ञान भागाला पाठमोरा होऊन ज्ञानलक्षणाचे ठिकाणी चांगले दृढ होवावे-म्हणजे ज्ञानलक्षणे आंगी चांगली ठसू द्यावी॥ ८६२॥ मग मनात ठसलेल्या त्या शुद्ध ज्ञानाने मनोवृत्ति ज्या ज्ञेयाला भेटेल ते ज्ञेय जाणण्याची अर्जुनाने इच्छा केली॥ ८६३॥

**गूढार्थदीपिका**—येथे भेटेल या शब्दाने चित्तवृत्तीचे व ज्ञेय परब्रह्माचे ऐक्य होते असे माउलीनी सुचविले आहे. वृत्तीला जो परब्रह्माचा साक्षात्कार होतो तो ऐक्याने होतो-म्हणजे वृत्ति ब्रह्माकार होऊन जाते. ब्रह्म हे इतर ज्ञेय पदार्थाप्रमाणे ब्रह्माकारवृत्तीहून निराळे राहत नाही.

**तंव सर्वज्ञांचा रावो। म्हणे जाणोनि तयाचा भावो। परिसे ज्ञेयाचा अभिप्रावो। सांगों आतां॥ ८६४॥**

**अर्थ**—तेव्हा सर्वज्ञांचा राजा जो भगवान तो अर्जुनाच्या अंत:करणातील भाव जाणून म्हणतो, अर्जुना! आता ज्ञेयाचे स्वरूप सांगतो, ऐक॥ ८६४॥

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते। अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते॥ १२॥**

**अर्थ**—ज्याला ज्ञेय म्हणतात, ते मी सांगतो. जे जाणले असता जीव अविनाशी होतो, ते उत्पत्तिरहित असलेले परब्रह्म होय. त्याला सत् म्हणता येत नाही व असत्‌हि म्हणता येत नाही॥ १२॥

**तरि ज्ञेय ऐसें म्हणणें। वस्तुतें येणेंचि कारणें। जें ज्ञानेंवांचूनि कवणें। उपाया न ये॥ ८६५॥**

**अर्थ**—ज्ञानेवाचूनि-म्हणजे एका त्याच्या जाणिवेवाचून-दुसऱ्या कोणत्याहि उपायाने ते प्राप्त होत नाही, या कारणामुळेच परब्रह्मवस्तूला ज्ञेय असे म्हणतात॥ ८६५॥

**गूढार्थदीपिका—ज्ञानेवाचूनि कवणे। उपाया न ये-**

येथे "ज्ञान" या शब्दाने रजस्तमगुणरहित अशा सात्विकबुद्धीत 'मी ब्रह्म आहे' या जाणीवरूपाने प्रगट झालेला आत्मप्रकाश घेतला आहे. त्यालाच सूक्ष्मबुद्धि, अग्रबुद्धि, चरमबुद्धि, विद्यावृत्ति इत्यादि नावे आहेत.

या ज्ञानवृत्तीनेच परब्रह्म जाणले जाते, म्हणून परब्रह्माला ज्ञेय म्हटले आहे. परब्रह्माचा सविकल्प व निर्विकल्प असा दोन प्रकारचा जीवाला अनुभव येतो. परब्रह्माचा, सच्चिदानंद धर्माने जेव्हा अनुभव घेतला जातो, तेव्हा ते परब्रह्म सविकल्प म्हटले जाते. असा अनुभव ज्ञानवृत्तीने येतो; अर्थात् येथे सात्विक ज्ञानाने कळणारे म्हणून जे ज्ञेयपरब्रह्म म्हटले आहे, ते सच्चिदानंदधर्माने अनुभवास येणारे सविकल्प परब्रह्म होय. त्याला जाणणे हीच त्याची प्राप्ति होय. ही ऐक्याची जाणीव किंवा ज्ञानाची जाणीव व त्या जाणिवेने जाणणारा, असे दोन्ही जेथे उरत नाहीत ते परब्रह्म निर्विकल्प म्हटले जाते.

**आणि जाणितलेया वरौतें। कांहीं करणें नाहीं जेथें। जाणणेंचि तन्मयातें। आणी जयाचें॥ ८६६॥**

**अर्थ**—आणि ज्याचे केवळ जाणणेच जीवाला तद्रूप करून सोडते, म्हणून जाणल्यानंतर जेथे दुसरे काहीच करायचे नसते॥ ८६६॥

**गूढार्थदीपिका—जाणतलेयावरौते। काही करणे नाही जेथे-**

उत्पन्न होऊन अस्तित्वात येणाऱ्या पदार्थाच्या प्राप्तिकरिता क्रिया उपयोगी असते; पण परब्रह्म उत्पत्तिरहित स्वत:सिद्ध असल्यामुळे त्याच्या प्राप्तीकरिता क्रिया इत्यादि उपाय उपयोगाचे नसतात. त्याला जाणणे हाच एक त्याच्या प्राप्तीचा उपाय होऊ शकतो आणि केवळ जाणण्यानेच जीव त्याच्याशी तद्रूप होऊ शकतो-म्हणजे परब्रह्माचे म्हणून सांगितलेल्या सच्चिदानंदधर्माचा, जीव आपल्याच ठिकाणी अनुभव घेतो. हीच त्याची तन्मयता किंवा तद्रूपता होय.

**जें जाणितलेयाचिसाठीं। संसार काढूनियां कांठी। जिरोनि जाइजे पोटीं। नित्यानंदाच्या॥ ८६७॥**

**अर्थ**—हे परब्रह्म जाणले असता व संसाराला त्याच्या नि:शेष बाहेर काढले असता जीवाने नित्यानंदाच्या पोटात जिरून जावे॥ ८६७॥

**गूढार्थदीपिका—संसार काढूनिया कांठी—**

ज्याप्रमाणे नदीत बुडी मारणारा सर्व अंगावरील कपडे काठावर काढून ठेवतो व त्यापासून अलग होतो, त्याप्रमाणे व्यतिरेकाने स्थूल, सूक्ष्म, कारण या तिन्ही देहाहून माझे मूळचे परब्रह्मस्वरूप निराळे आहे असे जाणून व संपूर्ण संसाराहून अलग होऊन त्याला (संसाराला) विसरला असता जीव नित्यानंदरूप आपल्या मूळच्या स्वरूपाशी ऐक्यरूप समाधि साधतो व आनंदरूप होतो.

**तें ज्ञेय गा ऐसें। आदि जया नसे। परब्रह्म आपैसें। नांव जया॥ ८६८॥**

**अर्थ**—अर्जुना! ते ज्ञेय परब्रह्म उत्पत्तिरहित आहे. त्याला परब्रह्म हे नाव सहज प्राप्त झालेले आहे-म्हणजे त्याचे नाव सर्वनिरपेक्ष आहे॥ ८६८॥

**गूढार्थदीपिका**—जीवाचे मूळचे स्वरूप निर्विकल्प आहे. अशा निर्विकल्प स्वरूपाचे, शब्दादिकांचे द्वारा ज्ञान होणेच शक्य नसल्यामुळे व ज्ञान झाल्याखेरीज जीव अज्ञानादि उपाधीतून मुक्त होणे शक्य नसल्यामुळे जीवाला, स्वरूपाचे ज्ञान व्हावे म्हणून श्रुतीने स्वरूपाचे ठिकाणी शब्द प्रवृत्ति केली आहे. ती शब्दप्रवृत्ति साक्षात् वाचकरूपाने होत नसून स्वरूपाच्या विरुद्धधर्माची व्यावृत्ति करणारी, अशी विशेषरूपाने होत असली, तरी काही शब्दाची प्रवृत्ति विशेषणरूप असून लक्षणरूपहि असते. ''समानजातीयेभ्य एव निवर्तकानि विशेषणानि विशेषस्य। लक्षणं तु सर्वत एव यथावकाशप्रदात्राकाशमिति'' (तै० उ० २-१ शां० भा०) ''विशेषण हे वस्तूच्या सजातीय पदार्था पासून वस्तूला निराळे करणारे असते आणि लक्षण हे सर्व पदार्थापासून वस्तूला निराळे करणारे असते. जसे आकाश अवकाशाला देणारे आहे'' असे आचार्यांनी विशेषण व लक्षण यात भेद दाखविला आहे. म्हणून विशेषणार्थक शब्द, हे विरुद्धधर्माची व्यावृत्ति करतात व लक्षणार्थक शब्द हे विरुद्धधर्माची व्यावृत्ति करून वस्तूच्या स्वरूपधर्माचाहि बोध करून देतात. 'परब्रह्म' हा शब्द असाच लक्षणार्थक असल्यामुळे सविकल्पदशेत तो स्वरूपाचा सहज वाचकासारखा झाला आहे, असे माउलीचे येथे म्हणणे आहे.

लक्षणार्थक शब्दाच्या साहाय्याने परब्रह्म ज्ञेय करून जाणतांना वृत्ति अर्थाकार झाली की लक्षणार्थक शब्दहि मागे राहतो.

**जें नाही म्हणो जाइजे। तंव विश्वाकारें देखिजे। आणि विश्वचि ऐसें म्हणिजे। तरि हे माया॥ ८६९॥**

**अर्थ**—बुद्धिवृत्ति शुद्ध होईपर्यंत हे ज्ञेय परब्रह्म जाणले जात नाही, तरी तेच नामरूपात्मक जगद्रूपाने प्रत्ययाला येत असते. आणि प्रत्ययाला येणारे जड-विनाशी व पृथक्-पृथक् वस्तुरूप असे जगत् म्हणजेच परब्रह्म असे म्हणावे. तर तसेहि नाही. तसा जगाचा प्रत्यय ही माया होय॥ ८६९॥

**गूढार्थदीपिका**—

**दंतिनि दारुविकारे दारु तिरोभवति सोऽपि तत्रैव। जगति तथा परमात्मा परात्मन्यपि जगत्तिरोधते॥ ९४॥**

(शंकराचार्यकृत-स्वात्मनिरूपण)

ज्याप्रमाणे लाकडाचे ठिकाणी हत्ती वगैरेचे नामरूप प्रगट करून त्या नामरूपाकडेच लक्षण देणाऱ्याला तेथेच असलेले लाकूड दिसेनासे होऊन हत्ती अशी लाकडाहून निराळी वस्तुच प्रत्ययाला येते, त्याप्रमाणे परब्रह्मसत्तेवर प्रगट झालेल्या नामरूपाकडेच लक्ष देणाऱ्या जीवाला, आधारभूत परब्रह्माची सत्ता दिसेनाशी होऊन तिचा पूर्ण विसर पडतो व परब्रह्माहून निराळे नामरूपात्मक जड-विनाशी व पृथक्-पृथक् वस्तुरूप असे जगत् प्रत्ययाला आले आहे; म्हणून असा विश्वाकार प्रत्यय ही माया किंवा भ्रम होय. परब्रह्म न विसरता विश्वाकाराचा परब्रह्माप्रमाणे सच्चिदानंदात्मक प्रत्यय आला असता तर तो प्रत्यय मायिक किंवा भ्रमजन्य, खोटा असा म्हणता आला नसता; म्हणून येथे जड-विनाशी व पृथक् पृथक् वस्तुरूपाने प्रत्ययाला येणाऱ्या विश्वालाच खोटे किंवा मायिक म्हटले आहे.

**रूप वर्ण व्यक्ती। नाहीं दृश्य द्रष्टा स्थिती। तरि कोणें कैसे आथी। म्हणावें पां॥ ८७०॥**

**अर्थ**—या परब्रह्माचे ठिकाणी रूप, वर्ण, व्यक्ति, मर्यादा किंवा दृश्य, दृष्टा ही स्थिति नाही. त्या परब्रह्माला कशाप्रकारचे आहे म्हणून कोणाला म्हणता येईल?॥ ८७०॥

**गूढार्थदीपिका**—वस्तूहून निराळ्या असलेल्या रूप, वर्ण, व्यक्ति, दृश्य, दृष्टा इत्यादिकांच्या द्वारा वस्तु अशा प्रकारची आहे, असे त्या वस्तूचे वर्णन करता येते; पण परब्रह्माहून निराळे काहीच नसल्यामुळे किंवा आहे ते सर्व शुद्ध परब्रह्मच असल्यामुळे परब्रह्म अशा प्रकारचे आहे असे कोणाच्या द्वारा व कोणाला वर्णन करता येईल?

**सारांश परब्रह्म निर्विकल्प आहे.**

**आणि साचचि जरी नाहीं। तरि महदादिक कोणें ठायीं। स्फुरत कैचें काईं। तेणेंवीण असे॥ ८७१॥**

**अर्थ**—आणि ज्ञेय परब्रह्मवस्तू खरोखरच नाही, असे म्हणावे तर त्या सत्यवस्तु वाचून ही भ्रमजन्य संपूर्ण महदादि सूक्ष्म व स्थूळ सृष्टि कोणत्या आधारावर व कशी भासते?॥ ८७१॥

**गूढार्थदीपिका**—सत्यवस्तूच्या आधारावाचून भ्रम होऊ शकत नाही किंवा भ्रमजन्य वस्तूला सत्य वस्तूचा आधार असावा लागतो. सत् परब्रह्मवस्तु मूळात नसती व तिचा आधार नसता तर महदादि प्रपंचाचा भ्रम होणेच शक्य नव्हते.

**म्हणोनि आथी नाथी हे बोली। जें देखोनि मुकी जाहली। विचारासीं मोडली। वाट जेथें॥ ८७२॥**

**अर्थ**—म्हणून परब्रह्माचे ठिकाणी "आहे नाही" हे शब्दच परब्रह्माला पाहून मुके झाले—म्हणजे ते प्रवृत्त होत नाहीत. तेथे विचाराची देखील वाट खुंटली॥ ८७२॥

**गूढार्थदीपिका—म्हणोनि आथी नाथी हे बोली। जे देखोनि मुकी जाहली—**

एका ठिकाणी व एका काळी राहून दुसऱ्या ठिकाणाहून दुसऱ्या काळी राहत नसणाऱ्या, तसेच उत्पन्न होऊन अस्तित्वात येणाऱ्या व ते अस्तित्व नाहीसे होणाऱ्या पदार्थांना 'आहे-नाही' म्हणता येते; पण आत्मस्वरूप अणुरेणूतून देखील सदासर्वदा व्यापक असल्यामुळे व तसेच ते उत्पत्तिनाशरहित अनादि स्वतःसिद्ध असल्यामुळे, तेथे 'आहे-नाही' हे शब्द लावता येत नाहीत.

परब्रह्माला 'आहे' म्हणता येत नाही व 'नाही' म्हणता येत नाही असे येथे जे म्हटले आहे, त्याचा परब्रह्म सदसत् विलक्षण अनिर्वचनीय-म्हणजे काल्पनिक किंवा खोटे आहे, असा अर्थ, ते अस्तित्वात असल्यामुळे करतां येत नाही. त्याचे हे अस्तित्व "आपणा भागु तैसे। असणेचि जे असे। असे नाही हे ओसे। पाडूनिया" (अमृ० प्र० ४-४०) या अमृतानुभवातील ओवीत सांगितल्याप्रमाणे 'आहे-नाही' यावाचून आहे.

**विचाराची मोडली। वाट जेथे-**

परब्रह्म, विचाराला जाणणारे म्हणून विचाराच्या पलीकडे, विचारावाचून केवल अद्वैतरूप आहे व त्याचे ठिकाणी विचाराची प्रवृत्तिहि होत नाही, असे येथे "विचाराची मोडली वाट" या पदाने सांगितले वाहे.

**जैसी भांडघटशरावीं। तदाकारें असे पृथ्वी। तैसें सर्व होऊनियां सर्वीं। असे जे वस्तु॥ ८७३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भांडे, घट, वेळणी इत्यादि मातीच्या पदार्थात मातीच तदाकार होऊन असते, दुसरे काही नसते, त्याप्रमाणे जी परब्रह्म वस्तु सर्व होऊनच सर्वात भरून आहे॥ ८७३॥

**गूढार्थदीपिका**—जगद्वस्तु परब्रह्माहून निराळी अशी खरी वाटते तोपर्यंत त्याला आधारभूत असलेले परब्रह्म झाकले जाते; म्हणून परब्रह्म जाणण्याकरिता प्रथम व्यतिरेक सांगितला जातो-म्हणजे जगताला परब्रह्माहून निराळे पाहायला सांगितले जाते. जगताचा व्यतिरेक करून परब्रह्माला पाहिले असता जगताचे भिन्न वस्तुत्वच नाहीसे होऊन सर्व नामरूपाने व सर्व नामरूपात एक परब्रह्मवस्तूच नंतर अनुभवाला येते, असे या ओवीत सांगितले आहे.

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम्। सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति॥ १३॥**

**अर्थ**—हे परब्रह्म, सर्वत्र हात, पाय, डोळे, शिरे, मुखे, श्रवण इत्यादि असलेले व विश्वामध्ये जेवढे कांही आहे ते सर्व व्यापून राहते॥ १३॥

**आघवांचि देशीं काळीं। नव्हतां देशकाळांवेगळी। जे क्रिया स्थूळास्थूळीं। तेचि हात जयाचे॥ ८७४॥**
**तयातें याकारणें। विश्वबाहु ऐसें म्हणणें। जें सर्वचि सर्वपणें। सर्वदा करी॥ ८७५॥**

**अर्थ**—स्थूळ व सूक्ष्म पदार्थरूप संपूर्ण देशाचे ठिकाणी व संपूर्ण काली त्या त्या देशकालाहून वेगळे न होता जी क्रिया होते, तेच ज्याचे हात आहेत॥ ८७४॥ सर्व पदार्थाचे ठिकाणी सर्वदा व सर्व होणाऱ्या क्रिया आत्मसत्तेनेच होत असल्यामुळे त्याला संपूर्ण जिकडे तिकडे हात आहेत असे म्हटले जाते॥ ८७५॥

**गूढार्थदीपिका**—सत्तामात्र निर्गुण स्वरूपाचे ठिकाणी भासणाऱ्या ब्रह्मांडांत जेवढ्या काही पदार्थमात्राच्या सर्व काळी क्रिया होतात, त्या सर्व विश्वाच्या अंतर्यामि असणाऱ्या परमेश्वराचे सत्तेनेच होतात; असे दाखवून माउलीनी नामरूपरहित बुद्धिगम्य अशा सत्तामात्र निर्गुणस्वरूपाचे ठिकाणी जीवाच्या बुद्धीचा प्रवेश करून दिला आहे.

**आणि समस्तांही ठायां। एके काळीं धनंजया। आलें असे म्हणोनि जया। विश्वांघ्रि नाम॥ ८७६॥**

**अर्थ**—आणि अर्जुना! आत्मस्वरूप संपूर्ण ठिकाणी एकाच वेळी व्यापून असल्यामुळे त्याला ''विश्वांघ्रि'' म्हणजे जिकडे तिकडे सर्वत्र पाय आहेत, असे नाव प्राप्त झाले आहे॥ ८७६॥

**गूढार्थदीपिका**—एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्याचे काम पाय करीत असतात व आत्मा व्यापक आहे म्हणजे एकाच काळी सर्वत्र गेल्यासारखा आहे; म्हणून त्याच्या या व्यापक धर्माचे ठिकाणी पायाची कल्पना केली आहे.

**पैं सवितया आंग डोळे। नाहींत वेगळवेगळे। तैसें सर्वद्रष्टें सकळें। स्वरूपें जें॥ ८७७॥**
**म्हणोनि विश्वतश्चक्षु। हा अचक्षुच्या ठायीं पक्षु। बोलावया दक्षु। जाहला वेदु॥ ८७८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे प्रकाशरूप सूर्याचे अंग व डोळे वेगळे वेगळे नाहीत, त्याप्रमाणे जे आत्मस्वरूप सर्वरूपाने सर्वदृष्ट आहे॥ ८७७॥ म्हणूनच जाणत्या वेदाने चक्षुरिंद्रियरहित अशा आत्मस्वरूपाला जिकडे तिकडे चक्षुरिंद्रिये आहेत, असे म्हटले आहे॥ ८७८॥

**गूढार्थदीपिका**—यच्चयावत् जीवाच्या जाणणाऱ्या वृत्तीचे ठिकाणी चैतन्यरूप आत्माच अधिष्ठानभूत असल्यामुळे यच्चयावत् प्राणि जे जे जाणतात ते ते सर्वच अंतर्यामि परमात्मा अनायासे जाणतो.

**जें सर्वांचिया शिरावरी। जे नित्य नांदे सर्वांपरी। ऐसिये स्थितीवरी। विश्वमूर्धा म्हणिपे॥ ८७९॥**

**अर्थ**—जी आत्मवस्तु सर्व प्रकारे सर्वांच्याशिरावर-म्हणजे सर्वांच्या पलीकडे-अखंड आहे. अशी स्थिति असल्यामुळे तिला विश्वमूर्धा असे वेद म्हणतो॥ ८७९॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे मनुष्याचे शिर सर्व अवयवांचे वर आहे, त्याप्रमाणे आत्मवस्तुहि सर्व कार्यकारणरूप पदार्थांचे वर आहे व अशीच ती सदासर्वदा राहते; म्हणूनच त्यांच्या, सर्व धर्मांचे वर असणे, या धर्माच्या ठिकाणी शिराची कल्पना करून त्याला (आत्मस्वरूपाला) विश्वमूर्धा—म्हणजे ज्याला जिकडे तिकडे शिरे आहेत असे म्हटले आहे.

**पैं गा मूर्ति तेंचि मुख। हुताशनीं जैसें देख। तैसें सर्वपणें अशेख। भोक्तें जें॥ ८८०॥**
**यालागीं तया पार्था। विश्वतोमुख हे व्यवस्था। आली वाक्पथा। श्रुतीचिया॥ ८८१॥**

**अर्थ**—तसेच अर्जुना! ज्याप्रमाणे जेवढी अग्नीची मूर्ति तेवढेहि त्याचे मुखच असते-म्हणजे त्याच्या कोणत्याहि भागावर टाकलेली आहुति अग्नीतच पडते, त्याप्रमाणे आत्मस्वरूप सर्व आपणच झाले असल्यामुळे सर्व भोगणारेहि तेच आहे॥ ८८०॥ म्हणूनच अर्जुना! त्याला जिकडे तिकडे मुख आहेत असे श्रुतीला म्हणावे लागले॥ ८८१॥

**गूढार्थदीपिका**—जीव भ्रांतीनेच आपल्याला निराळा व भोक्ता समजतो. वस्तुत: एक परमात्माच अद्वैतस्वरूप सर्व त्यालाच समर्पण होते; म्हणून तोच एक भोक्ता आहे, असे श्रुतीने सांगितले आहे.

**आणि वस्तुमात्रीं गगन। जैसें असे संलग्न। तैसे शब्दजातीं कान। सर्वत्र जया॥ ८८२॥**
**म्हणोनि आम्ही तयातें। म्हणों सर्वत्र आइकतें। एवं जें सर्वांतें। आवरूनि असे॥ ८८३॥**
**एऱ्हवीं तरी महामती। विश्वतश्चक्षु इया श्रुती। तयाचिये व्याप्ती। रूप केलें॥ ८८४॥**

**वांचूनि हस्त नेत्र पाये। हे भाष तेथ कें आहे। सर्व शून्याचा साहे। निष्कर्षु जें॥ ८८५॥**

**अर्थ**—आणि ज्यप्रमाणे आकाश, यच्चयावत वस्तूशी संलग्न आहे, त्याप्रमाणे जे सर्वत्र ओतप्रोत भरले असल्यामुळे संपूर्ण शब्दजात हेच ज्याचे सर्वत्र कान आहेत॥ ८८२॥ म्हणून 'सर्वत्र ऐकणारे' असे आम्ही त्याला म्हणतो. याप्रमाणे जे सर्व पदार्थमात्राला व्यापून आहे॥ ८८३॥ हे थोर बुद्धिमान अर्जुना! नाहीतरी ''विश्वतश्चक्षु'' म्हणजे ज्याला सर्वत्र डोळे आहेत, या श्रुतीने परब्रह्माचे जे वर्णन केले आहे, ते त्याची व्याप्ति दाखविण्याकरिता- म्हणजे ते अद्वैतरूप असल्यामुळे तेच सर्वत्र व्यापक आहे, त्यावाचून दुसरी वस्तुच नाही, हे सांगण्याकरिता-केले आहे॥ ८८४॥ नाहीतर जे परब्रह्म केवळ सर्व शून्याचा-म्हणजे सर्व सत्तेची-कसोटीच सहन करते. अशा परब्रह्माचे ठिकाणी हात, पाय, डोळे इत्यादि शरीराच्या अवयवाची भाषा कोठून असणार?॥ ८८५॥

**गूढार्थदीपिका—सर्व शून्याचा साहे। निष्कर्ष जे-**

''सर्व शून्याचा निष्कर्ष'' या चरणाचा अर्थ करताना माझी सद्‌गुरु आई म्हणते ''सर्व शून्य म्हणजे सर्व सत्ता। अभाव नोहे सर्वथा। हे गणितशास्त्र पाहता। येईल कळोनि॥ ६८॥ शून्य दाखवावे जरी झाले। तरी करणे लागे बिंदुले। अभाव दाखवावया वहिले। काहीच न लगे॥ ६९॥ शून्य अंकाच्या माथा चढे। तेव्हा दशगुण मूळ वाढे। अंकाभाव अंक माथा चढे। तरी मूळ वाढे हे दिसेना॥ ७०॥'' (भगवद्भक्ति सौरभ-पराग १-श्रीगुलाबराव महाराजकृत) येथे 'शून्य' हा शब्द अभाव किंवा काहीच नसणे, या अर्थाने योजिला नसून शून्य म्हणजे 'सत्ता या अर्थी योजिला आहे. सर्व शून्य म्हणजे सर्वसत्तारूप परब्रह्म, असा अर्थ होतो. ''शून्य'' शब्दाचा सत्ता हा अर्थ आहे, हे गणितशास्त्राचा विचार केला असता कळून येते.

गणितशास्त्रात शून्य दाखविण्याकरिता बिंदू उपयोगात असतात. ''शून्य'' शब्दाचा ''अभाव'' किंवा ''काहीच नाही'' असा अर्थ घेतला तर काहीच नाही हे दाखविण्याकरिता बिंदू देखील करायला नको.

तसेच 'शून्य' म्हणजे 'अभाव' असा अर्थ घेतल्यास ज्याप्रमाणे एका आकड्यांवर दुसऱ्या आकड्याचा अभाव असताना त्याचे मूल्य वाढलेले दिसून येत नाही, त्याप्रमाणेच आकड्यावर अभावरूप शून्य दिले असतानाहि त्या आकड्याचे मोल वाढू नये; पण उलट ज्याप्रमाणे एका आकड्यावर दुसरा आकडा ठेवला असता त्याचे मोल वाढताना दिसून येते, त्याप्रमाणे कोणत्याहि आकड्यावर शून्य दिले असता त्याची दसपट किंमत वाढते, हे आपण पाहतो. म्हणून ''शून्य'' हा शब्द अभाव वाचक नसून भावरूप सत्तावाचक आहे असे म्हणावे लागते.

अमृतानुभव प्र० ४ ओ० २४-३१ या ओव्यातून माऊलीने ''शून्य'' शब्दाचा ''सत्ता'' हा अर्थ आहे, हेच सिद्ध केले याप्रमाणे ''शून्य'' शब्दाचा ''सत्ता'' हा अर्थ असून ''सर्व शून्याचा साहे। निष्कर्ष जे'' म्हणजे परब्रह्म केवळ सत्तारूप किंवा सन्मात्र आहे. असा या चरणाचा अर्थ होतो.

**वाचूनि हस्त नेत्र पाये। हे भाष तेथ के आहे-**

चार चरणपंक्तीत माऊलीनी सन्मात्र आत्मस्वरूपाचे ठिकाणी हात, पाय, डोळे इत्यादि भौतिक अवयव असणे शक्य नाही, हे दाखविले आहे.

**पैं कल्लोळातें कल्लोळें। ग्रसिजत असे ऐसें कळे। परि ग्रसितें ग्रासावेगळें। असे काई॥ ८८६॥**

**अर्थ**—समुद्रावर अनेक लाटा उसळल्या असता एका लाटेने दुसऱ्या लाटेला नाहीसे केले असे दिसते, पण तेथे नाहीशी करणारी लाट व नाहीशी होणारी लाट, पाणी या स्वरूपाने पाहता परस्पराहून वेगळ्या असतात काय?॥ ८८६॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे ''पाणी'' या वस्तुरूपाने पाहता सर्व लाटा पाणीरूपच असतात, त्याप्रमाणे अमर्याद, व्यापक अशा आत्मस्वरूपाचे ठिकाणी त्याच्याहून भिन्न वस्तु व तिचे उत्पत्ति-नाश मुळीच संभवत नाहीत; म्हणून अशा आत्मवस्तूचे ठिकाणी जेवढे काही भासेल ती सर्व वस्तूची लीलाच होय.

आत्मा सच्चिदानंदस्वरूप असल्यामुळे जेव्हा त्याची लीला एक अद्वैत सच्चिदानंदस्वरूपानेच अनुभवाला येते

तेव्हा ती स्वरूपलीला होते व याच्या उलट, ती लीला जड-विनाशी अशा अनेक भिन्न भिन्न वस्तुरूपाने अनुभवास येते, तेव्हा ती अविद्या भ्रांतिजन्य लीला समजली जाते.

या स्वरूपलीलेचा अनुभव ज्ञानीभक्त घेतात व अज्ञानी लोक अज्ञानामुळे भ्रांतिजन्य लीलेचा अनुभव घेतात.

**तैसें साचचि जें एक। तेथ कें व्याप्यव्यापक। परि बोलावया नावेक। करावें लागे॥ ८८७॥**
**पैं शून्य जैं दावावें जाहलें। तैं बिंदुलें एक पाहिजे केलें। तैसें अद्वैत सांगावें बोलें। तै द्वैत कीजे॥ ८८८॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे खरोखरच जी परब्रह्मवस्तु अस्फुट अद्वैतस्वरूप आहे, तेथे व्यापणारा व व्यापिला जाणारा असे दोन पदार्थ कोठून राहणार? पण अद्वैत परब्रह्माविषयी क्षणभर बोलण्यापुरते द्वैत स्वीकारावे लागते॥ ८८७॥ दुसऱ्याला शून्य दाखवावयाचे असले म्हणजे एक बिंदू करून दाखवितात, त्याप्रमाणे अद्वैतवस्तु शब्दाने सांगावयाची असली म्हणजे द्वैत करून-म्हणजे तिला आपल्या शब्दाचा विषय करूनच-सांगावी लागते॥ ८८८॥

**एऱ्हवीं तरी पार्था। गुरुशिष्यसत्पथा। आडळु पडे सर्वथा। बोल खुंटे॥ ८८९॥**
**म्हणोनि गा श्रुती। द्वैतभावें अद्वैतीं। निरूपणाची वाहती। वाट केली॥ ८९०॥**

**अर्थ**—खरोखर पाहता, अर्जुना! सच्चिन्मात्र परब्रह्माचे ठिकाणी शब्दप्रवृत्ति होत नाही आणि गुरुशिष्यपरंपरेलाहि आडखीळ पडते॥ ८८९॥ म्हणूनच श्रुतीने अज्ञानी लोकांना परब्रह्माचे सत्यत्व व जगताचे मिथ्यात्व समजावून देण्याकरिता अद्वैत परब्रह्माचे द्वैतभावाने निरूपण करण्याची वाट वाहती केली-म्हणजे रूढ केली॥ ८९०॥

**गूढार्थदीपिका**—सच्चिन्मात्र आत्मस्वरूपाचे ठिकाणी, सांगणारी व सांगितली जाणारी वस्तु एकरूप होऊन जात असल्यामुळे तिथे बोलण्याला मौन पडते व गुरुशिष्य मार्गालाहि अवकाश नसतो. पण अज्ञान्याची द्वैतभावना नाहीशी करून आत्म्याची अद्वैतस्थिति त्याला पटवून देण्याकरिता अद्वैतस्वरूपाचे शब्दाने वर्णन करणे अवश्य असते. ते शब्दाने वर्णन होत असतांना सच्चिन्मात्रस्वरूपाचे ठिकाणी शब्दमात्र द्वैत उत्पन्न करावे लागते.

**तेंचि आतां अवधारी। इये नेत्रगोचरें आकारीं। तें ज्ञेय गा जयापरी। व्यापक असे॥ ८९१॥**

**अर्थ**—या संपूर्ण डोळ्याने दिसणाऱ्या नामरूपात ते ज्ञेय ज्या रीतीने व्यापक आहे, तेच आता सांगतो, ऐक॥ ८९१॥

**सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम्। असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च॥ १४॥**

**अर्थ**—जे ज्ञेय, मनबुद्धिसह संपूर्ण इंद्रिये व सत्वादिगुण या रूपाने प्रत्ययाला येते; पण जे सर्व मन, इंद्रिये व गुण यापासून निराळे आहे, जे कशाशीहि लिंपित नसून सर्वांना धारण करणारे आहे व जे सत्वादिगुणरहित असून गुण भोगणारे आहे॥ १४॥

**तरी तें गा किरीटी ऐसें। अवकाशीं आकाश जैसें। पटीं पट होऊनि असे। तंतु जेवीं॥ ८९२॥**
**उदक होऊनि उदकीं। रसु जैसा अवलोकीं। दीपपणें दीपकीं। तेज जैसें॥ ८९३॥**
**कर्पूरत्वें कापुरीं। सौरभ्य असे जयापरी। शरीर होऊनि शरीरीं। कर्म जेवीं॥ ८९४॥**
**किंबहुना जैसें पांडवा। सोनेंचि सोनयाचा रवा। तैसें जें या सर्वां। सर्वांगीं असे॥ ८९५॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याप्रमाणे अवकाश किंवा पोकळी या गुणाचे ठिकाणी आकाश आहे किंवा वस्त्राचे ठिकाणी सूतच वस्त्ररूप होऊन राहिले आहे; त्याप्रमाणे ते ज्ञेय सर्वरूपाने आहे॥ ८९२॥ किंवा ज्याप्रमाणे रस हा गुण पाण्याचे ठिकाणी पाणी होऊनच राहतो, पाहा. तेज, दिव्याचे ठिकाणी दिव्याच्या रूपाने राहते॥ ८९३॥ अथवा कापराच्या ठिकाणी सुगंध हा कापराचे रूपानेच असतो, शरीराचे व्यापाररूप कर्म शरीराचे ठिकाणी शरीररूप होऊन राहते॥ ८९४॥ अर्जुना! फार काय सांगावे! ज्याप्रमाणे सोनेच सोन्याचा रवा होऊन राहते, त्याप्रमाणे जे ज्ञेय संपूर्ण पदार्थमात्राचे ठिकाणी पदार्थमात्र होऊन राहते॥ ८९५॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे दोरीवर भीतीने भासलेल्या कल्पित सर्पाचे ठिकाणी, दोरीच सर्परूपाने भासते, त्याप्रमाणे आत्मस्वरूपाहून भिन्नत्वाने कल्पिलेल्या सर्व कार्यरूप पदार्थरूपाने एक अद्वैत आत्माच भासत असतो, असे या ८९२ ते ८९५ ओव्यातून माउलींनी सांगितले आहे.

**परी असे रवेपणामाजिवडे। तंव रवा ऐसे आवडे। वांचूनि सोनें सांगडें। सोनया जेवीं॥ ८९६॥**
**पैं गा वोघचि वांकुडा। परि पाणी उजू सुहाडा। वन्हि आला लोखंडा। लोह नव्हे कीं॥ ८९७॥**
**घटाकारें वेंटाळें। तेथ नभ गमे वाटोळें। मठीं तरी चौफळें। आये दिसे॥ ८९८॥**
**परि ते अवकाश जैसे। नोहेजतीचि आकाशें। जें विकार होऊनि तैसें। विकारी नोहे॥ ८९९॥**

**अर्थ**—पण जोपर्यंत सोने रवेपणात असते तोपर्यंत रवा असे म्हटले जाते. रवेपणावाचून नुसत्या सोन्याला सोनेच म्हणतात॥ ८९६॥ हे सुहृदा अर्जुना! तसेच पाण्याचा प्रवाह वाकडा असतो, पण पाणी सरळच असते. अग्नि लोखंडात आला, तरी तो लोखंड होत नाही॥ ८९७॥ आकाश, घटाच्या आकाराने वेटाळले गेले असता ते वाटोळे दिसते, तेच मठामध्ये सापडले असता चौकोनी आकाराचे दिसते॥ ८९८॥ पण ते आकाश अवकाशरूपानेच असते, घटाकार किंवा मठाकार होत नाही. त्याप्रमाणेच जे ज्ञेयविकार रूप झाले असले तरी विकाररूपाने परिणाम पावत नाही॥ ८९९॥

**गूढार्थदीपिका**—सच्चिदानंद परब्रह्माहून जड-विनाशी इत्यादि भिन्न धर्माने व भिन्न वस्तुत्वाने भासणारे सर्व पदार्थ परब्रह्माचे ठिकाणी भ्रमाने भासत असल्यामुळे त्याचे निराकरण करून ज्ञेय परब्रह्म घेतले पाहिजे, असे येथे सांगितले आहे. यालाच व्यतिरेक म्हणतात हे मागे सांगितलेच आहे.

**मन मुख्य इंद्रियां। सत्त्वादि गुणां यया-। सारिखें ऐसे धनंजया। आवडे कीर॥ ९००॥**
**पैं गुळाची गोडी। नोहे बांधेया सांगडी। तैसीं गुण इंद्रियें फुडीं। नाहीं तेथ॥ ९०१॥**
**अगा क्षीराचिये दशे। घृत क्षीराकारें असे। परि क्षीरचि नोहे जैसें। कपिध्वजा॥ ९०२॥**
**तैसें जें इये विकारी। विकार नोहे अवधारीं। पैं आकारा नाम भोंवरी। येर सोनें तें सोनें॥ ९०३॥**
**इया उघड म्हाटिया। तें वेगळेपण धनंजया। जाण गुणइंद्रियां-। पासोनियां॥ ९०४॥**
**नामरूपसंबंधु। जातिक्रियाभेदु। हा आकारासीच प्रवादु। वस्तूसि नाहीं॥ ९०५॥**

**अर्थ**—अर्जुना! इंद्रिये, सत्वादिगुण ज्यात मन मुख्य आहे, त्यांच्या रूपाने ते ज्ञेय भ्रमाने वाटू लागते॥ ९००॥ ज्याप्रमाणे गुळाची गोडी ढेपेच्या बांध्यासारखी होत नाही, त्याप्रमाणे ज्या ज्ञेयाचे ठिकाणी गुण, इंद्रियें ही वास्तविक नाहीत॥ ९०१॥ हे अर्जुना ज्याप्रमाणे दुधाच्या अवस्थेत तूप हे दुधाकार असते, पण ते दुधच नव्हे॥ ९०२॥ त्याप्रमाणे जे ज्ञेय, या सर्व कार्यरूप पदार्थाचे ठिकाणी असून कार्यरूप होत नाही, हे लक्षात ठेव. बुगडी हे नाव आकारालाच आहे. बाकी सोने ते सोनेच असते॥ ९०३॥ अर्जुना! स्पष्ट मराठी भाषेत बोलायचे तर सत्वादि गुण व इंद्रिये यांच्यापासून ते ज्ञेय वेगळेपणानेच असते, असे जाण॥ ९०४॥ नाम, रूप, संबंध, जाति, क्रिया हे सर्व आकाराविषयी बोलले जाते, ज्ञेयवस्तुविषयी नाही॥ ९०५॥

**तें गुण नव्हे कहीं। गुणा तया संबंध नाहीं। परि तयाचांचि ठायीं। आभासती॥ ९०६॥**
**येतुलेयासाठीं। संभ्रांताच्या पोटीं। ऐसें जाय किरीटी। जे हेंचि धरीं॥ ९०७॥**
**तरि तें गां धरणें ऐसें। अभ्रातें जेवीं आकाशें। कां प्रतिवदन जैसें। आरसेनि॥ ९०८॥**
**नातरी सूर्य प्रतिमंडळ। जैसेनि धरी सलिल। कां रश्मिकरीं मृगजळ। धरिजे जेवीं॥ ९०९॥**
**तैसें गा संबंधेंवीण। यया सर्वांतें धरी निर्गुण। परी तें वाया जाण। मिथ्यादृष्टी॥ ९१०॥**

**अर्थ**—ज्ञेयपरब्रह्माचा व सत्वादिगुणाचा मुळी संबंधच होत नसल्यामुळे ते गुणरूप कधी होत नाही, पण गुण हे त्याच्याच ठिकाणी भ्रांतीने भासतात॥ ९०६॥ म्हणूनच अज्ञानाने भ्रांत झालेल्या जीवांना, ज्ञेय परब्रह्मवस्तुच या सर्वांना धारण करते, असे वाटते॥ ९०७॥ ते त्याचे धारण करणे असे आहे, ज्याप्रमाणे आकाश अभ्रांना किंवा आरसा, मुखाच्या प्रतिबिंबाला किंवा पाणी; सूर्याचे प्रतिबिंबाला किंवा सूर्य, किरणरूप हाताचे ठिकाणी मृगजळाला धारण करतो, त्याप्रमाणे, अर्जुना! ज्ञेय जे निर्गुण परब्रह्म, ते सर्व कार्यरूप प्रपंचाला, त्यांचा यत्किंचितही संबंध न होऊं देता, धारण करते; पण ते धारण करणे खोटे असल्यामुळे व्यर्थ आहे॥ ९०८-०९-१०॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञेय परब्रह्माचे ठिकाणी जीवाने जड-विनाशी अशा स्थूल जगताची भ्रांतीने कल्पना केली असल्यामुळे व ते जगत् खरोखरच अस्तित्वात नसल्यामुळे त्याचा ज्ञेय परब्रह्माशी काही एक संबंध नसतो; असे येथे वरील ९०६ ते ९१० ओव्यांतून माउलीनी सांगितले आहे.

आचार्यांचेही असेच मत आहे, त्यांची "तत्रैवं सति यदध्यासस्तत्कृतेन दोषेण गुणेन वाणुमात्रेणापि स न संबध्यते" ही ब्रह्मसूत्रावरील पंक्ति उदाहृत करून आम्ही मागे सांगितलेच आहे.

**आणि यापरी निर्गुणें। गुणातें भोगणें। रंका राज्य करणें। स्वप्नीं जैसें॥ ९११॥**
**म्हणोनि गुणाचा संगु। अथवा गुणभोगु। हा निर्गुणीं लागु। बोलों नये॥ ९१२॥**

**अर्थ**—आणि ज्याप्रमाणे जागृतीत भिकारी असून स्वप्नात राज्य भोगावे त्याप्रमाणे ज्ञेय असे निर्गुण परब्रह्म सत्वादि गुणाचा भोग घेत असते॥ ९११॥ म्हणून निर्गुणस्वरूपाचे ठिकाणी गुणाचा संग किंवा गुणाचा भोग होतो, असा संबंध लावून निर्गुणस्वरूपाविषयी बोलता येत नाही॥ ९१२॥

**गूढार्थदीपिका**—निर्गुण-म्हणजे सत्व, रज, तम या तीन गुणाविरहित असलेला, असा आचार्यांनी गीताभाष्यात 'निर्गुण' या शब्दाचा अर्थ केला आहे.

जीव हा खरोखर त्रिगुणरहितच आहे; पण तो व्यर्थच मी त्रिगुणाने बद्ध आहे, अशी खोटीच कल्पना करतो व त्या गुणाचा भोग घेतो, असा भाव.

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च। सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत्॥ १५॥**

**अर्थ**—जे ज्ञेय, प्राणिमात्रांच्या आत-बाहेर व्यापलेले असून जे चराचररूपहि झाले आहे. जे दूर असून जवळहि आहे, पण अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे ते अज्ञान्याला कळत नाही॥ १५॥

**जें चराचर भूतां-। माजीं असे पांडुसुता। नाना वन्हीं उष्णता। अभेंदें जैसी॥ ९१३॥**
**तैसेंनि अविनाश भावें। जें सूक्ष्मदशे आघवें। व्यापूनि असे तें जाणावें। ज्ञेय एथ॥ ९१४॥**

**अर्थ**—हे अर्जुना! ज्याप्रमाणे अनेक प्रकारच्या अग्नीची उष्णता, त्या अग्नीशी एकरूप होऊन राहते, त्याप्रमाणे सर्व सजीव-निर्जीव प्राण्यांमध्ये जे अविनाशभावाने-म्हणजे कधीहि नाश पावत नाही अशा भावाने स्थित आहे. जे सूक्ष्मरूपाने सर्व पदार्थांना व्यापून आहे, ते येथे सांगितलेले ज्ञेय होय, असे जाण॥ ९१३-९१४॥

**गूढार्थदीपिका**—पूर्वसिद्ध अविनाशी भावाचा आश्रय करूनच विनाशी भावाची कल्पना होत असते. येथे माउलीनी विनाशी प्रपंचाला जो अविनाशभाव आधार आहे, ते ज्ञेय होय, अशी ज्ञेयरूप आत्म्याची अविनाशभावाने ओळख करून दिली आहे.

**जें एक आंतु बाहेरी। जें एक जवळ दुरी। जें एकवांचूनि परी। दुजी नाहीं॥ ९१५॥**

**अर्थ**—जे एक सर्वांच्या आंत-बाहेर असून आत्मविचार करणाऱ्यांना जवळ व आत्मविचार न करणाऱ्यांना दूर आहे. ज्या एकावाचून दुसरी वस्तुच नाही किंवा जे केव्हाहि काही एक बदल न होता अखंड एकसारखेच राहणारे आहे॥ ९१५॥

**गूढार्थदीपिका**—या ओवीत ज्ञेय आत्म्याची सर्वत्र व्याप्ति दाखवून व ते अद्वैत आहे असे सुचवून अद्वैतलक्षणाने त्याची ओळख करून दिली आहे.

**क्षीरसागरींची गोडी। माजी बहु थडिये थोडी। हें नाहीं तया परवडी। पूर्ण जें गा॥ ९१६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे दुग्धसमुद्राच्या दुधाची गोडी काठाशी थोडी व मध्ये फार अशी नसते, त्याप्रमाणे जे अखंड सर्वत्र परिपूर्ण आहे॥ ९१६॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञेय परब्रह्म अपूर्ण कधी होतच नाही. ते कोणत्याहि दशेत अखंड पूर्णच राहते. अशा लक्षणाने त्याची या ओवीत ओळख करून दिली आहे.

"पूर्णमदः पूर्णमिदम्" या बृहदारण्यक श्रुतीवर भाष्य करतांना भगवान श्रीशंकराचार्यांनीहि हेच सांगितले आहे.

**स्वेदजप्रभृती। वेगळाल्या भूतीं। जयाचिये अनुस्यूती। खोमणें नाहीं॥ ९१७॥**

**अर्थ**—स्वेदज इत्यादि चारी वेगवेगळ्या प्राण्यांच्या ठिकाणी ज्याची व्याप्ति कमी जास्त नाही॥ ९१७॥

**गूढार्थदीपिका**—या ओवीतून ज्ञेय परब्रह्म अस्फुट आहे असे सांगून ते अवयवरहित असल्यामुळे कमी जास्त होऊ शकत नाही, असे दाखविले आहे व त्या लक्षणाने त्याची ओळख करून दिली आहे.

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम्। भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च॥ १६॥**

**अर्थ**—जे ज्ञेय अस्फुट एकरूप आहे, तेच शरीराच्या भिन्नत्वामुळे सर्व भूताचे ठिकाणी विभागल्या गेल्यासारखे असून उत्पत्तिकाली सर्व सृष्टि निर्माण करणारे, स्थितिकाळी सृष्टीचे पोषण करणारे व प्रलयकाली सर्व सृष्टीला ग्रासणारे आहे॥ १६॥

**पैं श्रोते मुख्यटिळका। घटसहस्त्रां अनेका-। माजीं बिंबोनि चंद्रिका। न भेदे जेवीं॥ ९१८॥**

**अर्थ**—हे थोर थोर श्रोत्यामध्ये श्रेष्ठ असलेल्या अर्जुना! ज्याप्रमाणे हजारो घटातील पाण्यात चद्रबिंब पडले तरी तो चंद्र निरनिराळा होत नाही॥ ९१८॥

**गूढार्थदीपिका**—या ओवीत ज्ञेय परब्रह्माचे एकवस्तुत्व दाखविले आहे. त्याचे एकवस्तुत्व कधीहि भंग पावत नाही असा भाव.

**नाना लवणकणाचिये राशी। क्षारता एकचि जैसी। कां कोडी एकीं उसीं। एकचि गोडी॥ ९१९॥**
**तैसें अनेकीं भूतजातीं। जें आहे एकी व्याप्ती। विश्वकार्या सुमती। कारण जें गा॥ ९२०॥**
**म्हणोनि हा भूताकारु। जेथौनि तेंचि तया आधारु। कल्लोळा सागरु। जियापरी॥ ९२१॥**

**अर्थ**—किंवा मिठाच्या खड्यांचा ढीग केला तरी सर्व खड्यात ज्याप्रमाणे खारटपणा सारखाच असतो किंवा उसाची एक मोळी केली तरी सर्व उसात गोडी एकसारखीच असते॥ ९१९॥ हे शुद्धबुद्धि अर्जुना! त्याप्रमाणे जे अनेक भूतमात्राचे ठिकाणी एक अद्वैतरूपानेच व्यापून असून तेच जगद्रूप कार्याचे कारणहि आहे॥ ९२०॥ म्हणून ज्याप्रमाणे समुद्रापासून उत्पन्न झालेल्या तरंगाला समुद्र आधार असतो, त्याप्रमाणे ज्या ज्ञेयापासून हा भूताकार उत्पन्न झाला, ते ज्ञेयच त्याला आधार आहे॥ ९२१॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञेय परमात्मा जगताचे कारण आहे, असे जे म्हटले आहे, त्याचे येथे स्पष्टीकरण केले आहे. परमात्मा जगताचे परिणामी कारण नाही-म्हणजे तो जगद्रूपाने परिणाम पावला नाही. तो जगत्कार्याला आधार आहे-म्हणजे जगत् हे परमात्म्यावर पाण्यावरील तरंगाप्रमाणे विवर्तकार्यरूपाने भासते. वेदान्तातहि परब्रह्माला जगाचे विवर्तोपादान कारणच ठरविले आहे.

**बाल्यादि तिन्ही वयसी। काया एकचि जैसी। तैसें आदिस्थितिग्रासीं। अखंड जें॥ ९२२॥**
**सायंप्रातर्मध्यान्ह। होतां जातां दिनमान। जैसें कां गगन। पालटेना॥ ९२३॥**

**अर्थ**—बाल्य, तारुण्य, वृद्धाप्य ह्या वयाच्या अशा बदलत्या तीन अवस्था असल्या, तरी त्या तीन्ही अवस्थेत, ज्याप्रमाणे शरीर एकच असते, त्याप्रमाणे उत्पत्ति, स्थिति, लय या तिन्ही काळी जे ज्ञेय अखंड अविकारी एकरूप असते॥ ९२२॥ दिनमान होत जात असताना प्रातः, माध्यान्ह व सायं असे तीन काळ होतात तरी ज्याप्रमाणे या तिन्ही काळी आकाश न पालटता ते तसेच राहते॥ ९२३॥

**गूढार्थदीपिका**—या ओव्यांनी ज्ञेय परब्रह्माचे अविकारित्व व अपरिणामित्व दाखविले आहे.

**अगा सृष्टीवेळे प्रियोत्तमा। जया नांव म्हणती ब्रह्मा। स्थितीं जें विष्णुनामा। पात्र जाहलें॥ ९२४॥**
**मग आकारु हा हारपे। तेव्हां रुद्र जें म्हणिपे। तेंहीं गुणत्रय जेव्हां लोपे। तैं जें शून्य॥ ९२५॥**
**नभाचें शून्यत्व गिळून। गुणत्रयातें नुरऊन। तें शून्य तें महाशून्य। श्रुतिवचनसंमत॥ ९२६॥**

**अर्थ**—हे प्रियोत्तमा अर्जुना! सृष्टि उत्पत्तिकाळी ज्याला ब्रह्मा व स्थितिकाळी ज्याला विष्णु म्हणतात, तसेच प्रलय होऊन जेव्हा सर्व आकार मायेत नाहीसा होतो, तेव्हा ज्याला रुद्र म्हणतात आणि नंतर त्रिगुणहि नाहीसे

झाल्यावर जे शून्यरूप आकाश म्हटले जाते॥ ९२४-९२५॥ अशा रीतीने आकाशाचे शून्यत्व नाहीसे करून व तिन्ही गुणाला नाहीसे करून उरलेल्या शून्याला म्हणजे सत्तेला श्रुतीने महाशून्य म्हणजे महासत्ता म्हटले आहे॥ ९२६॥

**गूढार्थदीपिका—ते शून्य ते महाशून्य। श्रुतिवचन संमत-**

ब्रह्मांडात जेवढे स्थूलसूक्ष्म पदार्थ आहेत, त्यांचे अस्तित्व ज्ञेय परब्रह्माच्या अमर्याद अखंड सत्तेवरच जीवाने कल्पिले असल्यामुळे ज्ञेय परब्रह्माच्या सत्तेला महाशून्य-म्हणजे महासत्ता-असे ''स भूमा'' या श्रुतीत म्हटले आहे.

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते। ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम्॥ १७॥**

**अर्थ**—ते ज्ञेय सर्व सूर्यादि प्रकाश देणाऱ्या पदार्थांनाही प्रकाश देणारे आहे. ते अविद्या अंधःकाराच्या पलीकडे म्हणजे अंधःकाररहित म्हटले जाते. तेच ज्ञान असून ज्ञेय तेच आहे. ज्ञानाने प्राप्त होणारे, असेहि त्याला म्हणतात आणि ते सर्वांच्या हृदयात वसत असते॥ १७॥

**जें अग्नीचें दीपन। जें चंद्राचें जीवन। सूर्याचे नयन। देखती जेणें॥ ९२७॥**
**जयाचेनि उजियेडें। तारागण उघडें। महातेज सुरवाडे। राहाटे जेणें॥ ९२८॥**
**जें आदीची आदी। वृद्धीची जे वृद्धी। बुद्धीची जें बुद्धी। जीवाचा जीव॥ ९२९॥**
**जें मनाचें मन। जें नेत्राचे नयन। कानाचे कान। वाचेची वाचा॥ ९३०॥**
**जें प्राणाचा प्राण। जें गतीचे चरण। क्रियेचें कर्तेपण। जयाचेनि॥ ९३१॥**
**आकारु जेणें आकारे। विस्तारू जेणें विस्तारे। संहारू जेणें संहारे। पांडुकुमरा॥ ९३२॥**
**जें मेदिनीची मेदिनी। जें पाणी पिऊनि असे पाणी। तेजा दिवेलावणी। जेणें तेजें॥ ९३३॥**
**जें वायूचा श्वासोच्छ्वासु। जें गगनाचा अवकाशु। हें असो आघवाचि आभासु। आभासे जेणें॥ ९३४॥**

**अर्थ**—जे ज्ञेय अग्नीला प्रकाशमान करणारे आहे, जे चंद्राचा प्राण आहे, सूर्याचे डोळे देखील ज्याच्या योगाने पाहू शकतात॥ ९२७॥ ज्याच्या प्रकाशाने संपूर्ण नक्षत्र समुदाय प्रकाशित झाला आहे, ज्याच्या तेजाने प्रलयातील महातेज देखील सुखाने वावरते॥ ९२८॥ जे सर्व कारणाचे कारण, जे वाढीची वाढी व बुद्धीतील ज्ञानप्रकाशाचाहि प्रकाश असून जे सर्वस्वी जीवाचा आधार आहे॥ ९२९॥ जे मनाचे मन, नेत्राचे नेत्र, कानाचे कान व वाचेची वाचा आहे॥ ९३०॥ जे प्राणाचाहि प्राण आहे व जे गतीचे पाय असून क्रियेचे कर्तेपण ज्याच्या योगाने आहे॥ ९३१॥ हे अर्जुना! ज्या योगाने आकार आकाराला येतो, विस्तार विस्ताराला जातो, ज्याच्या योगाने संहार देखील संहार करतो॥ ९३२॥ जी ज्ञेयवस्तु सर्व पदार्थमात्राला आधार देणाऱ्या पृथ्वीचीहि पृथ्वी आहे-म्हणजे पृथ्वीलाहि आधार आहे. जे पाणी पिऊन-म्हणजे पाण्याचे स्थूल भौतिक रूप नाहीसे करून-पाण्याच्या शक्तिरूपाने आहे आणि ज्याच्या तेजाने सर्व तेजरूप दिव्यांची लावणी होते॥ ९३३॥ जे वायूचा श्वासोच्छ्वास असून आकाशाचे अवकाश आहे. अर्जुना! हा विस्तार असो. ज्याच्या योगानेच संपूर्ण आभास भासतो॥ ९३४॥

**गूढार्थदीपिका**—वर ज्ञेय परब्रह्म सत्तास्वरूप आहे, असे सांगून तेच आता चैतन्यरूप आहे असे सांगतात.

श्रीमद्भगवतांतील दशमस्कंधातर्गत वेदस्तुतीतील ''अगजगदौकसामखिलशक्त्यवबोधक ते'' (भाग. स्कं. १०-८७). या श्लोकात वेदांनी भगवंताची स्तुति करतांना चराचर भूतांचे ठिकाणी असलेल्या नाना प्रकारच्या दिसून येणाऱ्या सर्व शक्तीचा उद्‌बोधक तूच आहेस असे. जे म्हटले आहे, तेच येथे भगवंतांनी वरील श्लोकातून व माउलीनी त्यावरील ओव्यातून सांगितले आहे.

गिरणीतील सर्व चाकांना काम करण्याची शक्ति आणणारे एक तेथे मुख्य चाक असते. त्या मुख्य चाकाची शक्तिच ज्याप्रमाणे गिरणीतील इतर सर्व चाकांना अंशाने प्राप्त होत असते; त्याप्रमाणे सर्व चराचराचे ठिकाणी जो चैतन्यशक्तीचा आविर्भाव दिसून येतो, त्यांना प्रगट करणारा, अनंत ब्रह्मांडाला आधार असणाऱ्या एका परमात्म्यावाचून दुसरा कोण असणार?

**किंबहुना पांडवा। जें आघवेंचि असे आघवा। जेथ नाहीं रिगावा। द्वैतभावासी॥ ९३५॥**

**जें देखिलियाचिसवें। दृश्य द्रष्टा हें आघवें। एकवाट कालवे। सामरस्यें॥ ९३६॥**
**मग तेंचि होय ज्ञान। ज्ञाता ज्ञेय हन। ज्ञानें गमिजे स्थान। तेंहि तेंचि॥ ९३७॥**
**जैसें सरलियां लेख। आंख होती एक। तैसें साध्यसाधनादिक। ऐक्यासि ये॥ ९३८॥**
**अर्जुना जिये ठायीं। न सरे द्वैताची वही। हें असो जें हृदयीं। सर्वांचां असे॥ ९३९॥**

**अर्थ**—अर्जुना! फार काय सांगू! संपूर्ण पदार्थामध्ये जे एकच संपूर्णपणे आहे. जेथे त्यावाचून दुसऱ्या भावाचा प्रवेशच नाही॥ ९३५॥ ज्याचे दर्शन झाल्याबरोबर पाहणारा व पाहिले जाणारे संपूर्ण द्वैत एकवस्तूरूप अस्फुट अद्वैतांत समरस मिळून जाते॥ ९३६॥ मग ज्ञान, ज्ञाता, ज्ञेय व ज्ञानाने प्राप्त होणारे स्थान इत्यादि सर्वरूपाने तेच एक आहे, असा अनुभव येतो॥ ९३७॥ ज्याप्रमाणे लिहिलेले भिन्न आकडे पुसून टाकले असता, त्यांचा भिन्नपणा नाहीसा होऊन त्या सर्वांचे ऐक्य होते, त्याप्रमाणे ज्याच्या दर्शनाने साध्य-साधनादिकांचे ऐक्य अनुभवाला येते॥ ९३८॥ अर्जुना! ज्या ज्ञेयस्वरूपाचे ठिकाणी द्वैतभाव वाहणे मुळीच खपत नाही. हे असो, जे सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात आहे॥ ९३९॥

**गूढार्थदीपिका**—ही अखंड अविकारी परब्रह्मअवस्था जीवाचे मूळस्वरूप असल्यामुळे देहादिकांचा अहंभाव सोडून तिचा हृदयाचे ठिकाणी अनुभव घेता येतो.

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः। मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते॥ १८॥**

**अर्थ**—याप्रमाणे क्षेत्र, ज्ञान व ज्ञेय यांचे संक्षेपतः वर्णन केले. माझा भक्त हे सर्व जाणून माझ्याशी ऐक्य पावतो॥ १८॥

**एवं हे तुजपुढां। आदी क्षेत्र सुहाडा। दाविलें फाडोवाडां। विवंचुनी॥ ९४०॥**
**तैसेंचि क्षेत्रापाठीं। जैसेनि देखसी दिठी। तैसें ज्ञानही किरीटी। सांगितलें॥ ९४१॥**
**अज्ञानाही कौतुकें। रूप केलें निकें। जंव आयणी तुझी टेंके। पुरें म्हणे॥ ९४२॥**
**आणि आतां हें रोकडें। उपपत्तीचेनि पवाडें। निरूपिलें उघडें। ज्ञेय पैं गा॥ ९४३॥**
**हे आघवीचि विवंचना। बुद्धी भरोनि अर्जुना। मत्सिद्धिभावना। माझिया येती॥ ९४४॥**
**देहादि परिग्रहीं। संन्यासु करूनियां जिहीं। जीवु माझ्या ठाईं। वृत्तिकु केला॥ ९४५॥**

**अर्थ**—याप्रमाणे, सुहृदा अर्जुना! तुझ्यासमोर प्रथम आम्ही विचाराने फोड करून क्षेत्राचे स्वरूप दाखविले॥ ९४०॥ त्याचप्रमाणे क्षेत्रानंतर तू ज्या दृष्टीने ते ज्ञेयस्वरूप पाहू शकशील ती ज्ञानदृष्टि प्राप्त होण्याकरिता आवश्यक असलेले ज्ञानहि, अर्जुना! तुला सांगितले॥ ९४१॥ त्याचप्रमाणे तृप्ति होऊन तू पुरे म्हणशील, इतके अज्ञानदृष्टिचेहि रूप, चांगल्या रीतीने कौतुक म्हणून, स्पष्ट केले॥ ९४२॥ आता विस्तृत उपपत्तीच्या द्वारा केवळ ज्ञेयाच्या स्वरूपाचेहि स्पष्टपणे निरूपण केले आहे॥ ९४३॥ हे संपूर्ण विचार बुद्धिमध्ये दृढ ठसवून व माझ्या प्राप्तीचा ध्यास ठेवून अर्जुना! माझे भक्त माझ्या स्वरूपाला प्राप्त होतात॥ ९४४॥ ज्यांनी आपल्याशी संबंध जोडलेल्या देहादिक सर्व पदार्थ मात्र परिवारांचा मनातून संबंध सोडून (आपला) जीव माझ्या ठिकाणीच स्थिर केला॥ ९४५॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानाच्या पूर्वी केलेल्या भक्तीने आत्मज्ञान किंवा क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार दृढ झाल्यावरहि परमानंद प्राप्तिकरिता सगुणस्वरूपाचे प्रेम तसेच चालू ठेवणे, हा उपाय येथे सांगितला आहे.

**ते मातें किरीटी। हेंचि जाणोनियां शेवटीं। आपणपयां साटोवाटीं। मीचि होती॥ ९४६॥**
**मीचि होती परी। हे मुख्य गा अवधारीं। सोहोपी सर्वांपरी। रचिली आम्हीं॥ ९४७॥**
**कडां पायरी कीजे। निराळीं माच बांधिजे। अथावीं सुइजे। तरी जैसी॥ ९४८॥**
**एऱ्हवीं अवघेंचि आत्मा। हें सांगों जरी वीरोत्तमा। तरी तुझिया मनोधर्मा। गिळेल ना॥ ९४९॥**
**म्हणोनि एकचि संचलें। चतुर्धा आम्हीं केलें। जें अदळपण देखिलें। तुझिये प्रज्ञे॥ ९५०॥**
**पैं बाळ जैं जेवविजे। तैं घांस विसा ठायीं कीजे। तैसें एकचि चतुर्व्याजें। कथिलें आम्हीं॥ ९५१॥**
**एक क्षेत्र एक ज्ञान। एक ज्ञेय एक अज्ञान। हे भाग केले अवधान। जाणोनि तुझें॥ ९५२॥**

**अर्थ**—हे अर्जुना! ते मला अशाप्रमाणे जाणून शेवटी आपल्याला मला समर्पण करून त्या मोबदल्यात मीच होऊन राहतात॥ ९४६ ॥ मद्रूप होण्याचा हाच प्रकार मुख्य आहे, असे जाण. अड्यावर चढण्याकरिता जशा पायऱ्या कराव्या, आकाशात वर जाण्याकरिता जसा माच बांधावा, अथांग पाण्यामध्ये जशी नाव सोडवी, त्याप्रमाणे आम्ही तो मद्रूप होण्याचा प्रकार सर्व रीतीने सोपा करून तुजपुढे मांडला आहे॥ ९४७-९४८ ॥ नाहीतर सर्व आत्माच आहे असे जर सांगितले असते तर, हे सर्वश्रेष्ठा अशा अर्जुना! ते तुझ्या मनाला पटले नसते॥ ९४९ ॥ तुझी बुद्धि ते ग्रहण करण्यास असमर्थ आहे, हे मी पाहिले, म्हणूनच जे एक अद्वैतस्वरूपाने भरले आहे तेच आम्ही तुला चार प्रकारचे करून सांगितले॥ ९५० ॥ ज्याप्रमाणे लहान मुलाला जेवू घालायचे असते तेव्हा पुरुषाच्या एका मोठ्या घासाचेच वीस घास करावे लागतात, त्याप्रमाणे एकच अद्वैत असलेले परब्रह्म चार प्रकारचे करून तुला सांगितले॥ ९५१ ॥ तुझी ग्रहणशक्ति पाहून एक क्षेत्र, एक ज्ञान, एक ज्ञेय, एक अज्ञान असे भाग केलेत॥ ९५२ ॥

**गूढार्थदीपिका**—दर्शनकारांनी अधिकारानुसार कोणी एक तत्त्व, कोणी दोन, कोणी तीन, कोणी पांच अशी तत्त्वांची निरनिराळी संख्या मानली असली तरी सर्व दर्शनकारानी मोक्ष नित्य मानला असल्यामुळे व नित्य मोक्षाचे स्वरूप अद्वैत परब्रह्मस्थिति हेच होऊ शकत असल्यामुळे त्याच्या दर्शनाच्या प्रतिपादनाचे तात्पर्य अद्वैत परब्रह्माचे ठिकाणी आहे हे जे आम्ही मागे सांगितले तोच, ९४७ ते ९५२ पर्यंतच्या ओव्यांचा भावार्थ आहे.

**आणि ऐसेनही पार्था। जरी हा अभिप्रावो तुज हाता। न ये तरी हे व्यवस्था। एक वेळ सांगों॥ ९५३ ॥**
**आतां चौठायीं न करूं। एकही म्हणोनि न सरूं। आत्मानात्मया धरूं। सरिसा पाडु॥ ९५४॥**
**परि तुवां येतुलें करावें। मागो तें आम्हां देआवें। जे कानाचि नांव ठेवावें। आपण पयातें॥ ९५५ ॥**

**अर्थ**—आणि इतके करूनहि, अर्जुना! आम्ही सांगितल्याचा अभिप्राय तुला कळला नसेल, तर पुनः एकवेळ माझ्या निरूपणाची संगति सांगतो, ऐक॥ ९५३ ॥ आता ज्ञेयतत्त्वाचे चार भाग न करता किंवा एकच म्हणून न स्वीकारता आत्मा, अनात्मा असे सारखे दोन भाग करून दोघांचाहि बरोबरीने विचार करू॥ ९५४॥ पण तू एवढे करावे की आम्ही मागतो, ते द्यावे. तू आपल्याला कानाचे नाव ठेऊन घे-म्हणजे तू सर्वस्वी एक श्रवणेंद्रियच होऊन राहा॥ ९५५ ॥

**या श्रीकृष्णाचिया बोला। पार्थु रोमांचितु जाहला। तेथ देवो म्हणती भला। उचंबळेना॥ ९५६ ॥**
**ऐसेनि तो येतां वेगु। धरूनि म्हणे श्रीरंगु। प्रकृतिपुरुषविभाग। परिसें सांगों॥ ९५७॥**
**जया मार्गातें जगीं। सांख्य म्हणती योगी। जयाचिये भाटिवेलागीं। मी कपिल जाहलों॥ ९५८ ॥**
**तो आईक निर्दोखु। प्रकृतिपुरुषविवेकु। म्हणे आदिपुरुखु। अर्जुनातें॥ ९५९ ॥**

**अर्थ**—असे श्रीकृष्णाचे बोल ऐकून अर्जुनाचे शरीरावर आनंदाने रोमांच उभे राहिले. ते पाहून भगवान म्हणतात अर्जुना! असा अत्यंत हर्षाने उचंबळून येऊ नकोस॥ ९५६ ॥ अर्जुनाला आलेला हर्षवेग अशा बोलण्याने आवरून धरून देव म्हणाले, आता प्रकृति व पुरुष असा विभाग करून सांगतो, ऐक॥ ९५७॥ ज्या मार्गाला योगीलोक सांख्य म्हणतात व ज्या मार्गाची भाटाप्रमाणे स्तुति करण्याकरिता मी कपिल रूपाने अवतीर्ण झालो॥ ९५८ ॥ ज्यात कोणतेहि दोष नाहीत असा तो प्रकृति व पुरुष यांचा विवेक ऐक, असे अर्जुनाला आदिपुरुष भगवान श्रीकृष्ण म्हणू लागले॥ ९५९ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रकृतिपुरुषविवेक-म्हणजे प्रकृति व प्रकृतीचे संपूर्ण कार्य, यापासून पुरुषाला निराळे करणे यालाच व्यतिरेकहि म्हणतात.

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि। विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान्॥ १९ ॥**

**अर्थ**—प्रकृति व पुरुष असे दोन पदार्थ असून दोन्ही अनादि आहेत, सर्व कार्यरूप पदार्थ व गुण प्रकृतिपासून झाले आहेत, असे जाण॥ १९ ॥

**तरी पुरुष अनादि आथी। आणि तैंचिलागोनि प्रकृती। संवसरिसी दिवोराती। दोनी जैसी॥ ९६० ॥**

**कां रूप नोहे वायां। परी रूपा लागली छाया। निकणु वाढे धनंजया। कणेंसी कोंडा॥ ९६१॥**
**तैसीं जाण जवटें। दोन्ही इये एकवाटें। प्रकृतिपुरुष प्रकटें। अनादिसिद्धें॥ ९६२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे दिवस व रात्र हे दोन्ही बरोबर असतात, त्याप्रमाणे पुरुष हा अनादि असून प्रकृति त्याच्या बरोबरच असते॥ ९६०॥ किंवा रूप खोटे नसते तरी रूपाबरोबरच खोटी छाया असते अथवा धान्याच्या कणाबरोबरच धान्याचा कण नसलेला कोंडा वाढत असतो॥ ९६१॥ त्याप्रमाणे जुळ्यासारखे हे दोन्ही एकवटून असलेले व अनादिसिद्ध प्रकृति-पुरुष विभक्तरूपाने प्रगट होतात॥ ९६२॥

**गूढार्थदीपिका**—जीव व त्याची कल्पनारूप प्रकृति हे दोन्ही अनादि आहेत. जीव पूर्वी शुद्ध परब्रह्म होता व नंतर कल्पनाबद्ध किंवा प्रकृतिबद्ध झाला असे मानता येत नाही; कारण तसे मानले, तर मोक्ष नित्य ठरत नाही.

नित्यज्ञानी परमात्मा व अविद्येची निवृत्ति होऊन ज्ञानी झालेला पुरुष, या दोघांनाहि बद्धतेचा प्रत्यय राहत नाही. म्हणून जीव केव्हापासून बद्ध झाला हे तो (परमात्मा) सांगू शकत नाही व बद्ध असलेला जीवहि मी केव्हापासून बद्ध झालो हे सांगू शकत नाही, म्हणून जीव व त्याचा कल्पनेशी असलेला संबंध हे दोन्ही अनादिच मानावे लागतात.

**पैं क्षेत्र येणें नांवें। जें सांगितलें आघवें। तेंचि एथ जाणावें। प्रकृति हे गा॥ ९६३॥**
**आणि क्षेत्रज्ञु ऐसें। जयातें म्हणितलें असे। तो पुरुष हें अनारिसें। न बोलों घेईं॥ ९६४॥**
**इयें आनानें नांवें। परि निरूप्य आन नोहे। हें लक्षण न चुकावें। पुढतपुढती॥ ९६५॥**
**तरी केवळ जे सत्ता। ते पुरुष गा पांडुसुता। प्रकृति तें समस्ता। क्रिया नाव॥ ९६६॥**

**अर्थ**—आतापर्यंत क्षेत्र म्हणून जेवढे काही सांगितले, अर्जुना! त्यालाच प्रकृति म्हटले आहे असे जाण॥ ९६३॥ आणि ज्याला मागे क्षेत्रज्ञ म्हटले आहे. तोच पुरुष होय, हे मी अन्यथा सांगत नाही, असे समज॥ ९६४॥ क्षेत्र-क्षेत्रज्ञ, प्रकृति-पुरुष ही निराळी नावे असली, तरी त्या नावांनी सांगितले जाणारे अर्थ मात्र निराळे नाहीत; ही खूण तू विसरू नये, हे माझे वारंवार सांगणे आहे॥ ९६५॥ हे अर्जुना! नुसती जी सत्ता तो पुरुष होय. प्रकृति हे नाव संपूर्ण क्रियेला आहे॥ ९६६॥

**गूढार्थदीपिका—प्रकृति ते समस्तां। क्रियां नाव-**

क्रिया म्हणजे उत्पत्त्यादि क्रिया.

पुरुष हा केवळ सत्तास्वरूप असल्यामुळे त्याच्या ठिकाणी उत्पत्त्यादि क्रिया नाहीत; म्हणून तो प्रकृतीत मोडला जात नाही आणि उत्पत्त्यादि क्रिया ज्या बुद्धींद्रियादि कार्याचे ठिकाणी भासतात, तो सर्व प्रकृतिविभाग होय.

"असंगोह्ययं पुरुषः" या श्रुतीच्या आधारे सांख्यशास्त्रात 'पुरुष असंग आहे' असे मानले आहे. त्याचे असंगत्व दाखविण्याकरिता पुरुष हा संपूर्ण बुद्ध्यादि प्रकृतिकार्याहून वेगळा, केवळ सत्तास्वरूप आहे, असे त्या पुरुषाचे वर्णन केले आहे.

वेदान्तशास्त्रातहि "सत्पद ते ब्रह्म" "सत्पदनिर्गुण" या नाथवचनानुसार निर्गुण परब्रह्म केवळ सत्तास्वरूप मानले जाते; म्हणून प्रकृतिपुरुषाचा विवेक सांगणारे सांख्यशास्त्र म्हणजे वेदान्तातील आत्मानात्मविवेकरूप पहिली पायरीच होय, असे समजले जाते.

**बुद्धि इंद्रियें अंतःकरण। इत्यादि विकारभरण। आणि ते तीन्ही गुण। सत्त्वादिक॥ ९६७॥**
**हा आघवाचि मेळावा। प्रकृती जाहला जाणावा। हेचि हेतु संभवा। कर्माचिया॥ ९६८॥**

**अर्थ**—बुद्धि, दहा इंद्रिये, अंतःकरण, इत्यादि सर्व कार्याचा समुदाय आणि सत्व, रज, तम हे तीन गुण हा संपूर्ण मेळावा प्रकृतिच झाली आहे, असे समज आणि हेच कर्माच्या उत्पत्तीला कारण आहे.॥ ९६७-९६८॥

**कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते। पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते॥ २०॥**

**अर्थ**—कार्य, कारण व कर्तृत्व या सर्वाचे कारण प्रकृति आहे, असे म्हटले जाते आणि पुरुष हा सर्व सुखदुःखाच्या भोगाला कारण आहे, असे म्हटले जाते॥ २०॥

**तेथ इच्छा आणि बुद्धी। घडवी अहंकारेंसीं आधीं। मग तिया लाविती वेधीं। कारणाच्या॥ ९६९ ॥**

**अर्थ**—तेथे प्रथम प्रकृति ही इच्छा व बुद्धि यांना अहंकारासहित उत्पन्न करते. मग त्यांना कारणाच्या वेधांत पाडते॥ ९६९ ॥

**गूढार्थदीपिका—तेथ इच्छा आणि बुद्धि। घडवी अहंकारेसी आधी—**

''प्रकृतेः महत् महतोऽहंकारः'' प्रथम प्रकृतिपांसून बुद्धि व बुद्धिपासून अहंकार उत्पन्न होतो, असे सांख्यशास्त्रात सांगितले आहे.

बुद्धि इच्छेसहितच असल्यामुळे ''बुद्धि'' शब्दाने इच्छा घेतली जाते. जीवाची बुद्धि प्रथम सांख्यशास्त्रोक्त प्रकृतिपुरुषाचा विवेक उत्पन्न होईपर्यंत विषयवासनासहितच राहत असल्यामुळे ''बुद्धि'' शब्दात इच्छेचाहि अंतर्भाव होतो; म्हणूनच सांख्यशास्त्रात जो नुसत्या बुद्धीचा उल्लेख आहे, त्याचेच स्पष्टीकरण, माउलींनी ''इच्छा'' आणि ''बुद्धि'' यांना अलग दाखवून, केले आहे.

**मग तिया लाविती वेधी। कारणाच्या-**

बुद्धि व अहंकार यांच्यापासून पुढे कार्य उत्पन्न होते; म्हणून प्रकृति यांना कारणपणाचा ध्यास लावते-म्हणजे पुढील कार्याचे कारण करते, असे म्हटले आहे.

**तेंचि कारण ठाकावया। जें सूत्र धरणें उपाया। तया नांव धनंजया। कार्य पैं गा॥ ९७० ॥**

**अर्थ**—त्या कारणाला प्राप्त होण्याकरिता ज्या उपायरूप सूत्राला धरावे लागते, त्यालाच अर्जुना! कार्य म्हणतात॥ ९७० ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे तारेच्या किंवा दोराच्या साहाय्याने मनुष्य प्राप्तव्य ठिकाणी जातो, त्याप्रमाणे कार्याच्या द्वाराच त्याचे कारण ठरविता येते किंवा कार्यावरूनच त्याचे कारण ठरविता येते; म्हणून येथे ज्याच्यावरून कारण ठरविता येते त्याला कार्य म्हटले आहे.

**आणि इच्छा मदाचां थावीं। लागली मनातें उठवी। तें इंद्रियें राहाटवी। हें कर्तृत्व पैंगा॥ ९७१ ॥**
**म्हणोनि तीन्ही या जाणा। कार्यकर्तृत्वकारणा। प्रकृति मूळ हे राणा। सिद्धांचा म्हणे॥ ९७२ ॥**
**एवं तिहींचेनि समवायें। प्रकृति कर्मरूप होये। परि जया गुणा वाढे त्राये। त्याचिसारिखे॥ ९७३ ॥**
**जें सत्त्वगुणें अधिष्ठिजे। तें सत्कर्म म्हणिजे। रजोगुणें निपजे। मध्यम तें॥ ९७४ ॥**
**जें कां केवळें तमें। होती जिये कर्में। निषिद्धें अधमें। जाण तियें॥ ९७५ ॥**
**ऐसेनि संतासंतें। कर्में प्रकृतीस्तव होतें। तयापासोनि निर्वाळेते। सुखदुःख गा॥ ९७६ ॥**
**असंतीं दुःख उपजे। सत्कर्मीं सुख निपजे। तया दोहींचा बोलिजे। भोगु पुरुषा॥ ९७७ ॥**

**अर्थ**—आणि ती इच्छा प्रबळ होऊ लागली की मनाला चेतविते आणि ते चेतविलेले मन इंद्रियांकडून व्यापार करविते. मनाच्या त्या इंद्रियाकडून व्यापार करविण्याला कर्तृत्व म्हणतात॥ ९७१ ॥ म्हणून कार्य-म्हणजे जे उत्पन्न होते, पण ज्याच्यापासून पुढे काही उत्पन्न होत नाही, असे शरीरादि पदार्थ; कर्तृत्व म्हणजे व्यापार करविणे आणि कारण-म्हणजे कार्यरूप शरीरादिकांना निर्माण करणारे, बुद्धि अहंकारादि या सर्वांना प्रकृति मूळ-म्हणजे उपादानकारण-आहे असे सर्व सिद्धींचे राजे भगवान श्रीकृष्ण म्हणाले॥ ९७२ ॥ याप्रमाणे कार्य, कर्तृत्व, कारण या तिघांच्या मेळाव्याने प्रकृति कर्मरूप होते, पण ज्या गुणाची प्रतिष्ठा वाढेल-म्हणजे उत्कर्ष होईल-त्या गुणासारखेच कर्म होणार!॥ ९७३ ॥ सत्वगुणाच्या आधिक्याने केलेल्या कर्माला सत्कर्म म्हणतात. रजोगुणाने होणारे कर्म पुण्यरूप नाही तर पापरूपहि नाही, असे मध्यम म्हटले जाते॥ ९७४ ॥ जी कर्मे केवळ तमोगुणाने होतात, ती निषिद्ध व अधर्मरूप कर्मे म्हटली जातात॥ ९७५ ॥ याप्रमाणे प्रकृतिपासून पुण्यरूप व पापरूप कर्मे निर्माण होतात व त्या पुण्यरूप व पापरूप कर्मापासून अनुक्रमे सुखदुःखरूप फळ प्राप्त होते॥ ९७६ ॥ पापकर्मापासून दुःख प्राप्त होते. व पुण्यकर्माने सुख प्राप्त होते. या दोन्ही सुखदुःखाचा भोग पुरुषाला होतो॥ ९७७ ॥

**गूढार्थदीपिका**—सुख व दुःख असून ते मला झाले असे ज्ञान होणे, याला भोग म्हणतात.

पुरुष चेतन असल्यामुळे त्याच्या ठिकाणी जाणीव आहे; म्हणून सांख्ययोगी प्रकृतीच्या संगामुळे त्याला भोक्ता म्हणतात; पण प्रकृतीचा संग असला तरी कार्य, कर्तृत्व, कारण हे सर्व प्रकृतीचे कार्य आहे असे ठरत असल्यामुळे सांख्ययोगी, पुरुषाला कर्ता मानीत नाहीत.

**सुखदुःखें जंववरी। निफजती साचोकारीं। तंव प्रकृति उद्यम करी। पुरुष भोगी॥ ९७८॥**
**प्रकृति पुरुषांची कुळवाडी। सांगतां असंगडी। जे आंबुली जोडी। आंबुला खाय॥ ९७९॥**

**अर्थ**—जोपर्यंत सुखदुःखे खरोखर उत्पन्न होतात-म्हणजे खरी वाटतात, तोपर्यंत प्रकृति कर्म करते व पुरुष सुखदुःखाचा भोग घेतो. स्त्री श्रम करून मिळविते व पति बसल्याठिकाणी खातो, असा हा प्रकृतिपुरुषाच्या शेतीचा धंदा सांगतांना व्यवहारविरुद्ध आहे॥ ९७८-९७९॥

**गूढार्थदीपिका**—जो कर्ता असतो तोच त्याच्या कर्तृत्वाने मिळणाऱ्या फळाचा भोक्ता होतो असा सामान्य नियम आहे; पण सांख्यशास्त्रात कार्य-कारण-कर्तृत्वाला हेतु प्रकृति मानली आहे, भोक्तृत्वाला हेतु मात्र पुरुष मानिला आहे. येथे 'पुरुष भोक्तृत्वाचा हेतु आहे' या मताचा माउलींनी ''सांगता असंगडी'' असे म्हणून उपहास केला असून जसा पुरुष कार्य-कारण-कर्तृत्वाला हेतु नाही, तसाच तो भोक्तृत्वाला हेतु नाही, तो सर्वांचा केवळ साक्षी आहे, असे जे वेदान्ताचे मत, तेच योग्य आहे, असे ध्वनित केले आहे.

**आंबुलिया आंबुलिये। संगती ना सोये। कीं आंबुली जग विये। चोज ऐकें॥ ९८०॥**

**अर्थ**—या पुरुषप्रकृतिरूप पतिपत्नीची संगति नाही व संगति होण्याची सोय नाही; परंतु प्रकृतिरूप पत्नी जग प्रसवते हे आश्चर्य ऐक॥ ९८०॥

**गूढार्थदीपिका**—स्त्री पुरुषाची संगति झाली असता स्त्री मुलांना जन्म देऊ शकते; पण सांख्यशास्त्राच्या मते पुरुष असंग असल्यामुळे पुरुषप्रकृतीचा संबंध होण्याची सोय नसूनहि प्रकृति जगद्रूप कार्य प्रसवते. या सांख्यशास्त्राचा माऊलींनी ''चोज ऐका'', या पदाने उपहास करून पुरुषाचा कधीहि संबंध होत नसलेल्या व स्वतः जड असलेल्या प्रकृतिपासून जगद्रूप कार्य उत्पन्न होणे शक्य नाही; म्हणून ते जगत् खरोखर उत्पन्न झाले नसून अज्ञान भ्रमजन्य आहे, हे वेदान्तमतच ध्वनित केले आहे.

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान्। कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु॥ २१॥**

**अर्थ**—कार्यकारणादिरूपाने परिणाम पावलेल्या प्रकृतिचे ठिकाणी राहून-म्हणजे, हे सर्व मी आहे, असे अविवेकाने त्याच्याशी ऐक्य करून-पुरुष प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या गुणाचा भोग घेतो. याच्या बऱ्यावाईट योनीमध्ये जन्म होण्याला हा गुणांचा संगच कारण आहे॥ २१॥

**जे अनंगु तो पेंधा। निकवडा नुसधा। जीर्णु अतिवृद्धा-। पासोनि वृद्धु॥ ९८१॥**
**तया आडनांव पुरुषु। एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु। किंबहुना एकु। निश्चयो नाहीं॥ ९८२॥**

**अर्थ**—तो अंगरहित असा निराकार असून पांगळा-म्हणजे क्रियारहित आहे. तो ऐश्वर्यहीन, नुसधा-म्हणजे एकटा व असंग आहे. तो संपूर्ण वृद्धाहून अतिवृद्ध म्हणजे अनादि आहे॥ ९८१॥ त्या तत्त्वाला पुरुष हे आडनांव आहे. पुरुष नाही, तर तो स्त्री आहे किंवा नपुंसक आहे, असेहि त्याला म्हणता येत नाही; एवढेच नाही तर त्याच्या विषयी कोणताच निश्चय करता येत नाही॥ ९८२॥

**गूढार्थदीपिका—तया आडनांव पुरुषु-**

प्रकृतिरूप स्त्रियेचे ठिकाणी तो संगत होत नाही व सृष्टिरूप अपत्य उत्पन्न करीत नाही; म्हणून त्यांचे (पुरुषाचे) ''पुरुष'' हे आडनांव आहे, असे म्हटले आहे.

**अचक्षु अश्रवणु। अहस्तु अचरणु। रूप ना वर्णु। नाम आथी॥ ९८३॥**
**अर्जुना कांहींचि जेथ नाहीं। तो प्रकृतीचा भर्ता पाहीं। कीं भोगणें ऐसयाही। सुखदुःखाचें॥ ९८४॥**

**अर्थ**—त्याचे ठिकाणी चक्षु, श्रवण इत्यादि ज्ञानेंद्रिये नाहीत, तसेच हात पाय इत्यादि कर्मेंद्रिये नाहीत. त्याचे ठिकाणी रूप, वर्ण, नाम हेही नाहीत ॥ ९८३ ॥ अर्जुना! ज्या पुरुषाचे ठिकाणी काहीच नाही, असा हा पुरुष, प्रकृतीचा भर्तार होय, पाहा आणि अशा पुरुषाला सुखदु:खाचा भोग होतो ॥ ९८४ ॥

**गूढार्थदीपिका**—''काहींचि जेथे नाही''-म्हणजे जो केवळ सत्तास्वरूप आहे. ''प्रकृतीचा भर्तार''-म्हणजे तो केवळ आपल्या सत्तेनेच प्रकृतीला सत्तावान करून कार्यप्रवण होतो.

**तो तरी अकर्ता। उदास अभोक्ता। परि इया पतिव्रता। भोगविजे ॥ ९८५ ॥**

**अर्थ**—वास्तविक तो कर्ता नाही, भोक्ता नाही, उदास आहे; पण अशा या पुरुषाला त्याची पतिव्रता स्त्री-प्रकृति-भोग भोगायला लावते ॥ ९८५ ॥

**गूढार्थदीपिका**—पुरुषाच्या ठिकाणी भोक्तृत्व हे प्रकृतिपुरुषाच्या अविवेकरूप अज्ञानामुळेच आहे, असा अर्थ.

**जियतें अळुमाळु। रूपा- गुणाचा चाळढाळु। ते भलतैसाही खेळु। लेखा आणी ॥ ९८६ ॥**
**मा इये प्रकृती तंव। गुणमयी हेंचि नांव। किंबहुना सावेव। गुण तेचि हे ॥ ९८७ ॥**
**हे प्रतिक्षणीं नित्य नवी। रूपागुणांचीच आघवी। जडातेंही माजवी। इयेचा माज ॥ ९८८ ॥**
**नामें इयें प्रसिद्धें। स्नेहो इया स्निग्धें। इंद्रियें प्रबुद्धें। इयेचेनि ॥ ९८९ ॥**
**कायि मन हें नपुंसक। कीं तें भोगवी तिन्ही लोक। ऐसें ऐसें अलौकिक। करणें इयेचें ॥ ९९० ॥**
**हे भ्रमाचें महाद्वीप। हे व्याप्तीचेंचि रूप। विकार उमप। इया केले ॥ ९९१ ॥**

**अर्थ**—या प्रकृतीचे ठिकाणी आकार व गुण यांची थोडीशी हालचाल सुरू झाली की ती वाटेल तसा खेळ पुरुषापुढे मांडते ॥ ९८६ ॥ त्या प्रकृतीचे गुणमयी हेच नांव आहे. एवढेच नाही, तर खरोखर गुण हीच प्रकृति होय ॥ ९८७ ॥ ही क्षणोक्षणी बदलणारी आहे. ही संपूर्ण आकार व गुण यांचीच बनलेली आहे. रजोगुणाच्या उत्कर्षाने माजली असता ती जडालाहि माजविते ॥ ९८८ ॥ हिच्या योगानेच नांवे प्रगट होतात. हिच्या स्निग्धपणानेच जगात प्रेम व्यक्त झाले आहे आणि हिच्या योगानेच इंद्रिये जाणती झाली आहेत ॥ ९८९ ॥ हिच्यापासून झालेले मन हे नपुंसक आहे; पण तीच मनाकडून तिन्ही लोकांचा भोग घेवविते, असे हिचे करणे अलौकिक आहे ॥ ९९० ॥ ही प्रकृतिच जगद्रूप अनादिभ्रमाचे फार विस्तीर्ण बेट आहे. व्याप्तीचे रूप हीच होय. हिनेच असंख्य विकार केले आहेत ॥ ९९१ ॥

**गूढार्थदीपिका**—पुरुषाच्या ठिकाणी व्यापकत्व इत्यादि धर्म हिच्या अपेक्षेनेच आले आहेत. प्रकृति असंख्य विकाररूपाने परिणाम पावली नसती, तर पुरुषाला व्यापक म्हणण्याचे कारणच नव्हते, असा अर्थ.

**हे कामाची मांडवी। हे मोहवनींची माधवी। इये प्रसिद्धचि दैवी। माया हें नाव ॥ ९९२ ॥**

**अर्थ**—ही कामाची मंडपी आहे. ही प्रकृति म्हणजे अविवेकरूपी वनाला टवटवीत ठेवणारा वसंत ऋतु आहे. हीचे ''दैवी माया'' हे नांव वेदान्तात प्रसिद्ध आहे ॥ ९९२ ॥

**गूढार्थदीपिका—कामाची मांडवी-**

ज्याप्रमाणे मांडवाखाली वेल वाढतो, त्याप्रमाणे अविवेकरूपी प्रकृतिमुळेच विषयसुखाची वासना वाढते, असा अर्थ.

**हे वाङ्मयाची वाढी। हे साकारपणाची जोडी। प्रपंचाची धाडी। अभंग हे ॥ ९९३ ॥**
**कळा एथूनि जालिया। विद्या इयेच्या केलिया। इच्छा ज्ञान क्रिया। वियाली हे ॥ ९९४ ॥**
**हे नादाची टांकसाळ। हे चमत्काराचें वेळाउळ। किंबहुना सकळ। खेळु इयेचा ॥ ९९५ ॥**
**जे उत्पत्ति प्रलयो होत। ते इयेचे सायंप्रात। हें असो अद्भुत। मोहन हे ॥ ९९६ ॥**
**हे अद्वयाचें दुसरें। हे निःसंगाचें सोयरें। हे निराळेंसि घरें। नांदत असे ॥ ९९७ ॥**
**इयेतें येतुलावरी। सौभाग्यव्याप्तीची थोरी। म्हणोनि तया आवरी। अनावरातें ॥ ९९८ ॥**
**तयाचां तंव ठायीं। निपटूनि कांहींचि नाहीं। कीं तया आघवेंही। आपणचि होय ॥ ९९९ ॥**

**अर्थ**—सम्पूर्ण लौकिक व अलौकिक वाङ्मयाचा विस्तार हिच्यापासूनच आहे. हीच केवळ सत्तारूप निर्गुण परब्रह्माला झालेली साकारपणाची जोड आहे, आणि पुरुषावर पडलेला प्रपंचाचा अखंड घाला घालणारी हीच आहे. ॥ ९९३ ॥ चौसष्ट कळा येथूनच निर्माण झाल्या, चौदा विद्याहि हिनेच निर्माण केल्या. इच्छा, ज्ञानरूप जाणीव व क्रिया ह्यांना हिनेच जन्म दिला ॥ ९९४ ॥ योगातील दशनादाची टाकसाळ हीच आहे आणि सर्व चमत्काराचे घरहि हीच आहे, फार काय सांगू, अर्जुना! एका सत्तामात्र पुरुषावाचून जेवढे काही विशेषरूप द्वैत दिसते. तो सर्व हिचा खेळ आहे ॥ ९९५ ॥ जगदुत्पत्ति आणि जगत्प्रलय हे जे आदी अंती होतात, ते हिचेच प्रात:काळ व सायंकाळ आहेत. हे असो, ही प्रकृति म्हणजे पुरुषावर घातलेली फार मोठी भुरळ होय ॥ ९९६ ॥ ही प्रकृतिच, अद्वैत परब्रह्माचे ठिकाणी द्वैतरूपाने, नि:संगाचे ठिकाणी संबंधीपणाने व निराकार परब्रह्माचे ठिकाणी संसाररूपाने नांदत आहे ॥ ९९७ ॥ या प्रकृतीचे ठिकाणी येथपर्यंत थोर सौभाग्यव्याप्ति असल्यामुळे ती अनावर पुरुषालाहि आटोक्यात आणते ॥ ९९८ ॥ खरोखर त्या पुरुषाच्या ठिकाणी सर्वस्वी काही नाही, असे असतांना ही प्रकृति त्याचे ठिकाणी आपणच सर्व रूपाने नटते ॥ ९९९ ॥

**तया स्वयंभाची संभूती। तया अमूर्ताची मूर्ती। आपण होय स्थिति। ठावो तया॥ १००० ॥**
**तया अनार्ताची आर्ती। तया पूर्णाची तृप्ती। तया अकुळाची जाती। गोत होय॥ १००१ ॥**
**निराकाराचा आकारु। तया निर्व्यापाराचा व्यापारु। निरहंकाराचा अहंकारु। होऊनि ठाके॥ १००२ ॥**
**तया अचर्चाचें चिन्ह। तया अपाराचें मान। तया अमनस्काचें मन। बुद्धी ही होय॥ १००३ ॥**
**तया अनामाचें नाम। तया अजाचें जन्म। आपण होय कर्म। क्रिया तया॥ १००४ ॥**
**तया निर्गुणाचे गुण। तया अचरणाचे चरण। तया अश्रवणाचे श्रवण। अचक्षूचे चक्षु॥ १००५ ॥**
**तया भावातीताचे भाव। तया निरवयवाचे अवयव। किंबहुना होय सर्व। पुरुषाचें हे॥ १००६ ॥**

**अर्थ**—त्या स्वत:सिद्ध पुरुषाची आपण उत्पत्ति होते. त्या निराकाराची मूर्ति होते. ही प्रकृति आपण स्थिति होऊन त्याला राहण्याचे ठिकाणी करते ॥ १००० ॥ त्या निरिच्छाची इच्छा, त्या पूर्णाची तृप्ति, त्या कुलरहिताची जाति व गोत्र आपणच होते ॥ १००१ ॥ त्या अवर्णनीय पुरुषाचे लक्षण, अमर्यादाची मर्यादा, मनबुद्धि नसलेल्याची मनबुद्धि आपणच होते ॥ १००२ ॥ त्या निराकाराचा आकार, व्यापाररहिताचा व्यापार व अहंकाररहिताचा अहंकार आपणच होऊन राहते ॥ १००३ ॥ त्या नामरहिताचे नांव, त्या जन्मरहिताचा जन्म व कर्मरहिताचे कर्म आपणच होते ॥ १००४ ॥ त्या निर्गुणाचे गुण, अचरणाचे चरण, ज्याला कान नाहीत अशाचे कान व चक्षुरहिताचे चक्षु ती आपणच होते ॥ १००५ ॥ त्या भावरहिताचे भाव. निरवयाचे अवयव, फार काय सांगावे, सत्तामात्र पुरुषाची सत्ता सोडून बाकी सर्व तीच होते ॥ १००६ ॥

**ऐसेनि इया प्रकृती। आपुलिया सर्व व्याप्ती। तया अविकारातें विकृती-। माजीं कीजे॥ १००७ ॥**
**तेथ पुरुषत्व जें असे। तें ये इये प्रकृतिदशे। चंद्रमा अंवसे। पडिला जैसा॥ १००८ ॥**
**विदळ बहु चोखा। मीनलिया वाला एका। कसु होय पांचिका। जयापरी॥ १००९ ॥**
**कां साधूतें गोंदळी। संचरोनि सुये मैळीं। ना ना सुदिनाच्या आभाळीं। दुर्दिन कीजे॥ १०१० ॥**
**जेवी पय पशूच्या पोटीं। कां वन्हि जैसा काष्ठीं। गुंडूनि घेतला पटीं। रत्नदीपु॥ १०११ ॥**
**राजा पराधीन जाहला। कीं सिंहु रोगें रुंधला। तैसा पुरुष प्रकृती आला। स्वतेजा मुके॥ १०१२ ॥**
**जागता नरु सहसा। निद्रा पाडूनि जैसा। स्वप्नींचिया सोसा। वश्य कीजे॥ १०१३ ॥**
**तैसें प्रकृति जालेपणें। पुरुषा गुण भोगणें। उदास अंतुरीगुणें। आतुडे जेवीं॥ १०१४ ॥**
**तैसें अजा नित्या होये। आंगीं जन्ममृत्यूचे घाये। वाजती जैं लाहे। गुणसंगातें॥ १०१५ ॥**
**परि तें ऐसें पांडुसुता। तातलें लोह पिटितां। जेवीं वन्हीसीचि घाता। बोलती तया॥ १०१६ ॥**
**कां आंदोळलिया उदक। प्रतिमा होये अनेक। तें नानात्व म्हणती लोक। चंद्रीं जेवीं॥ १०१७ ॥**

**दर्पणाचिया जवळिका। दुजेपण जैसें ये मुखा। कां कुंकुमें स्फटिका। लोहितत्व ये॥ १०१८॥**
**तैसा गुणसंगमें। अजन्मा हा जन्मे। पावत ऐसा गमे। एऱ्हवीं नाहीं॥ १०१९॥**
**अधमोत्तमा योनी। यासि ऐसिया मानीं। जैसा संन्यासी होय स्वप्नीं। अंत्यजादि जाती॥ १०२०॥**
**म्हणोनि केवळा पुरुषा। नाहीं होणें भोगणें देखा। येथ गुणसंगचि अशेखा-। लागी मूळ॥ १०२१॥**

**अर्थ**—याप्रमाणे ही प्रकृति आपल्या सर्व रूपाने व्यापून त्या कार्यरहित पुरुषाला कार्यामध्ये घालते॥ १००७॥ ज्याप्रमाणे प्रकाशरूप चंद्र अमावस्येला आला असता प्रकाशरूप न दिसता अमावस्येसारखा दिसतो, त्याप्रमाणे पुरुषाचे असंगत्वादि पुरुषत्वहि प्रकृतिदशेत प्रकृतिदशेसारखे दिसते॥ १००८॥ वालभर शुद्ध सोन्यात हीणकस मिळविले असता त्याचा कस पांच रुपये किंमतीचा होतो॥ १००९॥ किंवा ज्याप्रमाणे पिशाच्च, चांगल्या माणसाच्याहि अंगात शिरून त्याला कुकर्मात प्रवृत्त करते किंवा अभ्रे सुदिनाला दुर्दिन करतात॥ १०१०॥ तसेच, ज्याप्रमाणे दूध पशूच्या पोटात असावे किंवा अग्नि लाकडात असावा, रत्नदीप वस्त्रात गुंडाळून घ्यावा॥ १०११॥ राजा पराधीन व्हावा, किंवा सिंह रोगाने व्यापावा, त्याप्रमाणे असंग पुरुषहि प्रकृतिदशेत आला असता (प्रकृतीच्या आधीन झाला असता) आपल्या असंगत्वादि स्वरूपधर्माला मुकतो॥ १०१२॥ ज्याप्रमाणे जागत असलेला पुरुष अकस्मात् त्याला झोप येऊन स्वप्नांतील सुखदु:खभोगाच्या तो स्वाधीन होतो॥ १०१३॥ त्याप्रमाणे अविवेकाने प्रकृतीशी ऐक्य पावल्यामुळे पुरुषाला गुणाचा भोग होतो. ज्याप्रमाणे स्त्री सद्‌गुणाने उदास पतीलाहि स्वाधीन करून घेते॥ १०१४॥ त्याप्रमाणे जन्मरहित व नित्य अशा पुरुषाच्या अंगी गुणाचा संबंध झाला असता जन्ममृत्युरूपी दु:खाचे घाव पडू लागतात॥ १०१५॥ पण ज्याप्रमाणे, अर्जुना! तापलेले लोखंड पिटले असता लोखंडावर होणारे घाव वन्हीचे ठिकाणीच होतात, असे लोक बोलतात॥ १०१६॥ किंवा पाण्याला हेलकावे दिले असता त्यात पडलेले चंद्राचे प्रतिबिंब अनेकरूप होते. अज्ञानी लोक ते प्रतिबिंबाचे नानात्व चंद्राचेच समजतात॥ १०१७॥ आरशाजवळ असण्याने त्यात मुखाचे प्रतिबिंब पडून जसा मुखाला दोनपणा येतो किंवा केशरामुळे स्फटिकाला लालपणा येतो॥ १०१८॥ त्याप्रमाणे गुणाचा संबंध होऊन जन्मरहित पुरुष जन्मला, असे वाटते. येऱ्हवीं तो जन्मत नाही॥ १०१९॥ स्वप्नांत संन्यासी जसा आपल्याला अंत्यजादि जातीत जन्मलेला पाहतो, त्याप्रमाणे पुरुषाला बऱ्या-वाईट योनी प्राप्त होतात, असे जाण॥ १०२०॥ केवळ सत्तामात्रपुरुषाला जन्म नाही व भोगणेहि नाही. या सर्वांना गुणाचा संबंधच कारण आहे, हे लक्षात घे॥ १०२१॥

**गूढार्थदीपिका**—मूळात पूर्ण अद्वैत सच्चिदानंद परब्रह्मस्वरूप असलेल्या जीवाला प्राप्त झालेली जीवदशा व येत असलेला सर्व पांचभौतिक अनुभव, त्याने अविवेकाने प्रकृतीशी केलेल्या केवळ ऐक्यामुळे आहे, वास्तविक नाही. हेच या वरील संपूर्ण ओव्यातून सांगितले आहे.

**त्वं सर्वभूतहृदयेषु कृतालयोऽपि त्वं मंत्रजाप्यविमुखेषु तनोपि मायाम्।**
**त्वन्मंत्रसाधनपरेष्वपयाति माया सेवानुरूप फलदोऽसि यथा महीपः॥**

(अध्यात्मरामायण)

सच्चिदानंद परमात्मा सर्वांच्या हृदयात घर करून बसला असला व त्याची शक्ति सच्चिदानंदस्वरूप म्हणून त्याच्याशी अभिन्न असली तरी भगवन्विमुख झालेल्यांना ही त्याची शक्ति भ्रमरूप त्रिगुणात्मक मायारूपाने प्रत्ययाला येऊन त्याला सर्व पांचभौतिक आहे, असे भासविते व भगवद्भक्तीने भगवंताशी सन्मुख होणाऱ्यांना ती स्वत: एक सच्चिदानंदस्वरूपाने प्रत्ययाला येऊन सर्व सच्चिदानंदरूप आहे असा प्रत्यय आणून देते. असे अहिल्येने भगवान रामचंद्राची स्तुति करतांना म्हटले आहे.

**उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः। परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः॥ २२॥**

**अर्थ**—वास्तविक पाहता हा प्रकृतीच्या कार्यात न गुंतता प्रकृतीच्या जवळ राहून केवळ साक्षी होऊन राहणारा, प्रकृतीच्या कार्याला अनुमोदन देणारा, सर्वांचे पोषण करणारा, सर्वांचा भोग घेणारा व सर्वांचे नियंत्रण करणारा सर्वेश्वर आहे. असा हा देहामध्ये परम प्रकृतीच्या पलीकडे असून त्याला परमात्माहि म्हणतात॥ २२॥

**हा प्रकृतिमाजीं उभा। परि जुई जैसा वोथंबा। यया प्रकृति पृथ्वीनभा। तेतुला पाडु॥ १०२२॥**

**अर्थ**—हा प्रकृतीच्या कार्यात उभा असला तरी जुईच्या झाडाला टेका दिलेल्या खांबाप्रमाणे केवळ आधाररूप असून पृथ्वी व आकाश यांच्यात जेवढे अंतर आहे, तेवढेच याच्यात (पुरुषात) व प्रकृतीत आहे॥ १०२२॥

**गूढार्थदीपिका—प्रकृतिमाजी उभा। परि जुई जैसा वोथंबा—**

केवल अद्वैतसत्तारूप पुरुषाहून भिन्न भासणारे, प्रकृति व प्रकृतीचे कार्यपदार्थ त्याच्या (पुरुषाच्या) सत्तेवरच कल्पिले असल्यामुळे त्याचीच एक सत्ता त्यांच्यात अनुगत झालेली आहे. हेच त्याचे प्रकृतिमध्ये उभे राहणे होय.

**इया प्रकृति पृथ्वीनभा। तेतुला पाड—**

अद्वैत, अविनाशी, सत्तास्वरूप पुरुषाचे ठिकाणी कल्पिलेले प्रकृत्यादि पदार्थ सत्यस्वरूप नसल्यामुळे त्यांचा पुरूषाशी मुळीच संबंध होत नाही; म्हणून त्याचे असंगत्व सदासर्वदा अखंड कायमच राहते आणि प्रकृतीच्या गुणादिकांचा संबंध भ्रांतिजन्यच असतो, हेच या दोन चरणांनी सांगितले आहे.

**प्रकृतिसरितेचां तटीं। मेरु होय हा किरीटी। माजीं बिंबे परी लोटीं। लोटों नेणें॥ १०२३॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याप्रमाणे नदीच्या काठांवर असलेला पर्वत नदीत प्रतिबिंबित झाला तरी नदीच्या प्रवाहाने तो लोटला जात नाही, त्याप्रमाणे हा पुरुषहि प्रकृतिरूप नदीच्या काठी असलेला अढळ असा मेरु पर्वत होय॥ १०२३॥

**गूढार्थदीपिका—माजी बिंबे परि लोटी। लोटो नेणे—**

पाण्यातील प्रतिबिंब व त्यावर होणाऱ्या पाण्याच्या हालचालीचा परिणाम हे जसे खोटे असते. त्याप्रमाणे पुरुषाचे प्रकृतीत असणे त्याच्यावर प्रकृतीच्या गुणाचा परिणाम होणे, हे सर्वच खोटे असते-म्हणजे जीवदशा प्राप्त झाली तरी ती खोटी असल्यामुळे जीवाची मूळची शुद्ध ब्रह्मदशा यत्किंचितहि न्यून किंवा मलीन होत नाही.

**प्रकृति होय जाये। हा तो असतुचि आहे। म्हणोनि आब्रह्माचें होये। शासन हा॥ १०२४॥**

**अर्थ**—प्रकृतीचा 'आहे-नाही', असा अनुभव येतो, याचा मात्र 'आहे' असाच अनुभव येतो, 'नाही' असा अनुभव येत नाही, म्हणूनच पुरुष हा आपल्या शुद्धस्वरूपाने ब्रह्मदेवापर्यंत सर्व जीवांचे शासन करणारा आहे॥ १०२४॥

**गूढार्थदीपिका—आब्रह्माचे होये। शासन हा—**

एका व्यापक वस्तूच्या आधारावरच भिन्न भिन्न वस्तु राहू शकतात. त्या स्वतंत्र राहू शकत नाहीत; म्हणून ती व्यापक वस्तु त्या भिन्न वस्तूचे नियमन-म्हणजे उत्पत्ति, स्थिति, लय-करणारी होते.

पुरुष तसाच मुळात व्यापक सत्तारूप असल्यामुळे त्या रूपाने तो सर्व प्रकृति व प्रकृतीच्या कार्याला नियामक आहे, असे येथे दाखविले आहे.

**आणि प्रकृति येणें जिये। याचिया सत्ता जग विये। इयालागीं इये। वरयितु हा॥ १०२५॥**
**अनंते काळें किरीटी। जिया मिळती इया सृष्टी। तिया रिगती ययाच्या पोटीं। कल्पांतसमयीं॥ १०२६॥**

**अर्थ**—पुरुषाच्या योगानेच प्रकृतीला अस्तित्व प्राप्त होते. त्याच्या सत्तेमुळेच तिच्यापासून जगद्रूप कार्य उत्पन्न होते; म्हणून हा प्रकृतीचा भर्तार झाला आहे॥ १०२५॥ प्रलयापर्यंत जो असंख्य काळ असतो, त्या काळात ज्या ह्या सृष्टीमागून सृष्टी उत्पन्न होतात, त्या सर्व प्रलयाचे वेळी पुरुषाच्या ठिकाणी लीन होतात-म्हणजे अव्यक्त होऊन राहतात॥ १०२६॥

**गूढार्थदीपिका**—सृष्टीच्या व्यक्तदशा व अव्यक्तदशा या दोन्ही सत्तारूप पुरुषाच्या ठिकाणी कल्पितच आहेत, असा अर्थ.

**हा महद्ब्रह्मगोसावी। ब्रह्मगोलकलाघवी। अपारपणें मवी। प्रपंचातें॥ १०२७॥**

**अर्थ**—हा पुरुष प्रकृतीचे शासन करणारा असून ब्रह्मांडाचा पसारा दाखविणारा जादुगार आहे. आपल्या अमर्यादपणाने तो प्रपंचालाहि मर्यादा घालणारा आहे॥ १०२७॥

**गूढार्थदीपिका**-अपारपणे मवी। प्रपंचाते—

ज्याप्रमाणे दोरीच्या पृष्ठभागावरच सर्पाचा भास होतो, तरी भ्रमाने सर्व दोरीच सर्परूपाने प्रत्ययाला येते, त्याप्रमाणे अमर्याद परब्रह्मसत्तेवर भासणारा प्रपंचही परब्रह्मासारखा अमर्यादच वाटतो; पण वेदादिकातून प्रपंचाचे उत्पत्ति, नाश सांगितले असल्यामुळे व ते परब्रह्मसत्तेवरच होत असल्यामुळे सत्तारूप परब्रह्म, प्रपंचापेक्षाहि अमर्याद असून त्याच्या मानाने प्रपंच मर्यादितच आहे, असे जे ''अत्यतिष्ठत दशांगुलम्'' या श्रुतीने सिद्ध केले आहे, तेच माउलीनी येथे सांगितले आहे.

**पैं या देहामाझारीं। परमात्मा ऐसी जे परी। बोलिजे ते अवधारीं। ययातेंचि॥ १०२८॥**
**अगा प्रकृतिपरौता। एकु आथी पांडुसुता। ऐसा प्रवादु तो तत्त्वता। पुरुषु हा पैं॥ १०२९॥**

**अर्थ**—या देहामध्ये परमात्मा आहे, असे जे म्हटले जाते, ते यालाच म्हटले जाते, हे लक्षात घे॥ १०२८॥ अर्जुना! प्रकृति पलिकडेहि एक पुरुष आहे, असा ज्यांचा शास्त्रातून उल्लेख आहे. तो पुरुष हाच होय॥ १०२९॥

**गूढार्थदीपिका**—कधी न बदलणारे व अखंड अविनाशी सच्चिदानंदस्वरूप राहणारे असे जे जीवाचे मूळचे शुद्ध स्वरूप आहे त्याला धरून जीवालाच परमात्मा म्हटले जाते व ते विसरल्यामुळे ब्रह्मस्वरूपाविषयी होणारी जी विपरीत कल्पना तिला धरून ब्रह्मालाच जीव म्हटले जाते.

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह। सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते॥ २३॥**

**अर्थ**—वर सांगितल्या प्रमाणे जो, पुरुष व गुणासह प्रकृति यांचे स्वरूप जाणतो, तो प्रारब्धानुसार वर्तन करीत असला, तरी पुनः जन्माला येत नाही—म्हणजे त्याला भौतिक शरीराची प्राप्ति होत नाही॥ २३॥

**जो निखळपणें येणें। पुरुषाते यया जाणें। आणि गुणाचें करणें। प्रकृतीचें तें॥ १०३०॥**
**हें रूप हे छाया। पैल जळ हे माया। ऐसा निवाडु धनंजया। जेवीं कीजे॥ १०३१॥**
**तेणें पाडें अर्जुना। प्रकृतिपुरुषविवंचना। जयाचिया मना। गोचर जाहली॥ १०३२॥**
**तो शरीराचेनि मेळें। करू कां कर्में सकळें। परि आकाश धुई न मैळे। तैसा असे॥ १०३३॥**
**आथिलेनि देहें। जो न घेपे देहमोहें। देह गेलिया नोहे। पुनरपि तो॥ १०३४॥**
**ऐसा तया एकु। प्रकृतिपुरुषविवेकु। उपकारु अलौकिकु। करी पैं गा॥ १०३५॥**
**परि हाचि अंतरीं। विवेक भानूचिया परी। उदैजे ते अवधारीं। उपाय बहुत॥ १०३६॥**

**अर्थ**—जो या पुरुषाला अशा शुद्धपणाने जाणतो व गुणाचे सर्व कर्म ते प्रकृतिचेच आहे. असे समजतो॥ १०३०॥ हे रूप आहे, ही छाया आहे, पलीकडे पाणी आहे, दिसते ती भ्रांति होय, असा ज्याप्रमाणे धनंजया! विवेक करावा त्याप्रमाणेच हा प्रकृतिपुरुषाचा विवेक अर्जुना! ज्याच्या चित्ताला दिसू लागला॥ १०३१-१०३२॥ तो शरीराचा संबंध असतांना विहित-निषिद्ध सर्व अशी कर्मे करो; पण ज्याप्रमाणे आकाश धुळीने मळत नाही, त्याप्रमाणे तोहि त्या कर्मानि लिंपित होत नाही॥ १०३३॥ देह असूनहि ज्याला देहाची आसक्ति नाही, तो देहपात झाल्यावर पुनः जन्माला येत नाही॥ १०३४॥ याप्रमाणे हा एक प्रकृति-पुरुषविवेकच त्याच्यावर अलौकिक उपकार करणारा आहे॥ १०३५॥ पण हा प्रकृति-पुरुष विवेक अंतःकरणांत सूर्याप्रमाणे अखंड प्रकाशरूप राहील असा उत्पन्न झाला पाहिजे. तो ज्या उपायाने उत्पन्न होतो ते उपाय पुष्कळ आहेत, सांगतो ऐक॥ १०३६॥

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना। अन्ये साङ्ख्येन योगेन कर्मयोगेन चाऽपरे॥ २४॥**
**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते। तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः॥ २५॥**

**अर्थ**—कोणी ध्यानाच्या योगाने अंतःकरणवृत्तिद्वारा बुद्धीचे ठिकाणी बुद्धिगत आत्मस्वरूपाला पाहतात. इतर कोणी सांख्ययोगाचे द्वारा व कोणी कर्मयोगाचे द्वारा आत्मस्वरूपाला पाहतात॥ २४॥ हे तिन्ही प्रकार न जाणणारे दुसरे कित्येक केवळ दुसऱ्यापासून श्रवण करण्याचीच उपासना करतात. ते श्रवणपरायण झालेलेहि मृत्यु तरून जातात॥ २५॥

**कोणी एक सुभटा। विचाराचां आगिटां। आत्मानात्मकिटा। पुटें देउनी॥ १०३७॥**
**छत्तीसही वानीभेद। तोडोनियां निर्विवाद। निवडिती शुद्ध। आपणपें॥ १०३८॥**
**तया आपणपयाचां पोटीं। आत्मध्यानाचिया दिठी। देखती गा किरीटी। आपणपेंचि॥ १०३९॥**

**अर्थ**—हे थोर योद्धया अर्जुना! कोणी आपल्या शुद्धचेतन आत्मस्वरूपाचे व देहादिक दृश्य जड पदार्थाचे ऐक्य करून, झालेल्या हीणकस जीवस्वरूपाला विचाररूप अग्नीत पुटे देऊन व छत्तीस प्रकारच्या पदार्थांचा कार्यभेद नि:शेष नाहीसा करून बुद्धीने आपल्याला शुद्ध करून घेतात॥ १०३७-१०३८॥ आणि नंतर, अर्जुना! शुद्ध झालेल्या आपल्या ठिकाणी आत्मध्यानरूपदृष्टीने केवळ आपल्या शुद्ध स्वरूपाला पाहतात॥ १०३९॥

**गूढार्थदीपिका—तया आपणपयाचां पोटी-**

मी वृत्तिपुरता मर्यादित आहे, अशा भ्रांतिसहित बुद्धिवृत्तिगत चैतन्याला जीव म्हणतात. तो ''आपणपयाच्या पोटी''-म्हणजे वृत्तिरूप आपल्याला केवळ, सत्तारूपाने आधार असलेल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी.

**आत्मध्यानाचिया दिठी—**

देह, इंद्रिये मन यांच्या द्वारा शब्दादि विषयाकडे धावणारी अंत:करणवृत्ति विचाराने दृढ आवरून ती अंतर्यामि असणाऱ्या प्रत्यक्स्वरूपाकडे सारखी लावित जाऊन तेथे स्थिर करणे, याला आत्मध्यानदृष्टि म्हणतात.

**देखती गा किरीटी। आपणपेची—**

त्या दृष्टीच्या योगाने प्रत्यक् आत्मस्वरूपाशी ऐक्य करून ''अहंब्रह्मास्मि'' म्हणजे ''मीच ब्रह्म आहे'' असे जाणतो.

मी आत्मस्वरूप आहे अशा ध्यानाने आत्मस्वरूप होणाऱ्याचे हे वर्णन आहे.

कोणाची पूर्वजन्मातील साधनाने परमार्थाची काही तयारी झाली असल्यामुळे वर्तमान जन्मात आत्मानात्मविवेकपूर्वक आत्मध्यानापासून सुरुवात झालेली दिसून येते.

**आणिक पै दैवबगें। चित्त देती सांख्ययोगें। एक ते अंगलगें। कर्माचेनि॥ १०४०॥**

**अर्थ**—आणि दुसरे कित्येक दैववशात् सांख्ययोगाच्या द्वारा, तर कित्येक कर्मयोगरूप भक्तीच्या आश्रयाने आत्मस्वरूपाचे ठिकाणी चित्तवृत्ति लावतात॥ १०४०॥

**गूढार्थदीपिका**—दैवबगे-म्हणजे दैववशात.

पूर्व अनेक जन्मांतील निष्काम विहितकर्मानुष्ठानाने चित्त शुद्ध झाल्यामुळे जन्मत:च वैराग्यसंपन्न होऊन कोणी पुरुष दैवयोगाने सांख्यशास्त्राकडे वळतात, हे ''दैवबगे'' या शब्दाने सूचित केले आहे.

**सांख्ययोग**—म्हणजे प्रकृतिपुरुषाचा विवेक करून मी असंग साक्षिभूत आहे अशी बुद्धिवृत्ति दृढ करणे.

**एक ते अंगलगे। कर्माचेनि—**

कोणाला पूर्व जन्मातील पुण्यसंचयाने वर्तमान जन्मात परमेश्वर प्राप्तिकरिता निष्कामकर्माचरणाची इच्छा होते.

**आणिक एक ते करिती ऐसे। अभिमान दवडूनि देशे। एकाचिया विश्वासे। टेकती बोला॥ १०४१॥**
**जे हिताहित देखती। हानि कणवा घेपती। पुसोनि शीण हरिती। देती सुख॥ १०४२॥**
**तयांचेनि मुखें जे निघे। तेतुलें आदरें चांगें। ऐकोनियां आंगें। मनें होती॥ १०४३॥**
**तया ऐकणेयाचि नांवें। ठेविती गा आघवें। तया अक्षरांसी जीवें। लोण करिती॥ १०४४॥**
**तेही अंतीं कपिध्वजा। इया मरणार्णवसमाजा-। पासूनि निघती वोजा। गोमटिया॥ १०४५॥**

**अर्थ**—कित्येक दुसरे असे करतात की आपण अत्यंत मूढ आहो, हे जाणून व शहाणपणाचा अभिमान सोडून देऊन जीवाचे हित कोणते, अहित कोणते हे जे योग्य रीतीने जाणतात, जीवांच्या झालेल्या हानीची ज्यांना करुणा येते व त्यांची विचारपूस करून व समाधान करून जे त्यांचे दु:ख नाहीसे करतात व सुख देतात, अशा एखाद्या आत्मप्राप्ति करून घेतलेल्या ज्ञान्याच्या शब्दांवर पूर्ण विश्वास ठेवतात॥ १०४१-१०४२॥ अशा साधुपुरुषांच्या मुखातून

जे जे निघेल ते ते आदराने श्रवण करून शरीराने व मनाने त्यांच्यासारखेच जे आचरण करणारे होतात॥ १०४३॥ अशा सत्पुरुषाच्या मुखाने श्रवण होणार आहे, हे कानावर आल्याबरोबर बाकीची सर्व कामे बाजूला सारून जे ऐकतात व त्यांच्या मुखातून निघणाऱ्या अक्षरावर आपला जीवभाव ओवाळून टाकतात॥ १०४४॥ तेहि, अर्जुना! शेवटी याप्रमाणे मरणरूपी समुद्रात बुडालेल्या समाजापासून-म्हणजे या संसारापासून-उत्तम रीतीने बाहेर पडतात॥ १०४५॥

**गूढार्थदीपिका—मरणार्णवसमाज**-म्हणजे मृत्यूने किंवा नाशाने ग्रासिलेला यच्चयावत् पदार्थसमुदाय.

अविनाशी परब्रह्माव्यतिरिक्त जेवढे काही नाशिवंत पदार्थ आहेत, त्या सर्वांना उद्देशून येथे ''समाज'' शब्द वापरला आहे. मरण किंवा नाश याला समुद्राची उपमा देऊन तो संपूर्ण ब्रह्मांडात पसरला आहे, हे सूचित केले आहे.

''श्रद्धा सत्सु विधीयताम्'' या वचनाप्रमाणे ज्यांनी पूर्णपणे परमार्थ स्वाधीन करून घेतला आहे व संसारसुखरूप स्वार्थ ज्यांचा निःशेष नाहीसा झाला असून दुसऱ्याच्या परमार्थसुखाविषयी ज्यांच्या पोटात अत्यंत कळवळा असतो, अशा सत्पुरुषांच्या वचनावर दृढ विश्वास ठेऊन चालणारे देखील कृतार्थ होतात, असा भाव.

**यया चतुर्विधप्रकारे। जे मज मीनले पुरे। तयासी कांही नुरे। भोक्तव्य गा॥ १०४६॥**
**येणें येणें प्रकारें। निस्तरती साचोकारें। हें भवकाउरें। आघवेंचि॥ १०४७॥**
**ऐसे हे उपाये। बहुवस एथें पाहे। जाणावया होये। एकी वस्तु॥ १०४८॥**
**आतां पुरे हें बहुत। पैं सर्वार्थाचें मथित। सिद्धांतनवनीत। देऊं तुज॥ १०४९॥**
**येतुलेनि पांडुसुता। अनुभव लाहाणा आयिता। येर तंव तुज होतां। सायास नाहीं॥ १०५०॥**
**म्हणोनि ते बुद्धि रचूं। मतवाद हे खांचूं। सोलींव निर्वचूं। फलितार्थचि॥ १०५१॥**

**अर्थ**—याप्रमाणे चार प्रकारांनी जे माझ्या ठिकाणी पूर्णपणे ऐक्य पावले त्यांच्या ठिकाणी भोगण्याकरिता प्रारब्धच उरत नाही॥ १०४६॥ या निरनिराळ्या प्रकारांनी हे संपूर्ण संसाररूप दुःखापत्तीतून निःसंशय पार पडतात॥ १०४७॥ याप्रमाणे अद्वैतब्रह्मवस्तु जाणण्याकरिता असे हे पुष्कळ उपाय येथे आहेत॥ १०४८॥ आता हे बहु बोलणे पुरे करू व सांगितलेल्या सर्व उपायरूप अर्थाचे मंथन करून काढलेले सिद्धान्तभूत नवनीत तुला देतो॥ १०४९॥ (अन्वयः-पंडुसुता येतुलेनि तुज आयिता अनुभव लाहाणा होतां तव येर सायास नाही) अर्जुना! येवढ्यानेच तुला अनुभवाचा सहज लाभ झाला असता मग इतर श्रम करावे लागणार नाहीत॥ १०५०॥ म्हणून या सिद्धान्तभूत नवनीताची बुद्धीने मांडणी करून व विरोधीमताचे खंडन करून निर्भेळ व सर्व निरूपणाचा निष्कर्षभूत अर्थच तुला सांगतो॥ १०५१॥

**यावत्सञ्जायते किञ्चित्सत्त्वं स्थावरजङ्गमम्। क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ॥ २६॥**

**अर्थ**—भरतश्रेष्ठा अर्जुना! जेवढी काही सजीव निर्जीव जीवसृष्टि उत्पन्न होते, ती सर्व, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगानेच होते, असे जाण॥ २६॥

**तरी क्षेत्रज्ञ येणें बोलें। तुज आपणपें जें दाविलें। आणि क्षेत्रही सांगितलें। आघवें चि॥ १०५२॥**
**तया येरयेरांच्या मेळीं। होइजे भूतीं सकळीं। अनिलसंगें जळी। कल्लोळ जैसें॥ १०५३॥**
**कां तेजा आणि उखरा। भेटी जालिया वीरा। मृगजळाचिया पूरा। रूप होय॥ १०५४॥**
**नाना धाराधरधारीं। झळंबलिया वसुंधरी। उठिजे जेवीं अंकुरीं। नानाविधीं॥ १०५५॥**
**तैसें चराचर आघवें। जें कांहीं जीवु येणें नांवें। तें तों उभययोगें संभवे। ऐसें जाण॥ १०५६॥**
**इयालागीं अर्जुना। क्षेत्रज्ञा प्रधाना-। पासूनि न होती भिन्ना। भूतव्यक्ति॥ १०५७॥**

**अर्थ**—क्षेत्रज्ञ या शब्दाने स्वतः तूच आहे, असे जे दाखवून दिले आणि जे संपूर्ण क्षेत्र तेहि तुला सांगितले॥ १०५२॥ ज्याप्रमाणे पाण्याशी वायूचा संबंध झाला असता पाण्यावर लाटा उत्पन्न होतात, त्याप्रमाणेच क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा परस्पर संबंध झाला असताच सर्व प्राणिसृष्टि उत्पन्न होऊ शकते॥ १०५३॥ किंवा वीरा! सूर्य व

बरड जमीन यांचा संबंध झाला असता मृगजळाचा पूर व्यक्त होतो॥ १०५४॥ किंवा ज्याप्रमाणे पावसाच्या धारांनी पृथ्वी भिजली असताच नाना प्रकारचे अंकुर उत्पन्न होतात॥ १०५५॥ त्याप्रमाणे जीव या नावाने जेवढे काही सजीव-निर्जीव आहेत, ते क्षेत्र व क्षेत्रज्ञ या दोघांच्या संगाने उत्पन्न होतात, असे जाण॥ १०५६॥ म्हणून अर्जुना! क्षेत्रज्ञ व प्रधान यापासून सर्व भूते भिन्न मानता येत नाहीत॥ १०५७॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् । विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति॥ २७॥**

**अर्थ**—सर्व नाशिवंत भूताचे ठिकाणी परमेश्वर हा नाश न पावणारा असा एक समस्वरूप आहे, असे जो पाहतो, तोच खरोखर पाहतो॥ २७॥

**पैं पटत्व तंतु नव्हे। तरि तंतूचि तें आहे। ऐसां खोलीं डोळां पाहें। ऐक्य हें गा॥ १०५८॥**
**भूतें आघवींचि होती। एकाचीं एक आहाती। परी पैं भूतप्रतीतीं। वेगळीक असे॥ १०५९॥**
**यांचीं नामेंही आनानें। अनारिसी वर्तनें। वेषही सिनाने। आघवे यांचे॥ १०६०॥**
**ऐसें देखोनि किरीटी। भेद सूसी हन पोटीं। तरि जन्माचिया कोटी। न लाहसी निघों॥ १०६१॥**
**पैं नाना प्रयोजनशीळें। दीर्घें वक्रें वर्तुळें। होती एकीचींच फळें। तुंबिणीयेचीं॥ १०६२॥**
**होतु कां उजू वांकुडें। परि बोरींचे हें न मोडे। तैसी भूतें अवघडें। परि वस्तु उजू॥ १०६३॥**
**अंगारकणीं बहुवसीं। उष्णता समान जैशी। तैसा नाना जीवराशीं। परेशु असे॥ १०६४॥**
**गगनभरी धारा। परी पाणी एकचि वीरा। तैसा या भूताकारा। सर्वांगीं तो॥ १०६५॥**
**हे भूतग्राम विषम। परी वस्तु ते एथ सम। घटमठीं व्योम। जियापरी॥ १०६६॥**
**हा नाशतां भूताभासु। एथ आत्मा तो अविनाशु। जैसा केयूरादिकीं कसु। सुवर्णाचा॥ १०६७॥**
**एवं जीवधर्महीनु। जो जीवेसीं अभिन्नु। देखे तो सुनयनु। ज्ञानियांमाजीं॥ १०६८॥**
**ज्ञानाचा डोळा डोळसां-। माजीं डोळस तो वीरेशा। हे स्तुति नोहे बहुवसा। भाग्याचा तो॥ १०६९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पटत्व तंतूहून निराळे दिसत असले, तरी सूत काढून टाकले असता पटत्व निःशेष नाहीसे होते. म्हणून पटत्व तंतूच आहे, त्याप्रमाणे क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे ऐक्य आहे असा खोल विचार करून पाहा॥ १०५८॥ सर्व सृष्टि जीवमात्रच आहे व एकापासून झाली आहे; पण ती भूते अलग अलग आहेत अशी प्रतीति येते॥ १०५९॥ या सर्वांची नावें निराळी, वागणूक निराळी व वेषहि निराळे॥ १०६०॥ असे पाहून, अर्जुना! हे सर्व भिन्न आहेत, असा जर भेद मनात वागविशील, तर अनंत जन्माच्या फेऱ्यातून तू बाहेर निघू शकणार नाहीस॥ १०६१॥ निरनिराळ्या उपयोगाला पडणारी व लांब, वाकडी, तिकडी, गोल अशी फळे असली तरी ज्याप्रमाणे ती एका दुध्या भोपळ्याचीच असतात॥ १०६२॥ किंवा बोरीचे लाकूड सरळ असो की वाकडे असो ते बोरीचे नव्हे, असे होत नाही, त्याप्रमाणे भूते नाना प्रकारची घडली असली तरी त्यातील वस्तु मात्र सरळ समस्वरूपच आहे॥ १०६३॥ पुष्कळशा अग्नीच्या ठिणग्यात उष्णता एकसारखीच असते, त्याप्रमाणे नाना प्रकारच्या जीवसमुदायात परमात्मा एकसारखा समच आहे॥ १०६४॥ सर्वत्र आकाशातून पावसाच्या धारा सुरु झाल्या तरी, हे वीरा! पाणी एकच असते, त्याप्रमाणे या भूताकारात एक परमात्माच वस्तुरूपाने त्यांच्या सर्वांगी वसत आहे॥ १०६५॥ ज्याप्रमाणे विषम आकार हे घटामठाचे असले तरी त्यातील आकाश सम असते, विषम होत नाही, त्याप्रमाणे जीवसृष्टि विषम असली तरी, त्यातील परब्रह्मवस्तु समच असते, विषम नसते॥ १०६६॥ ज्याप्रमाणे सोन्याचे बाहुली वगैरे अलंकार निराळ्या आकाराचे असले तरी, त्यांच्या सोन्याचा कस एकच असतो, त्याप्रमाणे जीवरूपी भूतांचा भास नाश पावत असला तरी सत्तारूप आत्मा तो अविनाशीच असतो॥ १०६७॥ याप्रमाणे सर्वांच्या अंतर्यामि राहणारा परमात्मा कोण्या ठिकाणी जीवाहून भिन्न नाही; पण त्या जीवाचे गुणधर्म नाहीत, असे जो पाहतो, तोच ''ज्ञानियामाजी'' म्हणजे चर्मचक्षूने जाणणाऱ्या मनुष्यामध्ये 'सुनयन' म्हणजे खरा डोळस होय॥ १०६८॥ हे वीरश्रेष्ठा! हा ज्ञानाचा डोळा ज्याला प्राप्त झाला तो पुरुष सर्व डोळस पुरुषांमध्ये डोळस होय. ही त्याची स्तुति नसून खरोखर तो थोर भाग्याचा होय॥ १०६९॥

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्। न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्॥ २८॥**

**अर्थ**—सर्वत्र समस्वरूपाने स्थित असलेल्या परमेश्वराला समस्वरूपाने जाणले असतां तोच आपण आपला घात करून घेत नाही; म्हणून तो परागतीला प्राप्त होतो॥ २८॥

**जे गुणेंद्रिय धोकटी। देह धातूंची त्रिकुटी। पांचमेळावा वोखटी। दारुण हे॥ १०७०॥**
**हे उघड पांचवेउली। हे पंचधा आगीं लागली। जीवपंचानना सांपडली। हरिणकुटी हे॥ १०७१॥**

**अर्थ**—हा देह म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश या पांच भूताच्या मेळाव्याने व कफ, वात, पित्त या धातूच्या त्रिकूटाने बनलेले व ज्यांत गुण, इंद्रिये ठेवली आहेत अशी फार वाईट खोळ होय॥ १०७०॥ हिला पाच इंद्रियांच्या द्वारा पंचविषयरूप पाच प्रकारच्या आगी लागून अति तप्त होत असते; म्हणून ही पांच नांगी असलेली उघड इंगळीच आहे. देह हा जीवरूप सिंहाला सांपडलेली हरिणकुटीच होय॥ १०७१॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे सिंहाला हरिणकुटी सापडून तिचा नाश होतो, पण सिंहाचा नाश होत नाही, त्याप्रमाणे ज्यांत गुण, इंद्रिये, धातु व पंचमहाभूते आहेत असा प्राप्त झालेला देह नाश पावत असला तरी तो जीव नाश पावत नाही.

**ऐसा असोनि इये शरीरीं। कोण नित्यबुद्धीची सुरी। अनित्यभावाचां उदरीं। दाटीचिना॥ १०७२॥**

**अर्थ**—जीव या शरीरात अशा प्रकारचा असल्यामुळे अनित्यभावाच्या उरात नित्यबुद्धीची सुरी कोण खुपसु शकत नाही हे समजत नाही॥ १०७२॥

**गूढार्थदीपिका**—जीव हा आपल्या अविनाशी स्वरूपांचा विचार करीत नाही व देहाशी ऐक्य पावून जन्ममरणाचा अनुभव घेतो.

**परी इये देहीं असतां। जो न येचि आपणया घाता। आणि शेखीं पंडुसुता। तेथेंचि मिळे॥ १०७३॥**

**अर्थ**—पण या देहात असतानाच जो आपल्या अविनाशित्वाचा अनुभव घेतो तो आपला (जन्ममरणरूप) घात करून घेत नाही आणि शेवटी, अर्जुना! तेथेच (आपल्या) मूळस्वरूपांत मिळतो॥ १०७३॥

**गूढार्थदीपिका**—जीव हा अविनाशीच असल्यामुळे विचाराने हे जाणून "मी सम आहे" अशी बुद्धी धारण केली व देहबुद्धी सोडली की तो आपल्या मूळच्या स्वरूपाला प्राप्त होतो.

**जेथ योगज्ञानाचिया प्रौढी। वोलांडूनियां जन्मकोडी। न निगों इया भाषा बुडी। देती योगी॥ १०७४॥**
**जें आकाराचें पैल तीर। जें नादाची पैल मेर। तुर्येचें माजघर। परब्रह्म जें॥ १०७५॥**

**अर्थ**—योगी योगज्ञानाच्या संपत्तीने थोर होऊन, हजारो जन्म ओलांडून व त्यातून आता निघायचे नाही असे म्हणून ज्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी बुडी मारतात॥ १०७४॥ जे आकाराचे पलीकडील तीर होय-म्हणजे जेथे आकारच नाही. जे नादाची पलीकडील मर्यादा आहे. जे तूर्या अवस्थेचे माजघर असून ज्याला परब्रह्म म्हणतात॥ १०७५॥

**गूढार्थदीपिका**—तूर्यावस्था ही जीवब्रह्मैक्याची जाणीवरूप अवस्था असल्यामुळे व परब्रह्म जाणीवरहित असल्यामुळे किंवा तुर्यावस्था परब्रह्मस्वरूपावरच भासत असल्यामुळे येथे परब्रह्माला तुर्येचे माजघर म्हटले आहे.

**मोक्षासकट गती। जेथें येती विश्रांती। गंगादि अपांपती। सरिता जेवीं॥ १०७६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे समुद्राचे ठिकाणी गंगादि सर्व नद्यांची गति थांबते, त्याप्रमाणे ज्याच्या ठिकाणी मोक्षासकट संपूर्ण गती थांबतात॥ १०७६॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्मात मिळाल्यानंतर 'मी कधी बद्ध नव्हतो' असा अनुभव येत असल्यामुळे मोक्षगतीही खोटीच ठरते, असा अर्थ.

**तें सुख येणेंचि देहें। पाय पाखाळणिया लाहे। जो भूतवैषम्यें नोहे। विषमबुद्धी॥ १०७७॥**
**दीपांचां कोडीं जैसें। एकचि तेज सरिसें। तैसा जो असे। सर्वत्र ईशु॥ १०७८॥**

**ऐसेनि समत्वें पंडुसुता। जिये जो देखतसांता। तो मरण आणि जीविता। नागवे फुडा॥ १०७९॥**
**म्हणोनि तो दैवागळा। वानीत असो वेळोवेळां। जे साम्यसेजे डोळा। लागला तया॥ १०८०॥**

**अर्थ**—भूतांची विषमता दिसत असली तरी ज्याची बुद्धि विषम होत नाही, त्या पुरुषाला ते परब्रह्मसुख याच देहांत पादप्रक्षालनाकरिता प्राप्त होते-म्हणजे अत्यंत सुलभ होते॥ १०७७॥ ज्या प्रमाणे हजारो दिव्यांचे तेज एकसारखेच असते, त्याप्रमाणे जो सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी मूळचा सत्तारूपाने असलेला ईश्वर होऊन असतो॥ १०७८॥ अर्जुना! अशा साक्षित्वाने आपल्याला पाहत जो जगतो, तो कधीच जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडत नाही॥ १०७९॥ म्हणून साम्यरूपी शय्येवर त्याला झोप लागलेली असते. या कारणानेच आम्ही त्याची विशेष भाग्यवान म्हणून वारंवार स्तुति करीत असतो॥ १०८०॥

**गूढार्थदीपिका**—ज्याला संसारात सर्व सुखाची प्राप्ति झालेली असते, त्याला भाग्यवान म्हणतात. पण त्यालाहि सुखाच्या प्राप्तीचा प्रयत्न करीतच राहावे लागते आणि त्याच्या ठिकाणी कमतरताच दिसून येते. पण ब्रह्मसुखाची प्राप्ति झाली असता सुखप्राप्तीची इच्छाच राहत नाही व प्रयत्नहि खुंटतो. म्हणून या ब्रह्मसुखाची ज्याला प्राप्ति झाली तो खरा आगळा भाग्यवान होय.

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः। यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति॥ २९॥**

**अर्थ**—संपूर्ण कर्मे प्रकृतिकडून केली जाणारी आहेत हे जाणून आपल्याला "मी अकर्ता आहे" असे जो जाणतो, तोच खरोखर पाहतो॥ २९॥

**आणि मनोबुद्धिप्रमुखें। कर्मेंद्रियें अशेखें। करी प्रकृतीचि हें देखे। साचें जो गा॥ १०८१॥**
**घरींचीं राहटतीं घरीं। घर कांही न करी। अभ्र धांवें अंबरी। अंबर तें उगें॥ १०८२॥**
**तैसी प्रकृति आत्मप्रभा। खेळे गुणीं विविधारंभा। येथ आत्मा तो वोथंबा। नेणे कोण॥ १०८३॥**
**ऐसेनि येणें निवाडें। जयाचां जीवीं उजिवडें। अकर्तयातें फुडें। देखिलें तेणें॥ १०८४॥**

**अर्थ**—मन आणि बुद्धि ज्या कर्मेंद्रियात मुख्य आहेत त्या संपूर्ण कर्मेंद्रियांकडून प्रकृतिच कर्म करविते, हे ज्याला खरोखर कळले आहे॥ १०८१॥ घरात राहणारी माणसेच घरात वावरतात. घर काही करत नाही. आकाशात आलेले मेघच इकडे तिकडे धावतात; पण आकाश स्थिर असते॥ १०८२॥ त्याप्रमाणे आत्मचैतन्याच्या प्रकाशाने त्रिगुणात्मक प्रकृति नाना कर्मप्रवृत्तिरूप खेळ करते. तेथे त्या कर्माचे ठिकाणी आत्मा खांबासारखा अचल असतो. तो कोणते कर्म झाले, हे काही जाणत नाही॥ १०८३॥ अशा या आत्मानात्मविवेकाने ज्याच्या अंत:करणात ज्ञानप्रकाश झाला, त्यानेच 'मी अकर्ता आहे' असे आपल्याला स्पष्ट जाणले॥ १०८४॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति। तत एव च विस्तारं ब्रह्म सम्पद्यते तदा॥ ३०॥**

**अर्थ**—जेव्हा निरनिराळी दिसणारी भूते एका ब्रह्मवस्तूचे ठिकाणी आहेत व त्यापासूनच संपूर्ण भूतविस्तार झाला आहे असे कळते, तेव्हाच तो (जीव) ब्रह्मस्वरूप होतो॥ ३०॥

**एऱ्हवीं तैंचि अर्जुना। होईजे ब्रह्मसंपन्ना। जैं या भूताकृती भिन्ना। दिसती एकी॥ १०८५॥**
**लहरी जैसिया जळीं। परमाणुकणिका स्थळीं। रश्मीकर मंडळीं। सूर्याच्या जेवीं॥ १०८६॥**
**नातरी देहीं अवेव। मनीं आधवेचि भाव। विस्फुलिंग सावेव। वन्हीं एकीं॥ १०८७॥**
**तैसे भूताकार एकाचे। हें दिठी रिगे जैं साचें। तैंचि ब्रह्मसंपत्तीचें। तारूं लागे॥ १०८८॥**

**अर्थ**—नाहीतरी, अर्जुना! या जीवाला जेव्हा भिन्न भिन्न भूते एका अद्वैतपरब्रह्माचे ठिकाणी दिसू लागतात तेव्हाच हा जीव ब्रह्मस्वरूप होऊ शकतो॥ १०८५॥ ज्याप्रमाणे पाण्यावर त्याच्याच लहरी, पृथ्वीवर तिचेच परमाणुरूप कण, सूर्यमंडळाचे ठिकाणी किरणे॥ १०८६॥ किंवा देहाच्या ठिकाणी अवयव, मनाच्या ठिकाणी सर्व विकारभाव, अग्नीच्या ठिणग्या असतात॥ १०८७॥ त्याप्रमाणे संपूर्ण भूतांचे आकार एका अद्वैत परब्रह्माचेच होत, हे खरे तत्त्व जेव्हा बुद्धीत ठसते, तेव्हाच संसारसमुद्रावर असलेले ब्रह्मस्वरूपतेचे जहाज हाती लागते॥ १०८८॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माहून दुसरे जेवढे काही सत्य वाटते, ते बाजूला सारल्यावर परब्रह्म हे त्या सर्वांविरहित केवळ सत्तास्वरूप, अद्वैत, निर्गुण आहे, असे ज्ञान होते; पण या ज्ञानाची येथेच समाप्ति नाही. परब्रह्म अद्वैत असल्यामुळे त्याहून दुसरी वस्तूच राहू शकत नाही; म्हणून परब्रह्माहून जेवढे काही निराळे केले होते त्यातहि परब्रह्मच भरून राहत असल्यामुळे ते सर्व परब्रह्मरूपच आहे, असा व्यापक अनुभव आला असता सगुण निर्गुण एकरूप होऊन जातात, असेच श्रीएकनाथ महाराजांनी ''सगुण निर्गुण हरिपायी'' या अभंगात सांगितले असून आचार्यांनीहि असाच आपला अनुभव ''तरंगफेनभ्रमबुद्बुदादि सर्व स्वरूपेण जलं यथातथा। तथैव देहाद्यहमंतमेतत् सर्व चिदेवैकरसं विशुद्धम्॥'' या श्लोकाने सांगितला आहे. अशा या प्रत्ययालाच अन्वयाचा प्रत्यय म्हणतात. येथे ज्ञानाची पूर्णता होते.

**मग जयातयाकडे। ब्रह्मचि दिठी उघडे। किंबहुना जोडे। अपार सुख॥ १०८९॥**

**अर्थ**—मग दृष्टीने जिकडे पाहावे तिकडे स्पष्ट ब्रह्मच दिसू लागते. एवढेच नाही तर अमर्याद सुख प्राप्त होते॥ १०८९॥

**गूढार्थदीपिका**—हा परब्रह्माचा व्यापक अनुभव आला असता या अनुभवात मिथ्या म्हणून उपेक्षणीय काहीच उरत नसल्यामुळे सर्वत्र ब्रह्मविषयक प्रेमदृष्टिच होऊ लागते. या प्रेमदृष्टिलाच व्यापकभक्ति म्हणतात व तिच्या योगाने अपार सुखाचा लाभहि होतो, असे येथे सुचविले आहे.

**येतुलेनि तुज पार्था। प्रकृतिपुरुषव्यवस्था। ठायेंठावो प्रतीतिपथा-। माजीं जाहली॥ १०९०॥**
**अमृत जैसें ये चुळा। कां निधान देखिजे डोळां। तेतुला जिव्हाळा। मानावा हा॥ १०९१॥**
**हा जी जाहलिये प्रतीती। घर बांधणें जें चित्तीं। तें आतां ना सुभद्रापती। इयावरी॥ १०९२॥**
**तरी एकदोन्ही ते बोल। बोलिजती सखोल। देंई मनातें वोल। मग ते घेंई॥ १०९३॥**
**ऐसें देवें म्हणितलें। मग बोलों आदरिलें। तेथें अवधानाचेंचि केलें। सर्वांग येरें॥ १०९४॥**

**अर्थ**—अर्जुना! इतक्या निरूपणाने प्रकृति-पुरुष निवाडा यथास्थितपणे तुझ्या अनुभवाला आला॥ १०९०॥ गुळणा करण्याकरिता अमृत मिळाले असता अत्यानंद होऊन ते थुंकून देऊन त्याची उपेक्षा करवत नाही किंवा द्रव्याचा मोठा ठेवा डोळ्याला दिसला असता त्याची उपेक्षा करवत नाही, त्याप्रमाणे या अन्वयरूप व्यापक प्रत्ययाचे ठिकाणी तसाच प्रेम जिव्हाळा असू दे॥ १०९१॥ प्रकृतिपुरुषाच्या आलेल्या प्रत्ययाला जे चित्तांत घर बांधायचे असते-(म्हणजे जो अनुभव चित्तात दृढ करावयाचा असतो) तो, हे अर्जुना! आता यानंतरच नाही का?॥ १०९२॥ त्याविषयी गूढ अर्थाने भरलेले आहे, असे एक-दोन शब्द सांगतो. तू आपल्या मनाला माझ्याकडे गहाण ठेऊन मग ते बोल ग्रहण कर॥ १०९३॥ असे देवाने म्हणून बोलायला सुरुवात केली. तेथे अर्जुनाने आपले सर्वांगच केवळ अवधानरूप केले॥ १०९४॥

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः। शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते॥ ३१॥**

**अर्थ**—हा परमात्मा अनादि व निर्गुण असल्यामुळे अविनाशी आहे. म्हणून, हे अर्जुना! तो शरीरात आहे, तरी काही कर्म करीत नाही व कर्मात लिप्त होत नाही॥ ३१॥

**तरि परमात्मा म्हणिपे। तो ऐसा जाण स्वरूपें। जळीं जळें न लिंपे। सूर्यु जैसा॥ १०९५॥**
**कां जे जळा आदीं पाठीं। सूर्य असतुचि असे किरीटी। माजीं बिंबे तें दृष्टी। आणिकांचिये॥ १०९६॥**
**तैसा आत्मा देहीं। आथि म्हणिपे हें कांहीं। साचें तरी नाहीं। तो जेथिंचा तेथें॥ १०९७॥**
**आरिसां मुख जैसें। बिंबलिया नाम असे। देहीं वसणें तैसें। आत्मतत्त्वा॥ १०९८॥**
**तया देहा म्हणती भेटी। हे सपायी निर्जीव गोठी। वारिया वाळुवे गांठी। केंही आहे॥ १०९९॥**

**अर्थ**—ज्याला परमात्मा म्हणतात, तो स्वरूपाने, ज्याप्रमाणे जलातील सुर्य जलाने लिंपित होत नाही, त्याप्रमाणे आहे, असे जाण॥ १०९५॥ कारण, अर्जुना! तो सूर्य पाण्याच्या पूर्वी व नंतरहि असलेलाच असतो; पण त्याचे

पाण्यात प्रतिबिंबित होणे, हे इतरांच्या दृष्टीने असते ॥ १०९६ ॥ त्याप्रमाणे आत्मा देहाच्या ठिकाणी आहे, हे जे काही म्हटले जाते, ते खरे नाही. तो जेथल्या तेथेच असतो ॥ १०९७ ॥ ज्याप्रमाणे आरशाच्या बाहेर असलेले मुख आरशात दिसले असता आपण त्याला आरशातील मुख म्हणतो, त्याप्रमाणे आत्मतत्त्वाचे, देहाच्या ठिकाणी असणे आहे ॥ १०९८ ॥ या आत्मतत्त्वाचा व देहाचा संबंध आहे, या म्हणण्यात काहीच अर्थ नाही. वारा आणि वाळू यांची गाठ कोणी बांधली आहे काय? ॥ १०९९ ॥

**गूढार्थदीपिका**—दोन सत्य पदार्थाचा संबंध होतो. पण क्षेत्रज्ञ व क्षेत्र या दोन पदार्थाचा संबंध आहे असे जे साधकाला वाटते त्याचा आत्मानात्मविवेकाने विचार केला असता क्षेत्रज्ञ आत्मा खरोखर अमर्याद, नित्य व अविनाशीस्वरूप असून क्षेत्र हे अज्ञानभ्रांतिकल्पनाजन्य आहे-म्हणजे त्याचे खरोखर अस्तित्वच नाही-असे सिद्ध होत असल्यामुळे या दोन सत्यमिथ्या अशा पदार्थाचा संबंध होणेच शक्य नाही, असे माउलीचे येथे वेदान्तानुसार म्हणणे आहे.

**आगी आणि कापुसा। दोरा सुवावा कैसा। केउता सांदा आकाशा। पृथ्वीयेसी ॥ ११०० ॥**
**एक निघे पूर्वेकडे। एक तें पश्चिमेकडे। तिये भेटीचेनि पाडें। संबंधु हा ॥ ११०१ ॥**
**उजियेडा आणि अंधारेया। जो पाडु मृता उभया। तोचि गा आत्मया। देहा जाण ॥ ११०२ ॥**
**रात्री आणि दिवसा। कनका आणि कापुसा। अपाडु कां जैसा। तैसाचि यासी ॥ ११०३ ॥**
**देह तंव पांचांचें जालें। हें कर्माचे गुणीं गुंथलें। भंवतसे चाकी सूदलें। जन्ममृत्यूच्या ॥ ११०४ ॥**
**हें काळानळाचां कुंडीं। घातली लोणियाची उंडी। माशी पांख पाखडी। तंव हें सरे ॥ ११०५ ॥**
**हें विपायें आगी पडे। तरी भस्म होऊनि उडे। जाहलें श्वाना वरपडें। तरी ते विष्ठा ॥ ११०६ ॥**
**या चुके दोन्ही काजा। तरी होय कृमींचा पुंजा। हा परिणामु कपिध्वजा। कश्मल गा ॥ ११०७ ॥**
**या देहाची हे दशा। आणि आत्मा तो एथ ऐसा। पैं शुद्ध नित्य आपैसा। अनादिपणें ॥ ११०८ ॥**
**सकळु ना निष्कळु। अक्रियु ना क्रियाशीळु। कृश ना स्थूळु। निर्गुणपणें ॥ ११०९ ॥**

**अर्थ**—अग्नि आणि कापूस यात दोरा कसा ओवता येईल? आकाश व पृथ्वी यांचा सांधा कसा जोडला जाणार? ॥ ११०० ॥ एक पूर्वेकडे व एक पश्चिमेकडे जाण्याला निघाले असता त्यांची भेट होण्यासारखाच देह व आत्मा यांचा संबंध आहे ॥ ११०१ ॥ उजेड व आंधार किंवा मेलेला व जिवंत यांची ज्या मानाने बरोबरी आहे, तशीच बरोबरी देह व आत्मा यांची आहे, असे जाण ॥ ११०२ ॥ रात्र आणि दिवस, सोने आणि कापूस हे जितके अजोड आहेत तितकीच देह आणि आत्मा यांची बरोबरी आहे ॥ ११०३ ॥ देह हा पंचभूताचा बनला असून कर्माच्या गुणांनी बांधला जाऊन जन्ममृत्यूच्या चाकावर घातल्यामुळे फिरत आहे ॥ ११०४ ॥ हे शरीर काळरूपी अग्नीच्या तोंडात घातलेला लोण्याचा गोळा होय. माशीला फडफडण्याला जितका वेळ लागतो तितक्या वेळात ते नाहीसे होते ॥ ११०५ ॥ जर हे शरीर अग्नीत पडले तर त्याचे भस्म होऊन ते नाहीसे होते. कुत्र्याच्या हातीं लागून ते त्याने खाल्ले तर त्याची विष्ठा होते ॥ ११०६ ॥ या दोन्ही प्रकारातून वाचले तर ते कृमीचा ढीग होते. हे अर्जुना! याप्रमाणे या देहाचा परिणाम वाईट होतो ॥ ११०७ ॥ या देहाची अशी दशा होते आणि आत्मा याच्या उलट असा आहे. तो अनादि असल्यामुळे सहज नित्य शुद्ध आहे ॥ ११०८ ॥ निर्गुण असल्यामुळे तो कळासहित नाही व कळारहित नाही. तो क्रियारहित नाही व सक्रिय नाही. तो कृश नाही व स्थूळ नाही ॥ ११०९ ॥

**गूढार्थदीपिका**—परमात्मा निर्गुण आहे—म्हणजे त्याचे ठिकाणी त्रिगुणात्मक मायेपासून झालेल्या जगताचे ठिकाणी दिसून येणारे कोणतेहि पांचभौतिक धर्म व गुण नाहीत असे जे आम्ही विधान केले आहे ते माउलीच्या या व पुढील ओव्याच्या आधारेच होय.

**आभासु ना निराभासु। प्रकाशु ना अप्रकाशु। अल्प ना बहुवसु। अरूपपणें ॥ १११० ॥**
**रिता ना भरितु। रहितु ना सहितु। मूर्तु ना अमूर्तु। शून्यपणें ॥ ११११ ॥**

**आनंदु ना निरानंदु। एकु ना विविधु। मुक्त ना बद्धु। आत्मपणें॥ १११२॥**
**येतुला ना तेतुला। आइता ना रचिला। बोलता ना उगला। अलक्षपणें॥ १११३॥**
**सृष्टीचां होणां न रचे। सर्वसंहारें न वेंचे। आथी नाथी या दोहींचें। पंचत्व हा॥ १११४॥**
**मवे ना चर्चे। वाढे ना खांचे। विटे ना वेंचे। अव्ययपणें॥ १११५॥**
**एवंरूप पैं आत्मा। देहीं जें म्हणती प्रियोत्तमा। तें मठाकारें व्योमा। नाम जैसें॥ १११६॥**
**तैसें तयाचिये अनुस्यूती। होती जाती देहाकृती। तो घे ना सांडी सुमती। जैसा तैसा॥ १११७॥**
**अहोरात्रें जैशीं। येती जाती आकाशीं। आत्मसत्ते तैसीं। देहें जाण॥ १११८॥**
**म्हणोनि इये शरीरीं। कांहीं करवी ना करी। आयताही व्यापारीं। सज्जु न होय॥ १११९॥**
**यालागीं स्वरूपें। उणा पुरा न घेपे। हें असो तो न लिंपे। देहीं देहा॥ ११२०॥**

**अर्थ**—भौतिक रूप नसल्यामुळे तो दिसणारा नाही किंवा न दिसणारा नाही, तो प्रकाशरूप नाही, तो अंधाररूप नाही, तो थोडा नाही किंवा बहु नाही॥ १११०॥ केवळ सत्तारूप असल्यामुळे तो कोठे रिकामा आहे किंवा कोठे भरला आहे असे नाही. तो कशा वांचून आहे असे नाही किंवा कशासहित आहे असे नाही. तो मूर्त नाही किंवा अमूर्त नाही॥ ११११॥ प्रत्यक् आत्मस्वरूप असल्यामुळे तो आनंदसहित नाही व आनंदरहित नाही. तो एक नाही किंवा अनेक नाही. तो मुक्त नाही किंवा बद्ध नाही॥ १११२॥ ज्ञानाचा विषय होत नसल्यामुळे तो एवढा नाही किंवा तेवढा नाही. तो आयता नाही किंवा निर्माण केलेला नाही. तो बोलणारा नाही किंवा उगा राहणारा नाही॥ १११३॥ सृष्टीच्या उत्पत्तीने तो उत्पन्न होत नाही किंवा तिचा संहार झाला असता तो नाहीसा होत नाही. "आहे-नाही" या दोहोलाहि तो नाहीसा करणारा आहे.॥ १११४॥ अविनाशी असल्यामुळे तो मोजला जात नाही किंवा बोलला जात नाही. तो वाढत नाही व कमी होत नाही. तो विटला जात नाही किंवा खर्च होत नाही॥ १११५॥ हे प्रियोत्तमा अर्जुना! अशा प्रकारचा आत्मा देहाच्या ठिकाणी आहे, असे जे लोक म्हणतात ते आकाशाला मठाकार झाले असता मठाकाश म्हणण्यासारखे आहे॥ १११६॥ हे शुद्धबुद्धि अर्जुना! त्याप्रमाणे त्याच्या सर्वत्र व्यापक सत्तेवरच सर्व देहाकार उत्पन्न होतात व नाश पावतात. तो देहाकार घेत नाही व सोडतहि नाही. तो जशाचा तसाच असतो॥ १११७॥ ज्याप्रमाणे दिवस-रात्र आकाशात येतात व जातात, त्याप्रमाणे आत्मसत्तेवर देह होतात व जातात हे जाण॥ १११८॥ म्हणून या शरीराचे ठिकाणी तो काही करवित नाही व करत नाही. आयत्या प्रकृतिकडून होत असलेल्या व्यापारांतहि तो भाग घेण्यास तयार होत नाही॥ १११९॥ म्हणूनच पूर्ण स्वरूप असल्यामुळे तो उणेपणा-पूरेपणा घेत नाही. हे असो तो देहांत असून देहाशी लिप्त होत नाही॥ ११२०॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते। सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते॥ ३२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आकाश सूक्ष्म असल्यामुळे सर्व वस्तूंचे ठिकाणी व्यापून असूनहि कशाने लिप्त होत नाही, त्याप्रमाणे आत्मा आकाशाहूनहि सूक्ष्म असल्यामुळे सर्वत्र देहात राहूनहि देहाने लिप्त होत नाही॥ ३२॥

**अगा आकाश कें नाहीं। हें न रिघेचि कवणें ठायीं। परि कायिसेनि कहीं। गादिजेना जैसें॥ ११२१॥**
**तैसा सर्वत्र सर्व देहीं। आत्मा असतचि असे पाहीं। परि संगदोषें एकेंही। लिप्तु नोहे॥ ११२२॥**
**पुढतपुढती एथें। हेंचि लक्षण निरुतें। जे जाणावें क्षेत्रज्ञातें। क्षेत्रविहिना॥ ११२३॥**

**अर्थ**—अर्जुना! आकाश कोठे नाही व कोण्याठिकाणी शिरले नाही? पण ते कशाने कधीहि ज्याप्रमाणे मळत नाही॥ ११२१॥ त्याप्रमाणे सर्वत्र देहात आत्मा मूळचाच आहे, पाहा! पण एकाहि देहाच्या संगतिदोषाने तो लिप्त होत नाही॥ ११२२॥ वारंवार जेथे हेच एक क्षेत्रज्ञाचे शुद्ध लक्षण सांगायचे की क्षेत्रज्ञाला क्षेत्रावाचून जाणावे॥ ११२३॥

**गूढार्थदीपिका**—क्षेत्र तेवढे जड-विनाशी असून क्षेत्रज्ञ जीव चेतन व अविनाशी आहे; म्हणून तो संपूर्ण क्षेत्राहून निराळा, असंग आहे, असे दृढ जाणल्यानेच "मी ब्रह्म आहे" हा प्रथम अनुभव येतो.

**संसर्गें चेष्टिजे लोहें। परि लोह भ्रामक नोहे। क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे। तेतुला पाडु॥ ११२४॥**
**दीपकाची अर्ची। राहाटी वाहे घरींची। परी वेगळीक कोडीची। दीपा आणि घरा॥ ११२५॥**
**पैंकाष्ठांच्या पोटीं। वन्हि असे किरीटी। परी काष्ठ नोहे या दृष्टी। पाहिजे गा॥ ११२६॥**
**अपाड नभा आभाळा। रवि आणि मृगजळा। तैसाचि हाही डोळां। देखावा पै॥ ११२७॥**

**अर्थ**—लोहचुंबकाच्या संसर्गाने लोखंड चळते, पण लोखंड लोहचुंबक होत नाही. क्षेत्र व क्षेत्रज्ञ या दोहोंतहि तितकेच अंतर आहे॥ ११२४॥ दिव्याची ज्योत घरातील माणसाचा व्यवहार चालविते, पण दिवा व घर यांच्यात कितीतरी वेगळेपणा आहे॥ ११२५॥ अर्जुना! लाकडाच्या पोटात अग्नि असला, तरी लाकूड अग्नि नव्हे अशी जशी आपली दृष्टि असते, तशा दृष्टिनेच देहामध्ये आत्म्याला पाहिले पाहिजे॥ ११२६॥ आकाश व अभ्र, सूर्य व मृगजळ यांच्यात जितकी भिन्नता असते तितकीच देह व आत्मा यांच्यात भिन्नता आहे, हे जाणले पाहिजे॥ ११२७॥

**गूढार्थदीपिका**—भ्रांतीने भासलेला पदार्थ खरोखर अस्तित्वातच नसतो; म्हणून ज्या सत्य वस्तूवर तो भ्रांतीने भासतो, त्या सत्य वस्तूशी त्याचा यत्किंचितहि संबंध राहू शकत नाही. सत्य, अविनाशी, निर्गुण अशा परब्रह्मावर भासणारे जगतहि भ्रांतिजन्य आहे; म्हणूनच सत्य परब्रह्माशी जगताचा यत्किंचितहि संबंध नाही; हाच सिद्धांत माउलींनी मागे पुष्कळदा सांगून पुन: येथेही श्रोत्यांच्या मनांत तो दृढ ठसावा म्हणून वरील ओव्यांतून मांडला आहे.

**यथा प्रकाशयत्येक: कृत्स्नं लोकमिमं रवि: । क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत॥ ३३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे एकच सूर्य संपूर्ण जगताला प्रकाशित करतो, त्याप्रमाणे अर्जुना! क्षेत्रज्ञ हा संपूर्ण क्षेत्राला प्रकाशित करतो॥ ३३॥

**हें आघवेंचि असो एकु। गगनौनि जैसा अर्कु। प्रगटवी लोकु। नांवें नांवें॥ ११२८॥**
**एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा। प्रकाशकु क्षेत्राभासा। यावरुतें हें न पुसा। शंका नेघा॥ ११२९॥**

**अर्थ**—हे सर्व असू दे. ज्याप्रमाणे एकच सूर्य आकाशांत राहून दररोज लोकसृष्टि प्रकट करतो॥ ११२८॥ या देहांतहि तो क्षेत्रज्ञ असाच सर्व भासरूप क्षेत्राला प्रकाशित करणारा आहे. यापुढे याविषयी पुन: शंका घेऊ नकोस व विचारू नकोस॥ ११२९॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा। भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम्॥ ३४॥**
**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोगो नाम त्रयोदशोऽध्याय:॥ १३॥**

**अर्थ**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे परस्पर अत्यंत वैलक्षण्य आहे व भूतसृष्टीचे कारण जी प्रकृति तिचे खरोखर अस्तित्वच नाही असे ज्ञानदृष्टीने ज्यांनी जाणले, ते परमपदाला जातात॥ ३४॥

**शब्दतत्त्वसारज्ञा। पैं देखणी तेचि प्रज्ञा। जे क्षेत्रा क्षेत्रज्ञा अपाडु देखे॥ ११३०॥**
**इया दोहींचें अंतर। देखावया चतुर। ज्ञानियांचें द्वार। आराधिती॥ ११३१॥**

**अर्थ**—हे शब्दतत्त्वाचे सार जाणणाऱ्या अर्जुना! जी क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे वैलक्षण्य पाहते तीच बुद्धि होय व तेच पाहणे होय॥ ११३०॥ क्षेत्र व क्षेत्रज्ञ या दोघांचे अंतर जाणून घेण्याकरिता शहाणे पुरुष, ज्ञानीपुरुषाच्या घराच्या द्वाराची आराधना करतात-म्हणजे ज्ञानीपुरुषाच्या दारात नम्र सेवक होऊन राहतात॥ ११३१॥

**गूढार्थदीपिका**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा योग्य विवेक अनुभवी ज्ञानी पुरुषांच्या साहाय्याशिवाय मनुष्याला केवळ आपल्या बुद्धीने करता येत नाही, असा भाव.

**याचिलागीं सुमती। जोडिती शांतिसंपत्ती। शास्त्रांचीं दुभतीं। पोसिती घरीं॥ ११३२॥**

**अर्थ**—हे शुद्धबुद्धि अर्जुना! याच्याचकरिता (मुमुक्षु लोक) शमादमादि साधनसंपत्ति प्राप्त करून घेतात व अनेक शास्त्ररूपी दुभत्या गायी घरी पोसतात॥ ११३२॥

**गूढार्थदीपिका**—शमदमादि साधनसंपत्तीने क्षेत्रापासून नि:शेष अलग झालेले मनच, शास्त्रानुसार व गुरुपदेशानुसार क्षेत्रविरहित परब्रह्माचे आकलन करू शकते.

**योगाचिया आकाशा। वळघिजे येवढाचि धिंवसा। याचियाचि आशा। पुरुषासि गा॥ ११३३॥**
**शरीरादि समस्त। मानितातिं तृणवत। जीवें संतांचें होत। वाहणधरु॥ ११३४॥**
**ऐसैसियापरी। ज्ञानाचिया भरोवरी। करूनियां अंतरीं। निरुते होती॥ ११३५॥**
**मग क्षेत्र क्षेत्रज्ञाचे। जे अंतर देखती साचें। ज्ञानें उन्मेख तयांचें। वोवाळूं आम्ही॥ ११३६॥**
**आणि महाभूतादिकीं। प्रभेदलीं अनेकीं। पसरलीसे लटिकी। प्रकृति जे हे॥ ११३७॥**
**जे शुकनळिकान्यायें। न लगती लागली आहे। हें जैसें तैसें होये। ठाउवें जयां॥ ११३८॥**

**अर्थ**—हे अर्जुना! योगरूपी आकाशाला मिठी मारावी असे धाडस, पुरुषाला याच्याच प्राप्तीच्या आशेने येते॥ ११३३॥ शरीरादि सर्व पदार्थ तुच्छ मानून जीवभावाने संतांच्या वाहणा डोक्यावर धारण करतात॥ ११३४॥ अशा प्रकारे अंत:करणात ज्ञानाची भर करीत जाऊन ते शुद्ध विवेकसंपन्न होतात॥ ११३५॥ मग जे क्षेत्रक्षेत्रज्ञाचे वैलक्षण्य बरोबर जाणतात, त्यांच्या त्या ज्ञानाला आम्ही आपल्या ज्ञानाने ओवाळू॥ ११३६॥ आणि जी ही खोटी प्रकृति महाभूतादि कार्यपदार्थाने विभक्त होऊन पसरली आहे॥ ११३७॥ जी शुकनळिकान्यायाने पुरुषाला न लागताच लागली आहे. हे जसे आहे, तसेच ज्याला कळून आले॥ ११३८॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे राघूला पकडण्याकरिता केलेली नळी व राघू हे दोन अत्यंत निराळे असतात. राघू नळीवर बसतो व नळी फिरली असता, 'मी पडेन' या भीतीने राघूच नळी पायाने पक्की धरून ठेवतो आणि 'मी नळीहून निराळा आहे', हे विसरतो. त्याचप्रमाणे क्षेत्रज्ञ जीव क्षेत्राहून अत्यंत निराळा आहे, पण हे विसरून तो भ्रांतीने क्षेत्रच ''मी आहे'' असे म्हणतो.

**जैसी माळा ते माळा। ऐसीचि देखिजे डोळां। सर्पबुद्धि टवाळा। उखी होउनी॥ ११३९॥**
**कां शुक्ति ते शुक्ति। हे साच होय प्रतीती। रुपेयाची भ्रांती। जाऊनियां॥ ११४०॥**
**तैसी वेगळी वेगळेपणें। प्रकृति जे अंत:करणें। देखती ते मी म्हणें। ब्रह्म होती॥ ११४१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सर्परूपाने दिसलेली माळा, खोटी सर्पबुद्धि नाहीशी होऊन माळारूपानेच डोळ्यांनी पहावी॥ ११३९॥ किंवा ज्याप्रमाणे शिंपेवर झालेली चांदीची भ्रांति नाहीशी होऊन मूळच्या शिंपेची, शिंपरूपाने खरी प्रतीति येते॥ ११४०॥ त्याप्रमाणे पुरुषाहून वेगळी असलेली जी प्रकृति, तिला जे वेगळेपणानेच अंत:करणाने पाहतात, ते पुरुष, मी म्हणतो, ब्रह्म होतात॥ ११४१॥

**गूढार्थदीपिका**—अखंड, असंगच राहत असलेल्या क्षेत्रज्ञ जीवाने आपले हे स्वरूप जाणले की प्रकृति व प्रकृतीचे संपूर्ण जगत्कार्य यांना स्वतंत्र अस्तित्वच उरत नाही व तो सर्व अज्ञानभ्रांतीचा पसारा होता, असा अनुभव येऊन व प्रकृत्यादिकांचा अत्यंत निरास होऊन तो ठायींच ब्रह्मरूप होऊन राहतो.

**जें आकाशाहूनि वाड। जें अव्यक्ताची पैल कड। जें भेटलिया अपाडा पाड। पडों नेदी॥ ११४२॥**
**आकारु जेथ सरे। जीवत्व जेथें विरे। द्वैत जेथ नुरे। अद्वय जें॥ ११४३॥**
**तें परमतत्त्व पार्था। होती ते सर्वथा। जे आत्मानात्मव्यवस्था। राजहंसु॥ ११४४॥**

**अर्थ**—जे आकाशाहून मोठे व जे अव्यक्तप्रकृतीचे पलीकडील तीर आहे. जे प्राप्त झाले असता ब्रह्माहून विलक्षण असलेल्या पदार्थाला ब्रह्माच्या बरोबरीचे होऊ देत नाही॥ ११४२॥ आकार जेथे संपतो, जीवत्व जेथे विरून जाते द्वैत जेथे उरत नाही, असे जे अद्वय आहे॥ ११४३॥ अर्जुना! दूध पाणी निवडण्यात प्रवीण असलेल्या राजहंसाप्रमाणे जे आत्मा व अनात्मा यांचा विवेक करण्यात प्रवीण आहेत. तेच परमतत्त्वरूप होऊन राहतात॥ ११४४॥

**ऐसा हा जी आघवा। श्रीकृष्णें तया पांडवा। उगाणा दिधला जीवा। जीवाचिया॥ ११४५॥**

**येर कलशींचें येरीं। रिचविजे जयापरी। आपणपें तया श्रीहरी। दिधलें तैसें॥ ११४६॥**
**आणि कोणा देता कोण। तो नर तैसा नारायण। वरी अर्जुनातें श्रीकृष्ण। हा मी म्हणे॥ ११४७॥**
**परि असो तें नाथिलें। ना पुसतां कां मी बोलें। किंबहुना दिधलें। सर्वस्व देवें॥ ११४८॥**
**कीं तो पार्थु जी मनीं। अझुनी तृप्ती न मनी। अधिकाधिक उतान्ही। वाढवीतु असे॥ ११४९॥**
**स्नेहाचिया भरोवरी। आंबुथिला दीपु घे थोरी। चाड अर्जुना अंतरीं। परिसतां तैसी॥ ११५०॥**

**अर्थ**—याप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमाऊली श्रोत्यांना म्हणते, महाराज! असा हा संपूर्ण क्षेत्रक्षेत्रज्ञाचा उलगडा श्रीकृष्णाने आपल्या जीवनापेक्षाहि प्रिय असलेल्या अर्जुनाला करून दिला॥ ११४५॥ ज्याप्रमाणे एका कलशातील पाणी दुसऱ्या कलशात ओतावे, त्याप्रमाणे श्रीहरीने अर्जुनाला आपण आपल्याला दिले—म्हणजे भगवंतांनी आपली शुद्ध स्वरूपस्थिति अर्जुनाचे अंत:करणात प्रगट केली॥ ११४६॥ आणि अर्जुन तो नर होय तसेच श्रीकृष्ण नारायण होत. यावरहि अर्जुनाला श्रीकृष्ण म्हणतात 'हा मीच होय'. याप्रमाणे ते दोघे एकच असल्यामुळे तेथे देणारा कोण असणार व दुसऱ्या कोणाला दिले जाणार!॥ ११४७॥ पण ते असो. न विचारता मी व्यर्थ का बोलावे? फार काय सांगायचे! भगवंतांनी अर्जुनाला आपले सर्वस्व दिले॥ ११४८॥ पण महाराज! तो अर्जुन मनामध्ये अजूनहि ऐकण्याचि तृप्ती मानित नव्हता. उलट त्याची अधिक अधिक ऐकण्याची उत्कंठा वाढतच होती॥ ११४९॥ उजळलेला दिवा जसजशी तेलाची भर घालावी तसतसा तो मोठा होत जातो, त्याचप्रमाणे भगवंताच्या मुखाने श्रवण करीत असता अर्जुनाचे अंत:करणातहि ऐकण्याची इच्छा वाढत होती॥ ११५०॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताच्या मुखातून निघणाऱ्या शब्दांचे अर्जुनाला जे इतके प्रेम वाटत होते, ते त्याचे भगवंतावरील प्रेमच त्याद्वारा व्यक्त होत होते.

**तेथ सुगरणी आणि उदारे। रसज्ञ आणि जेवणारे। मिळती मग अवतरे। हातु जैसा॥ ११५१॥**
**तैसें जी होतसे देवा। तया अवधानाचिया लवलवा। पाहातां व्याख्यान चढलें थांवा। चौगुणें वरी॥ ११५२॥**
**सुवायें मेघु सांवरे। जैसा चंद्रें सिंधु भरे। तैसा मातला रसु आदरें। श्रोतयाचेनि॥ ११५३॥**
**आतां आनंदमय आघवें। विश्व कीजेल देवें। तें रायें परिसावें। संजयो म्हणे॥ ११५४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे उत्तम स्वयंपाक करणारी असून तसेच सढळ हाताने वाढणारी आहे आणि उत्तम स्वयंपाकाची चंव जाणणारे असून तेच जेवणारे आहेत, अशी जोड मिळाली असता ज्याप्रमाणे वाढणाऱ्या स्त्रियेला वाढण्याची हौस वाटते॥ ११५१॥ त्याप्रमाणेच, महाराज! देवालाहि होत होते. अर्जुनाच्या अवधानाची नित्यनूतनता पाहून श्रीकृष्णाला व्याख्यान करण्यास चौपटीपेक्षा अधिक बळ चढले॥ ११५२॥ ज्याप्रमाणे अनुकूल वाऱ्याने, वर्षाव होण्यासारखे मेघ सांवरले जातात किंवा चंद्राच्या योगाने समुद्राला भरती येते, त्याप्रमाणे श्रोत्यांच्या आदरपूर्वक ऐकण्याने वक्त्याच्या बोलण्यांत रसाची पुष्टि झाली॥ ११५३॥ संजय राजा धृतराष्ट्राला म्हणतो, आता पुढे भगवान श्रीकृष्ण जे आपल्या बोलण्याने सर्व जगत आनंदमय करतील, ते बोलणे महाराजांनी ऐकावे॥ ११५४॥

**एवं जे महाभारतीं। श्रीव्यासें अप्रांतमती। भीष्मपर्वीं संगती। म्हणितली कथा॥ ११५५॥**
**तो श्रीकृष्णार्जुनसंवादु। नागरीं बोलीं विशदु। सांगोनि दाऊं प्रबंधु। वोवियेचा॥ ११५६॥**
**नुसधीचि शांतिकथा। आणिजेल कीर वाक्पथा। जे शृंगाराचां माथां। पाय ठेवी॥ ११५७॥**
**दाऊं वेल्हाळें देशी नवी। जे साहित्यातें वोजावी। अमृतातें चुकी ठेवी। गोडसेपणें॥ ११५८॥**
**बोल वोल्हावितेनि गुणें। चंद्रासि घे उमाणे। रसरंगी भुलवणें। नाद लोपी॥ ११५९॥**
**खेचराचियाही मना। आणी सात्त्विकाचा पान्हा। श्रवणासवें सुमना। समाधि जोडे॥ ११६०॥**
**तैसा वाग्विलास विस्तारूं। गीतार्थें विश्व भरूं। आनंदाचें आवारूं। मांडू जगा॥ ११६१॥**
**फिटो विवेकाची वाणी। हो कानामनाची जिणी। देखो आवडे तो खाणी। ब्रह्मविद्येची॥ ११६२॥**
**दिसो परतत्त्व डोळां। पाहो सुखाचा सोहळा। रिघो महाबोधसुकाळा-। माजीं विश्व॥ ११६३॥**
**हें निफजेल आतां आघवें। ऐसें बोलिजेल बरवें। जे अधिष्ठिला असे परमदेवें। श्रीनिवृत्ती मी॥ ११६४॥**

**म्हणोनि अक्षरीं सुभेदीं। उपमा श्लोक कोंदाकोंदी। झाडा देईन प्रतिपदीं। ग्रंथार्थासी॥ ११६५॥**
**हा ठावोवरी मातें। पुरतया सारस्वतें। केलें असें श्रीमंते। श्रीगुरुरायें॥ ११६६॥**
**तेणें जी कृपासावायें। मी बोलें तेतुले सामाये। आणि तुमचिये सभे लाहें। गीता म्हणे॥ ११६७॥**
**वरि तुम्हां संतांचे पाये। आणि मी लाधलों आहे। म्हणोनि जी नोहे। अटक कांहीं॥ ११६८॥**
**प्रभु काश्मिरीं मुकें। नुपजे ही कौतुकें। नाहीं उणी सामुद्रिकें। लक्ष्मीयेसी॥ ११६९॥**
**तैसी तुम्हां संतांपासीं। अज्ञानाची गोठी कायसी। यालागीं नवरसीं। वरुषेन मी॥ ११७०॥**

**अर्थ**—याप्रमाणे अमर्याद अशा बुद्धिमान व्यासमुनींनी भीष्मपर्वाच्या संगतीने महाभारतामध्ये जी कथा सांगितली आहे॥ ११५५॥ तो श्रीकृष्ण व अर्जुन यांचा संवाद ओवीप्रबंधात ग्रथित करून सुंदर मराठी भाषेतून स्पष्ट करून दाखविणार आहे॥ ११५६॥ ही कथा शांतरसाला धरून असली तरी, ती शृंगाररसाच्याहि डोक्यावर पाय ठेविल-म्हणजे शृंगाररसापेक्षाहि चित्ताकर्षक होईल-अशा रीतीने मी आपल्या मराठी वाणीने ती सांगेन॥ ११५७॥ साहित्याला शोभा आणील व गोडपणाने अमृतालाहि नावे ठेवील अशी सुंदर नवी मराठी भाषा निरूपणातून दाखविन॥ ११५८॥ चित्त प्रसन्न करण्याच्या गुणामुळे माझे शब्द चंद्रप्रकाशाचे माप घेतील-म्हणजे चंद्रप्रकाशहि माझ्या शब्दापेक्षा मर्यादित चित्त प्रसन्न करणारा ठरेल-आणि शब्दाने व्यक्त केलेल्या रसात रंगून मोहित झालेल्या मनाला दशनादहि ऐकू येणार नाहीत॥ ११५९॥ माझे बोल ऐकल्याबरोबर अत्यंत रजोगुणी-तमोगुणी व आकाशात भटकणाऱ्या अशा पिशाच्चादि प्राण्यांच्या मनाला देखील सत्वगुणाचा पाझर फुटेल व शुद्ध मनाच्या पुरुषांना समाधि प्राप्त होईल॥ ११६०॥ अशा प्रकारच्या शब्दविलासाचा विस्तार करून संपूर्ण विश्वात भगवद्गीतेचा अर्थ प्रकट करू आणि संपूर्ण जगाभोवती ब्रह्मानंदाचा कोट उभारू॥ ११६१॥ लोकात दिसून येणारी आत्मानात्मविवेकाची उणीव नाहीशी होवो. कान व मन असण्याचे सार्थक होवो व वाटेल त्याच्या दृष्टीला ब्रह्मज्ञानाची खाणी दिसो॥ ११६२॥ सर्वांच्या डोळ्याला एक सर्वत्र परब्रह्मच दिसो. सर्वजण ब्रह्मसुखाचा सोहळाच पाहोत आणि संपूर्ण विश्वाला ब्रह्मबोधाचा सुकाळ होवो॥ ११६३॥ सर्व देवांचा देव व श्रीसद्गुरु निवृत्तिनाथ यांचेच माझ्या चित्तात अधिष्ठान असल्यामुळे इच्छिल्याप्रमाणे सर्व घडून येईल असेच मी आता सुंदर निरूपण करणार आहे॥ ११६४॥ म्हणून ग्रंथाचा अर्थ सांगतांना उपमा व श्लोक यांच्या झालेल्या दाटीत शब्द स्पष्ट निराळे करून प्रत्येक शब्दाचे अर्थ व त्यातील भाव सांगेन॥ ११६५॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीमंत श्रीगुरु निवृत्तिनाथांनी इतके करता येण्यापुरते मला साहित्यसंपन्न केले आहे॥ ११६६॥ महाराज! श्रीगुरुकृपेच्या साहाय्यामुळेच मी बोलतो तितके माझ्याठिकाणी साठविले आहे आणि तुम्हा श्रोत्यांच्या सभेत गीतार्थ सांगण्यास मी समर्थ झालो आहे॥ ११६७॥ आणखी शिवाय तुम्हा संतांचे चरण आज मला प्राप्त झाले असल्यामुळे मला काही एक अवघड वाटत नाही॥ ११६८॥ हे प्रभो! सरस्वतीच्या पोटी मुके मूल कौतुक म्हणूनहि जन्मू शकत नाही. लक्ष्मीच्या हातावर सामुद्रिक लक्षणे कधी कमी नसतात॥ ११६९॥ त्याप्रमाणे तुम्हां संतांजवळ अज्ञानाची गोष्ट कोठून राहणार! म्हणून तुमच्या कृपेने मी नवरसाने परिप्लुत असे निरूपण करणार आहे॥ ११७०॥

**गूढार्थदीपिका**—माउलीचे सर्व उद्गार स्वाहंकाराचे नसून ज्ञानभक्तीने पूर्णब्रह्म झालेल्या श्रीसद्गुरुच्या व संताच्या अगाध कृपासामर्थ्यावर विकल्परहित दृढ विश्वास ठेवणाऱ्या शिष्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात हे व्यक्त करणारे व त्यांचा गौरव करणारे आहेत.

**किंबहुना आतां देवा। अवसरु मज देयावा। ज्ञानदेव म्हणे बरवा। सांगेन ग्रंथु॥ ११७१॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां त्रयोदशोऽध्यायः॥ १३॥**

**अर्थ**—श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हे प्रभो! फार काय सांगावे! आता मी सुंदर ग्रंथ सांगणार आहे, मला अवकाश द्या॥ ११७१॥

**श्रीसद्गुरुमाउलीच्या कृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह पूर्ण झाला तो श्रीसद्गुरुचरणी समर्पण असो.**



## समारोप

मागील बाराव्या अध्यायात माउलींनी ब्रह्मज्ञानानंतरहि सगुण साकार भगवंताच्या भक्तीची आवश्यकता व थोरवी गायिली.

भगवंताची सगुण व निर्गुण अशी दोन रूपे आहेत. निर्गुणस्वरूप अपरिणामी, अस्फुट, अद्वैत सच्चिदानंदस्वरूप आहे, तसेच सगुणस्वरूपहि शुद्ध परब्रह्मस्वरूपच आहे. ज्याप्रमाणे सोन्याची पारख झाल्यावाचून हा अलंकार सोन्याचा आहे. अशी खात्री होत नाही व त्याचे प्रेम वाटत नाही त्याप्रमाणे भगवंताच्या निर्गुणस्वरूपाचेहि नि:संदिग्ध ज्ञान झाल्याखेरीज भगवंताच्या सगुणस्वरूपाचेहि पूर्णब्रह्मत्व कळून येत नाही; म्हणून या तेराव्या अध्यायात निर्गुण म्हणजे गुणरहित अशा शुद्ध स्वरूपाचे पुन: विवेचन केले आहे.

भगवान म्हणतात, अर्जुना! या शरीराला क्षेत्र असे म्हणतात व या क्षेत्राला जो जाणतो त्याला क्षेत्रज्ञ म्हणतात. सर्व क्षेत्राचे ठिकाणी मीच एक क्षेत्रज्ञ आहे, असे जाण. तेथे क्षेत्र कोणते, कोणत्या प्रकारचे आहे, व कोणकोणत्या विकारांनी युक्त आहे, हे मजपासून संक्षेपत: ऐक.

वेदान्तदर्शन सोडून इतर दर्शनकारांनी क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा विचार केला असला तरी त्यांना त्यांचा योग्य निवाडा करता आला नाही, कारण वेदान्तदर्शनात क्षेत्रज्ञ हा अविनाशी मानला असून तद् व्यतिरिक्त सर्व भ्रांतिजन्य नाशिवंत मानले आहे. पण इतर दर्शनकारानी क्षेत्रज्ञासह सर्वच सत्य मानले असल्यामुळे क्षेत्रज्ञासह ते सर्व मर्यादित व नाशिवंत होतात व शून्यवाद गळी येतो.

पंचमहाभूते, अहंकार बुद्धि, अव्यक्त, दहा इंद्रिये, त्यांचे विषय मन, इच्छा, द्वेष, सुख, दु:ख, या सर्वांचा संघात चेतना व धृति या छत्तीस तत्वांचा क्षेत्रात समावेश होतो. तसेच अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, क्षांति, आर्जव, श्रीगुरुसेवा, शौच, स्थैर्य, आत्मविनिग्रह, विषयांचे ठिकाणी वैराग्य, गर्वरहितता, जन्म-मृत्यू-जरा-व्याधि इत्यादि दु:खांचे ठिकाणी दोष पाहणे, देह-स्त्री-गृह-पुत्र इत्यादिकांविषयी यत्किंचित् आसक्ति नसणे, इष्ट व अनिष्ट यांचे ठिकाणी समता, परमेश्वराचे ठिकाणी अनन्यपूर्वक अव्यभिचारी भक्ति, एकान्तसेवन, आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचे नित्यत्व जाणणे व झालेल्या ज्ञानाने परमात्मसाक्षत्कार होणे अशी, ज्ञान प्राप्त झाले असता, लक्षणे होतात. या लक्षणाच्या उलट लक्षणाचे अज्ञान असते.

जे ज्ञान जाणले असता मनुष्य अविनाशी होतो, ते परब्रह्म होय. त्याला सत् व असत् या शब्दानी संबोधिता येत नाही. त्या ज्ञेयाला विश्वबाहु, विश्वांघ्रि, विश्वतश्चक्षु, विश्वमूर्धा अशीहि नावें आहेत तेच ज्ञेय, मनबुद्धिसह संपूर्ण इंद्रिये व सत्वादिगुण या रूपाने प्रत्ययाला येते. पण ते सर्वांपासून निराळे आहे. तसेच ते सत्वादिगुणांचा संबंध नसतांहि गुण भोगणारे आहे. ते ज्ञेय प्राणिमात्रांच्या आतबाहेर व्यापून असून चराचररूपहि झाले आहे. ते एक अस्फुट असून सर्व सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व संहार करणारे आहे. व ते सर्व भूतामात्रांच्या हृदयामध्ये स्थित आहे.

अशा प्रकारे क्षेत्र, ज्ञान, अज्ञान व ज्ञेय जे परब्रह्म यांचे संक्षेपत: वर्णन करून अर्जुनाला भगवंतानी सांगितले; पण अर्जुन ते ग्रहण करू शकला नाही अशी शंका येऊन भगवंतांनी त्या चार तत्त्वांची सांख्यमतानुसार पुरुष व प्रकृति अशा दोनच तत्त्वात विभागणी करून अर्जुनाला समजावून दिले.

भगवान म्हणतात, अर्जुना! प्रकृति व पुरुष हे दोन्ही पदार्थ अनादि असून गुण व सर्व कार्यरूप पदार्थ प्रकृतिपासून झाले आहेत, असे जाण. पुरुष कार्यकारणादिरूपाने परिणाम पावलेल्या प्रकृतीचे ठिकाणी राहून प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या गुणांचा भोग घेतो व बऱ्या-वाईट योनींमध्ये जन्म होण्याला हा गुणांचा संगच कारण

आहे. वास्तविक पाहता हा प्रकृतीच्या कार्यात न गुंतता प्रकृतीच्या जवळ राहून या देहातच केवळ साक्षी होऊन राहणारा असून तो सर्वांचा पोषण करणारा व सर्वाचे नियमन करणारा सर्वेश्वर आहे. यालाच परमात्माहि म्हणतात. अशा प्रकारे जो त्याला जाणतो तो जन्ममरणापासून मुक्त होतो.

याला जाणण्याचे पुष्कळ प्रकार आहेत. कोणी ध्यानाच्या योगाने अंत:करणवृत्तिद्वारा त्याला आपल्याच ठिकाणी पाहतात, कोणी सांख्ययोगाचे द्वारा व कोणी कर्मयोगाचे द्वारा त्याला पाहतात.

कोणी परमेश्वराशी ऐक्य पावलेले जे सत्पुरुष आहेत त्यांच्या ठिकाणी अचल श्रद्धा ठेवून त्यांच्याकडून एकचित्ताने परमात्म्याच्या स्वरूपाचे श्रवण करतात व तेहि जन्ममृत्यूपासून मुक्त होतात.

सारांश, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगामुळे सर्व जडचैतन्यरूप अशा जगाची उत्पत्ति झाली आहे; पण क्षेत्राहून क्षेत्रज्ञ निराळा असून तो सर्व भूतांचे ठिकाणी समस्थितीने वास करतो असे जो पाहतो तोच परमगतीला प्राप्त होतो. अर्जुना! हा क्षेत्रज्ञ परमात्मा अनादि असल्यामुळे अविनाशी आहे, म्हणून या शरीरांत तो आहे तरी तो कर्म करीत नाही व कर्माने लिप्त होत नाही. अशा प्रकारे क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे अत्यंत वैलक्षण्य आहे.

शेवटी भगवान म्हणतात, अर्जुना! भूतसृष्टि व सृष्टीचे कारण जी प्रकृति हे काही एक अस्तित्वात नसून एक आत्माच आहे, असे ज्ञानदृष्टीने ज्यांनी दृढ जाणले तो माझ्या परमपदाला प्राप्त होतो.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**

